# मातांनो
# पोलिओ चे उच्चाटन करणें तुम्हाला सहज शक्य आहे !




**९ डिसेंबर व २० जानेवारी या तारखा राष्ट्रीय पोलिओ उच्चाटन-दिन म्हणून घोषित झाल्या आहेत.**

आपण अगोदरच आपल्या बालकाला पोलिओ-निरोधक औषध दिले असेल, पण खबरदारी म्हणून ९ डिसेंबर व २० जानेवारी रोजी आयोजित पोलिओ उच्चाटन शिबिरात जाऊन तीन वर्षा खालील आपल्या बालकाला पुन्हा एकदा पोलिओ-निरोधक औषध द्या.

**आरोग्य-संपन्न मुलांचे भविष्य म्हणजे आपल्या देशाचे भविष्य !**

**इ.स. २००० पर्यंत पोलिओ-रहित भारताच्या निर्मितीसाठी सहर्ष योगदान द्या.**



**PolioPlus**

**९ डिसेंबर, १९९५ व २० जानेवारी, १९९६**

**या तारखा**
लक्षात ठेवा.
हे दिनांक आपल्या बालकांच्या संरक्षणाचे दिवस आहेत.



विश्व-समाचार

## हाँगकाँगची वार्ता

अलीकडे वर्तमान-पत्रातून आपण हाँगकाँगच्या बऱ्याच बातम्या वाचतो. जगाच्या नकाशावर हाँगकाँग म्हणजे एक ठिपका ! हाँगकाँग चीनच्या आग्नेय दिशेला आहे. हा छोटा भूभाग १००० वर्ग किलोमीटर प्रदेशात व्यापलेला २५ बेटांचा एक समूह आहे. याची लोकसंख्या ५९,००,००० आहे.

हाँगकाँग 'क्राउन कॉलनी' नावाने सुप्रसिद्ध आहे. गेली १५५ वर्षे हा ब्रिटिशांच्या ताब्यात आहे. गेल्या सप्टेंबर मधे येथील विधान-सभेच्या शेवटच्या निवडणुका झाल्या. कारण ३० जून, १९९७ रोजी ब्रिटिश हाँगकाँग सोडून जातील आणि तो चीन मधे विलीन होऊन जाईल.

सोळाव्या शतकात पोर्तुगीज लोक सर्वात अगोदर इथे आले. अठराव्या शतकाच्या प्रारंभी ब्रिटिश इथे आले. तोपर्यंत ब्रिटिशांनी भारतात आपली सत्ता कायम केलेली होती. ईस्ट इंडिया कंपनीने चीनशी आपले व्यापारी संबंध अधिक दृढ केले. ब्रिटनचा असा आग्रह होता की वस्तूंची देवाण-घेवाण करण्यासाठी अफूचा उपयोग केला जावा. यामुळे चीन व ब्रिटन यांच्यातील संबंध बिघडले व युद्ध सुरू झाले. शेवटी चीनला हाँगकाँग ब्रिटनला द्यावे लागले. हे घडले सन १८४१ मध्ये. सन १८९८ मध्ये चीनने ९९ वर्षांच्या करारावर हाँगकाँग ब्रिटनला दिले. १९७४ मध्ये दोन्ही देशात झालेल्या तहानुसार सन १९९७ मध्ये ब्रिटनने हाँगकाँग चीनला परत द्यायचे आहे.

गेल्या पन्नास वर्षात आधुनिक औद्योगिक क्षेत्रात हाँगकाँगने अभूतपूर्व प्रगति केली आहे, विद्युत्, रसायने, विविध उपकरणे, प्लॅस्टिक, कापड, जहाजे बांधणे आदि क्षेत्रातील हाँगकाँगचा विकास लक्षणीय आहे. दक्षिण कोरिया, सिंगापूर, तैवान (हा ही चीनचाच एक भाग होता) यांच्या बरोबर हाँगकाँगला ही 'आशियाचा वाघ' म्हणून संबोधले जाते.

नुकत्याच इथे ज्या निवडणुका झाल्या त्यात दोन प्रमुख पक्षांनी भाग घेतला होता. 'डेमोक्रॅटिक पार्टी' हा चीनच्या विरोधी पक्ष होता, तर चीनचे समर्थन करणारा पक्ष होता 'डेमोक्रॅटिक अलायन्स'. साठ निर्वाचन-क्षेत्रात 'डेमोक्रॅटिक पार्टी' ने मताधिक्य मिळवून विजय संपादन केला. डेमोक्रॅटिक पक्षाचा जय हे चीनला एक आव्हान होते.

सन १९८४ मध्ये ब्रिटन व चीन यांच्यात जो तह झाला त्यानुसार चीन अन्य विषयां बरोबर हाँगकाँगच्या व्यापार, नागरी स्वातंत्र्य इत्यादि मध्ये कसली ही ढवळाढवळ करणार नाही. हा या तहाचा प्रमुख भाग होता. याचा अर्थ असा होतो की 'देश एक, पण पद्धति दोन' अमलात येतील.

ब्रिटन हाँगकाँगच्या जनतेला चीन विरुद्ध भडकावीत आहे असा चीनचा आरोप आहे. जर असेच चालू राहिले तर चीन हाँगकाँग मधे झालेल्या निवडणुका रद्द करील असा सावधानीचा इशारा चीनने ब्रिटनला दिला आहे.

अशा परिस्थितीत मुख्य देश चीनशी मिळून-मिसळून हाँगकाँग राहू शकेल का ? अथवा आपल्याला स्वतंत्र देश म्हणून घोषित करील? या प्रश्नांचे उत्तर दोन वर्षांच्या काळात मिळेल.





# मान्त्रिक

राजगढची राजकुमारी रूपवती असामान्य लावण्यवती होती. अठरा वर्षांची झाली, तरी अजून ती भारी खोडकर होती. मागचा-पुढचा विचार न करता मनात आलेली कल्पना ती अमलात आणी. डोंगरावर असलेल्या देवळात जायचा बहाणा करून ती खूपदा आपली प्रिय सखी विमला हिला बरोबर घेऊन जंगलात भटकायला जाई.

जंगलात पोचल्यावर तिथे असलेल्या एका पहाडावरच्या जुन्या किल्ल्याकडे ती एकटक पहात राही. किल्ल्याकडे बोट दाखवून खूपदा ती विमलाला म्हणे, ''केंव्हा तरी एकदा त्या किल्ल्यात जाऊन यावंसं वाटतं मला !''

तिच्या बोलण्याने घाबरून विमला म्हणे, ''राजकुमारी,असल्या अुजाड अन् ओस पडलेल्या किल्ल्यात बहुधा एकाद्या मान्त्रिकाची, किंवा राक्षसाची वस्ती असते.''

''तू तर अगदीच भित्री-भागुबाई आहेस ! एकाद्या दिवशी एकटी का होईना, पण तिथे जाऊन येणारच मी !'' रूपवती म्हणे.

इकडे राजदम्पतींने विचार केला की, आता कन्येचा लवकर विवाह करून दिला, तर ती सुधारेल. अनेक स्थळे शोधूनशोधून त्यांनी रामगिरीचा युवराज रत्नसेन याच्याशी तिचा विवाह ठरवून टाकला.

रूपवतीला हा विवाह अजिबात मान्य नव्हता. आपल्या माता-पित्यांना तिने विचारले, ''मला कळू दे तरी, की या राजपुत्रात असं काय लागून गेलंय?''

कन्येच्या या प्रश्नाचे आश्चर्य वाटून राजा म्हणाला, ''हा रामगिरीचा युवराज रत्नसेन चांगला सुशिक्षित आहे, गुरुकुलात त्याचं अुत्तम प्रकारे शिक्षण पुरं झालेलं आहे. आज ना अुद्या तो रामगिरीचा राजाही बनेल.''

या अुत्तराबरही असंतुष्ट होअून रूपवती म्हणाली, ''सुन्दर आहे, सुशिक्षित आहे, केंव्हा न केंव्हा राजा बनेल - या तर अगदी सामान्य अन् नैसर्गिक गोष्टी झाल्या पिताजी ! पण त्याच्यात असा कोणता विशेष गुण आहे की मी त्याच्यावर मुग्ध होऊन त्याच्याशी लग्न करावं? माझ्याशी विवाह करणाऱ्या पुरुषात काही खास वैशिष्ट्य असावं.''

राजा-राणी म्हणाले - ''आमचा निश्चयही अैकून घे आता ! तुझा विवाह लवकरच होणार आहे, अन् तोही रत्नसेनशीच !''

थोड्या दिवसात आपल्या इष्टमित्रांसह रत्नसिंह राजगढला येअून राजाच्या अतिथिगृहात पाहुणचारही घेअू लागला. आता तिसऱ्या दिवशीचा विवाहमुहूर्त होता, इतक्यात रूपवतीच अंत:पुरातून अदृश्य झाली.

रूपवतीची प्रियसखी विमला मात्र समजून चुकली होती की, 'राजकुमारी जाणूनबुजूनच मुद्दाम अदृश्य झालेली आहे ! पहाडावरील किल्ल्यात जाण्याची तिची फारा दिवसांची इच्छा तिने या निमित्ताने पुरी करून घेतली असणार, अन् ती सध्या नक्कीच तेथे असणार.' विवाहमुहूर्तावर तिला परत आणणे हे आपले कर्तव्य आहे असे विमलाला वाटले आणि कोणाला काही न सांगता ती किल्ल्याकडे निघाली. पहाडावर पोचतापोचता संध्याकाळचे पाच वाजले. किल्ल्याचा दरवाजा बन्द होता, पण दाराच्या फटीतून तिने आत पाहिले, तेंव्हा तिला खूप आश्चर्य वाटले अन्



तिला भीतीने कापरे भरले !

त्या अुजाड किल्ल्याच्या दरवाज्याजवळच एक मोठा तलाव होता. तलावाच्या किनाऱ्यावर एक कुरूप माणूस बसलेला होता. हातातल्या वेताच्या काठीचे टोक त्याने पाण्यात सोडलेले होते. त्याच्या कमरेत धनुष्यासारखा बाक असून त्याला छोटीशी दाढी होती. जवळच राजकुमारी रूपवती अश्रू ढाळत बसलेली होती.

त्या दाढीवाल्याने काठी पाण्याबाहेर ओढत राजकुमारीला म्हटले, ''ए पोरी, मी काही कोणी चांगला माणूस नाहीय. जी कोणी मुलगी माझ्याशी लग्न करायला तयार होत नाही, तिला मी मासोळी बनवून या तळ्यात

सदाशिव आठवले



सोडून देतो.''

रूपवती त्याला म्हणाली, ''मी रामगिरीच्या युवराजाची पत्नी बनणार होते, पण माझं दुर्भाग्य मला इथे घेऊन आलं. तू तर एक मान्त्रिक आहेस, म्हातारा आहेस. तुझे सारे केस पिकलेत, दात पडून गेलेत, कंबरेचं धनुष्य झालंय. तुझ्यासारख्या जख्ख-डाशी लग्न करू मी? हट्, कधीच नाही जमणार ते !''

तिच्याकडे नाराजीने पहात मान्त्रिक म्हणाला, ''घमेंड सोडून दे आपली ! तोंडात येईल ते बकू नकोस. तुला तलावात सोडण्यापूर्वी दोन दिवसांची मुदत देतो. तोपर्यन्त ही घागर, हेच जग तुझं !''

दुसऱ्याच क्षणी रूपवती मासोळी बनून जमिनीवर तडफडू लागली. विकटपणे हसत मान्त्रिकाने तिला अुचलून घागरीत टाकले, आणि करून झाकण लावले.

अंधार पडू लागलेला होता. मान्त्रिकाने एक मशाल पेटवली. विमला अजूनही हे सर्व पहात होती. आता धैर्य एकवटून तिने दरवाजा खटखटवला. मान्त्रिक बडबडत दरवाजाकडे निघाला, ''रात्रीच्या वेळीही इकडे यायचं धाडस करणारं कोण आहे? अन् वर दरवाजाही वाजवत आहे !''

त्याने दरवाजा अुघडताच घाबरत घाबरत विमला म्हणाली, ''मी फार लांबून आले आहे. अंधारामुळे इथे अडकून पडलेय. आपल्या या किल्ल्यात मला रात्रभर राहू द्याल का दाजी? मान्त्रिकाचा चेहराच असा होता की कोणीही त्याला घाबरेल; त्याच्याबद्दल कोणालाही घृणा वाटेल. त्यामुळे विमलाच्या तोंडचे 'दाजी' संबोधन त्याला भारी गोड वाटले. फार आनन्दाने तो अुत्तरला, ''हो, हो! का नाही राहू देणार? तुझ्यासारख्या सुन्दर मुलींना नक्की आश्रय मिळेल इथे. ये, आत ये.''

विमला आत आल्याबरोबर मान्त्रिकाने दरवाजा बन्द करून घेतला. नंतर तो म्हणाला, ''तुझं सौन्दर्य पहायला या एका मशालीचा अुजेड पुरेसा नाहीय. थांब हं, मी आतून आणखी एक मशाल पेटवून आणतो.'' आणि तो एका एकाकी खोलीकडे वळला.





ही संधी साधून विमलाने घागरीचे झाकण अुघडले. रूपवतीने तिला ताबडतोब ओळखले. विमला तिला म्हणाली, ''तुम्हाला इथून सुरक्षित घेऊन जायला आलेय मी. आता भिण्याचं काही कारण नाही.''

इतक्यात मान्त्रिकाला परत येताना पाहून विमलाने घागरीचे झाकण बन्द केले. तो जवळ आल्याबरोबर ती म्हणाली, ''वा:! काय छान किल्ला आहे हा ! अगदी स्वर्गासारखा वाटतोय! या वयातही तुम्ही किती छान दिसताय; मग सत्तर वर्षपूर्वी तर किती रूबाबदार दिसत असाल !''

विमलाच्या प्रशंसेने चढून जाऊन मान्त्रिक म्हणाला, ''हो! सत्तर वर्षांपूर्वी मला पाहिलं असतंस, तर बेशुद्धच झाली असतीस तू ! तोंडून शब्दही निघाला नसता तुझ्या ! काहीही असो. आता आपण दोघांनी एकमेकांना पसन्त केलंय. माझ्याशी लग्न कर अन् या स्वर्गात कायमची रहा !''

''हां दाजी, माझा तसाच विचार आहे. इथं चोराचिलटांचं भय तर नाही नं?'' घाबरल्यासारखे करीत विमलाने विचारले. डोळे लाल करत म्हातारा म्हणाला, ''काय बोललीस? इथे चोरांची भीती? मनात आणलं तर हा किल्ला आकाशमार्गानं अुचलून नेऊन विन्ध्य पर्वतात ठेवीन मी ! माझी मन्त्रशक्ती अजब आहे. अशक्यातली अशक्य गोष्ट ही करून दाखवू शकतो मी. तितकी ताकत आहे माझ्यात.'' एक पळभर थांबून तो पुन्हा म्हणाला, ''अन् चोरी होईल असं वाटायला तुझ्याजवळ तरी असं काय हिरे-जवाहीर आहे?''

ताबडतोब हिरा जडवलेली आपली अंगठी दाखवत विमला म्हणाली, ''दाजी, हिरा जडवलेली ही अंगठी साधीसुधी नका समजू! हिच्यात अद्‌भुत शक्ति आहे. नुकताच एक सिद्ध पुरुष आकाशमार्गानं जाताजाता रात्रीच्या वेळी रस्ता चुकला अन् आमच्या घरामागे खाली अुतरला. आमच्या कुटुम्बानं त्याचा आदर-सत्कार, पाहुणचार केला. सकाळी परत जाताना त्यानं ही अंगठी मला दिली.''



''सिद्धानं दिली? पण हिच्यात कसलं खास वैशिष्ट्य आहे, ते तर सांग.'' आश्चर्याने मान्त्रिकाने विचारले.

''समोर अुभ्या असणाराला ही दाखवत रहा, अन् त्याच्याकडून हवं ते काम करून घ्या. - असं सामर्थ्य आहे या अंगठीत. म्हणजेच माणसाच्या मनात ताबडतोब परिवर्तन घडवू शकते ही.'' विमलाने सांगितले.

हे ऐकल्याबरोबर मान्त्रिकाचे डोळे चमकू लागले. तो अंगठीकडेच पहात राहून म्हणाला, ''लहानपणापासूनची माझी एक इच्छा आहे - खुद्द राजा बनायची नव्हे, पण राजाचा जावई बनायची इच्छा. या घागरीत एक राजकुमारी आहे - मासोळीच्या रूपात ! आपल्या या अंगठीच्या प्रभावानं तिला माझी पत्नी बनायला राजी कर.'' असे म्हणत त्याने आपली वेताची काठी घागरीवर टेकली.

त्याबरोबर राजकुमारी रूपवती स्वतःच्या रूपात घागरीबाहेर आली. तिला डोळ्यांनी इशारा करत अंगठी समोर धरून विमला म्हणाली, ''वाः! काय लावण्य ! कित्ती मनोरम रूप ! नुसतं पाहून ही राजकन्या असल्याचं कळतंय. माझे हे दाजीबा वरून जरी कसेसेच वाटले, कुरूप दिसत असले, तरी खरे फार सुंदर आहेत ते ! तुला अगदी अनुरूप आहेत बघ. करशील विवाह त्यांच्याशी ?''

रूपवती अुत्तरली, ''हो ऽ ! करीन की.''

हे ऐकताच खूश होत मान्त्रिक म्हणाला, ''काय भाग्यशाली आहे मी!'' अन् आनन्दाने त्याने एकदम अुडी मारली. तोल जाअून तो पडणारच होता, पण हातची काठी टेकून त्याने स्वतःला संभाळले. नंतर तो विमलाला म्हणाला, ''ए पोरी ! ती अंगठी दे माझ्या हाती. राजा मला जावई बनवायला नकार देअू लागला, तर त्याला दाखवीन अन् त्याचं मन बदलीन मी.'' अन् त्याने विमलापुढे हात पसरला.

विमलाने याच संधीचा बरोबर फायदा घेतला. तिने त्याचा हात पकडून जोराने ओढल्याबरोबर मान्त्रिक अुलटा खाली पडला. ताबडतोब त्याची काठी हातात घेअून तिने त्याच्याच डोक्यावर टेकली.

अन् काय ! मान्त्रिक ताबडतोब मासा बनला अन् तडफडत तलावात जाअून पडला.

''थोडक्यात वाचले बघ ! चातुर्यानं मला वाचवलंस विमला !'' असे म्हणत राजकुमारीने मैत्रिणीला मिठी मारली. ती पुढे म्हणाली, ''चल, राजधानीत जाअू आपण. आपल्या लग्नाची अशी छान भेट देईन मी तुला, की पहातच रहाशील. कल्पनाच करू शकायची नाहीस बघ !''

राजधानीत पोचतापोचता सकाळ अुजाडली. सकुशल परत आलेल्या रूपवतीला पाहून राजाराणी आनन्दित झाले. त्यांनी समाधानाचा निश्वास टाकला. इतक्यात नवरदेव रत्नसेनही तेथे येअून पोचला.

रूपवतीने त्यांना सर्वांना आपली कहाणी सांगितली. ती म्हणाली, ''माझी अशी इच्छा होती की, काही खास वैशिष्ट्य असलेल्या माणसाशीच विवाह करावा. मी अगदी मूर्खासारखाच आग्रह धरला, स्वतः संकटात सापडले अन् तुम्हा सर्वांना दुःख दिलं. रत्नसेनशी विवाह करायला तयार आहे मी.''

राजदम्पती काही बोलणार, इतक्यात एकटक विमलाकडेच पहात असलेला रत्नसेन म्हणाला, ''क्षमा असावी राजकुमारी ! या विवाहाला तुम्ही तयार असाल, पण मी नव्हे ! तुम्ही मान्त्रिकाच्या जाळ्यात अडकलात, तेंव्हा तुमची सुटका मला करणाऱ्या विमलात मोठं वैशिष्ट्य दिसतंय. तिच्याशीच विवाह करायची माझी इच्छा आहे.''

हे ऐकून विमला अवाकच झाली. शरमेनं तिनं मान खाली घातली. रूपवतीही क्षणभर स्तब्ध राहिली. नंतर मैत्रिणीच्या खांद्यावर हात ठेवत हसून ती म्हणाली, ''विमला, मी आपलं वचन पुरं केलंय. तुला म्हटलं होतं ना मी, की आपल्या लग्नाची मी तुला एक अमोल भेट देईन? मी तुला, तू कल्पनाही न करू शकशील अशी भेट देत आहे.''

राजदम्पतीच्या अुपस्थितीत रत्नसेन व विमला यांचा विवाह धुमधडाक्याने साजरा झाला.



# परोपकारी

**आ**पल्या शेतातील भोपळे शहरातील बाजारात विकून राजा आपल्या बैलगाडीत बसून गांवाकडे परत येत होता. त्याला रस्त्यात एक भला मोठा दगड पडलेला दिसला. तो बाजूला केल्याशिवाय गाडी पुढे जाऊ शकत नव्हती आणि राजा एकटा हे काम करू शकत नव्हता.

विचार करीत राजाने चौफेर नजर टाकली. जवळच्या एका टेकाडावर एक माणूस ढाराढूर झोपलेला त्याला दिसला. राजाने त्याला उठवले नि आपली अडचण सांगितली. नंतर दोघांनी मिळून दगड दूर सारला.

रस्त्यात दगड टाकणाऱ्या माणसाला राजाने शिव्यांची लाखोली वाहिली. तसेच ऐन वेळी आपल्याला मदत करणाऱ्या त्या परोपकारी माणसाची त्याने तोंड भर स्तुति केली. राजाने त्या माणसाला विचारले - ''तुला कुठे जायचंय?'' तो म्हणाला - ''मी निघालोय रामापुरला.''

राजा म्हणाला - ''ठीक आहे. बस माझ्या गाडीत. मला रामापुरच्या पुढे जायचे आहे. वाटेत तुला उतरवीन.''

बैलगाडी रामापुरला पोचताच तो माणूस गाडीतून खाली उतरला नि म्हणाला - ''रस्त्यात मध्यभागी दगड ठेवून मी तुम्हाला त्रास दिला. माफ करा हं!''

आश्चर्यचकित होऊन राजाने विचारले - ''रस्त्यात कशासाठी दगड ठेवलास तू? हे तुझं काम हे मला माहीत नव्हतं. न कळत मी तुला खूपच शिव्या दिल्या!''

हसत तो माणूस म्हणाला - ''शहरातून परत येत होतो. अगदी थकून गेलो होतो. चालवत नव्हते माझ्याच्याने. दुसरा काही उपाय सुचेना, दिला दगड खाली ढकलून रस्त्यात. जो बाजूला करण्यासाठी गाडीवाल्याला दुसऱ्या कोणाची मदत लागेलच. कारण एका माणसाला तो दगड बाजूला करणे शक्य नाही. आता राहिली आपल्या शिव्या सहन करण्याची गोष्ट. आपल्या शिव्या ऐकून नाराजीने जर मी आपल्याला विरोध केला असता, तर आपण मला गाडीत थोडंच बसवून घेतलं असतं?''

हे ऐकून राजा जोरजोरात हसत राहिला.






## ५

(खूपशा संकटांना तोंड देऊन व बऱ्याच नौका आणि साथीदारांना मुकून रूपधर सुकेशिनी नामक देवीच्या बेटावर पोचला. तेथे आपल्या दलाचे त्याने दोन भाग केले. मायावी नावाच्या साथीदाराला एका दलाचा सरदार बनवून त्याला बेटाची व झाडीत लपलेल्या घराबद्दलची माहिती काढण्यासाठी पाठवले. नंतर मायावीला सोडून इतर सर्वांना आपल्या मन्त्रशक्तीने डुकरे बनवून टाकले. संशय आल्यामुळे स्वत: मायावी त्या घरात गेलाच नसल्याने वाचला होता. त्याच्या तोंडून सारे वर्णन ऐकल्यावर रूपधर स्वत:च सुकेशिनीकडे गेला. रूपधरच्या समोर तिची सगळी मंत्रशक्ती व्यर्थ ठरली आणि ती स्वत: त्याची साथीदार बनली.) -यानन्तर -

**सु**केशिनीच्या सल्ल्यावरून रूपधर समुद्रावर आपली वाट पहाणाऱ्या साथीदारांकडे गेला. ते सर्वजण त्यावेळी समुद्रतटावरच बसून होते. रूपधरला पहाताच ते खुशीने उड्या मारत त्याच्याजवळ जाऊन पोचले. प्रत्यक्ष इथाकाला पोचल्यावरही झाला नसता, इतका आनन्द त्यांना रूपधर सुखरूप परत आल्याचे पाहून झाला. त्यांच्या डोळ्यांतून आनन्दाश्रू वाहू लागले.

''आपले बाकीचे सर्वजण कुठे आहेत? कुठे आहेत ते?'' सर्वजण उत्सुकतेने त्याला विचारू लागले.

''आपले लोक सुकेशिनीच्या घरातच सुखरूप आहेत. आरामांत खातपीत मजा करत बसले आहेत ते. आता प्रथम आपल्याला आपली नौका बाहेर ओढून ती अन् दोर वगैरे सर्व एकाद्या गुहेत लपवून ठेवायला हवं. यानन्तर तुम्हा सर्वांना मी



"सुकेशिनीच्या घरी घेऊन जाईन." रूपधर अुत्तरला.

सर्वांनी लगेच काम सुरू केले. पण मायावी त्या सर्वांना ओरडून म्हणाला, "अरे मूर्खांनो, कुठे निघालाय त्याचा विचार तरी करा. सुकेशिनीच्या घरी? ती तर तुम्हा सर्वांना वाघ चित्ता वगैरे जनावरं बनवून, कुत्र्याप्रमाणे तुमच्याकडून पहाऱ्याचं काम करवील. घडलेलं सगळं विसरलात काय? फाललोचनच्या गुहेत गेल्यावर आपल्यावर काय गुदरलं ते आठवा ! त्यावेळी या रूपधरमुळेच तर आपले काही साथीदार मरून गेले नं? त्याच्या बेअकलीपणामुळेच तर आपण बरबाद झालोत!"

मायावीच्या या बोलण्याने रूपधर क्रोधाने अुसळू लागला ! तलवार काढून तो मायावीवर धावून गेला. परंतु बाकीच्या साथीदारांनी त्याला कसेबसे अडवले. ते म्हणाले, "याला यायचं नसेल तर नको येऊ दे. इथेच राहून आपल्या नौकेचं रक्षण करील तो. आम्ही सारेजण येतो तुझ्याबरोबर सुकेशिनीकडे. चल घेऊन आम्हाला." शेवटी सर्वांबरोबर मायावीही निघाला.

सुकेशिनीने रूपधरच्या सगळ्या साथीदारांच्या स्नानाची व्यवस्था केली; त्यांना चांगले कपडे दिले. रूपधर येऊन पोचेपर्यन्त ते स्वादिष्ट भोजनाचा आस्वादही घेऊ लागले होते. दोन्हीं दले एकमेकांसमोर आली, तेंव्हा सर्वांनी आनन्दाने ओरडायला सुरुवात केली.

सुकेशिनी रूपधरला म्हणाली, "तुम्ही लोक झालं गेलं सर्व विसरून गेलात तर बरं होईल. कसकसल्या कष्टांना तुम्ही तोंड दिलंत, ते माहीत आहे मला. आता आरामात खा, प्या. आपल्या इथाका नगरात जसे आनन्दाने रहात होता, तितक्याच आनन्दानं इथे ही रहा."

रूपधरने तिचा सल्ला मानला. एक वर्षभर आपल्या साथीदारांसह तो तेथे आरामात राहिला. वर्ष संपल्याबरोबर त्याचे अनुचर त्याला म्हणू लागले, "आपण काय आता स्वदेशी जायचंच नाही का? इथंच कायम



रहायचं का आपण?"

रूपधर सुकेशिनीला म्हणाला, "माझे साथीदार आता स्वदेशी जायला अुतावळे झाले आहेत. आम्ही सर्वांनी आता इथून निघावं हे बरं. पण त्यासाठीही आम्हाला तुझी मदत हवी."

"तुम्हाला जबरदस्तीनं इथं ठेवून घ्यायची माझी इच्छा नाहीय. पण स्वदेशी पोचण्यापूर्वी तुला आणखी एक यात्रा करावी लागणार. यमराजाच्या नरकात सांकेतिक नावाचा एक दिव्यज्ञानी आहे. तु त्याला एकदा भेट अन् त्याचा सल्ला घे."

हे ऐकून रूपधर हताशच झाला. तो म्हणाला, "हे काय सांगतेस सुकेशिनी? नरकात जाणं काय माझ्या हातचं आहे का? कोणी नावेतून कधी नरकात गेलंय का?"

"पण सुकाणू धरून दिशा पहात जायची गरजच नाही. नौकेत मुकाट बसून रहा. अुत्तरी हवा आपोआपच तुला तेथे घेऊन जाईल. तुझी नौका समुद्र ओलांडून पलिकडील किनाऱ्याला लागेल. तिथून थोडं पुढे गेल्यावर तुम्हा लोकांना एक टेकाड दिसेल. त्याच्या जवळच अग्नी आणि अश्रुनदी वैतरणीला मिळतात. या टेकाडाजवळ तू हातभर लांबीरुंदीचा खड्डा खण अन् त्यात पितरांना तर्पण दे. पिंडदान कर. पितरांना हे सर्व अर्पण करून 'आपणाला सकुशल इथाकाला पोचवण्यासाठी' त्यांना प्रार्थना



कर. घरी पोचल्यावर त्या सर्वांसाठी काही प्राणी बळी देण्याचं त्यांना वचन दे. सांकेतिकला नमस्कार करून सांग की, एक काळा बोकड बळी देईन. नंतर एक बोकड अन् मेंढी यांचा बळी दे. नंतर ते चांगले भाज. असे सर्व केल्यावर यमराज अन् सर्व नगरवासींना प्रणाम कर. लगेचच पितरं बळी स्वीकारायला जमतील. त्यांच्यातच सांकेतिक ही असेल. तो तुला घरी जाण्याचा अुपाय सुचवेपर्यन्त पितरांना बळीला स्पर्श करू देऊ नको." सुकेशिनीने स्वदेशी परत पोचण्याचा असा अुपाय रूपधरला सांगितला.

सकाळ झाली. रूपधरने आपल्या



साथीदारांना जागे केले. तो त्यांना म्हणाला, ''अुठा, आपल्याला आता हा प्रदेश सोडून जायचं आहे. सुकेशिनीनं आपल्याला आणखी एका यात्रेचा अुपाय सुचवला आहे.''

रूपधरचे साथीदार तर आपापल्या घरी जायला अुत्सुक होते. पण आता या यात्रेच्या विषयामुळे त्यांच्यात निरुत्साह पसरला. अन् यमराज इत्यादींच्या स्थानी, म्हणजे नरकात आपल्याला जायचंय हे कळल्यावर तर ते रडू-ओरडू लागले. त्यांच्यातले काहीजण बेशुद्धही झाले. लोक आपले केस अुपटू लागले. पण रूपधरबरोबर निघण्यावाचून दुसरा अुपायही नव्हता.

सर्वजण निघून नौकेजवळ आले. तोवर सुकेशिनीही तेथे येअून पोचली होती. तिच्याबरोबर एक काळा बोकड व एक काळी मेंढी होती. कोणाशी काही न बोलताच ती तेथून निघून गेली.

सर्वजण नौका समुद्रात ओढून घेअून आले. बळीची जनावरेही त्यांनी नौकेत नेली. सुकेशिनीच्या कृपेने अुत्तर वारे वाहू लागले अन् नौका पुढे निघाली.

कोणतीही अडचण न येता संध्याकाळपर्यन्त नौका पुढे-पुढे जात राहिली. सूर्यास्तानन्तर अंधार पसरला अन् अंधारातच नौका किनाऱ्याला लागली.

सुकेशिनीच्या सूचनेप्रमाणे रूपधरने अग्नीनदी व अश्रुनदी वैतरणीला मिळायच्या जागी खड्डा खणला. तेथे त्या लोकांनी तर्पण करून पिंडदान केले व पितरांचे ध्यान केले. होम करून बोकड व मेंढी यांचे त्यात बळी दिले.

ताबडतोब कोलाहल करत पितरांच्या झुंडी बळीचा स्वीकार करण्यासाठी तेथे येअून पोचल्या. यमराज व इतर सर्वांना प्रणाम करून रूपधर, पितरांना म्हणाला, ''सांकेतिकशी बोलून मी जोपर्यन्त आपल्या शंका फेडून घेत नाही, तोपर्यन्त तुम्ही कोणीही बळीला स्पर्श करता कामा नये.''

इतरांना बाजूला करत एक स्त्री पुढे आली. तिला पाहून रूपधर आश्चर्याने अवाक् झाला. कारण ती दुसरी कोणी नसून खुद्द रूपधरची आईच होती! ट्रॉयवर हल्ला करण्यासाठी तो जेंव्हा बाहेर पडला, तेंव्हा तर ती जिवन्त होती. ती केंव्हा मेली, हेही रूपधरला माहीत नव्हते.

तिला पाहून रूपधरचे डोळे भरून आले. त्याला तिची दयाही आली. तरीही त्याने तिला बळीला शिवू दिले नाही.

सांकेतिक हातातली सोन्याची छडी फिरवत तिच्या मागोमागच आला होता. रूपधरला ओळखून तो म्हणाला, ''मुला, हा पितृलोक सूर्यप्रकाशाला पारखा आहे. अशा या ठिकाणी तू कसा काय आलास? जरा मागे सरकलास तर बळी स्वीकारून मी तुला जरूर ती मदत करीन.''



रूपधर मागे सरकला अन् त्याने सांकेतिकला बळीचा स्वीकार करू दिला. नंतर रूपधरकडे वळून सांकेतिक म्हणाला, ''तू स्वदेशी जायला तडफडत आहेस, हे मला ठाअूक आहे. खरं तर स्वदेशापुढे स्वर्गाचीही काय मातब्बरी? पण साऱ्या देवता तुझ्यावर रुसलेल्या आहेत. त्यामुळे अजूनही तुला बऱ्याच यातना सहन कराव्या लागणार आहेत. अनेक कष्ट सहन करणार आहेस तू. पण शेवटी सकुशल नक्की घरी पोचशील. वाटेत त्रिनापिया नावाचं एक बेट लागेल. तेथे सूर्यभगवानाशी संबंधित पशु रहातात. तू किंवा तुझ्या साथीदारांपैकी कोणी त्यांना कसलाही त्रास देअू नका. चुकूनही कोणाच्या हातून तसं घडलं, तर इथाकाला पोचायचं तुमचं स्वप्न हे स्वप्नच राहील. पण योग्य तऱ्हेने वागलात तर मृत्यूपासून वाचून अन् दुसऱ्याच एका नौकेत बसून तुम्ही घरी पोचाल. अजूनही तुमचे कष्ट संपणार नाहीयेत. तुमच्या घरात सर्वत्र शत्रूच शत्रू असतील. अन् ते तुझ्या पत्नीला लग्नासाठी जबरदस्ती करू पहातील. पण हां, तू कोणत्या ना कोणत्या प्रकारे त्या सर्वांचा अन्त करशील. यानंतर देवतांबाबतीतलं तुझं कर्तव्य तुला पार पाडावं लागेल. ते सर्व कसं करायचं, ते मी सांगेन तुला. नौका वल्हवण्याचं वल्हं तू



आपल्या हातात घे. आजपर्यन्त मिठाचा अुपयोग केला नसलेला अन् समुद्र न पाहिलेला माणूस भेटेपर्यन्त तुला यात्रा करत रहावं लागेल. अशी माणसं ओळखण्याचं रहस्यही मी सांगतो तुला. तुझ्या हातातलं वल्हं पाहून ते तुला विचारतील की, 'हे काय एकादं शेतीविषयक साधन आहे काय?' असा माणूस आढळल्याबरोबर तू आपलं वल्हं जमिनीत पुरून टाक आणि वरुणदेवासाठी बळीं अर्पण कर. एक बकरी, एक बैल अन् एका डुकराचा बळी देऊन घराकडे चालू लाग. नंतर तू दीर्घकाल जिवन्त रहाशील. समुद्रामुळेच तू निश्चिन्त रहाशील व शेवटी तुला सुखमय मृत्यु प्राप्त होईल. त्यावेळी तुझे सर्व आप्त तुझ्या जवळच असतील.''

''ठीक आहे. जे घडायचं, ते नक्की घडणारच. घडणारं कोण टाळू शकणार? पण एक गोष्ट सांगा. माझ्या आईचा प्रेतात्मा तिथे अुभा आहे. ती माझ्याकडे पहात नाहीय अन् माझ्याशी बोलत ही नाहीय. ती केवळ बळीवरच नजर लावून आहे. ती मला ओळखू शकेल असा अुपाय सांगा ना.'' रूपधरने विनंती केली.

''मुला, जोपर्यन्त बळी प्राप्त होत नाही, तोपर्यन्त पितरांना सत्य गोष्टी समजत नाहीत, हे लक्षात ठेव.'' असे सांगून सांकेतिक यमलोकात निघून गेला.

आईला बळी प्राप्त होईपर्यन्त रूपधर तेथेच अुभा राहिला. तो मिळाल्यानन्तर आईने त्याच्याकडे पाहिले व त्याला ओळखून ती म्हणाली, ''जिवन्त असूनही तू या लोकात कसा पोचलास बाळा? हे तर कोणालाही जमत नाही. तू काय ट्रॉयहून सरळ इथेच आला आहेस? इथाकाला गेला नाहीस? आपल्या बायकोला नाही भेटलास?''

''नाही आई, घरी पोचण्यासाठीच अनेक यातना सहन करीत आहे मी. इथला निवासी सांकेतिक याला भेटण्यासाठीच इथे यावं लागलं मला. आई, पण तू मेलीस कशी? आजारी होतीस, की आकस्मिक मरण आलं तुला? पिताजी कसे आहेत? माझ्यावर विसंबून ते काय अजूनही माझी वाट पहात आहेत? की आता मी येणारच नाही असं समजून ते दुसऱ्या कोणाच्या आश्रयाला गेले? माझी बायको काय म्हणतेय? काय करायची इच्छा आहे तिची? मुलाबरोबर राहून आपली इस्टेट संभाळत आहे नं ती? की आणखी कुणाशी लग्नही केलंय तिनं?'' रूपधर आपल्या आईला प्रश्नांवर प्रश्न विचारत राहिला.

आई अुत्तरली, ''अरे ती तुझ्या घरीच आहे. किती सहनशील आहे ती, हे तुला काय माहीत? रात्रंदिवस बिचारीचं मन तुझ्यासाठीच जळत आहे रे ! तुझी इस्टेट अजून तुझ्याच नावे आहे. तुझा मुलगा विजयध्वज तुझा वारस बनला आहे. अन् राजाच्या साऱ्या जबाबदाऱ्याही संभाळतो आहे तो! तुझे वडील गाव सोडून शहरात येण्यातले नाहीत. थंडीतही अंगावर पांघरूण न घेता ते जनावरांजवळ जमिनीवरच झोपतात. म्हातारपणा बरोबर तुझ्या न परतण्याचं दुःख खात राहिलं आहे त्यांना. आता राहिली माझ्या मरणाची हकिकत. मी कोणत्या आजारामुळे नव्हे, तर तुझ्या आठवणीने झुरून मेले.'' आईने रूपधरला सर्व हकीकत सांगून टाकली.

रूपधरने आईला एकवार प्रेमाने मिठी मारायचा प्रयत्न केला. पण तो सफल झाला. नाही. तीनदा तोच प्रयत्न करूनही काही अुपयोग झाला नाही.

तेंव्हा रडत दीनपणे रूपधर आईला म्हणाला, ''फक्त एकदाच मिठीत घे ना मला ! माझ्यापासून दूर का रहाते आहेस?''

''अरे वेड्या ! जिवन्त व्यक्ती, मृत व्यक्तीला कशी मिठी मारू शकणार? तुला जिला मिठी मारावीशी वाटतेय, ती तर केंव्हाच जळून खाक होअून गेलीय. आता ताबडतोब या अन्धाऱ्या लोकातून निघून जा बरं. पण इथे पाहिलेलं, अैकलेलं आपल्या बायकोला मात्र सांगू नकोस.'' आईने त्याला सूचना दिली.



# खरी गोष्ट

रंगापुरच्या जमीनदाराच्या घरी एक नोकर होता. त्याचं नाव बहादुर. जमीनदाराच्या कार्यालयाची खोली स्वच्छ ठेवणं, खुर्च्या व बाकांवरील धूळ झटकणं, भिंतीवरील जाळ्या-जळमटं काढून टाकणं ही त्याची कामं होती. पण ही सर्व कामं तो कशी-बशी करी. जमीनदाराची पानांची चांदीची पेटी मात्र तो खूप मनापासून स्वच्छ करी. पेटी नेहमी चमकत असे.

जमीनदार हे सर्व बारकाईने पहात असे. एक दिवशी जमीनदाराने त्याला बोलावलं आणि म्हणाला - 'अरे बहादुर, दिवसें दिवस तू फार आळशी होत चालला आहेस, असं दिसतंय. कार्यालयाची खोली कधी स्वच्छ नसते. पण हं, पानांची चांदीची पेटी मात्र तू अगदी चकचकीत ठेवतोस. ते काम तू अगदी मनापासून करतोस. त्याबद्दल तुझी प्रशंसा करावी तेवढी थोडीच !''

यावर बहादुरने नम्रपणे उत्तर दिले - ''मालक, त्याबद्दल आपण कशाला माझी तारीफ करता ? आपल्या प्रमाणेच पेटीतील पानांचा रोज मी ही आस्वाद घेत असतो. अशा स्थितीत मी जर पेटी चकचकीत ठेवली नाही, तर ते ठीक होईल का? आपणच सांगा.''

आता खरी गोष्ट जमीनदाराच्या लक्षात आली. आपली पानांची पेटी बहादुरच्या हाती लागणार नाही अशी जमीनदार नंतर काळजी घेऊ लागला.



# महिमाशाली आरसा

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडापाशी गेला. त्याने झाडावरून प्रेत खाली उतरवले आणि ते आपल्या खांद्यावर लादून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हां प्रेतातील वेताळ बोलू लागला - ''हे राजन्, कुठली महिमावान वस्तु प्राप्त करण्यासाठी या स्मशानात तू हे कठोर परिश्रम करीत आहेस, हे काही माझ्या लक्षात येत नाही. अपूर्व अद्भुत महिमाशाली वस्तु सुद्धा कधी कधी आपला महिमा गमावून बसतात. उदाहरणादाखल मी तुला एका राजकुमाराची गोष्ट सांगतो.'' वेताळ गोष्ट सांगू लागला.

नैमिषारण्यात जयेन्द्र नावाचा एक मुनि रहात असे. तो सर्व शास्त्रात पारंगत होता. कित्येक तरुण शिष्य बनून त्याच्याजवळ रहात. सिंहपुरीचा राजा हिमदत्त अशाच शिष्यांपैकी एक होता. चार वर्षे जयेन्द्रच्या आश्रमात राहून त्याने अनेक विद्या शिकून घेतल्या.

# वेताळ कथा



जेव्हा हिमदत्त घरी जायला निघाला तेव्हा मोठ्या प्रेमाने जयेन्द्र त्याला म्हणाला - "बेटा, तुझे शिक्षण आता संपले. भविष्य-काळात तू सिंहपुरीचा राजा होणार आहेस. तुला उपयोगी पडेल अशी एक वस्तु मी तुला देऊ इच्छितो."

ताल-पत्रांपासून बनवलेल्या एका पेटीतून जयेन्द्रने एक गोल आरसा काढला आणि हिमदत्तला दाखवीत तो म्हणाला - "हा एक महिमाशाली आरसा आहे. याच्या समोर जो माणूस येईल त्याच्या बद्दलची सर्व माहिती हा सांगतो. एक समर्थ राजा बनून चांगले नाव कमव. याचा तुला जेव्हा उपयोग होणार नाही, तेव्हा मला तो परत आणून दे."

हिमदत्तने गुरूचे आभार मानले व तो सिंहपुरी राज्यात परत आला.

एके दिवशी सिंहल देशातून वीरभूपति नावाचा एक मल्ल, धीरसिंह नावाचा एक तलवार-बहाद्दर व भूपाल वर्मा नावाचा एक कुशल धनुर्धारी असे तिघे जण सिंहपुरीत आले. राजाला तिघे जण भेटले आणि म्हणाले - "महाराज, आम्हा तिघात कोण अधिक श्रेष्ठ आहे हे आतापर्यंत कोणी ही सांगू शकले नाही. आपल्या आरशाच्या मदतीने आपण आमच्या प्रश्नाचे उत्तर द्याल अशा आशेने आम्ही आपल्याला भेटायला आलो आहोत.

तिघे ही महान् शक्तिशाली आहेत हे हिमदत्ताच्या लक्षात यायला वेळ लागला नाही. युद्ध-कौशल्याच्या बाबतीत तिघे एकाहून एक सरस होते. हिमदत्ताने तिघांना ही आरशासमोर उभे केले आणि आरशाला उद्देशून प्रश्न केला - "हे महिमाशाली दर्पणा, या तिघात सर्वश्रेष्ठ वीर कोण बरे ?"

आरशाने काहीच उत्तर दिले नाही. दोन-तीनदा विचारून ही आरशाकडून काही उत्तर मिळाले नाही. महिमाशाली आरसा ही आपली समस्या सोडवू शकत नाही हे जाणून तिघे वीर निराश होऊन परत निघाले.

या घटने नंतर थोड्याच दिवसांनी कोसल देशातून धूमकेतु आणि वज्रबाहु नावाचे दोन मल्ल सिंहपुरीला आले. त्यांच्या पुढे ही प्रश्न होता की दोघात श्रेष्ठ वीर कोण? कारण अनेक वेळा दोघे जण एकमेकांशी लढले आणि कोणीच कोणाला जिंकले नाही. दोघे ही तुल्यबल ठरले.

आपल्या मागील अनुभवानुसार हिमदत्ताला मनातल्या मनात वाटलं की आपला आरसा काही या प्रश्नाचं उत्तर देऊं शकणार नाही. तरी पण त्याने दोघांना आरशापुढे उभे करीत विचारले "हे महिमाशाली दर्पणा, या दोन मल्लात कोण बरे श्रेष्ठ?"

लगेच आरशाने उत्तर दिले - 'वज्रबाहु!' आरशाने आपला महिमा गमावलेला नाही याचा हिमदत्तला फार आनंद झाला. त्याने पुन्हा आरशाला प्रश्न विचारला - "धूमकेतू पेक्षा वज्रबाहु कसा बरे श्रेष्ठ?"

"एका मांत्रिकाने दिलेला ताईत आपल्या हातावर बांधल्यामुळे मल्लयुद्धात धूमकेतूचा पराभव होत नाही!" आरशाने प्रश्नाचे उत्तर दिले.

हे ऐकताच धूमकेतूचा चेहरा पांढरा पडला. वज्रबाहूने रागाने धूमकेतूच्या हातावरील ताईत ओढला नि फेकून दिला.

हिमदत्ताने तावडतोब दोघांना लढण्यासाठी पाचारण केले. वज्रबाहूने आपल्या वज्रासारख्या कठोर प्रहारांनी हां हां म्हणता धूमकेतूला चित केले. त्याने आरशाने सांगितलेले सत्य सिद्ध करून दाखवले.

रत्नगिरि आणि वज्रगिरि ही सिंहपुरीची



दोन शेजारी मांडलीक राज्ये होती. रत्नगिरीची राजकुमारी विजयमाधवी आणि वज्रगिरीची राजकुमारी पूर्णबिंदु या दोघी अतुल सौंदर्यशालिनी कन्या आहेत असे हिमदत्तच्या कानांवर आले. सौंदर्याबाबत त्यांची बरोबरी करणाऱ्या स्त्रिया जगात शोधून सापडणार नाहीत. हिमदत्ताने दोघींची चित्रे मागवून घेतली. प्रत्येक जण आपापल्या परी अतिशय सुंदर होती. दोघींपैकी कोण अधिक सुंदर याचा निर्णय हिमदत्तला करता येईना. दोन्ही राज्यांच्या राजांना हिमदत्तने संदेश पाठविला की त्यांनी आपापल्या मुलींना घेऊन सिंहपुरीला यावे.

दुसऱ्याच दिवशी दोन्ही मांडलीक राजे



आपल्या मुलींना घेऊन सिंहपुरीला आले. हेमदत्ताने आपल्या राजभवनात त्यांच्या राहण्याची व्यवस्था केली. दुसऱ्या दिवशी त्यांना बोलावून हेमदत्त म्हणाला - ''माझे निमंत्रण स्वीकारून तुम्ही आलात, याबद्दल मी आपला आभारी आहे. मी आपल्याला कशासाठी बोलविले आहे हे आतापर्यंत तुमच्या लक्षात आलेच असेल. राजकुमारी विजयमाधवी व पूर्णबिंदु यांची चित्रे मी पाहिली. दोघींच्या पैकी कोण अधिक सुंदर आहे हे मला समजेना. आता त्या दोघी ही माझ्या समोर आहेत. तरी पण कोण सरस आहे याचा निर्णय मी करू शकत नाही. म्हणून ही कठिण समस्या सोडविण्याचे काम मी आपल्या महिमाशाली आरशाकडे सोपवीत आहे. दोन्ही राजकुमारी या आरशापुढे उभ्या राहतील आणि दोघींच्यात कोण अधिक सुंदर आहे हे हा आरसा सांगेल.''

पूर्णबिंदूने तत्काळ आपली संमति दिली नि ती आरशासमोर जाऊन उभी राहिली. पण विजयमाधवी हसून व्यंगपूर्वक स्वरात म्हणाली - ''युवक राजा आंधळा आहे हे आता माझ्या लक्षात आलं. अंध राजाशी विवाह करण्याची माझी मुळिच इच्छा नाही. सौंदर्याबाबत निर्णय घेण्यासाठी आरशापुढे उभी रहायला मी तयार नाही.''

मदनासारख्या सौंदर्यसंपन्न हिमदत्ताला विजयमाधवी आंधळा म्हणाली. आपल्या मुलीच्या या बोलण्यावर रागावून राजा आपल्याला काय शिक्षा करील याची विजयमाधवीच्या पित्याला खूपच भीति वाटली.

विजयमाधवीच्या बोलण्यावर प्रथम तर राजा चांगलाच रागावला. पण क्षण भरात आपला राग आवरून तो अशा रीतीने हसला, जणू काही सगळं त्याच्या लक्षात आलं. तो विजयमाधवीच्या वडिलांना म्हणाला - ''मला आपली मुलगी पसंत आहे. जर मी तिला पसंत असेन तर आपण ताबडतोब लग्नाच्या तयारीला सुरुवात करावी.''

दोन्ही राजकुमारींच्या आई-वडिलांना हिमदत्तच्या या आकस्मिक निर्णयाचे मोठे आश्चर्य वाटले. तसेच तेथे हजर असलेल्या दरबाऱ्यांना व राजसेवकांना ही या निर्णयाने आश्चर्यात टाकले. काही दिवसातच हिमदत्त व विजयमाधवी यांचा विवाह-समारंभ मोठ्या थाटामाटात पार पडला.

एक महिन्यानंतरची गोष्ट. राजभवनातील एक पहारेकरी भद्र याने राणीच्या अलंकार - मंजूषेवर ठेवलेला चन्द्रहार चोरला. बागेतील अशोक-वृक्षाच्या ढोलीत त्याने तो लपवून ठेवला. काही दिवसात चोरीबाबत सर्व जण विसरून जातील, नि मग आपण चंद्रहार घरी घेऊन जावा असा त्याचा विचार होता.

परंतु मल्लिका नावाच्या एका दासीने भद्रला चंद्रहार लपवताना पाहिले. भद्रने हार लपवून ठेवल्यावर तिने हळूच तो उचलला व आपल्या घरी नेला.

आपला चंद्रहार हरवल्याची वार्ता काही वेळानंतर राणी विजयमाधवीने राजाला सांगितली. हिमदत्तला वाटलं की अंत:पुरात काम करणाऱ्या कोणा तरी सेवक-सेविकेचे हे काम असले पाहिजे. त्याने सर्वांना बोलविले आणि आरशापुढे उभे करून प्रश्न विचारला - ''हे महिमाशाली दर्पणा, राणीच्या चंद्रहाराची कोणी बरे चोरी केली?''

चतुर मल्लिका भद्राच्या मागे उभी राहिली. जेव्हा आरशा समोर उभे राहण्याची भद्राची पाळी आली, तेव्हा त्याला दरदरून घाम फुटला. एवढ्यात आरशाने सांगितले - ''भद्र



चोर आहे!''

आरशाचा हा निर्णय ऐकून मल्लिकेने सुटकेचा श्वास सोडला. हात छातीवर ठेवून ती स्वत:शीच काही बडबडू लागली. विजयमाधवीने हा सर्व प्रकार पाहिला. तिने मल्लिकेला कैद करण्याची आज्ञा पहारेकऱ्यांना दिली.

''माधवी, हे तू काय केलंस? भद्र चोर आहे हे तर आरशाने आपल्याला सांगितलंच होतं. मग हिला कशासाठी कैद करवलंस?'' हिमदत्तने राणीला विचारले.

''मला वाटतंय यात मल्लिकेचा सुद्धा हात आहे!'' विजयमाधवीने उत्तर दिले.

हिमदत्तने दरडावून मल्लिकेला विचारले



तेव्हा बिचारी घाबरली आणि झालेला सर्व प्रकार राजाला सांगून टाकला. आपल्या घरी जाऊन ती हार घेऊन आली. हिमदत्तने चंद्रहार राणीच्या गळ्यात घातला नि तिच्या सूक्ष्म निरीक्षण-शक्तीची तोंड भरून तारीफ केली.

थोडा वेळ गप्प राहून नंतर राजाने विजयमाधवीला विचारले - ''हा महिमाशाली आरसा चांगली कामे करतो, पण कधी कधी काही वाईट ही घडण्याची शक्यता नाकारता येणार नाही. याचा उपयोग मर्यादित आहे हे आता सिद्ध झालंय! आजच हा गुरुजींना परत करावा नाही?''

एवढी गोष्ट सांगून वेताळाने राजाला विचारले - ''राजा, मुनि जयेन्द्रने दिलेला महिमाशाली आरसा कधी कधी उत्तर देऊं शकला नाही. यामुळे त्याच्या सामर्थ्याबाबत मनात शंका येते. तीन वीरात कोण सर्वश्रेष्ठ हे आरसा सांगू शकला नाही! पण वज्रबाहु नि धूमकेतु यांच्यात श्रेष्ठ कोण ते मात्र आरशाने सांगितले. असं का बरं झालं? एकदा आरसा असफल झाला नि दुसऱ्या वेळीं सफल झाला. असं का घडलं?

आता राहिली राजकुमारींच्या सौंदर्य-परीक्षेची गोष्ट. विजय-माधवी आरशासमोर उभी रहायला का तयार नव्हती हे लक्षात येत नाही. पूर्णबिंदूच्या सौंदर्यापुढे ती टिकणार नाही असं कदाचित तिला वाटलं असेल. हिमदत्त तर मदनाचा पुतळा होता, त्याच्यात कुठेच व्यंग नव्हते, तो सूक्ष्मग्राही होता, तरी पण माधवीने त्याला 'अंध' म्हटले, हा तिचा अविवेक नाही का? आणि अशा युवतीशी हिमदत्तने विवाह केला हा तर शुद्ध मूर्खपणा नाही का?

हिमदत्त म्हणाला की आरशामुळे चांगल्या बरोबर वाईट ही घडण्याची शक्यता आहे. या निर्णयाप्रत तो का आला याचे काही कारण दिसत नाही. म्हणून आरसा गुरुला परत देण्याचा निर्णय मूर्खपणाचा नाही का? माझ्या या शंकांचे समाधान केले नाहीस तर तुझ्या मस्तकाचे तुकडे-तुकडे होतील हे तू जाणतोसच !''

राजा विक्रमादित्य शंकांचे समाधान करीत म्हणाला - ''मुनि जयेन्द्रने हिमदत्तला दिलेला आरसा महिमाशाली होता यात काही संशय नाही. परंतु हे ही खरे की त्याच्या महिम्याच्या काही मर्यादा आहेत. सिंहलहून आलेले तीन वीर वीरभूपति, वीरसिंह व भूपाल वर्मा हे तिघे तीन निरनिराळ्या विद्यात निपुण होते. तेव्हा त्यांच्या युद्ध-कौशल्याची तुलना करून कोणा एकास श्रेष्ठ ठरविणे कसे शक्य आहे? म्हणूनच आरशाला याबाबत निर्णय करता आला नाही. तो मौनच राहिला. आता राहिली वज्रबाहु व धूमकेतूची गोष्ट. हे दोघे एकाच विद्येत पारंगत होते. म्हणून त्यांच्यातील श्रेष्ठ वीर कोण हे आरसा सांगू शकला.

राजकुमारींची गोष्ट याहून वेगळी आहे. आरशा समोर उभी राहिले तर एखाद्या वेळी आपला पराजय होईल असे विजयमाधवीला भय वाटले, अशी तुझी समजूत असेल तर ती मात्र चुकीची आहे. दोन सौंदर्यशालिनी मधील कोण अधिक सुंदर याचा निर्णय जर आरसा घेणार असेल तर तो आपला अपमान आहे असे माधवीला वाटले. ती नाराज झाली आणि तिने हिमदत्ताला आंधळा म्हटले. पण तिच्या या म्हणण्यातील सत्य बुद्धिमान हिमदत्ताने समजून घेतले, आणि म्हणूनच त्याने विजयमाधवीशी विवाह केला.

महिमाशाली आरशाच्या मर्यादा मल्लिकाला माहीत होत्या. म्हणूनच चोरी करून ही ती वाचली. विजयमाधवीच्या सूक्ष्म अवलोकनामुळे नंतर ती पकडली गेली. म्हणून हिमदत्ताला वाटले की या आरशामुळे कधी कोणाचे नुकसान ही होण्याची शक्यता आहे. महिमाशाली आरशाचा उपयोग करण्यापेक्षा मनुष्याने आपल्या बुद्धीचा उपयोग करणे अधिक श्रेयस्कर आहे हे हिमदत्ताने जाणले. बुद्धीच्या साह्यानेच आपल्या समस्या सोडविणे बरे. मला वाटते हा निर्णय सर्वस्वी योग्यच आहे. हिमदत्त मूर्ख तर नाहीच, फार बुद्धि-कुशल शासक आहे.''

अशा रीतीने राजाचा मौन-भंग झाल्यावर वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडावर जाऊन बसला.

**आधार : सुभद्रा यांची एक कथा**



# कामचोर

समुद्र-किनाऱ्यावरील एका गावात मणिगुप्त नावाचा एक व्यापारी रहात असे. व्यापाराचा हिशीब ठेवण्यासाठी त्याच्या पदरी अनेक नोकर होते. त्यांच्या पैकी काही कामचोर होते. बरेच नोकर गप्पा मारीत बसत. किरीट नावाचा एक नोकर मात्र मोठा प्रामाणिक होता. आपले काम तो मनापासून करी. इतकेच नव्हे तर दुसऱ्यांची कामे ही करी.

काही नोकर आपले काम नीट करीत नाहीत, चकाट्या पिटत बसतात, हे मणिगुप्तच्या लक्षात आले, तेव्हा त्याने त्यांना सावधानीचा इशारा दिला. तो म्हणाला - ''मी सर्व काही पहात आलो आहे. तुम्ही आपली वर्तणूक बदलली नाही, तर मी तुम्हाला 'कामचोर' अशी पदवी बहाल करीन.''

या सूचनेमुळे काही नोकरांनी आपल्यात सुधारणा केली. ते आपापली कामे प्रामाणिकपणे करू लागले. व्यापाऱ्याने सूचना दिल्यावर ही जे बदलले नाहीत, त्यांची कामे किरीट करू लागला.

काही दिवसांनी मणिगुप्तने सर्व नोकरांना बोलविले नि त्यांना म्हणाला - ''तुमच्या पैकी कोण खरा कामचोर आहे, ते माझ्या लक्षात आलंय. 'कामचोर' ही पदवी बहाल करण्यालायक आहे हा किरीट! काम न करता जो आळसात वेळ घालवतो त्याला मी कामचोर म्हणत नाही. दुसऱ्यांनी जी कामं करायची आहेत, त्यांची चोरी करून, ते आपले कर्तव्य आहे असे समजून जो स्वत: करतो तो ही कामचोरच! अशा कामचोरात हा किरीट आहे.''

यानंतर किरीटने आपली काम करण्याची पद्धत बदलली. यामुळे दुसऱ्या नोकरांनी आळस झाडून टाकून आपापली कामे सावधपणे करायला सुरुवात केली. कारण किरीट आता त्यांची कामे करायला तयार नसे.





# कच्छ व सौराष्ट्र

मूळ पाठ : मीरा नायर ❖ चित्रकारी : गोपकुमार

आपला देश हा एक द्वीपकल्प आहे. याला खूप लांबच लांब समुद्रकिनारा लाभलेला आहे. देशाच्या भूभागापैकी मोठा भाग समुद्राने वेढलेला आहे. किनाऱ्याची लांबी ७,५०० कि.मी. आहे. समुद्रकिनाऱ्यावर काही ठिकाणी चुनखडीचा दगड आहे, तर काही ठिकाणी गोड्या पाण्याची सरोवरे आहेत. काही ठिकाणी मैलोन् मैल सोनेरी, रुपेरी रेती पसरलेली आहे. काही ठिकाणी प्राचीन

मंदिरे उभी आहेत, तर काही ठिकाणी आधुनिक बन्दरे. आपली सागरकिनाऱ्याची सहल गुजरात राज्यातील कच्छपासून सुरू होते.

कच्छच्या पूर्व व उत्तरेकडे जवळजवळ सर्वत्र निर्जन-ओसाड वाळवंट पसरलेले असून ते कच्छचे रण म्हणून ओळखले जाते.

स्थलांतर करणारे पक्षी हिवाळा सुरू झाल्याबरोबर कळपाकळपाने येऊ लागतात अन् हे क्षेत्र त्यांच्या कोलाहलाने भरून जाते. हजारो कि.मी. अंतर पार करून मध्य आशिया व अन्य देशातून हे पक्षी कडाक्याच्या थंडीपासून स्वतःचे रक्षण करण्यासाठी अुडत येथे येतात. संपूर्ण देशात कच्छचे रण ही अशी एकच जागा आहे की जेथे फ्लेमिंगो पक्षी आपली अंडी घालतात.

या क्षेत्रातला विशेष प्राणी म्हणजे खेचर, इंग्रजीत याला 'वाइल्ड अॅस' असे म्हणतात. लाल-करड्या किंवा पिवळट-भुरक्या रंगाची ही खेचरे वाळवंटी प्रदेशातील कोरड्या हवेत सहजपणे राहू शकतात. निसर्गानेच अशी व्यवस्था केलेली आहे की, त्यांच्या शरीरातल्या ग्रंथीतले पाणी लवकर नाहीसे होत नाही अन् आपल्या शरीरात पाण्याचे भरपूर प्रमाण ही खेचरे राखून ठेवू शकतात. खेचरांना संरक्षण देण्यासाठी १९७३ मधे ४,८४० वर्ग कि.मी.च्या क्षेत्रावर 'ध्रांगध्रा राष्ट्रीय अुद्यान' निर्माण केले गेले आहे. सन १९६५ मधे मात्र अचानक या शांत-नीरव भागातली शांतता बंदुका व तोफांच्या आवाजाने भंग पावली. यावेळी येथे भारत व पाकिस्तान यांच्यात बरेच दिवसपर्यन्त युद्ध झाले.

जंगली गाढव खेचर

कच्छच्या बंदरांमधे मुख्य आहेत - मांडवी, मुंद्रा, जखऊ, लखपत, कोटेश्वर आणि कांडला. या प्राचीन बंदरांपैकी मांडवी हेच सर्वात मोठे व महत्त्वाचे बंदर मानले जाई. पूर्वीच्या काळात तेथे धान्य, खजूर, चामडी, लाकूड, वेलदोडा, दालचिनी, चिनी रेशीम इ. मालाने लादलेली जहाजे कोकण, मलबारच्या किनाऱ्यावरून आणि मस्कत, आफ्रिका देशातून येत असत. आणि तेथे माल अुतरवल्यावर कापूस, कापड, साखर, तेल, लोणी, तुरटी इ. लादून परत जात. माल लादलेल्या जहाजांचा ताफा येत असल्याची खबर मिळाली की मांडवीतील मोठमोठे व्यापारी तावडतोब समुद्रकिनारी जमत आणि दीपगृहाजवळ बनवलेल्या अुंच स्तंभावर चढून जहाजांची वाट पहात रहात; अन् वेळ घालवण्यासाठी 'कोणाचं जहाज अगोदर किनाऱ्यावर पोचेल' याबद्दल आपसात पैजा लावत. हा स्तंभ आजही अस्तित्वात आहे. कच्छचे व्यापारी कधीकधी आपले ताफे बनवूनही समुद्रावर व्यापारासाठी निघत.

कच्छचे शासक महारावल खेंगारजी तृतीय यांच्या असे लक्षात आले की कांडलाची नैसर्गिक स्थिति एक बंदर बनवण्यासाठी अगदी आदर्श अशी आहे. त्यांनी तेथे एक अत्याधुनिक बंदर बनवण्याची सूचना सरकारला दिली. त्यांच्या अविरत प्रयत्नांनी १९५५ मधे तेथे एक आधुनिक बंदर बनवण्यात आले. कांडला आपल्या देशाचे पहिले करमुक्त व्यापारी बंदर आहे. कांडलाच्या जवळच आशियातील सर्वात मोठा मीठ बनवण्याचा कारखाना आहे.

हिंदूंच्या चार धामांपैकी एक द्वारकापुरी हे देशाच्या अगदी पश्चिमतम टोकावर सौराष्ट्रात आहे. पुराणांनुसार, समुद्रदेवतेने द्वापरयुगात श्रीकृष्णाला द्वारकापुरी वसवण्यासाठी १२ योजने जमीन दिली होती आणि त्याच्या मृत्यूनन्तर व यादववंशाच्या विनाशानन्तर ती परत घेतली. येथील स्थानिक लोकांचा असा विश्वास आहे की, श्रीकृष्णाची ती जुनी द्वारका आजही समुद्राच्या अुदरात तशीच अस्तित्वात आहे. अन् आश्चर्याची गोष्ट अशी की अलिकडेच काही वर्षांपूर्वी समुद्रगर्भात शोध केल्यावर पुरातत्त्ववेत्त्यांना द्वारकेच्या किनाऱ्यापासून थोड्या अंतरावर एका शहराचे अवशेष सापडले आहेत.

द्वारकेतील मंदिर



आपण द्वारकेहून किनाऱ्याकिनाऱ्याने चालत सोमनाथला जाऊ म्हटले, तर वाटेत पोरबन्दर शहर लागेल. राष्ट्रपिता महात्मा गांधी यांचे हे जन्मस्थळ. त्यांच्या जन्मस्थानाला आज 'कीर्तिमन्दिर' असे संबोधले जाते. गांधीजींचा जन्म झालेली खोलीही या कीर्तिमन्दिरात पहायला मिळते. येथे एक कताई-कक्ष व एक प्रार्थना कक्षही आहे. कीर्तिमन्दिराचे शिखर ७९ फूट अुंच आहे.

गांधीजींना ७९ वर्षांचे आयुष्य लाभले. शिखरावर संगमरवराच्या शिलेवर गांधीजींच्या जीवनातील महत्त्वाच्या घटना अंकित केलेल्या आहेत.

येथील लोकांची समजूत आहे की पोरबन्दरचे प्राचीन नाव सुदामापुरी असे होते. श्रीकृष्णाने आपला प्रियसखा सुदामा याच्या साठी या नगराची निर्मिती केली होती.

द्वारकेच्या पुढे प्रभास क्षेत्रावर अरबी समुद्राच्या किनारी सोमनाथ मंदिर आहे. हे बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक होय. या मंदिराची निर्मिती इसवीसनाच्या



सोमनाथ मंदिर

पहिल्या शतकात केली गेली होती.

दर्शनासाठी येणाऱ्या राजे-महाराजे व धनिक व्यापाऱ्यांनी दिलेली धनराशी व भेटवस्तु यांमुळे मंदिराचे ऐश्वर्य व समृद्धि दिवसेंदिवस खूपच वाढत राहिली. असे म्हणतात की मंदिराच्या गाभाऱ्यातील समयांवर बहुमूल्य रत्ने जडवलेली होती. तेथील विशाल घंटा व तिची साखळी ठोस सोन्याने बनवलेली होती.पण ही अपार संपत्तीच मन्दिराच्या विनाशाचे कारण बनली. १०२५ मधे गजनीच्या महंमदाने मंदिर फोडले व लूट केली. तिथे मिळालेला एकूण ऐवज गजनीला नेण्यासाठी त्याला शेकडो हत्ती, उंट व खेचरांचा ताफा जुळवावा लागला.

या आक्रमणानन्तर गुजराथ व माळव्याच्या राजांनी मंदिर पुन्हा उभारले. परन्तु पुढील सातशे वर्षांत हे मन्दिर एकूण सहा वेळा पुन:पुन्हा फोडले व लुटले गेले. आजचे मन्दिर त्याच प्राचीन मंदिराच्या जागी पुनश्च बनवले गेले आहे. भारताचे पहिले राष्ट्रपति डा. राजेन्द्र प्रसाद यांच्या हस्ते ११ मे १९५१ रोजी या नव्या मन्दिरात शिवलिंगाची प्राणप्रतिष्ठा करण्यात आली.



# बाटलीतील भूत

नुकतेच अनुसूयेचे लग्न झाले होते. तिचा नवरा योगी तसा चांगला माणूस होता. पण तो आपल्या आजीला फार भीत असे. आजीवर त्याचं प्रेम ही होतं. त्याचे आई-वडील लहानपणीच वारले होते. आजीनेच त्याचे पालन-पोषण केले होते. आजी मंगला मोठी कजाग बाई होती. अनुसूयाकडून ती खूप कामे करून घेई. आणि वर तिला शिव्या देई. कधी कधी ती तिला मारहाण ही करी.

अनुसूयेला हे सर्व सहन होईना. तिने आत्महत्या करायचा निर्णय घेतला. रात्री गावाबाहेरच्या एका वडाच्या झाडाजवळ पोचली. त्यावेळी एक मांत्रिक तिथे भुतांचा शोध घेत होता. अनुसूयेशी बोलून त्याने तिची कहाणी जाणून घेतली.

अनुसूया मांत्रिकाला म्हणाली - ''माझी आता अधिक जगण्याची इच्छा नाही. मरून जाण्याचा एकादा सोपा मार्ग मला सांगाल?''

मांत्रिकाने हसत एक बाटली तिच्या हाती दिली आणि सांगितले - ''या बाटलीचे बूच उघडलेस की एक भूत बाहेर येईल. कसलं ही कष्टाचं काम असलं तरी ते करील आणि पुन्हा बाटलीत जाऊन बसेल. नंतर तू या भुताला सोडून दे. पण एक गोष्ट लक्षात ठेव. कुणाला दु:ख होईल असं काही काम याच्याकडून कधी करून घेऊ नकोस.''

अनुसूयेने मांत्रिकाचे आभार मानले आणि बाटली घेऊन आपल्या घरी परत आली.

दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे मंगला आरडा-ओरड करू लागली - ''अग ए चांडाळणी, उद्या सण आहे. अजून तू घर स्वच्छ केले नाहीस. भिंती सारवल्या




प्रकाश कलमाडी

नाहीस. अंगणात रांगोळी काढली नाहीस. या वर्षी आपलं खूप नुकसान होणार असं वाटतंय मला. ऊठ लवकर आणि सारी कामं उरकून टाक." अनुसूयाला सगळी कामं सोपवून ती झोपून गेली.

आजीने सांगितलेली कामं ऐकून बिचारी अनुसूया रडू लागली. तिला फार वाईट वाटलं. तिला वाटलं होतं सणाच्या दिवशी तिचे आई-वडील तिच्याकडे येतील, ती त्यांचा छान आदर-सत्कार करील, त्यांच्या साठी काही गोड पक्वाने बनवील. पण आजीने सांगितलेली कामे केव्हा संपतील कोण जाणे !

अनुसूयाला बाटलीतील भुताची आठवण झाली. बाटलीचे बूच उघडताच भूत बाहेर आले. तिने त्याला आपले रडगाणे ऐकवले.

अनुसूयाचे सांत्वन करीत भुताने स्वतःच सर्व कामे करायला सुरुवात केली. थोड्याच वेळात अनेक मिष्टान्ने बनविली. मंगला झोपून उठली तेव्हा सगळं घर सजलेलं तिने पाहिलं. पक्वानांचा सुवास घरात दरवळत होता. तिने एकदा सर्व घर नीट स्वच्छ झालंय असं पाहून घेतलं. मग तिने स्वतः भोजन केले. स्वादिष्ट पक्वान्नांचा आस्वाद घेत ती विचार करू लागली की एकट्या अनुसूयेने इतक्या थोड्या वेळात ही सर्व कामे कशी केली असतील? नंतर ती गप्प बसली.

दुसऱ्या दिवशी अनुसूयेचे आई-वडील आले. मंगलाने प्रेमाने त्यांचा आदर-सत्कार केला आणि त्यांच्या समोर अनुसूयेची तोंड भर स्तुति केली. दोन दिवस मुलीकडे राहून ते आपल्या गावी परतले. आपली मुलगी सासरी आनंदात आहे याचा त्यांना संतोष वाटला.

ते गेल्यावर मंगलाने पुन्हा सुनेला त्रास द्यायला सुरुवात केली. घरात धुण्याच्या कपड्यांचा ढीग पडला होता, दोन दिवस आई-वडील राहिल्यामुळे घरात सगळीकडे केर-कचरा झाला होता, घर स्वच्छ धुवायला पाहिजे होते. यासाठी विहिरीवर जाऊन मोठ-मोठ्या कळशा-हंड्यांतून पाणी आणायला पाहिजे होते. मंगलाने अनुसूयाला ही सर्व कामं करायला सांगितली आणि ती शेजारच्या घरी बसायला गेली.

बाटलीतील भुताच्या मदतीने सासू परत येईपर्यंत अनुसूयेने सगळी कामे झटपट पूर्ण करून टाकली.

ते पाहून मंगलाला आश्चर्याचा धक्काच बसला. इतक्या थोड्या वेळात अनुसूयेने सर्व कामे कशी केली हे काही तिच्या लक्षात येईना. असळ रागाने ती अनुसूयेला म्हणाली - "आपल्या विहिरीचे पाणी खारे आहे. सर्व कपडे कालव्याच्या पाण्यात धुवून आण."

अनुसूयेने होकार-दर्शक मान हलवली.

"नुसती मुंडी हलवली की काम होत नाही. सगळे कपडे तुला एकदम घेऊन जाता येणार नाहीत. अर्धे कपडे अगोदर धुवून आण, मग राहिलेले घेऊन जा. समजलं? धावत जा आणि पळत ये !"







मंगलाने आज्ञा फर्मावली.

अनुसूया शांतपणे म्हणाली - "लक्ष्मीची सून सरस्वती म्हणत होती, कालव्याच्या बाजूला छान गार हवा वाहते. कपडे तेथेच वाळवून आणू?"

तिच्या या प्रश्नावर मंगला रागाने लाल होत म्हणाली - "हो, तसंच कर. मी स्वतः पाहीन की कपडे नीट वाळले आहेत की नाही." आणि मंगला पुन्हा शेजारच्या घरी गप्पा मारायला गेली.

अनुसूया कालव्यावर गेली. भुताने खांब रोवले, दोरी बांधली आणि हा हा म्हणता सगळे कपडे स्वच्छ धुवून वाळवले.

थोड्या वेळाने मंगला स्वतः तेथे आली. दोरीवर कपडे वाळत असलेले पाहून तिने तोंडात बोट घातले. तरी पण तिने अनुसूयेची प्रशंसा केली नाही. तिला वाटलं - अनुसूया इतकी कठिण कामं चुटकी सरशी करते, याचा अर्थ तिच्यापाशी एकादी मायावी शक्ति असावी. ती मनातल्या मनात म्हणाली - "हिच्या जवळ मायावी शक्ति असली, तर मला काय तिची भीति? कारण अनुसूया स्वतःच मला भिते. नम्रपणे माझ्या आज्ञांचे पालन करते. मालकीण माझ्या मुठीत आहे, मग नोकर मला काय त्रास देतील?"

तेव्हापासून मंगलाने अनेक कठिण कामे अनुसूयेकडे सोपवायला सुरुवात केली नि स्वतः आरामात राहू लागली.

अशा रीतीने अनुसूयेला मदत करण्यासाठी दोन महिन्यात भूत अठ्ठ्याण्णव वेळा बाटलीबाहेर आले. आता त्याच्या फक्त दोनच पाळ्या शिल्लक राहिल्या होत्या. मग ते जायला स्वतंत्र होणार होते. मग सगळी कामं आपल्याला स्वतःलाच करावी लागणार अशा विचाराने चिंतित होऊन अनुसूया खोलीच्या कोपऱ्यात बसून राहिली.

अनुसूयेला बसलेली पाहून मंगला गरजली - "काय झालं ग? आरामात बसून राहिली आहेस? आपल्या विहिरीचं पाणी खारं आहे. गोड्या पाण्यासाठी कालव्यापर्यंत जावं लागतं ! तू आता एक काम कर - विहिरीतीलं सगळं पाणी उपस, आणि विहीर कालव्याच्या गोड्या पाण्याने भरून टाक.

मंगला गेल्याबरोबर अनुसूयेने बाटलीतील भुताला बोलवलं आणि त्याला आपल्या वाट्याला आलेलं काम सांगितलं.

आतां चिडून भूत म्हणाले - "तुझ्यासाठी अतिशय खडतर कामे मी करीत राहिलो. तुला वाटत असेल मी चुटकी सरशी सगळी कामं करून टाकतो. पण तुला काय माहीत मला किती त्रास घ्यावा लागतो आहे."

तिची कींव करीत भूत म्हणाले - "ठीक आहे, आता या कामाबरोबर माझी नव्व्याण्णव कामे पूर्ण होतील. मग एकच काम करायचं शिल्लक राहील ! त्यानंतर तू काय करणार आहेस?"

अश्रू पुसत अनुसूया म्हणाली - "मग आत्महत्या करण्याशिवाय मला काय गत्यंतर आहे बरं?"

क्षण भर भूत विचारात पडले. आणि मग त्याने सुचविले - "एक काम कर. माझा नातू फार चांगला मुलगा आहे. त्याच्या बायकोला मी खूप त्रास दिला. म्हणून भूत बनून तुझी सेवा करतोय! ही मंगला मोठी कजाग आहे, म्हणून आपण दोघे मिळून एक युक्ति करू. तुला बोलावून ती जेव्हा काही काम सांगेल, तेव्हा तू मला बोलव. तू मला तिला मारून टाकायची आज्ञा दे. मी तसं करीन आणि तिच्या भुताला बाटलीत बंद करून निघून जाईन. मग त्या भुताकडून तू मन मानेल तशी कामे करून घे. चांगला सूड उगव तिचा !" असे सांगून भुताने स्वच्छ गोड्या पाण्याने विहीर भरली आणि ते बाटलीत जाऊन बसले.

अनुसूया काय करीत आहे हे पहायला मंगला येतच होती, तेव्हा भुताचा हा कट तिने ऐकला. गेले काही दिवस काय चालू आहे हे आता तिच्या लक्षात आले. तेव्हा पासून मंगलाने अनुसूयेला एक ही काम करायला सांगितलं नाही. भुताला शंभरावं काम करायची वेळच आली नाही. बिचारं बाटलीतच बंद पडून राहिलं !





# पोपटाचे ज्योतिष

मांडव देशाच्या राजाने आपली मुलगी रत्नमाला हिच्या स्वयंवराच्या निमंत्रण-पत्रिका सर्व देशांच्या राजांकडे रवाना केल्या. त्रिशांबी मांडवचा शेजारी देश होता. त्या देशाचा राजकुमार संदीप याने रत्नमालेच्या सौंदर्याबाबत खूप ऐकले होते. तिच्याशी आपला विवाह व्हावा अशी त्याची इच्छा होती.

राजकुमारी रत्नमाला आपल्याला पसंत करील व स्वयंवरात आपल्याच गळ्यात वरमाला घालील असा संदीपला विश्वास होता. विश्वासपूर्वक काही दिवस अगोदरच तो मांडव राजधानीत आला. स्वयंवराच्या मुहूर्ताला अजून थोडा अवकाश होता. आताच राजदरबारात जाऊन अन्य राजकुमारांनी आपल्याला पहावे अशी संदीपची इच्छा नव्हती. म्हणून त्याने थोडी विश्रांति घेतली आणि राजधानीत एक फेरफटका मारायला निघाला. राजधानीतील काही प्रेक्षणीय ठिकाणे त्याला पहायची होती.

तो जेव्हा राजमार्गावर चालत होता, तेव्हा एका छोट्या मंदिरासमोर एक जाहिरात टांगलेली त्याने पाहिली. जाहिरात होती - "पोपटाचे ज्योतिष, फक्त एक मोहोर !"

संदीपला या ज्योतिषाबाबत जाणण्याची उत्कण्ठा निर्माण झाली. एक मोहोर देऊन त्याने मंदिरात प्रवेश केला. आत एक पिंजरा लटकत होता, नि आत होता एक पोपट. तो पोपट माणसाची वाणी बोले.

संदीपला पाहताच पोपट उद्गारला - "त्रिशांबि नगरीच्या राजकुमाराचे स्वागत ! सुस्वागतम् !! आमची राजकुमारी रत्नमाला हिच्या स्वयंवरासाठी आपण आलेले आहात. तेव्हा आपण आमचे बंधूच ना? आपले कल्याण होवो हीच शुभेच्छा !"

पोपटाचे हे बोलणे ऐकून संदीपला मोठे आश्चर्य वाटले. तो कोण आहे, कशासाठी राजधानीत आला आहे हे सर्व या पोपटाला कसे माहीत झाले हे काही त्याच्या लक्षात येईना. त्याबाबत विचार करीत असताना त्याचे लक्ष एकदम आपल्या कपड्यांकडे गेले. त्याला वाटलं आपल्या कपड्यांवरून पोपटाने हे सर्व जाणले. तो आपल्या निवास-स्थानी परत आला.

आता संदीपने आपली उंची राजोचित वस्त्रे काढून टाकली व एका सामान्य माणसाचा वेष धारण केला. पुन्हा एकदा येऊन त्याने मंदिरात प्रवेश केला. त्याला पाहताच पोपट म्हणाला - "त्रिशांबीच्या राजकुमाराचे पुन्हा एकदा स्वागत - सुस्वागतम् ! आमच्या राजकुमारीच्या स्वयंवरासाठी आलेले आपण आमचे बंधूच. आपले कल्याण होवो !"

पोपटाचे हे बोलणे ऐकून संदीपला आणखी जास्त आश्चर्य वाटले. पहिल्या वेळी त्याच्या वस्त्रांवरून पोपटाने 'तो कोण?' हे ओळखले असेल, पण यावेळी तर त्याने अगदी सामान्य कपडे घातलेले होते. तरी पण पोपटाने त्याला बरोबर कसे ओळखले हे त्याला समजेना.

संदीप याबाबत बराच विचार करीत राहिला. तो लगबगीने बाहेर पडला. रस्त्यात त्याने आपले केस कापून घेतले आणि नंतर जवळच्या एका दुकानात शिरला.

या दुकानात रंगी-बेरंगी कपडे होते. साधु-संन्यासी वापरतात अशा भगव्या वस्त्रांचे त्याला खूप आकर्षण वाटले. पण साधु-संन्यासी पोपटाकडे ज्योतिष जाणण्यासाठी

**अनिल ठाकरे**



जाणार नाहीत. तेव्हा एखाद्या बहुरूप्याचे कपडे आपल्याला योग्य होतील का असा विचार तो करू लागला. त्याला वाटलं आपल्या सारख्या राजकुमाराने असले कपडे कसे घालावेत. कपड्यांबाबत निर्णय करण्यात संदीपचा बराच वेळ गेला. शेवटी त्याने पुरोहिताचे कपडे खरेदी केले.

यावेळी पुरोहिताची वस्त्रे धारण करताना संदीपला कसेसेच वाटले. तरी पण अनिच्छेने त्याने ते कपडे अंगावर चढविले, कपाळावर टिळा लावला. खांद्यावर उपरणे घेतले आणि तो त्या मंदिरात जाऊन पोचला.

त्याला पाहताच खदखदा हसत पोपट म्हणाला - "त्रिशांबि नगरीच्या राजकुमाराच्या पुनरागमनाबद्दल मी त्याला हार्दिक धन्यवाद देतो. आमची राजकुमारी रत्नमाला हिच्या स्वयंवरात भाग घेण्यासाठी किती त्रास सोसून आपण इथे आलात ! पण आताच स्वयंवराचा मुहूर्त टळला. आमच्या राजकुमारीने विशालनगरच्या राजकुमाराच्या गळ्यात वरमाला घातली. ती आता त्याच्याशी विवाह करणार आहे. आपण ज्या कामासाठी आलात ते तर विसरूनच गेलात. माझ्या बद्दलची आपली जिज्ञासा याला कारणभूत आहे. हाती आलेली संधि गमावणारे आपण सहावे राजकुमार आहात. इतर पांचांप्रमाणे आपल्याबद्दल ही मला फार सहानुभूति वाटते. याशिवाय माझं ज्योतिष ऐकण्यासाठी आपण तीन वेळा इथं आलात. शतशः धन्यवाद !" आणि पोपटाने आपले पंख फडफडवले.

पोपटाचे हे बोलणे ऐकून आता आपली चूक संदीपच्या लक्षात आली. राजकुमारीच्या स्वयंवरासाठी निघाला, स्वयंवरापूर्वीच राजधानीत पोचला, पण स्वयंवरात उपस्थित राहू शकला नाही ! इतकेच नव्हे, तर पोपटाचे ज्योतिष ऐकण्यासाठी निरनिराळे वेष धारण केले ! त्याला वाटलं - लोकांना हे सर्व समजलं तर ते खूप खूप हसतील !

स्वतःलाच दोष देत दुःखी अंतःकरणाने तो आपल्या निवास-गृहात आला. मुकाट्याने आपल्या राज्यात परत जायला निघाला.





# महाभारत

दक्षिण समुद्र तटवर्ती प्रदेशात सौभद्र नामक तीर्थ आहे. त्यात स्नान करण्यासाठी अर्जुन पाण्यात प्रवेश करणार, इतक्यात तेथील ब्राह्मणांनी त्याला अडवले अन् त्या तीर्थाबद्दल माहिती दिली.

"या सौभद्र-तीर्थाबरोबरच पालोमा, कारंडव, प्रसन्न व भारद्वाज नावाची तीर्थेही याच प्रदेशात आहेत. परन्तु गेल्या शंभर वर्षात यांपैकी कोणत्याही तीर्थात कोणी स्नान करत नाही. त्यात मगरी रहात असल्यामुळे स्नानासाठी उतरणे धोक्याचे आहे."

पण केवळ मगरीला भिऊन यात स्नान करण्याचे साहस न करणे, म्हणजे तो केवळ भित्रेपणा आहे, असे अर्जुनाला वाटले. म्हणून निःसंकोचपणे त्याने या तीर्थातही प्रवेश केला.

पाणी हलल्याचा आवाज ऐकल्याबरोबर त्या तीर्थातील विशाल मगर पुढे आली व तिने धडामकन् अर्जुनाचा पाय पकडला. पण अर्जुनाने तशाच अवस्थेत तिला खेचून पाण्याबाहेर आणले आणि किनाऱ्यावर खाली फेकले. त्याबरोबर मगरीचे एका सुंदर स्त्रीत परिवर्तन झाले ! अर्जुनाने विचारले, "हे सुंदरी, तू कोण आहेस? तू मगर कशी होतीस अन् आता पुन्हा स्त्री कशी झालीस?"

उत्तरादाखल ती स्त्री म्हणाली, "महाराज, मी एक अप्सरा आहे. माझं नाव आहे वर्गा. सौरभेयी, समीची, पसा, लता या माझ्या चार मैत्रिणीही शापामुळे मगरी बनल्या. त्याही इथल्या जवळच्या चार तीर्थात रहात आहेत. आपण माझं जसं शापविमोचन

द्वारकेत अर्जुन

केलंत, तसंच त्या चौघींनाही शापमुक्त करा.''

''पण हा भयानक शाप तुम्हाला का लागला?'' अर्जुनाने विचारले. वर्गा आपली कहाणी सांगू लागली.

''आम्ही पाचही जणी दिक्पालांची नगरे पहायला निघालो. ती पहातपहात आम्ही भूलोकी अुतरलो. एका वनात एक ब्राह्मण तपस्येत लीन असलेला आम्हाला दिसला. तो एखाद्या अग्निहोत्रासारखा ज्वालायमान, तेजस्वी दिसत होता. त्याची तपस्या भंग करावी असं आमच्या मनात आलं अन् त्याला अुत्तेजित करण्यासाठी आम्ही मधुर गाणी गायिली, तऱ्हेतऱ्हेची नृत्यं प्रदर्शित केली. तरीही त्याच्यावर ढिम्मसुद्धा परिणाम होईना. त्यानं आम्हाला काडीचीही किम्मत दिली नाही. मग आम्हीही जास्तच चेकाळून गेलो अन् त्याचं लक्ष वेधण्यासाठी हरतऱ्हेचे प्रयत्न केले. शेवटी तो चिडला, अन् त्याने आम्हाला मगरी बनायचा शाप दिला. आम्ही ताबडतोब त्याच्या पायावर लोळण घेअून त्याला विनवलं की, 'स्त्रियांना अशी शिक्षा देणं बरं नव्हे. असल्या जिण्यापेक्षा आम्ही मरण पत्करायला तयार आहोत.' तेंव्हा तो म्हणाला की, 'तुम्हाला शंभर वर्षं तरी मगरींच्या रूपात रहावंच लागेल. त्यातून तुमची सुटका नाही. पण नंतर मात्र कोणी तरी तुम्हाला पाण्याबाहेर खेचून काढेल व नंतरच तुम्हाला निजस्वरूप लाभेल.' तेंव्हापासून आम्ही पाचजणी या पाच तीर्थांत रहात आहोत. आता लवकर चला अन् बाकीच्या माझ्या चार मैत्रिणींनाही मुक्त करा.'' तिच्या इच्छेनुसार अर्जुनाने त्या चारही तीर्थात अुतरून तिच्या मैत्रिणींचे शापविमोचन केले.



अर्जुन यानन्तर तेथून मणिपुरला परत आला आणि चित्रांगदेबरोबर राहू लागला. काही काळानन्तर चित्रांगदेला झालेल्या पुत्राचे नाव ठेवले बभ्रुवाहन. वंशोद्धारक म्हणून चित्रांगदेने हा पुत्र आपल्या पित्याला अर्पण केला. यानन्तर तेथील जवळच्या प्रभासतीर्थात अर्जुनाने स्नान केले. त्या रात्री पाअूस टपटपत होता. त्यामुळे तो एका झाडाखाली झोपला.

तेथे गदुड नावाच्या एका यादवाशी अर्जुनाचा परिचय झाला. त्याने कृष्णाची बहीण सुभद्रा हिचे सौन्दर्यवर्णन अर्जुनासमोर केले. सुभद्रा तिलोत्तमेपेक्षाही लावण्यवती असल्याबद्दल अर्जुनाने अगोदरच ऐकले होते. आता तिला प्रत्यक्ष पाहून आपलीशी करायचा निश्चय अर्जुनाने केला. प्रभासतीर्थापासून द्वारका फार दूर नव्हती. तिथे गेल्यावर कृष्णाचेही दर्शन होईल.

यादवांच्या मनात संन्यासी, यती लोकांबद्दल फार आदरभाव असतो, हे जाणून अर्जुनाने यतिवेषांत द्वारकेला जायचे ठरवले. या अवधीत अर्जुन तीर्थयात्रा करत प्रभास तीर्थावर पोचल्याची बातमी द्वारकेत पोचली होती. कृष्ण त्याला भेटण्यासाठी स्वत:च प्रभासक्षेत्री पोचला. अर्जुनाचा अवतार पाहून त्याने विचारले, ''अर्जुना, अरे हा कसला वेष धारण केला आहेस?''



अर्जुनाने आपल्या मनातली इच्छा कृष्णाजवळ व्यक्त केली. कृष्णाने त्याला आपली संमती दर्शवली. अर्जुनाला रैवतक पर्वतावर ठेवायचे ठरवून त्याला तो आपल्या बरोबर घेअून गेला. तेथे एक रात्र व एक दिवस या दोघांनी एकमेकांच्या सहवासात गप्पा मारण्यात, नृत्य-गायनाचा आनन्द अुपभोगत व जेवणाखाण्यात व्यतीत केला. दुसऱ्या दिवशी सकाळीच अर्जुनासाठी जरूर त्या सुखसोयींची व्यवस्था करून कृष्ण द्वारकेत परतला.

यानन्तर काही दिवसांनी रैवतक पर्वतावर



यादवांनी मोठा अुत्सव साजरा केला. तो अुत्सव पहाण्यासाठी द्वारकेहून वसुदेव, अुग्रसेन, अक्रूर इ. यादव पुरुष, देवकी, रेवती, रुक्मिणी, सत्यभामा, जांबवंती इत्यादी अंत:पुरातील स्त्रिया आणि सुभद्रा व इतर कन्याही आल्या. या साऱ्या मेळाव्यात फिरणाऱ्या सुभद्रेला पाहून अर्जुन फारच खूश झाला. अुत्सव संपल्याबरोबर सर्वजण द्वारकेला परत गेले.

कृष्णाच्या अनुमतीने आता अर्जुनानेही रैवतक सोडला आणि द्वारकेतील एका अुद्यानवनात तो राहू लागला. तेथे विहार करण्यासाठी आलेल्या बलराम आदि यादवांनी यतिवेषातील अर्जुनाला पदस्पर्श करून नमस्कार केला. हा वेषांतरित अर्जुन आहे हे कोणालाही माहीत नव्हते. ते त्याला खराखुरा संन्यासीच समजत होते. त्यांनी नम्रतेने अर्जुनाला विचारले, ''आपण कोणकोणत्या पुण्यक्षेत्रांना भेटी दिल्यात? कोणती तीर्थस्थाने पाहिलीत? इथे किती दिवस रहाणार आहात?'' अर्जुन अुत्तरला, ''चातुर्मास इथेच कंठायचा विचार आहे माझा. चातुर्मास म्हणजे श्रावण शुक्लपक्षापासून कार्तिक शुक्लपक्षापर्यंत, चार महिने पर्यन्त निष्ठेने पूजा-पाठ करायचा!''

बलराम त्याच्या बोलण्याने प्रभावित झाला. जवळच बसलेल्या कृष्णाला तो म्हणाला, ''सुभद्रेच्या महाला जवळच्या लतागृहात या यतीच्या रहाण्याची सोय करू या आपण. तुझा काय विचार आहे कृष्णा?''

कृष्ण म्हणाला, ''पण दादा! हा यति दिसायला सुन्दर आहे, अन् आपली सुभद्राही अतिसुन्दर आहे. काही निराळाच परिणाम झाला तर? मला तर भीतीच वाटतेय!''

''सर्वांकडे संशयी दृष्टीनं पहाणं योग्य नव्हे कृष्णा ! या यतीसाठी तेच अतिअुत्तम स्थान आहे.'' बलरामाने आग्रह धरला. आता कृष्णाने असे नाटक केले की, जणु काही आपण आपल्या अग्रजाचे म्हणणे खोडून काढू शकत नाही. मोठ्या नाटकीपणाने त्याने बलरामाच्या प्रस्तावाला मान्यता दिली. अर्जुनाला सुभद्रेच्या लतागृहात ठेवण्यात आले.



कृष्णाने मात्र सत्य गोष्ट हळूच रुक्मिणी अन् सत्यभामा यांच्या कानावर घालून ठेवली. नंतर तो सुभद्रेला म्हणाला, ''सुभद्रे, यतीला तुझ्या लतागृहात ठेवले आहे. तू अन् तुझ्या सख्यांनी त्याची योग्य ती सेवा करायला हवी. त्याला ज्या ज्या गोष्टींची गरज पडेल, त्या त्या पुरवायला हव्यात. त्याच्या स्नान भोजनादींच्या बाबतीत नीट जागरुक रहा. आजपर्यंत यतींची सेवा करून अनेक यादवकन्यांनी त्यांच्याकडून वर मिळवले आहेत.''

कृष्णाच्या आज्ञेनुसार सुभद्रा यतिसेवेत रत झाली. तिने त्याची कसलीही गैरसोय होऊ दिली नाही. सुभद्रेच्या सौन्दर्यावर अर्जुन मोहून गेला. त्याच्या तीर्थयात्रांची मुदत खरी तर केव्हाच संपून गेली होती. परन्तु आता इन्द्रप्रस्थाला परत जायची त्याला इच्छा होत नव्हती.

एकीकडे अर्जुनाची अशी स्थिती होती, तर दुसरीकडे सुभद्रेचीही अवस्था तशीच झाली होती. अर्जुनाबद्दल तिच्या मनात अतीव आदर अुत्पन्न झाला. यादव गदुडाचेच नव्हे, तर अर्जुनाच्या प्रशंसेसाठी काढलेले कृष्णाचे बोलही तिच्या कानात गुंजत होते. तिने वारंवार असेही ऐकले होते की, यादव जेंव्हा आपल्या मुलांना आशीर्वाद देतात, तेंव्हा असे म्हणतात की, ''अर्जुनासारखा धनुर्धारी बन.'' या सर्व बोलण्यांमुळे अर्जुन तिच्या मनाला व्यापून राहिला होता. इन्द्रप्रस्थाहून कोणी आलेले कळले, की मुद्दाम भेटायला जाअून ती अर्जुनाबद्दल विचारी अन् त्याचे सांगणे श्रद्धेने ऐके.

एकदा अर्जुन एकटाच असताना सुभद्रेने त्याची परिचर्या संपल्यावर त्याला विचारले. ''आपण कोणकोणते देश पाहिले आहेत? कधी इन्द्रप्रस्थाला गेला होता का? आमची मावशी कुन्तीदेवी खुशाल आहे नं? धर्मराज वगैरे सर्व? विशाल नेत्र व आजानुबाहु अर्जुनाला आपण ओळखता का? तो मोठा पराक्रमी व अुच्च कोटीचा वीर आहे.''

अर्जुन अुत्तरला, ''इन्द्रप्रस्थात कुन्तीदेवी, पांडव अन् द्रौपदी इ. सर्वजण खुशाल आहेत, सुखी आहेत. पण त्यांना माहीत नसताना अर्जुन मात्र आत्ता यतिवेषात व्दारकेला सुभद्रेसमोर बसलेला आहे! सुभद्रे, तुला मी आवडतो, त्यापेक्षा कित्येक पटींनी अधिक तूच मला आवडतेस. एकाद्या शुभमुहूर्तावर तुझ्याशी विवाह करून मी आपले जीवन सार्थकी लावीन.''

सुभद्रा लज्जेने मस्तक झुकवून गप्प राहिली व थोड्याच वेळात तेथून पळून गेली.

त्या दोघांची परिस्थिति पाहून कृष्णाने रुक्मिणीची अर्जुनाच्या सेवेसाठी नियुक्ती केली. अर्जुनाला प्रत्यक्षात पाहिल्यानंतर तर सुभद्रा त्याच्यावरच्या प्रेमात वेडीच झाली. तिने आहार, निद्रा सोडून दिली.

आपल्या कन्येची स्थिती पाहून देवकीदेवी म्हणाली, ''वेडे, का अशी झुरत चालली आहेस? तुझं म्हणणं घरच्या पुरुषांना सांगून तुझ्या इच्छापूर्तीचा प्रयत्न करीन मी.''

देवकीने सुभद्रेबद्दल आपला पति वसुदेव याज्याजवळ बोलणे केले. त्याने ही गोष्ट अुग्रसेन, अक्रूर इ. यादवांना सांगितली. कृष्णाची अनुमती घेअून त्यांनी दहा दिवसांनंतरचा विवाहमुहूर्तही निश्चित केला. परन्तु हे सर्व बलरामा पासून लपवून ठेवण्यात आले. यासाठी त्यांनी दवंडी पिटवली की, अंतर्द्वीपात बारा दिवस पर्यन्त अुत्सव साजरा करण्यात येणार आहे.

हे अंतर्द्वीप खूप विशाल होते. या अुत्सवात भाग घेण्यासाठी लहान मुलांपासून मोठ्यांपर्यन्त सर्वजण गेले. अर्जुनाला वाटले होते की कृष्णही त्यासाठी जाईल. त्याने सुभद्रेच्या मागे लागून कृष्णाला तसे विचारायला लावले. ती कृष्णाला म्हणाली, ''दादा, तूही अंतर्द्वीपाला गेलास, तर यतीची सेवा योग्य तऱ्हेने होणार नाही. तू इथेच रहा ना !''

कृष्ण म्हणाला, ''यावेळी यतिसेवा तुला एकटीलाच करावी लागेल. त्यासाठी योग्य असे दुसरे कोणीही नाहीय.'' अन् तोही तिकडे निघून गेला. अन् अशा तऱ्हेने अर्जुन व सुभद्रेचा बेत सफल झाला.

क्रमशः



## चान्दोबाच्या बातम्या

### फक्त सेहेचाळीस वर्षे

आंतरराष्ट्रीय विशेषज्ञ अन्वर फाजल यांचे म्हणणे असे आहे की आपली ही पृथ्वीमाता फक्त सेहेचाळीस वर्षांचीच



आहे. ऐकायला काहीसे विचित्रच वाटतेय न? पण त्यांचे म्हणणे तसे बरोबरच आहे. कारण, सर्व अन्य वैज्ञानिकांच्या मतानुसार पृथ्वी ४६,०० मिलियन वर्षांपूर्वी निर्माण झाली. या आकड्यालाच अन्वर हुसेन ४६ वर्षे म्हणतात. त्यामुळे बाकीचे कालमापन सोपे पडते. बंगलोरला नुकत्याच झालेल्या एका सभेत बोलताना अन्वर फाजल म्हणाले की, "पृथ्वीच्या बाल्यावस्था व तारुण्यावस्था यांच्याबद्दल आपल्याला काहीच माहिती नाहीय. खरे तर आपल्याला जे काही माहीत आहे, ते केवळ मागील चार वर्षांपुरतेच. राक्षसी पाली व तत्सम सरपटणारे प्राणी फक्त एक वर्षापूर्वी पर्यन्त अस्तित्वात होते. एका आठवड्यापूर्वीच बर्फात संपूर्ण बुडालेली पृथ्वी बर्फाबाहेर पडली. चार तासांपूर्वीपासून मानव जात पृथ्वीवर वावरत आहे. शेती केवळ एका तासापूर्वीच सुरु झालीय. औद्योगिक क्रान्ती एका मिनिटापूर्वी घडून आली, गेल्या साठ क्षणात प्राण्यांच्या पाचशे जाती नामशेष झाल्या!" असे सांगून त्यांनी आपले भाषण समाप्त केले. आता ४६ वर्षे वयाचे रहस्य आले ना ध्यानात?

### पुन्हा शाळेत

'माणसाचे शिक्षण त्याच्या जीवनाच्या अंतापर्यंत चालू असते.' असे म्हणतात. पण त्याचा अर्थ असा नव्हे की आपल्याला पुन्हा शाळेत जाऊन काही शिकायला हवे. पण द. अमेरिकेतील ब्राझील या प्रान्तातल्या काही प्रमुखांना खरोखरच पुन्हा शाळेत जावे लागले. 'कित्येक असे नेते आहेत की ज्यांचे राजनैतिक ज्ञानच अपुरे आहे. ते अनुभवहीन असल्यामुळे आपली कर्तव्ये नीट पार पाडू शकत नाहीत' - असे म्हणून विधानसभेचे सदस्य, मेयर, कौन्सिलर आदि एकूण १८० लोक राजनैतिक, सामाजिक व आर्थिक बाबतीतले ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी पुन्हा शाळेत दाखल झाले. आपल्या देशातील लोकसभा व राज्यसभेत प्रथम निवडून येणाऱ्या सभासदांनाही तेथील कार्य कसे चालते याबद्दलचे आपले ज्ञान अजमावून घेण्यासाठी एक कोर्स पुरा करावा लागतो.

### विद्यार्थीच शिक्षक बनला

अमेरिकन वैमानिक दलाचा कॅप्टन स्कॉट ओ ग्रेडी हा १९९१ मधे तेथील शिक्षणालयाचा एक विद्यार्थी होता. दोन वर्षांपूर्वी तो शान्तिसुरक्षा दलाचा सदस्य बनून बोस्नियाला गेला. तो जे विमान चालवत होता, ते शत्रूने खाली पाडले. तो ज्या ठिकाणी पडला, त्या स्थानाची त्याला काहीच माहिती नव्हती. अनेक कष्ट करून, कसेतरी त्याने स्वतःला वाचवले. सहा दिवसांनंतरच मदत मिळून त्याला सुरक्षित ठिकाणी नेले गेले. त्याने आपले प्राण कसे वाचवले, कोणकोणत्या परिस्थितीतून त्याला जावे लागले, तसे करताना त्याने कोणत्या पद्धती अवलंबल्या वगैरे त्याचे प्रत्यक्ष अनुभव जाणून घेण्यासाठी शिक्षणविभागातील लोकांनी त्याच्याभोवती गर्दी केली. या गर्दीत त्याचे काही अध्यापकही हजर होते! अशा प्रकारे प्रत्यक्ष अनुभवाच्या जोरावर तो आपल्याच शिक्षकांचा शिक्षक बनला.

## चान्दोबा पुरवणी - ८५

## आपल्या देशाची वृक्षसंपदा

# भुटकेश

भुटकेश हे भाग्यदेवतेचे आवडते फूल मानले जाते. सत्यस्वरूप महाविष्णूंचा आवडता पांढरा रंग यात स्पष्टपणे दिसून येतो. बंगालीत याला 'नागवली', तमिळमधे 'वेळ्ळैइलै', मल्याळीत 'पाराधोली', हिन्दीत 'पेदीना' व संस्कृतमधे 'श्रीवटी' असे म्हणतात. वनस्पतीशास्त्रात याला 'मुस्सैंडा फ्रौंडोसा' या नावाने ओळखले जाते. श्रीकृष्णाचे निवासस्थान असलेल्या वृंदावन, मथुरा व भरतपुर या विशाल भूप्रदेशात ही झाडे विपुल प्रमाणात आढळतात. याशिवाय नीलगिरी, पश्चिम घाटातील काही प्रदेश, दार्जिलिंगच्या आसपासचा मुलूख व प. बंगालमधेही ही झाडे आढळतात.

केवळ सहा मीटर इतक्या उंचीपर्यंत वाढणाऱ्या या झाडाची पाने गर्द हिरव्या रंगाची असतात, अन् प्रत्येक डहाळीच्या शेवटाला एक अगदी स्वच्छ पांढऱ्या किंवा काहीशा मळकट पांढऱ्या रंगाचे मोठे पान असते.

पाने जोडी-जोडीने एकमेकांविरुद्ध अशी येतात. साधारण दहा बारा सेंटीमीटर लांबीची ही पाने काहीशी लांबट गोलाकार व शेवटाकडे निमुळती टोकदार असतात. पानाचा वरचा भाग गर्द हिरवा असून मागील भाग काहीसा फिका असतो. पानाची मधली शीर दोन्ही बाजूंना चांगली भरीव, टपटपीत दिसते.

या झाडाची फुले मधे केशरी व बाजूने करड्या रंगाची असून आकाराने फारशी मोठी नसतात. पुष्प कोषाला पाच फाटे फुटतात व त्यातलाच एक फाटा पानासारखा आकार धारण करतो. या पानाचे आकारमान जवळजवळ इतर पानांइतकेच असते. या पानाशिवायचे बाकीचे फाटे गळून पडतात. फुलांचा उपयोग सर्वसाधारणपणे माळा बनवण्यासाठी केला जातो. या माळांचा उपयोग दाराला तोरण म्हणून लावण्यासाठी करतात.

या झाडाचे फळ अंडाकार असून हिरवे असते. पिकल्यावर त्यांचा रंग काळा पडतो. झाडाच्या जवळ जवळ सर्वच भागांचा औषधांसाठी उपयोग होतो.



आपल्या देशातील ऋषि-मुनि : ९

# दुर्वास

त्रिपुरासुराच्या वधासाठी भगवान शंकराने एक बाण बनवला. त्यात प्राण फुंकून त्याने तो आपल्या लक्ष्यावर सोडला. ईप्सित कार्य पूर्ण करून तो बाण परत फिरला व आपल्या निर्मात्याकडे परत येऊन एकाद्या शिशुप्रमाणे शिवाच्या मांडीवर झोपल्यासारखा आडवा पडला. ते पाहून प्रसन्न झालेल्या शिवाने त्याला मानवी बाळाचे रूप प्रदान केले. हेच बाळ मोठे होऊन पुढे 'दुर्वास' नावाने प्रसिद्धीस आले.

मुळातच संहारासाठी निर्माण झाल्यामुळे पुढे श्रेष्ठ मुनी होऊनही दुर्वासांचा संहारक गुण तसाच राहिला. त्यांचा हा संहारगुण क्रोधरूपात बाहेर पडे. बारीकसारीक बाबतीतही त्यांना चटकन राग येई. परंतु सत्य गोष्ट ध्यानात आल्यावर ते शान्त ही होत.

आपल्या पौराणिक कथांशी दुर्वासांचा खूप संबंध आहे. यात सर्वात प्रसिद्ध आहे दुष्यंत शकुन्तलेची कथा. शकुन्तला कण्व मुनींच्या आश्रमात वाढली. तिने दुष्यंताशी गांधर्वविवाह केला. 'राजधानीला येशील, तेंव्हा मी तुला स्वीकारीनच' असे वचन देऊन दुष्यन्त निघून गेला. एके दिवशी दुर्वास मुनि कण्वांच्या आश्रमात आले. शकुन्तला त्या वेळी दुष्यंताच्या आठवणीत मग्न असल्यामुळे दुर्वासांचे आगमन तिच्या ध्यानात आले नाही. शकुन्तला जाणून बुजूनच अशी वागत आहे, असे वाटून दुर्वासांनी या अपमानामुळे रागावून तिला शाप दिला - ''ज्याच्या आठवणीत स्वत:ला हरवून मला बेपर्वाई दाखवलीस, तोच तुला विसरून जाईल.'' शकुन्तलेच्या सख्यांनी शाप परत घेण्याबद्दल त्यांना विनवल्यावर ते शान्त झाले अन् आपल्या शापाची तीव्रता त्यांनी कमी केली.

राजाला भेटायला शकुन्तला राजधानीत गेली, तेंव्हा प्रथम दुष्यन्ताने तिची ओळखही नाकारली. पण काही कालावधीनन्तर पश्चात्ताप होऊन त्याने शकुन्तलेचा स्वीकार केला. ही सारी घटना केवळ दुर्वासामुळेच घडली.

दुर्वासांची अशी वागणूक केवळ सामान्य माणसांबाबतच नव्हे, तर अवतारी पुरुषांबाबतही होई. श्रीकृष्ण द्वारकेचा शासक होता. दुर्वास एकदा त्याची परीक्षा घेण्यासाठी तेथे गेले. त्यांनी खीर मागून घेतली. रुक्मिणी व कृष्णाने स्वत: ती बनवून दिली. ती कृष्णाच्याच हाती देऊन दुर्वासांनी त्याला स्वतच्या सर्वांगाला फासून घ्यायची आज्ञा दिली. कृष्णाने मुकाट्याने ती पाळली. पण दुर्वास एवढ्याने तृप्त झाले नाहीत. ते स्वत: रथात बसले व घोड्यांच्या जागी स्वत:ला जुंपून तो कृष्ण-रुक्मिणींनी ओढून न्यावा अशीही आज्ञा त्यांनी केली. दोघांनी विनयपूर्वक या आज्ञेचेही पालन केले. रथ ओढत ते एका जंगलात येऊन थेले. त्यांच्या या वृत्तीने प्रसन्न होऊन मोठ्या प्रेमाने दुर्वासांनी कृष्णाला आलिंगनबद्ध केले. ते म्हणाले, ''तपस्वी लोकांबद्दल तुला किती आदर आहे, हे पहाण्यासाठी मी तुझी परीक्षा घेतली. तुझी सहनशक्ती व विनय गुण असामान्य आहेत. खीर लेपलेल्या तुझ्या शरीराला कोणीही शस्त्राने आघात पोचवू शकणार नाही. ते अभेद्य आहे.'' त्याला वर देऊन दुर्वास निघून गेले.

कृष्णाने आपल्या तळपायांना खीर लावलेली नव्हती, त्यामुळेच अंतिम समयी एका किराताने मारलेला बाण तळपायात घुसून त्याचा मृत्यु ओढवला.



## तुम्हाला माहीत आहे काय?

१. पहिला अन्तरिक्ष प्रवासी कोण होता?
२. 'मॅकमोहन रेषा' चा अर्थ काय?
३. देवमाशाचे आकारमान काय असते?
४. जगात सध्या सजीव असणारे ज्वालामुखी किती आहेत?
५. भारतीय अन्तरिक्ष परिशोध संस्था केंव्हा स्थापन झाली?
६. कांगारू किती लांबीची उडी मारू शकतो?
७. पेनिसिलिनचे संशोधक कोण? शोध केंव्हा लागला?
८. 'जन्तर-मन्तर' म्हणजे काय आहे? ते कोठे आहे?
९. स्वत:च्या आसाभोवती फिरायला सूर्याला किती वेळ लागतो?
१०. 'ब्रह्मो समाजा' चे संस्थापक कोण?
११. बॅडमिंटन हा खेळ प्रथम केंव्हा खेळला गेला?
१२. रवीन्द्रनाथ टागोर यांना नोबेल पारितोषिक केंव्हा देण्यात आले?
१३. २,५०० वर्षांपूर्वी गौतम बुद्धाने आपले पहिले प्रवचन एका मृगवनात दिले. ते सध्या कोठे आहे?
१४. आकाशवाणीने आपला व्यापार विषयक 'विविध भारती' कार्यक्रम केंव्हा सुरु केला?
१५. आपल्या देशात एक अशी संस्था आहे की जेथे जगात सर्वात अधिक संख्येने लोक नोकरी करतात. तिचे नाव काय ?
१६. राजधानी दिल्लीत महात्मा गांधींची समाधी आहे. कस्तुरबांची समाधी कोठे आहे?
१७. शेवटचा मोगल बादशहा कोण?
१८. आपल्या देशात पहिले डाकतिकिट केंव्हा काढण्यात आले?
१९. 'आशियाई क्रीडास्पर्धा' प्रथम कोठे भरवण्यात आल्या? त्या वेळचा विजयी देश कोणता?

## उत्तरे

१. जॉन एच्. ग्लेन.
२. भारत व तिबेट मधील सीमारेषा.
३. मादी देवमासा आकराने सर्वात मोठा असून तो जवळ जवळ ९० फूट लांब व १०० टन वजनाचा असतो.
४. जवळजवळ ८५०.
५. १९६९ मधे.
६. एका झेपेत ६ ते ९ मीटर.
७. ब्रिटनचे अलेक्झांडर फ्लेमिंग, १९२८ मधे.
८. अंबर महाराज जयसिंग निर्मित अंतरिक्ष परिशोधन संस्था, दिल्लीत, १९२४ मधे.
९. भूमध्य रेषेजवळ पंचवीस दिवस व ध्रुवप्रदेशांजवळ तेहतीस दिवस.
१०. राजा राममोहन राय.
११. १८७० मधे पश्चिम इंग्लंडच्या ग्लोसेस्टशायर मधील बॅडमिंटन गावात.
१२. 'गीतांजली' साठी १९१३ मधे.
१३. वाराणसीजवळील सारनाथ येथे.
१४. तीन ऑक्टोबर १९५७ रोजी.
१५. भारतीय रेल्वे संस्था, जवळजवळ वीस लाख नोकर.
१६. पुण्याच्या आगाखान पॅलेसच्या प्रांगणात. त्यांचा येथेच मृत्यु झाला.
१७. बहादुरशहा जफर.
१८. १८५८ मधे.
१९. दिल्लीत १९४१ मधे, विजयी देश जपान.



# उग्रसेनची जडी-बुटी

प्राचीन काळी चंदनपुर नावाच्या नगरीत एक महान् वीर रहात असे. त्याचे नाव उग्रसेन. तलवारबाजीत त्याची बरोबरी करणारा वीर पृथ्वी-तलावर नाही असे लोक म्हणत. अनेक वीर त्याच्याशी लढायला आले आणि हारले.

त्याच नगरीत महानंद नावाचा एक तरूण होता. लहानपणासून त्याची महत्त्वाकांक्षा होती की आपण तलवार चालवण्यात पारंगत व्हावे. म्हणून खड्ग-विद्येत निष्णात अशा अनेकांना त्याने गुरू केले, आणि या विद्येतील बारकावे शिकून घेतले. परंतु तो कोणत्याही वीराला हारवू शकला नाही.

अशा परिस्थितीत एक बैरागी एकदा त्याला म्हणाला - ''मला जर भरपेट खाऊ घातलंस तर तुझी कोणती ही असाध्य इच्छा मी पूर्ण करीन !''

महानंदाने बैराग्याला विचारले - ''तुम्हाला जे पोटभर खाऊ घालणार नाहीत, त्यांच्या इच्छा पूर्ण होणार नाहीत का?''

यावर बैरागी म्हणाला - ''स्वादिष्ट फळं देणाऱ्या वृक्षाला पाणी लागतं, ते मनुष्यच देऊं शकतो. मनुष्य हा त्या वृक्षाचा आधार आहे. माणूस स्वतः फळांची निर्मिति करू शकत नाही. वृक्ष स्वतः आपल्या मुळांना पाणी देऊ शकत नाहीत. माणसात काही माणसं वृक्षासारखी असतात. मी त्यांच्यातीलच एक आहे !''

महानंदने वैराग्याला पोटभर खाऊ घातले आणि आपली इच्छा व्यक्त केली - ''खड्ग-युद्धात माझ्याहून अधिक पराक्रमी कोणी असू नये.''

वैराग्याने आपल्या थैलीतून एक बुटी काढली आणि म्हणाला - ''ही घे. चांगली चावून चावून खा. हिच्या प्रभावाने तुझ्यात नवीन शक्तीचा संचार होईल. नंतर एखाद्या अतिमहान् वीराचा खड्ग-युद्धात पराभव कर. मग तू कोणत्या ही वीराचा सहज पराभव करू शकशील.''

महानंद विचार करू लागला - ''उग्रसेनची बरोबरी करणारा कोणी ही अन्य वीर नाही. मी त्याचा पराजय केला तर दुसरा कोणी ही वीर मला पराभूत करू शकणार नाही ! पण उग्रसेनचा पराभव करणे मला शक्य होईल का?''

त्याची शंका दूर करीत बैरागी म्हणाला - ''जर तू एकदा उग्रसेनला हरवलेस, तर तो पुन्हा तुझ्याशी सामना करायला येणार नाही. त्याचा एकदा तू पराजय केलास, तर नंतर तू दुसऱ्या कोणत्याही वीराचा पराभव करू शकशील. तू उग्रसेनला आव्हान दिलंस आणि त्याने तुला हरवलं, तर मात्र या बुटीचा काही उपयोग होणार नाही.''

महानंद म्हणाला - ''मी उग्रसेनचा पराभव केला तरी अन्य वीरांना ही मी जिंकू शकेन असं मला नाही वाटत !''

हसून बैरागी म्हणाला - ''औषध असो वा वर, दोन्हींची सफलता विश्वासावर अवलंबून आहे. जिथे अविश्वास असेल तिथे या दोन्ही गोष्टी उपयोगी पडत नाहीत. एकदा विजयी झालास की तुझ्यातील आत्मविश्वास वाढेल. तुझ्यात नवीन शक्तीचा संचार होईल. या आत्मविश्वासाच्या आधाराने ही बुटी प्रभावी होईल आणि मग तू अजिंक्य होशील.''

महानंदाने बैराग्याने दिलेली बुटी चघळून



खाऊन टाकली. तसा त्याच्यात एक नवीन उत्साह संचारला. त्याने आपली तलवार म्यानात सरकवली आणि उग्रसेनच्या घराकडे निघाला. रस्त्यात त्याला एक म्हातारा भेटला. तो म्हणाला - ''उग्रसेनला आव्हान द्यायला निघाला आहेस ? उग्रसेनला हरवणारा कोणी नाही हे तुला माहीत नाही असं दिसतंय !''

महानंद म्हणाला - ''एकदा, फक्त एकदाच मी त्याचा पराभव केला, तर मला कोणी जिंकू शकणार नाही निश्चित !''

महानंदाच्या आत्मविश्वासाचं वृद्धाला मोठं आश्चर्य वाटलं. तो म्हणाला - ''उग्रसेनचा पराभव करणं हे सोपं? उग्रसेनची कमजोरी फक्त मीच जाणतो. मला एक हजार मोहरा

पांडुरंग पानसे



द्यायला तयार असलास तर एक आठवड्यात मी तुला सारे प्रशिक्षण देईन. मग तुझा विजय होऊ शकेल.''

शंका प्रदर्शित करीत महानंदने विचारले - ''तू म्हणतोस तसे न झाले तर ...?''

वृद्धाने आश्वासन दिले - ''उलट तुलाच मी हजार मोहरा देईन !''

आता महानंदच्या मनात विश्वास निर्माण झाला व तो वृद्धाचा शिष्य बनला.

म्हाताऱ्याच्या म्हणण्यात काही रहस्य आहे हे महानंदला समजले नाही. अंदरकी बात अशी होती. अलीकडे काही दिवस उग्रसेनला सतत मिळणाऱ्या विजयाचा कंटाळा आला होता. आता एकदा, केवळ एकदाच पराजयाचा आनंद अनुभवण्याची त्याची इच्छा होती. आणि हे त्याने ह्या म्हाताऱ्याला सांगितले होते आणि तो म्हणाला होता - ''हा पराजय एकाद्या महान् वीराने करावा. तूच असा योग्य वीर शोधून काढ !''

म्हातारा गेले काही दिवस याच प्रयत्नात होता. त्याला वाटलं - वैराग्याच्या बुटीचे सेवन केलेल्या या महानंदाशिवाय दुसरा कोणता योग्य वीर आपल्याला मिळणार?

एक आठवड्यानंतर महानंदने उग्रसेनला आव्हान दिले. अनेक लोकांच्या उपस्थितीत दोन वीरात तुंबळ युद्ध झाले. बुटीचा प्रभाव अथवा बुटीवरील त्याचा विश्वास कशाने का होईना, पण महानंदचा विजय झाला. त्या दिवशी खड्ग-युद्धात महानंदने जी कुशलता दाखवली, तिची उग्रसेनने ही तारीफ केली. उग्रसेनला आपला पराजय मान्य करावाच लागला.

उग्रसेनचा पराभव होईल असं कुणाला ही वाटलं नव्हतं. चंदनपुरच्या जनतेने तोंडात बोट घातलं. एका दिवसात महानंदाला सर्व लोक 'महावीर' म्हणू लागले. त्याला भेटायला आणि त्याच्याशी दोन गोष्टी बोलायला लोक उत्सुक दिसू लागले.

आपल्या वायद्यानुसार महानंदने वृद्धाला एक हजार मोहरा दिल्या. त्या दिवसापासून त्याचं नाव पडलं - ''महावीर!''



बातमी ऐकून उग्रसेनने ज्यांचा पराभव केला होता ते सर्व वीर चंदनपूरला आले. या सर्वांनी पूर्वी महानंदाला हारवले होते. महानंद खड्ग-युद्धात किती कुशल आहे हे ते जाणून होते. कदाचित् उग्रसेनचे कौशल्य आणि शक्ति कमी झाली आहे म्हणून महानंदचा विजय झाला असं ते म्हणू लागले.

या सर्व महावीरांची इच्छा होती की एकदा का होईना उग्रसेनला हारवायचे ! आता त्यांना हे शक्य वाटत होते. त्या सर्वांनी खड्ग-युद्धासाठी उग्रसेनला आव्हान दिले. उग्रसेन शांतपणे म्हणाला - ''एकदा झालेल्या पराजयामुळे माझा आत्मविश्वास ढळला आहे. मी युद्ध करण्याच्या मनस्थितीत नाही. तुमची इच्छा असेल तर महानंदाला आव्हान द्या.''

त्या सर्वांनी महानंदाशी युद्ध केले आणि सर्वांचा दारूण पराभव झाला. सर्वांना समजलं की आता महानंद पहिल्या सारखा राहिला नाही. ते महानंदला म्हणाले - ''हे परमवीर, या जगात कोणी खरा वीर असेल तर तो म्हणजे उग्रसेन असे आम्ही समजत होतो. पण तू तर त्याच्याहून श्रेष्ठ वीर सिद्ध झालास. आता तुझी बरोबरी करील असा कोणी वीर शिल्लक उरला नाही.''

त्यांचं बोलणं ऐकून महानंदचा आनंद गगनात मावेना. आता त्याला असा संशय येऊ लागला - ''उग्रसेनचा पराक्रम खरोखरीच



निस्तेज झाला आहे काय? विजयाच्या उत्साहात माझी वीरता वाढत चालली आहे आणि पराभूत झाल्यामुळे उग्रसेन निस्तेज होत चालला आहे. अगदी सामान्य वीरांशी लढायला ही तो कचरतो आहे.''

महानंदाने असा ही विचार केला - ''मी शक्तिहीन उग्रसेनचा पराभव केला असे ही कदाचित् लोकांना वाटत असेल. जर लोकांचा हा भ्रम नाहिसा करावयाचा असेल तर उग्रसेन व अन्य वीरात खड्ग-युद्ध झाले पाहिजे आणि त्यात उग्रसेनने सर्वांना हारवले पाहिजे. तेव्हाच मी खरोखर महावीर आहे यावर लोकांचा दृढ विश्वास बसेल.''

ही योजना अंमलात आणण्यासाठी

महानंदने वृद्धाकडे मदतीची याचना केली.

यावर जोरात हसत वृद्ध म्हणाला - ''उग्रसेन त्यांच्याशी लढायला तयार होणार नाही. तुझी इच्छा असेल तर तुझ्याशी लढेल.''

महानंद गर्वाने म्हणाला - ''मी तर त्याचा एकदा पराजय करून चुकलोय !''

''त्यावेळी त्याला पराजयाचा आनंद अनुभवायचा होता. जाणून-बुजून तो पराभूत झाला. आता पुन्हा लढाईत त्याला जिंकणे तुला शक्य होणार नाही !'' म्हाताऱ्याने सत्य ओकले.

''माझा पराक्रम व उत्साह दिवसेंदिवस वाढत आहे. उग्रसेन पराजयाच्या दु:खाने विव्हल झालेला आहे. लढाई झाली तर निश्चितपणे माझाच जय होईल.'' महानंद अभिमानाने म्हणाला.

वृद्धाने आणखी स्पष्ट करून सांगितले - ''तू जी बुटी खाल्लीस तिच्याहून अधिक शक्तिशाली बुटी उग्रसेनने सेवन केलेली आहे हे तुला माहीत नसावे. उग्रसेनला हारवणारा वीर जगात कोणी नाही.''

हे ऐकून महानंदने आश्चर्याने विचारले - ''त्याच बैराग्याने उग्रसेनला पण बुटी दिली का?''

वृद्ध शांतपणे म्हणाला - ''नाही, ती तर तूच दिली होतीस. समर्थ नि शक्तिशाली वीराचा जेव्हा पराभव होऊ लागतो तेव्हा तो घायाळ वाघाप्रममाणे आपली सर्व शक्ति एकवटून शत्रूवर तुटून पडतो. उग्रसेनने खाल्लेली बुटी म्हणजे तुझ्याकडून झालेला त्याचा पराजय !''

परंतु विजयोन्मादात मस्त झालेल्या महानंदने पुन्हा एकदा खड्ग-युद्धासाठी उग्रसेनला ललकारले. यावेळी महानंदचा दणदणीत पराभव झाला.

खरं सांगायचं म्हणजे महानंद उग्रसेनच्या बरोबरीचा नव्हता. झालेल्या पराजयामुळे त्याचा सर्व उत्साह मावळला. त्याने पुन्हा कधी उग्रसेनला युद्धाचे आव्हान दिले नाही.

आपली शक्ति मर्यादित आहे हे आता महानंदच्या लक्षात आले.





# न्यायनिर्णय

खूप जुनी गोष्ट. सुकेतन काश्मीरचा राजा होता. श्रीनगर ही राज्याची राजधानी होती. राजधानीपासून दूर एका नगरात एक न्यायाधीश रहात असे. न्याय देण्याच्या बाबतीत, निर्णय करण्याच्या बाबतीत तो खूपच हुशार निघाला. थोड्याच अवधीत काश्मीरच्या कानाकोपऱ्यात त्याची प्रसिद्धी पोचली.

हा न्यायाधीश न्यायदानाबाबत किती पटु आहे हे समक्षच पहावे, असा विचार त्याच्या मनात आला.

राजाने ताबडतोब सामान्य व्यक्तीसारखा पोशाख धारण केला व घोड्यावर बसून न्यायाधीशाच्या नगराकडे निघाला. तेथे पोचता-पोचता दोन दिवस लागले. वेस ओलांडून नगरात प्रवेश करताना समोरून एक लंगडा भिकारी 'धर्मप्रभु' असे म्हणत अपेक्षेने राजाजवळ आला.

राजाने त्याच्या हातावर काही नाणी ठेवली व तो पुढे निघाला. पण भिकाऱ्याने त्याचा पिच्छा सोडला नाही. तो पुन्हा एकदा 'धर्मप्रभु' म्हणत राजाकडे पाहू लागला.

''भीक दिली ना, मग आता काय?'' राजाने विचारले.

''साहेब, बाजार भरला आहे आज. लंगडा आहे मी. इतक्या दूर चालू नाही शकणार मी. आपल्या मागे घोड्यावर घ्या ना मला.'' भिकारी म्हणाला.

''ठीक आहे, चढ.'' राजा हसत म्हणाला. भिकाऱ्याला चढायला मदत करून राजा त्याला बाजारापर्यन्त घेऊन गेला.

आता राजा त्याला म्हणाला, ''हा बघ बाजार. उतर आता.''

राजाला वाटले की, हा लंगडा असल्याने त्याला उतरायला मदत हवी असेल. घोड्यावरून आपला हात पुढे करत तो

चान्दोबात पंचवीस वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट



भिकाऱ्याला म्हणाला, ''हं, धर माझा हात अन् उतर खाली.''

''आं? मला आपल्या घोड्यावरून उतरायला सांगणारा कोण रे तू?'' भिकाऱ्याने एकदम पवित्रा बदलत म्हटले.

''अरे ! घोडा तर माझा आहे; परवानगी देणारा तू कोण? उतर आधी घोड्यावरून.'' राजा रागावून म्हणाला.

पण भिकारी दृढ स्वरात म्हणू लागला की घोडा आपलाच आहे. तेंव्हा खाली उतरण्याचा प्रश्नच नाही येत.

''अरे वा ! याला म्हणतात 'चोराच्या उलट्या बोंबा.' दिवसाढवळ्या इतका अन्याय होताना कुठेच पाहिला नाही मी ! माहीत आहे तुला, या शहरात एक सुप्रसिद्ध न्यायाधीश आहे?'' राजाने विचारले.

''अरे किती मोठा न्यायाधीश असला तरी, 'घोडा लंगड्याचाच असल्याचा निर्णय देईल तो ! तुझ्यासारख्या माणसाचा घोडा आहे' असं तो म्हणेल?'' भिकाऱ्याने प्रत्युत्तर केले.

''मग चल तर न्यायालयात, पाहू काय निर्णय होतो ते.'' राजा म्हणाला.

''होऽ चल की ! मला कोणाचं भय नाही.'' भिकारी चांगला निर्ढावलेलाच दिसला.

हा न्यायाधीश आता कसा न्याय करतो हे पहाण्याची राजाला चांगलीच संधी मिळाली. ते दोघे ही न्यायालयात गेले. त्यावेळी तेथे कुठल्याशा खटल्याची चर्चा चालू होती.

खटला होता एक तलाठी व एक शेतकरी यांच्यातला. एका स्त्रीवरून दोघात वाद चालू होता. ती स्त्री तर मुकी होती अन् दोघे ही म्हणत होते की, ''जे बोलेन, ते खरे बोलेन; खऱ्याशिवाय अन्य काहीही बोलणार नाही!''

''आता एक काम करा. आज आपल्या या बायकोला इथेच सोडून जा आपल्या घरी. उद्या मी निवाडा करीन.'' न्यायाधीश म्हणाला.

यानन्तर एक कसाई आणि एक तेलवाला तिथे आले. कसायाच्या हातात खूपशी नाणी होती, अन् तेलवाल्याचे हात तेलाने लडबडलेले होते.

''साहेब, हा कसाई माझ्याकडे आला आणि म्हणाला, कि एका मोहोरेची चिल्लर देत असशील तर मला थोडं तेल खरीदायचं आहे. माझ्याजवळ जितकी नाणी होती, तितकी सगळी काढून मी मोजत होतो. बस ! यानं इतक्यात झडप घालून ते सगळे पैसे घेतले अन् आता म्हणतोय की, सगळे माझेच आहेत. आपणच द्या निर्णय आता !'' तेलवाल्याने कैफियत मांडली.

''पण साहेब, ही गोष्ट खरीच, की मी याच्याकडे तेल खरीदायला गेलो. आपल्या खिशात किती पैसे आहेत, ते मोजावे म्हणून बाहेर काढून मोजायला लागतोय, तोच माझा हात पकडून हा म्हणायला लागला की, पैसे आपलेच आहेत. आपणच न्याय द्या आता !'' कसायाने आपली बाजू सांगितली.

''हे सगळे पैसे ठेवा इथे. उद्या या, म्हणजे सांगेन काय काय ते.'' न्यायाधीश म्हणाला.

आता या दोन तंट्यांनंतर राजाच्या घोड्या बद्दलचा खटला उभा राहिला.

''महाशय, मी श्रीनगरचा रहाणारा. बाजारात काही खरेदीसाठी घोड्यावरून येत होतो. वेशीवर हा लंगडा भिकारी भीक मागू लागला. मी त्याला पैसे दिले. पुन्हा यान विनंती केली की, मी त्याला आपल्या घोड्यावरून बाजारपर्यन्त न्यावं. मी त्याची तीही इच्छा पुरी केली. पण बाजाराशी पोचल्यावर हा घोड्या वरून उतरायलाच तयार होईना. अन् उलट म्हणतोय की, घोडा त्याचाच स्वतःचा आहे.''



राजाने तक्रार केली.

''साहेब, तुम्ही पहातातच आहात की मी लंगडा आहे. त्यामुळे कुठे जायचं झालं की आपल्या घोड्यावरूनच जातो. आज बाजाराकडे निघालो होतो, तेंव्हा हा माणूस वेशीजवळ भेटला. माझ्याकडे गयावया करत म्हणू लागला की, चालता चालता आपले पाय अगदी झिजायला झालेत. मला आपल्या घोड्यावरून बाजारपर्यन्त घेऊन चल. मी दया करून त्याला बाजारपर्यन्त आणला. अन् आता माझ्याच गळ्यात पडलाय. म्हणतो की 'घोडा माझाच आहे.' आपणच न्याय करा न्यायाधीश महाराज !'' भिकारी बोलला.

''घोडा माझ्याजवळ सोडा अन् उद्या या.''



न्यायाधीश त्यांनाही म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सगळे फिर्यादी अन् प्रेक्षक ही न्यायालयात जमले.

न्यायाधीशाने तलाठ्याला बोलावून म्हटले, ''बाबा, ही स्त्री तुमचीच बायको आहे. घ्या ताब्यात तिला. या शेतकऱ्याची फिर्याद खोटी आहे. त्याला मी पन्नास चाबकांची शिक्षा देत आहे.''

यानंतर दुसरा फिर्यादी कसायाला बोलावून तो म्हणाला, ''हे पैसे तुझेच आहेत. या तेल्याने खोटी तक्रार मांडलीय. यालाही पन्नास फटक्यांची शिक्षा सुनवत आहे मी.''

नंतर राजा आणि लंगडा यांना बोलावून न्यायाधीशाने विचारले, ''ज्या घोड्याच्या मालकीबद्दल दोघेजण दावा करत आहात, त्याला मी इतर वीस घोड्यांबरोबर बांधून ठेवलाय. त्या विसातून आपला कोणता हे ओळखू शकाल?''

राजा म्हणाला, ''अगदी सहज ओळखीन.'' भिकारीही तसेच म्हणाला.

न्यायाधीशाने प्रथम राजाला बरोबर नेऊन घोडा ओळखायला सांगितले.

सगळ्या घोड्यातून आपला घोडा राजाने अगदी सहजपणे ओळखला. नंतर न्यायाधीश म्हणाला, ''आता परत जाऊन त्या लंगड्याला द्या पाठवून.''

राजाने तसे केल्यानन्तर लंगड्यानेही घोडा बरोबर ओळखला. नंतर न्यायाधीश आत येऊन राजाला म्हणाला, ''हा घोडा तुमचाच आहे. जा घेऊन. खोटी फिर्याद केल्याच्या आरोपावरून भिकाऱ्यालाही पन्नास फटक्यांची शिक्षा मिळेल.

यानंतर न्यायालयाचे कामकाज संपवून सर्वजण निघून गेले. पण राजा मात्र मुद्दाम तेथेच रेंगाळला. त्याला पाहून न्यायाधीशाने विचारले, ''आता का बरं इथेच उभे आहात? निर्णय पटला नाही का?''

''न्याय मला अगदी बरोबरच वाटला. त्याबद्दलच बोलायचं आहे मला. माझा न्याय आपण बरोबरच केला. इतर खटल्यांबद्दल मी काही सांगू शकत नाहीय. त्यांचाही न्याय आपण बरोबरच केला असाल कदाचित. पण मी कल्पनाच करू शकत नाहीय की आपण निर्णय इतक्या सहजपणे, अगदी बरोबर कसे दिलेत?''

''त्यात अवघड काहीच नव्हतं. त्या बाईचीच गोष्ट घ्या. काल मी तिला आपल्या घरी घेऊन गेलो. पोचल्यावर मी तिला म्हणालो की, माझ्या पेनातली शाई संपलीय. ते नीट धुवून नवी शाई भर. तिनंही ते काम इतकं सहजपणे केलं, जशी काही तिला नेहमीची सवयच आहे. सामान्य शेतकऱ्याची बायको हे काम इतक्या सुलभपणे नाही करणार. तेंव्हा मी ओळखलं की, ती तलाठ्याचीच बायको आहे.''

''हो, बरोबरच ओळखलंत आपण. पण पैसे कसायाचेच, हे कसं ओळखलंत?'' राजाने विचारले.

''ते तर फारच सोपं! तुम्ही तेल्याचे लडबडलेले हात पाहिलेच असतील. पैसे त्याचे असते, तर तेल नाण्यांनाही लागलं असतंच. मी ती नाणी पाण्यात टाकून पाहिली. थेंबभर ही तेल पाण्यावर तरंगलं नाही.'' न्यायाधीश बोलला.

''मग घोडा माझाच हे कसं सांगितलंत? लंगड्यानं घोडा ओळखला नाही?'' राजाने विचारले.

''हो ओळखला की! तुम्ही दोघंही घोडा बरोबर ओळखणार हे तर माहीतच होतं मला!'' न्यायाधीश म्हणाला.

आश्चर्याने राजाने विचारले, ''तर मग तो माझाच, हे कसं सांगितलंत?''

''तुमच्यापैकी घोड्याला बरोबर कोण ओळखतं हे पहायचं नव्हतंच मला! पण घोडा तुमच्यापैकी कोणाला ओळखतो ते पहायचं होतं. घोड्यानं तुम्हाला ओळखलं. माझं काम सोपं झालं.'' न्यायाधीशाने स्पष्टीकरण दिले.

न्यायाधीशाच्या हुशारीचे राजाला फार कौतुक वाटले. श्रीनगरला पोचल्यावर त्याने न्यायाधीशाला बोलावून घेऊन त्याला एक जहागीर बक्षिस दिली. आपण अन्य कुणाला नव्हे तर खुद्द राजालाच न्याय दिला, हे लक्षात आल्यावर न्यायाधीशाच्या आश्चर्याला ही पारावार राहिला नाही.



विश्व समाचार

# संयुक्त राष्ट्र संघाचा सुवर्ण-महोत्सव

संयुक्त राष्ट्र संघाचे कार्यालय न्यूयॉर्क मध्ये आहे. गेल्या आक्टोबर महिन्यात संघाचा सुवर्ण-महोत्सव मोठ्या थाटामाटात साजरा झाला. पन्नास वर्षे पूर्ण झाल्याच्या संघाच्या या स्वर्ण-जयंती उत्सवात सुमारे १८० राष्ट्रांनी भाग घेतला. यावेळी अनेक देशांचे प्रधान मंत्री, राष्ट्राध्यक्ष व प्रमुख सरकारी अधिकारी उपस्थित होते.

२२ आक्टोबर रोजी अमेरिकेचे अध्यक्ष बिल क्लिंटन, रशियाचे अध्यक्ष बोरिस एल्स्टिन, क्यूबाचे अध्यक्ष फिडेल कास्ट्रो, पॅलेस्टाइनचे नेता नासर अराफत इ. नेत्यांनी संमेलनात भाग घेऊन आपापले विचार प्रकट केले. ता. २३ रोजी फ्रान्सचे अध्यक्ष जॅक्स चिराक, ब्रिटनचे प्रधान मंत्री जॉन मेजर यांची व्याख्याने झाली. तिसऱ्या दिवशी आपल्या भारताचे प्रधान मंत्री श्री.पी.व्ही. नरसिंहराव यांनी राष्ट्र-संघाच्या अधिवेशनात आपले विचार मांडले. एकूण १८५ वक्त्यांनी महोत्सवात विचार-प्रदर्शन केले. प्रत्येक वक्त्याला पाच मिनिटांचा वेळ दिला गेला होता.

१९१४ ते १८ मध्ये झालेल्या विश्व-युद्धानंतर त्या वेळच्या प्रमुख राष्ट्रांच्या नेत्यांनी एकत्र येऊन जगातील अनेक राष्ट्रांचा एक संघ स्थापन केला. पुन्हा असे विश्व-युद्ध होऊ नये हा त्यामागील उद्देश होता. पण हा उद्देश मात्र सफल झाला नाही. सन १९३९ मध्ये दुसऱ्या विश्व-युद्धाचा प्रारंभ झाला.

सतत पाच वर्षे चाललेल्या या युद्धात लाखो सैनिक मारले गेले. अशी भयंकर परिस्थिति पुन्हा उत्पन्न होऊ नये, भावी पिढ्यांचे असल्या युद्धापासून संरक्षण व्हावे अशा उच्च हेतूने २६ जून १९४५ रोजी संयुक्त राष्ट्र-संघाची स्थापना झाली. सान्फ्रान्सिस्को येथे भरलेल्या संघाच्या पहिल्या अधिवेशनात पन्नास राष्ट्रांच्या नेत्यांनी भाग घेतला व त्यात तयार झालेल्या यु.एन्. चार्टरवर स्वाक्षऱ्या केल्या. स्वाक्षरी करणारात आपला देश ही एक होता. स्वीडनचे ट्रिग्विली यांची संयुक्त राष्ट्र-संघाचे प्रथम सचिव म्हणून निवडणूक झाली.

जगातील काही देशात, विशेषत: व्हीएटनाम, कंबोडिया, कोरिया, युगोस्लाविया, पॅलेस्टाइन, अरेबिया इत्यादि देशात युद्धे होत राहिली; तरी पण संयुक्त राष्ट्र-संघ आपल्या उद्देश-पूर्तीत सफल झाला व त्याने आपले अस्तित्व टिकवून धरले असे म्हणायला हरकत नाही.

केवळ राजनैतिक समस्या सोडविणे हे राष्ट्र-संघाचे काम नाही. संघाने अन्य विविध प्रकारच्या समस्या ही हाताळल्या. त्याने संयुक्त राष्ट्र संघ बालक-निधि (युनिसेफ), शिक्षण, विज्ञान व सांस्कृतिक संस्था (युनेस्को), विश्व आरोग्य संस्था, आंतरराष्ट्रीय श्रमिक संस्था, विश्व-न्यायालय इत्यादि संस्थांची स्थापना करून आपले ध्येय गाठण्याचा यशस्वी प्रयत्न केला. निरनिराळ्या क्षेत्रात या संस्था उत्तम कार्य करीत आहेत.

संयुक्त राष्ट्र-संघाचे दुसरे प्रधान सचिव हेमार्क जोल्ड म्हणाले - ''संयुक्त राष्ट्र-संघाचा जन्म आम्हाला स्वर्गात घेऊन जाण्यासाठी नव्हे, तर आम्ही नरकात जाऊन पडू नये यासाठी झाला !'' स्वर्ण-जयंतीच्या वेळचे सचिव बुट्रोस घाली महोत्सवात भाग घेणाऱ्या ज्येष्ठ नेत्यांना उद्देशून म्हणाले - ''मी आपणास आपल्याच घरात आव्हान देत आहे. शांतता प्रस्थापित करण्यासाठी प्रयत्न करणाऱ्या जागतिक प्रजेच्या मंचावर मी आपले सर्वांचे स्वागत करतो.''

संयुक्त राष्ट्रसंघाचे अति उदात्त व महान ध्येय सिद्ध व्हावे यासाठी तरुण नेत्यांचे सहकार्य अत्यंत आवश्यक आहे. यामुळे जगात शांति स्थापन होईल व सर्व राष्ट्रांचा बहुमुखी विकास होईल.





## वाघाने घडवून आणलेला विवाह

शशिधर हा मणिपुरचा राजा होता. शिकार हा त्याचा जणू सहावा प्राणच होता.

असाच एकदा तो काही शिपायांना बरोबर घेऊन, रथात बसून शिकारी साठी जंगलाकडे निघाला. दुपारपर्यन्त त्यांनी शिकार केली. नंतर तो आपल्या परिवारासह एका झाडाखाली बसून, आराम करू लागला. तेंव्हा अचानकच एका वाघिणीने त्याच्यावर हल्ला चढवला. पण शशिधरने प्रसंगावधान राखून विजेच्या वेगाने तो रोखला. आपली तलवार म्यानातून उपसून वाघिणीचे डोकेच उडवले.

सर्वांनी मनोमन राजाच्या धैर्याची प्रशंसा केली. इतक्यात जवळच्या झुडुपात हालचाल जाणवली.

वाघिणीच्या रक्ताने माखलेली तलवार तशीच हातात घेऊन राजा शशिधर सावधपणे त्या झुडुपांकडे पाहू लागला. इतक्यात वाघिणीचे एक पिल्लू बाहेर आले अन् शिपायांकडे पहात हळूहळू गुरगुरू लागले. एक महिन्याचेही नव्हते ते पिल्लू अजून !

पुढे येऊन ते वाघिणीभोवती फिरत कुरकुरू लागले. त्याची ती दयनीय अवस्था पाहून शशिधरचे मन गलबलू लागले. हळूच पिल्लामागे जाऊन त्याने ते पकडले. पण पिल्लू रागावून आपल्या छोट्या छोट्या पंजांनी राजाचा हात ओरबाडू लागले.

त्याच्या डोक्यावर प्रेमाने थोपटत शशिधर म्हणाला, "हां चुप, अुगी-अुगी! अरे स्वत:चा प्राण वाचवण्यासाठीच मला तुझ्या आईला मारावं लागलं रे ! पण तुला आता छान संभाळीन बघ मी !"

वाघिणीचे पिल्लू पाहून राणी गिरिजादेवी शशिधरला म्हणाली, "नाथ, हे पिल्लू मोठे झाले की, एखादे वेळी, आपल्यालाच धोकादायक होईल !"

एक जोरदार सुस्कारा सोडत शशिधर म्हणाला, "बिचाऱ्याला आई अुरली नाहीय. माझ्याच हातांनी मारली मी तिला. याला पाळण्यासाठीच तर आणलाय मी इथे. माझी खात्री आहे, की हा माणसात वाढला, तर त्याच्या स्वभावातलं क्रौर्य नाहीसं होईल. तसं न झालं, तर देऊ की सोडून त्याला जंगलात !"

त्या दिवसापासून राजाने त्या पिल्लाला दूध पाजायला सुरुवात केली. महिन्याभरात ते एकाद्या पाळीव जनावरा सारखे वागू लागले. एकाद्या मांजरासारखे ते पायात घोटाळे. खुद्द राणीच्याच मांडीवर झोपी जाई.

वर्षाचे होईपर्यन्त ते चांगलेच मोठे झाले. आता त्याला कोणी पिल्लू म्हणणे शक्य नव्हते. पूर्ण वाढीचा वाघ दिसू लागला तो. पिवळ्या, अुदी रंगाच्या त्याच्या अंगावर सर्वत्र काळेभोर चमकदार पट्टे अुठले. तो मांसही खाअू लागला. परन्तु तरीही त्याने कोणत्याही माणसाला किंवा अंत:पुरातल्या कोणत्याही प्राण्याला कसलाही त्रास दिला नाही.

नंतर अचानक एकदा या वाघाच्या अंगावर कसलासा व्रण अुभारून आला. आठवडाभरात तो व्रण चांगला तळहाताएवढा दिसू लागला. पशुवैद्याने त्याची परीक्षा केली व म्हटले, "महाराज, असे व्रण जनावरांच्या अंगावर खूपदा अुठतात. साध्यासुध्या औषधाने हा बरा नाही होणार. यासाठी एक लेप तयार करायला हवा. लेपासाठी बारा प्रकारच्या मुळ्या लागतात. त्यातलं एक औषध माझ्याजवळ



नाहीय. त्याचं नाव आहे 'सिंदूर सुधा पुष्प'. या फुलाचा रंग पिवळा असतो. रोप गजभर अुंचीचं असतं. वर्षातून एकदाच रोपावर फुलं लागतात. मी असं ऐकलंय की हे रोप रत्न-पुरीचे महाराज आनन्दवर्धन यांच्या महाला मागच्या बगीचात आहे."

आनन्दवर्धनचे नाव ऐकताच राजा शशिधरचा चेहरा एकदम क्रोधाने लाल झाला. वीसेक वर्षापूर्वी घडलेल्या एका घटनेची त्यांना आठवण झाली.

त्यावेळी कांचनपुरीची युवराज्ञी मदनमंजरीच्या स्वयंवराची तयारी चालू होती. तिच्या पित्याचे नाव होते भूपालवर्मा. मदनमंजरीच्या अपूर्व लावण्याबद्दल अनेक

प्रेमा डबीर



राजपुत्र ऐकून होते. 'कदाचित् आपल्याच गळ्यात वरमाला पडेल' अशा विचाराने अनेक राजपुत्र स्वयंवरमंडपात हजर राहिले होते. राजा शशिधरही तेथे हजर होता. तसा तर त्याचा एक विवाह अगोदरच झालेला होता.

पण या स्वयंवरामागे एक रहस्य होते. रत्नपुरीचा राजा आनन्दवर्धन व मदनमंजरी एकमेकांकडे आकर्षित झालेले होते. आपसात त्यांचे खूप प्रेम होते. परन्तु घराण्याच्या रिवाजाप्रमाणे स्वयंवर आवश्यक होते म्हणून केवळ देखाव्यासाठी भूपालवर्माने हे स्वयंवर मांडले होते.

यामुळे प्रत्यक्षात असे घडले की, मदनमंजरीने मंडपात बसलेल्या कोणाही राजकुमाराकडे दृष्टीही न टाकता सरळ आनन्दवर्धनजवळ जाऊन त्याच्या गळ्यात माळ घातली.

शशिधर त्यावेळी आनन्दवर्धनच्या शेजारीच बसलेला होता. गळ्यात माळ पडल्याबरोबर आपल्या मिशीवर ताव देत, तिरप्या नजरेने शशिधरकडे तुच्छतेने पहात आनन्दवर्धनने विचारले, ''पाहिला स्वयंवर-स्पर्धेतला माझा विजय?''

मदनमंजरीने आपल्याला न वरल्याबद्दल शशिधरला वाईट तर वाटले होतेच, अन् वर आता आनन्दवर्धनच्या या शब्दांनी त्याच्या जखमेवर मीठ चोळले!

मणिपुरी व रत्नपुरी ही दोन्ही शेजारी राज्ये होती. सहाजिकच सीमेच्या प्रश्नावरून त्यांच्यात वाद होते व त्यावरून शत्रुत्वही होते आपसात. आता या स्वयंवरामुळे एक राजा संतुष्ट होता, तर दुसरा ईर्षेने जळत होता.

या पार्श्वभूमीवर स्वयंवरमंडपात आनन्दवर्धनने अपमानास्पद शब्द उच्चारताच शशिधर झटक्याने आसनावरून खाली उतरला व त्याने आपली तलवार म्यानाबाहेर उपसली. तो त्वेषाने बोलला, ''एका स्त्रीनं निवड केली, म्हणून स्वतःला कोणी महावीर समजू नकोस. खड्गयुद्धात मला हरवून दाखव, तुला शक्य असेल तर!''

त्याच्या या बोलण्याने आनन्दवर्धनलाही त्वेष चढला. तो म्हणाला, ''नुसतं खड्गयुद्ध करून काय होणार? मोती द्वीपासाठीच आपला आपसात झगडा चाललाय न? या युद्धात आपल्या दोघात जो जिंकेल, त्याचंच होईल मोतीद्वीप! माझी ही अट मान्य असेल तर अगदी आत्ताच तयार आहे मी युद्धाला!''

शशिधरने अट मान्य केली. 'खड्गयुद्धात आपली कोणीच बरोबरी करू शकणार नाही' अशी त्याची खात्री होती. क्षणभरातच विवाहमंडपाचे समरमंडपात रूपान्तर झाले.

दोघेही बराच वेळ लढले. हळूहळू आनन्दवर्धनची शक्ती कमी होऊ लागली. शशिधरने ते ओळखले, आणि तो दुप्पट उत्साहाने तलवार चालवू लागला. आनन्दवर्धनने एका अगदी जीवघेण्या वारातून स्वतःचा कसातरी बचाव केला अन् उलट त्या वाराने शशिधरच्या स्वतःच्याच उजव्या हाताला जखम झाली. तलवार त्याच्या हातून गळून पडली.

आपल्याच तलवारीने जखमी झालेल्या शशिधरला आपला पराभव कबूल करावा लागला. शत्रूच्या सामर्थ्यामुळे नव्हे, तर आपल्या केवळ दुर्भाग्यामुळे पराजित झालेला शशिधर मनाने फारच क्षुब्ध झाला. त्या दिवसापासून त्याच्या मनात आनन्दवर्धनबद्दलची घृणा व द्वेष खदखदत राहिला.

पतीच्या मनात चालू असलेला संघर्ष राणी गिरिजादेवीने ताडला. ती म्हणाली, ''नाथ,



ही हट्टाची, आग्रहाची वेळ नव्हे. आपल्याला काहीही करून आनन्द वर्धनच्या महालामागच्या बगीच्यातून ते फूल मिळवायला हवं; वाघिणीच्या पिल्लाला वाचवायलाच हवं. याला मरू न देणं हा आपला धर्म आहे. आपल्या प्रेमाची निशाणी आहे ही.''

क्षणभर विचार करून राजा म्हणाला, ''रत्नपुरीवर आक्रमण करून, त्यांना हरवून आपण ते फूल मिळवलं तर?''

''पण प्रभु, युद्धात जय किंवा पराजय हा दैवाधीन असतो असं म्हणतात. अन् समजा युद्धात जय मिळाला, परन्तु तुमच्यावर राग असणाऱ्या आनन्दवर्धननं युद्ध सुरू



होण्यापूर्वीच ते झाड अुपटून टाकलं तर? सिंदूरसुधापुष्प मग तुमच्या हाती येईलच, असं कशावरून म्हणता येईल? मग काय कराल तुम्ही? अन् शिवाय एका वाघासाठी दुसऱ्या देशावर हल्ला करणं, हे इतर सर्व राजांना हास्यास्पद नाही वाटणार? यामुळे कदाचित् तुमचे मित्रही शत्रु बनतील.'' राणीने शशिधरला समजावायचा प्रयत्न केला.

''मग वाघाला कसं वाचवायचं हे तूच सांग न?'' असहाय आवाजात राजाने विचारले.

गिरिजादेवी मधू आवाजात म्हणाली, ''तुम्ही रागावणार नसाल तर एक सांगायचंय. आपले युवराज दीप्तिशेखर आणि आनन्द वर्धनची कन्या चंदना यांचं एकमेकांवर प्रेम आहे. आपली एकूण गंभीर परिस्थिती विचारात घेअून मी कधी त्याची वाच्यता केली नाही. पण तुमचा त्यांना आशिर्वाद असेल, तर आपलं आत्ताचं हे कामही सोपं होईल पहा.''

पुन्हा एकदा चिडत शशिधर ठामपणे बोलला, ''आपल्या शत्रुशी असलं नातं जोडणं अशक्य आहे ही अगदी काळ्या दगडावरची रेघ समज. माझ्या जिवात जीव असेतो हे नक्कीच होणं नाही !''

तरीही राणीने यात आपला पराभव मानला नाही. ती शान्त स्वरात राजाला म्हणाली, ''प्रभु, वाघाचं रहाण्याचं खरं नैसर्गिक ठिकाण म्हणजे जंगल. एक क्रूर जनावर आहे ते. पण माणसात राहून तोही एक गरीब प्राणी बनलाय. आपल्याजवळ राहून त्यानं आपली नैसर्गिक प्रवृत्तीच बदलून टाकलीय . क्रूर जनावरातही असं अशक्यप्राय परिवर्तन होअू शकत असेल, तर खुद्द आपल्यासारख्या समजदार माणसांना ते शक्य नाही होणार? आपण तर माणसं आहो. आपल्याला परमेश्वरानं ज्ञान दिलंय, बऱ्या वाईटातला फरक समजण्याची शक्ति दिलीय. पाप काय, अन् पुण्य काय, हेही समजतं आपल्याला नं? याशिवाय तुम्ही तर खुद्द 'राजा' आहात, देशाचे अन् आपल्या प्रजेचे रक्षक आहात तुम्ही! मग विनाकारणच दुसऱ्यावर आक्रमण करणं, त्यांना मारून टाकणं हे न्यायसंगत आहे का? त्यांच्याशी मैत्री स्थापन करू न शकणं हा आपल्यातल्या मानवतेचा लोप नव्हे? यात आपलीच पशुवृत्ती नाही दिसून येत? सरळ तोंडावर असं कडू बोललेलं तुम्हाला आवडलं नसेल कदाचित् ! क्षमा करा मला. तुम्ही जंगलात आपल्या या पाळीव वाघाच्या आईला ठार केलं होतं. पण म्हणून काय त्यानं तुमचा सूड घ्यायचा प्रयत्न केला? एका वाघात जी क्षमाबुद्धी आहे, तेवढीही तुमच्यात नाही. मला तर याचंच आश्चर्य वाटतंय अन् वाईटही वाटतंय त्याबद्दल.''

राणीच्या या बोलण्याचा राजाच्या मनावर फार परिणाम झाला. भाल्यासारखं बोचलं ते बोलणं त्याला. त्याने या गोष्टीचा नव्याने खोलवर विचार करायला सुरुवात केली. थोड्या वेळाने तो म्हणाला, ''ठीक आहे. हा संबंध जोडायला आनन्दवर्धनची हरकत नसेल, तर माझीही संमती आहे या विवाहाला. पण आता अगोदर रत्नपुरीहून ते फूल मागवून आपल्या वाघावर इलाज करायला हवा.'' अन् त्याने रत्नपुरीला पाठवण्यासाठी एका दूताला बोलावून घेतले. इतक्यात दारामागे अुभ्या असणाऱ्या पशु-वैद्याला राणीने इशारा केला. तो आता पुढे आला अन् राजाला म्हणाला, ''महाराज, मी खोटं सांगितलं होतं आपल्याला. वाघावर इलाज करण्यासाठी त्या फुलाची काहीही गरज नाहीय. माझ्याकडे असलेल्या पाळा-मुळांच्या साह्यानं मी त्याला बरा करू शकतो. आपल्या मनात बदल व्हावा, रत्नपुरी आणि मणिपुरी यांच्यात दृढ संबंध प्रस्थापित व्हावेत, दोन्ही देशांची प्रजा सुखी-समाधानी व्हावी यासाठी महाराणींनी केलेल्या योजनेला मदत करायचं दुस्साहस केलंय मी. मला क्षमा करा !''

त्याच्या बोलण्यावर स्मितहास्य करीत शशिधर म्हणाला, ''महाराणीला द्यायचं ते बक्षिस मागाहून पाहीन मी. पण तुम्ही केवळ पशुवैद्यच नव्हे, तर माणसातल्या पशु-वृत्तीवर इलाज करायची अपार शक्तीही आहे तुमच्यात.'' अन् राजाने गळ्यातला रत्नहार काढून वैद्याला बक्षिस दिला.



# नियम

**रा**मशर्मा, नारायण आणि गुरु यांनी आपले वैद्यकीचे शिक्षण पुरे केले. आपल्या गावी येऊन त्यांनी आपले गृहस्थ-जीवन सुरू केले. नंतर तिघांनी एकदा एकत्र येऊन असे ठरवले की तिघांनीही एकत्रच एक हॉस्पिटल अुघडायचे व एकत्रच काम करायचे. असे करण्यामुळे एकमेकांशी स्पर्धा किंवा द्वेष या भावनांना वावच रहाणार नव्हता. त्यांनी असाही नियम केला की, जे कोणी इलाज करून घेण्यासाठी येतील, त्यांच्याकडून आगाअू तीन रुपये वसूल करायचे.

एके दिवशी खुद्द रामशर्माच्याच बायकोचे जानकीचे डोके अतिशय दुखू लागले. प्रथम गुरु भेटला तेंव्हा तिने आपल्या नवऱ्याला भेटायची इच्छा व्यक्त केली. गुरु तिला म्हणला, ''आपल्या डोकेदुखीवर इलाज करून घ्यायला इथे दवाखान्यात आली असशील, तर अगोदर तीन रुपये जमा कर.''

रागावून जानकी म्हणाली, ''मी कोण हे माहीत आहे न तुम्हाला?''

विनयपूर्वक गुरु अुत्तरला, ''पण पैसे वसूल करायचा नियम आहे आमचा.''

जानकीने घरून पैसे आणले व ते गुरूला देअून त्याच्याकडून औषध घेतले. नंतर आपल्या नवऱ्याच्या खोलीत जाअून त्याला तिने सर्व हकिकत सांगितली. ती म्हणाली, ''मला कशी वागणूक मिळाली, ते पाहिलंत ना? कंजूषपणालाही काही हद्द असते !''

यावर हसत रामशर्मा म्हणाला, ''यात कंजूषपणाचा काय संबंध? जे तीन रुपये मिळतात, ते आम्ही तिघं सारखे वाटून घेतो. तुझ्याकडून पैसे न घेता औषध दिलं असतं, तर त्या दोघांना काहीच मिळालं नसतं ना? याशिवाय पुढे त्यांनी आपापल्या बायकांना फुकट इलाज केला, तर माझंही दोन रुपयाचं नुकसान होईल की नाही?''

आपल्या नवऱ्याच्या या प्रामाणिकपणावर जानकी फारच खूश झाली.






## ६

(रूपधर आपल्या अनुयायांसह सुकेशिनीकडे काही काळ अतिथी म्हणून राहिला. यानन्तर त्यांच्या दबावामुळे तो त्यांच्यासह स्वदेशी जायला तयार झाला. पण अगोदर सुकेशिनीच्या सल्ल्यावरून तो यमलोकात गेला. तेथे त्याची आपल्या मातेच्या प्रेतात्म्याशी भेट झाली. तिच्याकडून त्याला आपल्या कुटुंबियांबद्दलची सर्व हकिकत समजली.) -नंतर

**रू**पधर आपल्या आईशी बोलण्यात गुंतला असताना, अन्य प्रेतात्मे बळी स्वीकारण्यासाठी जमा झाले. त्या सर्वांशी बोलून त्याने त्यांचीही खबर जाणून घेतली. तिथे आलेल्यांच्यात नवद्योत व भुवनसुंदरी यांच्याही माता हजर होत्या.

बळी प्राप्त झाल्यानन्तर बरेच प्रेतात्मे परत फिरले. इतक्यात सम्राटाचा आत्मा तेथे आला. बळी मिळाल्याबरोबर त्यानेही रूपधरला ओळखले व तो जोराने रडू लागला. त्याने रूपधरचा हात हातात घ्यायचा प्रयत्न केला. पण प्रेतात्मे जिवन्त व्यक्तीचे हात पकडू शकत नव्हते व त्यांना आलिंगनही देअू शकत नव्हते.

आश्चर्यचकित होअून रूपधरने त्याला विचारले, ''महाराज, आपण इथे कसे आलात अन् केंव्हा?''

''अजबल नावाचा एक दुष्ट माणूस आणि माझी पत्नी या दोघांनी मिळून मला मारून



टाकायचे कारस्थान रचले. अतिथी म्हणून मला बोलावून घेऊन जेवताना त्यांनी कपटानं माझी हत्या केली. माझ्याबरोबर माझ्या साऱ्या लोकांनाही त्यांनी मारून टाकलं. युद्धात तू सुद्धा अनेक दारुण हत्या पाहिल्या असशील रूपधर, पण भोजन करते वेळी इतक्या साऱ्यांना एकाच वेळी मारून टाकण्याच्या घटनेची तू कल्पनाही करू शकणार नाहीस.'' सम्राटाने रडतरडत आपल्यावर गुदरलेला प्रसंग सांगितला.

''होय महाराज, स्त्रीबुद्धि चंचल आणि प्रलयकारी असते. युद्धाहून परत येण्यापूर्वीच आपल्या हत्येची योजना तयार झालेली असावी. स्त्रीवर विश्वास नाही ठेवता येत. भुवनसुंदरीचंच पहा नं. तिच्यासाठी कित्येक जण मेले, मारले गेले.'' रूपधर समजूत घालत म्हणाला.

''पण तुझी बायको तर चांगली पतिव्रता आहे. तू युद्धाला निघण्यापूर्वी तर ती अगदी नवपरिणीता होती; थोड्या दिवसांनी माताही बनणार होती ती. आतापर्यन्त तिचा पुत्र मोठा झाला असेल.''

ते दोघे असे बोलण्यात मग्न असताना वज्रकाय व पितृकीर्तीचे प्रेतात्मेही तेथे आले. ट्रॉययुद्धात मेलेले अन्य वीरही येऊन पोचले. रूपधरला ओळखताच वज्रकायही त्याच्याशी बोलू लागला. अनेक विषयांवर त्यांनी गप्पा मारल्या. त्याने रूपधरला विचारले, ''माझा पुत्र खुशाल आहे का? कशा प्रकारचा योद्धा आहे तो?'' ''तुझा नवयोध फार पराक्रमी आहे. त्याच्यासारखा व्यूह रचणारा त्याच्या तोडीचा दुसरा कोणी वीर नव्हेच. कित्येक योद्धयांना त्यानं सहजपणे पाणी पाजलंय. लाकडी घोड्यात लपलेल्यांच्यात तोही एक होता. भीती कशी ती त्याला ठाऊकच नाही. हातात तलवार घेऊन ताबडतोब रणांगणात उडी घेण्यासाठी केंव्हाचा परवानगी मागत होता. ट्रॉयवर तुटून पडायची तीव्र इच्छा होती त्याला. युद्धात किती मेले अन् किती जखमी झाले सांगता नाही येणार. पण अंगावर एकही जखम न झालेला एकटा नवयोधच.'' रूपधरने कौतुक सांगितले.





हे बोलणे ऐकून वज्रकायचा आत्मा फारच प्रसन्न झाला व तो निघून गेला. ज्यांना भेटायची इच्छा होती, त्या सर्वांना भेटून झाल्यावर रूपधर नौकेकडे परतला अन् सर्वांनी आपली यात्रा पुढे सुरू केली. नौका लवकरच परत सुकेशिनीच्या द्वीपावर पोचल्या.

सुकेशिनीने मोठ्या हर्षाने सर्वांचे स्वागत केले. त्यांची प्रशंसा करत ती म्हणाली, ''तुम्ही लोक खरोखरच अजोड पराक्रमी आहात. खरे तर माणूस एकदाच शेवटी यमलोकात जातो. पण तुम्हाला तर पुन्हा एकदा तिथे जायला संधी मिळणार आहे. आजचा दिवस माझे पाहुणे म्हणून रहा; खा-प्या अन् विश्रान्ती घ्या. उद्या सकाळी तुम्ही पुढल्या प्रवासाला निघा.''

ग्रीक सैनिक दिवसभर तिथे खातपीत राहिले. नंतर रूपधर सोडून सर्वजण नौकेजवळ जाऊन तिथल्या रेतीवर मस्त झोपले. रूपधर सुकेशिनीबरोबर राहून तिला यमलोकातील सर्व विचित्र गोष्टी एकएक करून सांगत राहिला. त्या ऐकल्यानन्तर सुकेशिनी म्हणाली, ''या तर सगळ्या निघून गेलेल्या दिवसांच्या गोष्टी झाल्या. आता पुढे काय करायचं याचा विचार करायला हवा. माझं बोलणं नीट ऐकून घे. पुढल्या प्रवासात प्रथम तुझी नागकन्यांशी भेट होईल. तिच्या आवाजात संमोहन शक्ति आहे. तिच्या हाकेला साद देईल, तिचं म्हणणं मानेल, त्याचं मरण ओढवलंच असं समज. त्या द्वीपावर पोचण्यापूर्वीच तुझ्या सगळ्या साथीदारांच्या कानात मेण भरून ठेव म्हणजे त्या नागकन्यांचं मधुर संगीत तुम्हा कोणाला ऐकू येणार नाही. त्यांची गाणी ऐकायचा मोह तुला अनिवार झाला, तर तुला डोलकाठीशी घट्ट बांधून ठेवायला तुझ्या साथीदारांना अगोदरच नीट सांगून ठेव. 'मी कितीही ओरडलो विव्हळलो तरीही मला सोडू नका' असंही स्पष्ट सांग त्यांना. म्हणजे तुला त्यांची गाणी ऐकू येतील; पण त्यापासून कसला धोका उद्भवणार नाही. नागकन्यांचं द्वीप ओलांडून गेलास की समुद्रात तुला दोन वाटा दिसतील. त्यातल्या कोणत्या वाटेनं जायचा निर्णय तू घ्यावास याबद्दल मला काहीच सांगता येणार

नाही. त्यातली एक वाट दोन डोंगरांच्या मधून जाते. त्या वाटेनं जायचा प्रयत्न कोणी केला, की लगेच दोन्ही डोंगर एकमेकांना चिकटतात अन् जाणारा माणूस मधे चिरडून जातो. ते दोन्ही हलते-चालते डोंगर आहेत. आता दुसरी वाट आहे ती विध्वंसिनी पर्वताच्या जवळून. हा पर्वत खूप अुंच आहे, अन् त्याचं शिखर नेहमीच हिमाच्छादित असल्यामुळे आजपर्यन्त ते कुणाच्याच नजरेस पडलेले नाही. सारा पर्वत निसरडा असल्यामुळे आजवर त्याच्यावर कोणी चढूही शकला नाहीय. या पर्वतात एक पश्चिमाभिमुख गुहा आहे. त्यात विध्वंसिनी नावाची राक्षसी रहाते. ती कुत्र्यांच्या पिल्लासारखी कुई कुई ओरडत असते. पण तरीही तिच्या आवाजाने सर्वांचा थरकाप होतो. या राक्षसीला बारा पाय आणि सहा डोकी आहेत. तिचे सहाचे सहा गळे चांगले लांबलचक आहेत. गुहा खूप अुंचावर असल्याने अगदी अुत्तमातल्या अुत्तम धनुर्धरीचाही बाण तिथवर पोचू शकत नाही. तरीही विध्वंसिनी आपल्या कमरेचा वरचा भाग गुहेबाहेर काढून तोंडाने समुद्रातले मासे पकडून खाते. आजपर्यन्त तिथून एकही नाविक जिवन्त सुटून जाऊ शकला नाहीय. या पर्वताजवळ पाण्यात एक मोठा भोवरा आहे. नाव या भोवऱ्याच्या तडाख्यात सापडली की बाहेर काढणं अशक्यच. तेंव्हा आपली नौका नेताना भोवऱ्यापासून सावध रहा. विध्वंसिनी पर्वताच्या जवळूनच जावं लागेल तुला. विध्वंसिनी आपल्या सहा तोंडांनी सहा माणसंच पकडेल, पण बाकीचे सर्वजण तरी वाचतील.

यानंतर तुम्ही सर्वजण त्रिनासिया बेटावर पोचाल. तेथे भगवान सूर्याच्या गायी आणि बकऱ्यांचे कळप फिरत असलेले दिसतील. त्यांच्यावर लक्ष ठेवायचं काम सूर्याच्या दोन्ही मुली करत असतात. ही सारी जनावरं नव्यानं जन्मत नाहीत आणि मरतही नाहीत; चिरंजीव आहेत ती. तू अन् तुझे साथीदार त्यांच्यापासून दूरच रहा. त्यांच्या जवळसुद्धा फिरकू नका. तसं केलंत तर सर्वजण खलास व्हाल. कष्ट तर तुम्हाला होतच रहाणार आहेत, पण निदान आपल्या चुकांमुळे ते वाढवू नका."

सुकेशिनीने सर्वांच्या भविष्याचा आराखडा स्पष्ट मांडून दाखवला. सकाळी रूपधर आपल्या नौकेकडे आला अन् त्याने साथीदारांना झोपेतून अुठवले. नाव समुद्रात लोटून ते ताबडतोब पुढल्या प्रवासाला निघाले. सुकेशिनीच्या मेहेरबानीमुळे हवाही अनुकूल राहून त्यांना पुढे जायला कसलाही त्रास झाला नाही.

त्यांना पहिला धोका नागकन्यांचा होता. म्हणून रूपधरने साथीदारांना, सावध रहाण्यासाठी, सुकेशिनीने सांगितलेली सारी हकिकत स्पष्ट केली. त्याने सर्वांच्या कानात मेण भरून त्यांना बहिरे केले. नंतर साथीदारांनी रूपधरला जाड दोरखंडाने डोलकाठीशी घट्ट बांधून ठेवले. रूपधरने त्यांना अगोदरच सांगून ठेवले की, "मी स्वतःला सोडवून घ्यायचा प्रयत्न करतो आहे, असे दिसले तर मला आणखी घट्ट आवळून बांधा, पण मोकळं करायचा प्रयत्न मुळीच करू नका."







नाव नागकन्यांच्या दृष्टिपथात आल्या बरोबर त्या मधुर पण अुच्च-स्वरात गाऊ लागल्या. रूपधरला त्यांनी त्याचे नाव घेऊन हाका मारल्या व आपले गायन ऐकायला विनवले. त्यांची गाणी ऐकता ऐकता रूपधर अगदी तल्लीन झाला व आणखी ऐकण्यासाठी तडफडू लागला. नाव तर पुढे जातच होती. गाणे ऐकू येत असेपर्यन्त त्याने स्वत:ला मोकळे करण्यासाठी साथीदारांपुढे खूप गयावया केली. पण त्यांनी अुलट त्याला जास्तच घट्ट बांधले. थोड्याच वेळात नौका गाणे ऐकू येण्याच्या टप्प्याबाहेर गेली. अन् साथीदारांनी रूपधरची बंधने मोकळी केली. रूपधरनेही त्यांच्या कानातील मेण काढून टाकले. इतक्यात दूरवर पाणी गोल-गोल फिरत असलेले रूपधरला दिसले. तो भोवरा पाहून सर्व साथीदार घाबरून गेले.

रूपधर त्यांना धीर देत म्हणाला, ''भोवऱ्याला भिऊ नका. फाललोचनांच्या आक्रमणापुढे हे संकट म्हणजे काहीच नव्हे. तो पहाड दिसतोय ना, त्याच्या जवळून घ्या नौका आपली.''

पर्वतावरील गुहेत रहाणाऱ्या विध्वंसिनी बद्दल तो आपल्या साथीदारांजवळ काहीच बोलला नाही. तिचा अुल्लेखही त्याने केला नाही. तो केला असता, तर हातातली वल्ही फेकून देऊन त्यांनी आणखी काय केले असते, कुणास ठाऊक! रूपधर त्या पर्वताकडे मात्र एकटक पहात राहिला. आकाश मेघव्याप्त असल्यामुळे त्याला गुहा किंवा राक्षसी यांपैकी काहीच दिसू शकले नाही. बाकी साऱ्या साथीदारांचे सारे लक्ष त्या भोवऱ्याकडेच लागून राहिलेले होते.

इतक्यात अचानक विध्वंसिनीने आपली सहाही डोकी बाहेर काढून सहा साथीदारांना नावेतून अुचलून घेतले. नाव तशीच पुढे गेली.

पुढे एक सुंदरसे बेट त्या सर्वांना दिसले. तेथून गायी अन् बकऱ्यांचे आवाज येत होते. याच बेटावर भगवान सूर्याची पशुसंपदा होती.

रूपधरला ताबडतोब सांकेतिक व सुकेशिनीच्या इशाऱ्यांची आठवण झाली. घाबरतच त्याने आपल्या अनुयायांना म्हटले, ''दोस्तहो! या बेटावर अुतरू शकण्याइतके आपण भाग्यवान नाही आहोत. तुम्ही सर्वजण खूप थकला आहात हे ठाऊक आहे मला. आपल्या सर्वानाच विश्रान्तीची फार गरज आहे. पण या बेटावर पाऊल ठेवणं धोक्याचं असल्याबद्दल सांकेतिक अन् सुकेशिनीनं मला अगोदरच सांगून ठेवलंय. जाणूनबुजून कशाला संकट ओढवून घ्यायचं? तेंव्हा नौका बेटाच्या डावीकडे फिरवा.''

रूपधरच्या बोलण्यामुळे सर्वजण हताश झाले. त्यांच्या अुत्साह थंड पडला, नाराज होत मायावी म्हणाला, ''रूपधर, तू माणूस नव्हेस ! दगड आहेस दगड! तुला स्वत:ला विश्रान्ती नको असेल. सदान्कदा कामातच गुंतलेलं रहाणं, हे तुझं ध्येय ! पण या माणसांकडे पहा जरा ! बिचारे किती थकून गेलेत. यांच्याकडे पाहून तर असं वाटतंय, की कुठल्याही क्षणी यांचे प्राण कुडी सोडून निघून जातील ! तू यांना या बेटावर अुतरू देत नाहीयेस; खाणं बनवून खाण्याइतकाही अवधि द्यायला तयार नाहीस तू. आता थोड्याच वेळात रात्र होईल याची जरा कल्पना तरी करून पहा ! कशी दयनीय अवस्था होईल आपल्या सर्वांची. काहीही होवो ! या बेटावर अुतरून स्वयंपाक करून जेवणारच आम्ही. अुद्या सकाळी निघू या पुढे !''

मायावीच्या या बोलण्याला इतर सर्वांनी दुजोरा दिला. 'दैवात लिहिलं असेल, ते होणारच' हे रूपधरनेही जाणले. तो मायावीला म्हणाला, ''तुम्हा सर्वांचं असंच म्हणणं असेल तर मी एकटा काय विरोध करणार ! पण निदान सर्वांनी मला एक वचन द्या. गायी किंवा बकऱ्या दिसल्या, तर त्यांना हातही लावू नका कोणी. सुकेशिनीने दिलेले पदार्थ सोडून अन्य कोणत्याही पदार्थाला हातसुद्धा लावू नका, खाऊ तर नकाच. एकादी बकरी मारून खायचा प्रयत्न करू नका. अगोदर तसं वचन द्या सर्वांनी. वचनबद्ध व्हायला तयार असाल, तरच या त्रिनासिया बेटावर पाऊल ठेवू आपण.''

सर्वांनी मुक्तकंठाने वचन दिले.



# दानशौर्य

त्रिलिंग देशाचा राजा विशाखदत्त मोठा दानशूर होता. पण देशाचा पैसा अशा प्रकारे खर्च व्हावा, ही गोष्ट त्याच्या प्रधानाला आवडत नव्हती. संधी पाहून राजाला ही गोष्ट समजावून सांगावी असे प्रधानाने ठरवले.

एके दिवशी एक गरीब स्त्री राजदरबारात आली व रडत रडत बोलू लागली, ''महाराज, दोन वर्षापूर्वी माझे पति एका अपघातात दगावले आणि मी अनाथ झाले. मला एकच मुलगा असून तो आजारी आहे. त्याच्या औषधोपचारासाठी मला आपल्याकडून मदतीची अपेक्षा आहे. जन्मभर आपली ऋणी राहीन मी !''

ही करूण कथा ऐकून विशाखदत्तचे हृदय विरघळले. त्याने त्या स्त्रीला दोनशे मोहरा देऊन रवाना केले.

दुसऱ्याच दिवशी शिपाई त्या स्त्रीला कैद करून दरबारात राजापुढे घेऊन आले. ते म्हणाले, ''महाराज, ही बाई एक नंबरची लबाड आहे. प्रधान महाराजांनी तिच्यामागे गुप्त हेर पाठवले होते. त्यांना आढळून आलं की, हिचा नवरा अन् मुलगा दोघंही अगदी खुशाल आहेत !''

आता प्रधान मधेच म्हणाला, ''पाहिलंत महाराज आपल्या दानशूरपणाचा आधार घेऊन आपल्यालाच हिनं कसं फसवलं ते?''

त्या तरुणीकडे नीट लक्षपूर्वक पहात राजा म्हणाला, ''प्रधानमंत्री, कष्टांची नुसती कल्पना करून रडणं-भेकणं ही अगदी सहज घडणारी गोष्ट आहे. पण सामान्य माणसांना ही सहज जमणारी गोष्ट नव्हे ! मला तर हिच्यात एका उत्तम अभिनेत्रीची लक्षणं दिसत आहेत ! कलाकारांचा गौरव करणंही तर आपलीच जबाबदारी न ? हिला आणखी शंभर मोहरा देऊन पाठवून द्या.''



# कैवल्य

राजा विक्रमादित्य सहज आपला पराभव मानणारा नव्हता. नेहमीप्रमाणे तो झाडाजवळ गेला आणि प्रेत खाली उतरवून मुकाट्याने स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतातील वेताळ बोलू लागला - ''राजा, आपले ध्येय गाठण्यासाठी तू हे भगीरथ प्रयत्न करीत आहेस. पण हे कठीण काम करण्यासाठी कोणा मुनीने तुला बहकावले असावे असे मला वाटते. कारण ते आपल्या तपोबळाच्या साह्याने एकाद्या दुष्टाला ही पुण्यलोकात पोचवू शकतात. पण कधी कधी त्यांचे संकल्प तडीस जात नाहीत. उदाहरणादाखल मी तुला निकुंभिका नावाच्या राक्षसीची गोष्ट सांगतो. लक्षपूर्वक ऐक.'' असं म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला.

दंडकारण्यात निकुंभिका नावाची एक राक्षसी रहात असे. तिला नरमांस फार आवडत असे. चुकून कोणी वाटसरू त्या

## वेताळ कथा



बाजूला आला की ती गुहेतून बाहेर येई नि त्याला मारून खाऊन टाकी.

एक दिवशी लग्नाचे एक वऱ्हाड रस्त्याने जाऊ लागले. माणसांचा वास येताच निकुंभिका ताडकन उठून गुहेबाहेर आली. आणि तावडीत आलेल्यांना खाऊन टाकलं. पोटभर नरमांस खाऊन ती झोपून गेली. ती जागी झाली तेव्हा तिला कडकडून भूक लागली आणि ती जंगलात इकडे-तिकडे भटकू लागली. एका झाडाखाली विनयशील नावाचा एक मुनि तपश्चर्या करीत बसलेला तिला दिसला.

त्याला पाहून निकुंभिका खुश झाली. ती मुनीच्या दिशेने जाऊ लागली. तसे तिला दिसले की अग्निज्वाला त्या मुनीचे संरक्षण करीत आहेत. मुनीने डोळे उघडले नि तो म्हणाला - ''निकुंभिके, तू माणसांना मारून खाऊन टाकतेस ! हे असलं निकृष्ट जीवन सोडून देण्याचा प्रयत्न कर. उद्या शिवरात्रीचा पवित्र दिवस आहे. कुठल्याही माणसाला न मारता परमेश्वराचं नाम-स्मरण कर. एक माणूस येऊन तुला पवित्र गंगाजळ देऊन जाईल. ते प्राशन करून तुझी सर्व पापे धुऊन जातील. ते पीताच तुला या राक्षस जन्मापासून मुक्ति मिळेल.''

मुनीला नमस्कार करून निकुंभिका म्हणाली - ''मुनिवर, आपण सांगितलं तसंच मी करीन.'' आणि ती तेथून निघाली.

शिवरात्रीच्या दिवशी नागभैरव नावाचा एक कुप्रसिद्ध डाकू घोड्यावर स्वार होऊन येत असलेला तिला दिसला. ती भुकेने व्याकुळ झालेली होती. ती आपल्या गुहेतून बाहेर आली आणि नागभैरवला तिने आपल्या मुठीत पकडले.

नागभैरव थर-थर कापत गयावया करीत म्हणाला - ''नको, कृपा करून मला मारू नकोस.'' त्याचं हे बोलणं ऐकून राक्षसीला कालचे मुनीचे बोलणे आठवले. तिने नागभैरवला जमिनीवर ठेवले नि विचारले - ''खरं सांग, तू कोण आहेस?''

नागभैरव म्हणाला - ''मी एक डाकू आहे. माझं नाव नागभैरव. आताच एका घरात चोरी केली आणि मिळालेले दागिने घेऊन चाललोय. हे दागिने मी तुला देऊन टाकतो, पण मला मारू नकोस.''

चोराचं हे बोलण ऐकून निकुंभिका जोरजोरात हसत म्हणाली - ''अरे दुष्ट माणसा, तुझ्या दागिन्यांशी रे मला काय करायचंय?'' मुनीचा उपदेश ती विसरली नव्हती; पण भुकेने व्याकुळ झालेल्या निकुंभिकेने डाकूला खाऊनच टाकले. इतक्यात काही अंतरावर तिला एक माणूस दिसला. निकुंभिका लगेच एका वडाच्या झाडामागे लपून बसली. तो जवळ येताच तिने दरडावून विचारले - ''कोण रे तू ?''

राक्षसीला पाहताच त्याची घाबरगुंडी उडाली. कापत तो म्हणाला - ''मी वीरदास. मी कलिंग राजाचा स्वयंपाकी. महाराज एकाएकी माझ्यावर रुष्ट झाले. त्यांनी मला नोकरीवरून काढून टाकले. आणि मी इथं जंगलात आलो.''

प्रखर दृष्टीने वीरदासकडे पहात राक्षसीने विचारले - ''काही कारणावाचून तर राजाने तुला नोकरीवरून काढून टाकले नसेल ! तू काही तरी चूक केली असली पाहिजे. खरं सांग काय झाले ते !''

वीरदास चाचरत म्हणाला - ''राक्षसीणबाई, खरंच सांगतो. मला मारू मात्र नकोस. शेजारच्या देशाच्या राजाने मला पुष्कळ धन दिले आणि महाराजांच्या भोजनात मला विष मिसळायला सांगितले.



मी तसे करीत असता पकडला गेलो.''

यावर विकट हास्य करीत निकुंभिका म्हणाली - ''राजाने तुझी हकालपट्टी केली नि तू माझ्या तावडीत सापडलास !'' आणि तिने त्याला आपला घास बनवले !

तरी पण तिची भूक भागली नाही. आपल्या गुहेत बसून ती डुकल्या घेत राहिली. शिवकांत नावाचा एक तरूण तिकडून येताना तिला दिसला. त्याला पाहताच ती उठून उभी राहिली आणि ओरडून म्हणाली - ''हे दुष्ट माणसा, थांब. तुझी यात्रा आता इथेच संपली असं समज.''

निकुंभिकेला पाहून शिवकांत जरा ही घाबरला नाही. धीटपणे तो म्हणाला - ''मला



कशासाठी थांबवते आहेस ग ?"

जोरजोरात हसत राक्षसी म्हणाली - "अरे मूर्खा, मी तुला कशासाठी थांबवते आहे हे तुला समजलं नाही? दोन जणांना तर मी खाल्लंच, तरी पण भूक भागली नाही माझी. नुसती न्याहरी झालीयसं वाटतंय बघ ! खरं भोजन तर अजून व्हायचच आहे. म्हणून शहाण्या, तुला बोलवते आहे."

न घाबरता शिवकांत म्हणाला - "तर मग खाऊन टाक मला नि भागव आपली भूक. जर तुझी भूक भागवू शकलो, तर मला खूप खूप आनंद होईल !"

त्याच्या या बोलण्याचं राक्षसीला मोठं आश्चर्य वाटलं. ती म्हणाली - "म्हणजे तुला मृत्यूचं भय नाही वाटत?"

"भय कशासाठी? प्रत्येक माणसाला एक न एक दिवस मरायचंच आहे ना? कोणी अमरपट्टा घेऊन थोडाच आलाय? एकाद्या रोगाने मरण्यापेक्षा तुझी भूक भागवणं बरं नाही का?" शिवकांतने आपला विचार सांगितला.

हा कोणी सामान्य माणूस दिसत नाही असं निकुंभिकेला वाटलं. तरी पण हा सगळं नाटक तर करीत नाही ना असा तिला संशय आला. गोड गोड बोलून मला फसवण्याचा तर याचा विचार नसावा ना? तिने त्याला उचलून आपल्या डाव्या हातात धरलं. तेव्हा शिवकांत म्हणाला - "थोडी थांब. माझी बायको बरेच दिवस आजारी आहे. काशीला गेलो होतो नि तिच्याच साठी हे गंगाजल आणलंय ! तिला मी गंगाजल देऊ शकणार नाही. व्यर्थ जाण्यापेक्षा तूच हे पिऊन टाक झालं. निदान पुढील जन्म तरी तुला चांगला मिळेल !"

राक्षसीने लगेच शिवकांतला खाली जमिनीवर ठेवले नि म्हणाली - "हे गंगाजल आपल्या बायकोलाच दे." आणि तिने शिवकांतला साष्टांग नमस्कार घातला.

शिवकांतचा पद-स्पर्श होताच निकुंभिकेला कैवल्य प्राप्त झाले.

राजा विक्रमादित्याला एवढी गोष्ट ऐकवून वेताळ म्हणाला - "राजा, शिवरात्रीच्या दिवशी कोणाला ही मारू नये असं मुनि विनयशीलने निकुंभिकेला सांगितलं होतं. शिवरात्रीला दिवसभर परमेश्वराचे नामस्मरण करण्याची सूचना ही मुनीने दिली होती. शिवाय असं ही सांगितलं होतं की एका मानवाकडून तिला गंगाजल मिळेल व ते प्राशन केल्यावर तिला राक्षस जन्मातून मुक्ति मिळेल. तरी पण निकुंभिकेने दोन माणसांना खाऊन टाकलं. शिवकांतला मात्र तिने सोडलं. शिवकांतने देऊ केलेलं गंगाजल तिने स्वीकारले नाही. तरी सुद्धा तिला मोक्ष-प्राप्ति झाली. हे कसं शक्य झालं? गंगाजल प्राशन न करता तिला मोक्ष कसा मिळाला? माहीत असून ही माझ्या या प्रश्नांची उत्तरे न दिलीस तर तुला माहीतच आहे की तुझ्या मस्तकाचे तुकडे-तुकडे होतील."

राजा विक्रमादित्याने निवेदन केले - "राक्षसी निकुंभिकेने ज्या दोन माणसांना खाऊन टाकलं त्यांच्यापैकी एक डाकू होता, तर दुसऱ्याने आपल्या मालकाशी द्रोह केला होता. ते मानवरूपी राक्षस होते, मानव नव्हते. म्हणून शिवरात्रीच्या दिवशी या दोघांना मारून खाऊन टाकण्यात कोणते ही पाप नाही. शिवकांतने देऊ केलेल्या गंगाजलाला निकुंभिकेने स्पर्श सुद्धा केला नाही, तरी तिला कैवल्य प्राप्त झाले. याचं कारण असं की डोळ्यांसमोर आपला मृत्यु पहात असून ही शिवकांतने राक्षसी बद्दल घृणा प्रकट केली नाही. उलट निदान पुढच्या जन्मी तिला उत्तम जन्म मिळावा अशी आपली इच्छा प्रदर्शित केली. आपल्या बायकोसाठी आणलेले गंगाजल त्याने निकुंभिकेला देऊ केले. अशा त्यागी व देवासारख्या तपस्व्याचा पदस्पर्श गंगाजलाहून ही अधिक प्रभावी व शक्तिशाली असतो. निकुंभिकेला मुनीने दिलेला उपदेश स्मरत होता. तरी सुद्धा त्यागी शिवकांतने दिलेले गंगाजल तिने स्वीकारले नाही. उलट ते त्याने आपल्या बायकोला द्यावे असे तिने सांगितले. म्हणूनच राक्षसी निकुंभिकेला कैवल्य प्राप्त झाले."

अशा रीतीने राजाचा मौन-भंग करण्यात वेताळ यशस्वी झाला. मग तो प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला.

**आधार : तरूण चटर्जी यांची एक कथा**





# श्रेष्ठ कोण ?

धर्मपुरीचे जमीनदार राजशेखर एक दिवशी आपल्या दिवाणाला म्हणाले - ''आपल्या खेड्यात जाऊन कर वसूल करून आणा. हे काम करता करता लोक काय म्हणतात ते ही ऐका, त्यांची सुख-दुःखे जाणून घ्या.''

दिवाणाने बरोबर दोन नोकर घेतले आणि आपल्या कामासाठी बाहेर पडला. कर वसूल करीत लोकांचे कष्ट व आवश्यकता यांबाबत बरीच माहिती त्याने मिळवली. तो दूर अंतरावरील मायामयी नावाच्या एका खेड्यात पोचला. या गावात जाण्यासाठी धड रस्ता ही नव्हता. गावातील लोक अगदी भोळे-भाबडे होते. जमीनदाराला कर द्यायचा असतो हे ही त्यांना माहीत नव्हते.

धर्मपुरीला परत आल्यावर दिवाणाने जमीनदाराला कामाचा सर्व अहवाल सादर करून म्हटले - ''मालक, आपल्या सर्व खेड्यात अत्यंत मागासलेले खेडे आहे मायामयी. मोठं विचित्र गाव आहे ते. तिथले रहिवासी अगदी भोळे-भाबडे आहेत. असे लोक मी अन्यत्र कोठे ही पाहिले नाहीत.'' दिवाणाने त्यांच्या भोळेपणाची काही उदाहरणे ही जमीनदारापुढे मांडली.

त्यावेळी तर्कानंदस्वामी तिथे हजर होता. तो तर्क-शास्त्रावर प्रवचने देत देश भर दौरा करीत होता. दिवाणाने सांगितलेल्या गोष्टी ऐकून तो हसत म्हणाला - ''या लोकांच्या भोळेपणाचे प्रमुख कारण आहे त्यांच्यातील तर्क-शक्तीचा अभाव ! हा एक प्रकारचा रोग आहे. तार्किक पद्धतीने विचार करण्याची सवय या लोकांना लावली पाहिजे.''

शंका प्रकट करीत जमीनदाराने विचारले - ''ते कसे बरे शक्य होईल?''

तर्कानंदाने दावा केला - ''का नाही? सर्व विश्व तर्काधिष्ठित आहे. सूर्य, चंद्र नि सर्व नक्षत्रे तर्क-शास्त्रानुसार भ्रमण करीत आहेत. मी आपल्या दोन शिष्यांना घेऊन त्या गावी जातो. तो गाव दाखवणारा कोणी माणूस माझ्याबरोबर द्या. थोड्याच दिवसात त्या गावातील लोकांना मी बुद्धिमान आणि विवेकसंपन्न करून सोडीन. सर्व जण शुक्राचार्य आणि बृहस्पति सारखे बनतील.''

जमीनदाराने आनंदाने त्याचा हा प्रस्ताव स्वीकृत केला. तर्कानंदस्वामीने जमीनदाराचा निरोप घेतला आणि आपल्या शिष्यांसह तो मायामयी गावात पोचला.

गाव तसं दिसायला सुंदर होतं. दुरून समुद्राच्या लाटांचा ध्वनि येत होता. चारी बाजूंना हिरवीगार शेते लवलवत होती. गावातील झाडांवर फळे लटकत होती. काही अंतरावर एक छोटं जंगल होतं. गाव डोंगरात दडलेलं होतं.

तेथील सुंदर दृश्ये पाहून तर्कानंदस्वामीचे शिष्य म्हणाले - ''गुरुजी, येथील लोक भोळे-भाबडे असतील यावर विश्वासच बसत नाही.''

त्यांच्यावर चिडून तर्कानंदस्वामी म्हणाला - ''दिवाणाने खोटं सांगितलं असावं असं का तुम्हाला वाटतं? तुम्ही जा आणि गावातल्या सर्व लोकांना या वडाच्या झाडाखाली माझं प्रवचन ऐकण्यासाठी पाचारण करा.''

शिष्य गावातील घरोघरी गेले. त्यांनी प्रत्येकाला सांगितलं - ''तर्कानंदस्वामी वीस वर्षे हिमालयात राहून आलेले आहेत. त्यांनी



विंध्य पर्वतावर दहा वर्षे तपश्चर्या केली. तर्कर्षि नावाच्या महान् ऋषीज़वळ राहून ते तर्कशास्त्र-पारंगत झालेले आहेत. ते आज संध्याकाळी तर्कशास्त्रावर प्रवचन देणार आहेत. तुम्ही सर्व जण ते ऐकायला वडाच्या झाडाखाली या.''

तर्कशास्त्र ही काय चीज आहे हे कुणाला ही माहीत नव्हतं. जिज्ञासेने सर्व ग्रामवासी प्रवचन ऐकण्यासाठी वट-वृक्षाखाली जमा झाले.

लोकांची एवढी गर्दी पाहून तर्कानंद प्रसन्न झाला. वट-वृक्षाच्या चबुतऱ्यावर तो ठाण मांडून बसला. तो प्रवचन सुरू करणार इतक्यात एका शिष्याने गुरूच्या कानात सांगितले - ''या

जनार्दन चिंचाळकर

लोकांच्याकडे पाहून असं वाटतंय की यांच्या पैकी काही मोठे दुष्ट व घमेंडखोर असावेत. आपण सांगितलेल्या गोष्टी यांना पटल्या नाहीत तर ते आपला पाठलाग करून आपल्याला मारतील सुद्धा. म्हणून आपण यांच्यापुढे क्षमा-गुणावर प्रवचन देणे इष्ट होईल !''

शिष्याची प्रशंसा करीत तर्कानंद स्वामी म्हणाला - ''पुत्र, तुझा सल्ला योग्य आहे. एक दिवशी तू माझा प्रमुख शिष्य बनशील.'' नंतर जमलेल्या श्रोत्यांना उद्देशून तर्कानंद म्हणाला - ''सर्व जन्मात उत्तम जन्म म्हणजे मनुष्य-जन्म. सर्व गुणात उत्तम गुण म्हणजे क्षमा-गुण. यालाच क्षमा-भिक्षा असं ही म्हणतात. याहून उत्तम असा दुसरा कोणता ही धर्म नाही.''

इतक्यात जमावातील एक माणूस उठला नि त्याने प्रश्न केला - ''स्वामीजी, घरात चोरी करणाऱ्या एका माणसाला मी पकडले. पण मी त्याला माफ केलं आणि सोडून दिलं ! हा माझा क्षमा-गुण उत्तमच नाही का?''

आणखी एक माणूस उठून उभा राहिला आणि म्हणाला - ''माझ्या घरात चोरी करीत असलेल्या एका माणसाला मी पकडले. मी त्याला शिव्या दिल्या नाहीत, की मारलं नाही. मी त्याला म्हटलं - आता पर्यंत जेवढ्या वस्तु चोरल्यास त्या घेऊन जा. स्वामीजी, माझा हा क्षमा-गुण उत्तम आहे की नाही?''

त्याचा प्रश्न संपताच तिसरा माणूस उभा राहून विचारू लागला - ''अशाच परिस्थितीत सापडलेल्या एका चोराचा मी प्रेमाने आदर-सत्कार केला. त्याला सांगितलं - तुला जे पाहिजे जे संकोच न करता घेऊन जा. स्वामीजी, हा माझा क्षमा-गुण त्या दोघांच्या पेक्षा उत्तम नाही का?''

यावर तर्कानंद स्वामी म्हणाला - ''तुम्हा सर्वांच्या क्षमा-गुणापेक्षा त्या चोरांचा क्षमा-गुण अधिक प्रशंसनीय आहे. तुम्ही सर्व जण भोळे आहात. तुम्हाला कोणाला इजा न पोचवता चोर निघून गेले, तुम्ही थोडक्यात बाचलात !''

आणि तर्कानंद स्वामी एक क्षणाचा ही विलंब न करता ते गाव सोडून निघाला!






दीव (अंग्रजी उच्चार 'द्यु') हे खंबाटच्या खाडीच्या मुखावरील एक छोटेसे बेट आहे. याचे नाव संस्कृत 'द्वीप' या शब्दावरून पडले आहे. केवळ ४० वर्ग कि.मी. क्षेत्रफळ असलेले दीव हे एके काळी फार महत्त्वाचे नगर होते. १५८३ मधे ते पोर्तुगीजांनी आपल्या ताब्यात घेतले. १९६१ पर्यन्त ते त्यांच्याच हाती होते. यानन्तर गोवा व दमण यांसह दीवही भारतात सामिल करण्यात आले. आता दीव-दमण हे एक संयुक्त संघीय क्षेत्र आहे.

दीवचा किल्ला पोर्तुगीजांनी बनवला होता. त्याच्या तीन बाजूंना समुद्र व चौथ्या

## सागर किनाऱ्यावर सहल - २

# खंबाटची खाडी

आलेख - मीरा नायर ❖ चित्रकार - गोपकुमार

बाजूला खोल खंदक आहे. किल्यात एक उंचसा दीपस्तंभही आहे. याच्या गॅसचा प्रकाश खूप दूरपर्यंत दिसतो.

खंबाट खाडीच्या वायव्य तटावर भावनगर आहे. येथून ४० कि.मी. अंतरावर अलंग येथे जहाजे तोडण्याचा कारखाना आहे. कामातून गेलेली जहाजे तोडणे हे एक तांत्रिक काम असते. समुद्राच्या खाऱ्या पाण्यात वर्षानुवर्षे तरंगत



राहून जहाजे 'म्हातारी' होतात. अलंगचा हा कारखाना १९८३ मधे सुरु करण्यात आला व आज तो या प्रकारचा जगातला सर्वात मोठा कारखाना आहे. नाना देशातील जहाजे येथे तोडण्यासाठी आणली जातात. जहाजे बनवण्याचे कारखाने समुद्रकिनाऱ्यापासून सुमारे १,००० मीटर अंतरावर असतात. पण अलंगचा कारखाना अशा ठिकाणी बांधला आहे, की जेथे भरतीच्या वेळी जहाज थेट किनाऱ्यावरच आणून उभे करता येते.

अलंगच्या ईशान्येला एक लहानसे पीरम नावाचे बेट आहे. त्याच्या आग्नेय कोपऱ्यावर उभ्या असलेल्या काही खडकांमधे प्राचीन जीवाश्म





(फॉसिल्स) मोठ्या प्रमाणावर सापडतात. हत्ती, घोडे, गेंडे, पाणघोडे, बैल, मगरी-सुसरी, कासवे आणि मोठमोठ्या माशांचेही जीवाश्म या खडकांतून आढळतात.

प्राचीन नगर लोथल हेही खंबाट खाडीच्या क्षेत्रातच येते. येथे खोदाई काम केले असता ई.स.पू. ४,००० ते ३,००० च्या काळातील सिंधु नदी खोऱ्यातील संस्कृतीच्या एका मोठ्या शहराचे अवशेष सापडले आहेत. लोथल बंदरातून मेसापोटेमियाशी समुद्रातून व्यापार चालत असे. ओहोटीच्या वेळी कमी पाण्यातूनही जहाजे किनाऱ्यावर आणता यावीत,यासाठी लोथलच्या गोदीत पाण्याचे नियंत्रणही केले जात असे. यानंतर मोठमोठ्या वादळांमुळे, पूरांमुळे भूस्खलन होऊन बन्दरात माती भरून गेली. आजचे लोथल शहर समुद्रकिनाऱ्यापासून काही कि.मी. अंतरावर आहे.



लोथलच्या ईशान्येला आणखीही एक शहर होते. त्याचे नाव खंबाट. इंग्रज लोक याला 'कैबे' असे म्हणत. खाडीचे नाव या शहरावरूनच पडले आहे. अलिकडे येथे खनिज तेलाचे स्रोत सापडले आहेत. त्यामुळे आता पुन्हा शहराचे नाव ऐकू येऊ लागले आहे. खंबाटच्या साड्याही प्रसिद्ध आहेत. कमी मूल्याची रत्ने अकीक यांचा लघुउद्योगही येथे आहे. हे रत्न अरब, अन्य खाडी-प्रदेश व अग्नेय आशियातील देशांत खूप लोकप्रिय आहे.

खरे म्हणजे गुजराथच्या समुद्राच्या चांगल्या मोठ्या क्षेत्रात खनिज तेल मिळते. खंबाटशिवाय दुसरे मोठे तेल क्षेत्र भडोच जवळ अंकलेश्वरमधे आहे.

गुजराथमधील फारच थोडी प्राचीन शहरे अजून त्याच स्थितीत आहेत. नर्मदेच्या मुखावर असलेल्या भडोच शहराला पूर्वी भरुकच्छ म्हणत असत. प्राचीन काळी हे पश्चिम भारताचे फार मोठे बंदर व व्यापारी केन्द्र होते. दक्षिण भारत व परदेशातूनही तेथे जहाजे येत असत, आणि त्यांचा माल इतरत्र पाठवण्यासाठी तेथील गोदामात ठेवला जात असे. तापी नदीच्या किनाऱ्यावर वसलेले सुरत हे शहर व्यापार व धर्म या दोन्ही दृष्टींनी महत्त्वाचे होते. सोळाव्या शतकात मोगल राज्यकाळात याला 'मक्केचे द्वार' म्हटले जाई.



सत्राव्या शतकात डच, फ्रेंच व इंग्रजांनी सुरतेत आपले कारखाने म्हणजे व्यापारी कोठारे बनवली होती.

दक्षिणेतील मोगलांचे आक्रमण रोखण्यासाठी शिवाजीच्या सैन्याने १६६४ मधे सुरतेवर हल्ला केला होता. त्या काळात मोगलांच्या गुजराथ सुभ्याची सुरत ही राजधानी होती. तिथला सुभेदार इनायत खान आपला जीव वाचवण्यासाठी किल्ल्यात लपून बसला व त्याने पूर्ण शहर व तेथील प्रजेला मराठ्यांच्या दयेवर सोडून दिले. इंग्रजी व डच व्यापारी कोठारांनी कसेबसे आपले रक्षण केले, पण सुरत शहर मात्र साफ लुटले गेले.



या आक्रमणानन्तर सुरत शहराच्या चारी बाजूंना उंच व मजबूत तट बांधण्यात आला. परन्तु त्याचाही फारसा उपयोग झालाच नाही. सहा वर्षांनंतर शिवाजीने पुन्हा हल्ला केला. यावेळी मोगल अधिकारी व शिपाई शहर सोडून पळून गेले. शिवाजीने सुरतमधून अपार धनदौलत लुटली. या दोन हल्ल्यांनंतर पुन्हा कधी शहराची भरभराट झाली नाही. १९ व्या शतकापर्यन्त इथला व्यापारधंदा व ऐश्वर्य मुंबईकडे निघून गेले.

परन्तु आज सुरत पुन्हा मोठे व्यापारी-केन्द्र बनले आहे. तेथील जरीकाम, रेशमी साड्या व रेयॉन कापड फार प्रसिद्ध आहे. आपल्या देशातील हिऱ्यांना पैलू पाडण्याचे सर्वात मोठे केन्द्रही हेच आहे.



खंबाट खाडीच्या पूर्व तटावर गुजराथच्या तटरेषेच्या शेवटच्या टोकावर संजान शहर आहे. आठव्या शतकात इराणमधील पार्शी धर्माचे लोक भारतात प्रथम संजान



बंदरातच अुतरले. तेथे दगडाचा एक स्तंभ बनवण्यात आला आहे.

त्या काळात जाडी राणा हा संजानचा राजा होता. इराणमधून आलेल्या या लोकांना आपल्या राज्यात आश्रय द्यायला तो कां कूं करत होता. राणाच्या आज्ञेने पारशांचा प्रमुख मेहरजी याच्यापुढे दुधाने काठोकाठ भरलेला वाडगा ठेवण्यात आला. ''माझं राज्य या वाडग्याप्रमाणेच तुडुंब भरलेलं आहे. तुम्हा लोकांसाठी यात थोडी सुद्धा जागा नाही.'' असा या कृतीचा आशय होता. पण मेहरजीने हळूच थोडीसी साखर त्या दुधावर भुरभुरली आणि वाडगा परत केला. त्याचा अर्थ होता - ''माझी माणसं आपल्या प्रजेत या साखरेप्रमाणेच मिसळून जातील व आपल्या राज्याच्या अुन्नतीला पोषक बनून रहातील.''

मेहरजीच्या या अुत्तराने राणा खूष झाला व त्याने त्यांना आपल्या राज्यात रहायला परवानगी दिली. पार्शी समुदाय दिल्या वचनाप्रमाणे गुजराथेतल्या जनजीवनात मिसळून गेला. आपल्या नव्या देशाच्या प्रगतीत त्यांनी खूप हातभार लावला आहे.

संजानच्या अुत्तरेला अुदवाडा येथे पारशांची इराणशहा आतिश बेहराम ही सर्वात प्रसिद्ध अग्यारी (अग्निमंदिर) आहे. आपल्याबरोबर पारशांनी इराणमधून आणलेला पवित्र अग्नि तेथे आजही प्रज्वलित ठेवलेला आहे. या अग्यारीचा 'बडा दस्तूर' (पुजारी) बनवले जाणे ही मोठी मानाची गोष्ट मानली जाते.

खंबाट खाडीच्या आरपार एक धरण बनवायच्या योजनेवर विचार चालू आहे. 'खाडीच्या अुत्तरभागातील पाण्याचे गोड्या पाण्याच्या सरोवरात रूपान्तर करणे' हा या योजनेचा अुद्देश आहे. साबरमती, मही इत्यादि नद्यांचे गोडे पाणी या खाडीत येअून पडते.





# घृत-दान

कालीघाट मध्ये माधव तुपाचा व्यापार करीत असे. तो फार सावधगिरीने व्यापार करी. त्यामुळे त्याचे तूप टिकाऊ असे. तुपाला कधी ही वास येत नसे. लोकांचा माधव वर फार विश्वास होता. दूर-दूरचे लोक औषधासाठी शुद्ध तूप पाहिजे असेल तर माधवकडेच येत. त्यामुळे माधवचा धंदा उत्तम चालू होता. त्याला व्यापारात खूप फायदा मिळे.

तेथील जमीनदार आपले वारस व भाऊबंदकीच्या संकटात सापडला. त्याचे मन फार अस्वस्थ झाले. त्याला रात्रभर झोप येईनाशी झाली. कालीघाटच्या एका नामांकित ज्योतिषाने जमीनदाराला सल्ला दिला की जर नवग्रह-शांति-होम केला तर सर्व अडचणी निश्चित दूर होतील. ज्योतिषाने सल्ला तर दिला, पण जबाबदारी आली सगळी गावच्या पुरोहितावर ! त्यालाच हा होम यथासांग पार पाडायचा होता. होमासाठी अत्यंत आवश्यक तुपासंबंधी त्याने प्रथम विचार केला. सगळं तूप गायीचं असलं पाहिजे. त्यात जरा सुद्धा भेसळ असता कामा नये.

पुरोहिताने माधव बद्दल खूप ऐकलं होतं. त्याने त्याला बोलवलं आणि सगळी माहिती देऊन म्हणाला - ''बघ बरं, वेळ फार थोडा राहिला आहे. या होमासाठी तुला दहा घागरी तूप पुरवावं लागेल. किंमतीबाबत तुला जमीनदाराशी वाटाघाटी करायला नकोत. तू जी किंमत मागशील ती ते देतील. पण तूप अगदी शुद्ध आणि गायीचंच असलं पाहिजे. त्यात कसलीही भेसळ चालणार नाही. तुझा प्रामाणिकपणा मला माहीत आहे. तरी पण पुरोहित या नात्याने तुला सावध करणं हे माझं कर्तव्य आहे असं मी समजतो. तुला शक्य असलं

ज्योति यादव



तरच 'हो' म्हण अन्यथा मी दुसऱ्या एकाद्या व्यापाऱ्याकडे जाऊन चौकशी करीन.''

पुरोहिताने सांगितल्याप्रमाणे दहा घागरी तूप पुरविण्याचा वायदा माधवने केला. एक तर हे जमीनदाराचे काम होते आणि शिवाय हे देव-कार्य पण होते ! इतक्या मोठ्या प्रमाणावर तूप जमविण्यासाठी माधवला खूप प्रयत्न करावा लागला, अनेकांची मनधरणी करावी लागली. रात्रंदिवस त्याला परिश्रम करावे लागले.

वद्यात जमीनदाराच्या एका नातेवाइकाला विषारी जखम झाली. त्याला मधुमेह झालेला होता आणि तो फार कुपथ्य करी. नुकत्याच व्यायलेल्या गायीचा चीक त्याने घेतला. त्यामुळे त्याला विष-बाधा झाली. जखमेवर मीठ चोळावे त्याप्रमाणे या विषारी जखमे बरोबर त्याला काविळीने ग्रासले. रोग्याची परीक्षा करून वैद्य नातेवाईकांना म्हणाला - ''जमालगोट्याची पाने गायीच्या दुधात भिजवून गरम करा आणि ती जखमेवर बांधून टाका. नंतर मी जे औषध देईन ते तुपातून दिवसाकाठी तीन वेळा रोग्याला द्या. गायीचं शुद्ध तूप असावं, कशाची भेसळ नसावी. तूप शुद्ध नसेल तर या औषधाचा उपयोग होणार नाही.''

जमीनदाराचा एक जवळचा नातेवाईक गायीच्या तुपासाठी धावत-पळत माधवकडे आला.

नवग्रह शांति होमासाठी आता दहा दिवस राहिलेले होते. माधवने दहा घागरी तूप जमवले होते. आता जमीनदाराच्या एका नातेवाइकाला गायीचे तूप पाहिजे होते. हा जमीनदाराचा जवळचा नातेवाईक होता. जर नाही म्हटलं तर जमीनदाराकडून दबाव येण्याची शक्यता होती. आपल्या जवळील दहा घागरी तुपातून थोडं काढून देणं ही त्याला प्रशस्त वाटेना.

माधवने बराच विचार केला आणि शेवटी तुपाची एक घागर जमीनदाराच्या नातेवाइकाला दिली. नंतर आणखी एक घागर तूप जमविण्याचा तो प्रयत्न करू लागला. माधवचं दुर्भाग्य म्हणा अथवा परमेश्वर त्याची परीक्षा पहात होता म्हणा, आणखी एक घागर तूप त्याला कोठे ही मिळेना. अन्य काही उपाय न सुचल्यामुळे शेवटी तो पुरोहिताकडे गेला, आणि जे घडलं ते सगळं त्याला सांगितलं.

पुरोहिताने सगळं शांतपणे ऐकून घेतलं नि हसून म्हणाला - ''माधव, तुझा प्रामाणिकपणा प्रशंसनीय आहे. तुझ्या जागी दुसरा कोणी असता, तर त्याने थोडं म्हशीचं तूप मिसळून टाकलं असतं. नऊ गोष्टी दानात दिल्या जातात - जमीन, सोनं, तीळ, धान्य, मीठ, गूळ, वस्त्रे, चांदीचे रुपये आणि गायी ! असं म्हणतात की गाईचं तूप धरलं तर दानाच्या दहा गोष्टी होतात. तू तर व्यापार करीत आहेस. तरी पण देव-कार्यासाठी शुद्ध तूप देऊन तू मोठं पुण्य मिळवलं आहेस. या होमाविषयी थोडं मी तुला सांगतो. खरं म्हणजे होमासाठी नऊ घागरी तूप पुरेसं आहे. मला वाटलं नवग्रह शांति होम करताना आयत्या वेळी थोडं तूप कमी पडू नये. म्हणून मी दहा घागरी तुपाची मागणी केली होती. ही गोष्ट दुसऱ्या कोणाला सांगू नकोस. तुझ्याजवळ आज पुरेसं तूप आहे. दहाव्या घागरीतील तूप जमीनदाराच्या नातेवाइकाच्या रोग-निवारणार्थ कामी यावं अशी भगवंताची



इच्छा दिसतेय.''

माधवने पुरोहिताला नमस्कार केला आणि प्रसन्न अंतःकरणाने घरी आला. नवग्रह शांति होम पूर्ण झाला. होमाच्या महिम्याने अथवा जमीनदाराच्या हुशारीने जमीनदार सर्व संकटातून मुक्त झाला. त्याचा नातेवाईक ही संपूर्ण रोगमुक्त झाला. त्याची तब्येत ठणठणीत झाली !

होमाची सांगता झाल्यावर दोन दिवसांनी दुसऱ्या गावचा एक माणूस घागरभर तूप घेऊन आला. माधवने ते खरेदी केले. माधव आता विचार करू लागला की या तुपाचा सदुपयोग कसा करावा. शेवटी तो पुरोहिताकडे येऊन त्याला म्हणाला -

"पंडितजी, अशी संधि पुन्हा कधी मिळेल? आपणच हे घृत-दान आज माझ्याकडून स्वीकारावे !"

श्रद्धा व भक्तिपूर्वक माधवने दिलेले दान पुरोहित नाकारू शकला नाही. त्याने ते दान स्वीकारले.

माधवने दिलेल्या या दानाची वार्ता सर्वत्र पसरली. जमीनदाराच्या कानावरही ही बातमी गेली. कुतूहलपूर्वक त्याने एक बैठक बोलवली. या बैठकीत पुरोहित व माधव ही उपस्थित होते.

जमीनदार आपल्या नातेवाइकाला उद्देशून म्हणाला - "नवग्रह शांति होमासाठी पुरोहिताने दहा घागरी तुपाची मागणी केली होती. परंतु माधवने नऊ घागरीच तूप दिलं. अर्थात् माझी काही तक्रार नाही. पण मला एक संशय येतोय ! पुरोहित आणि माधव यांनी संगतमन करून काही तरी केलं असावं असं मला वाटतंय. मला वाटतं या दोषामुळेच होमाचा कार्यक्रम म्हणावा तसा विधिवत् झाला नाही. माधव, तुझं काय म्हणणं आहे, ते मला ऐकू दे. मग मी काय निर्णय घ्यायचा तो घेईन."

माधव हात जोडून जमीनदाराला म्हणाला - "संकट-काळी परमेश्वरच आपला उद्धार करतो असा माझा विश्वास आहे. पुरोहिताने मान्य केल्यावरच मी दहावी घागर आपल्या नातेवाइकाला दिली. होमाची सांगता झाल्यावर एका गावकऱ्याने मला जी एक तुपाची घागर दिली ती मी पुरोहिताला दान म्हणून दिली. या घागरीतील तूप असेच येणारा-जाणारांना विकण्याची माझी इच्छा नव्हती. हे दान द्यायला पुरोहित मला सर्वात योग्य वाटले. यात माझी काही चूक ही असू शकेल. पण आपला अपमान करण्याचा माझा मुळिच उद्देश नव्हता."

हे निवेदन ऐकून बैठकीत उपस्थित असलेले सर्व लोक हंसू लागले. जमीनदाराने माधवची तोंड भरून प्रशंसा केली. आणि त्याला एक चांगला पुरस्कार दिला.





# योग्य जोडी

रघुवीर नावाचा एक माणूस विवाह जुळवून देण्याचा व्यवसाय करीत असे. तो मोठा गप्पिष्ट होता. खोट्याला खरं सिद्ध करण्याचे सामर्थ्य त्याच्या वाणीत होते. आपल्या बोलण्याने तो सर्वांना प्रभावित करी.

कमल पांडे त्याच गावात रहात असे. आपली मुलगी नीलांबरी हिचे शक्य तितक्या लवकर लग्न करून टाकण्याची त्याची इच्छा होती. शास्त्रे व पुराणे यात तो पारंगत होता. परंतु त्याची मुलगी नीलांबरी मात्र अशिक्षित राहिली, कारण तिला शिक्षणाची आवड नव्हती. शिवाय ती तिरळी होती. तरी पण आपल्या मुलीला सुंदर व सुशिक्षित वर मिळावा अशी कमल पांडेची इच्छा होती. ही जबाबदारी त्याने रघुवीरवर सोपवली.

गावात कमल पांडेचे बरेच नातेवाईक होते. त्यांच्यापैकी काहींनी आपल्या मुलाचे लग्न नीलांबरीशी व्हावे अशी इच्छा प्रदर्शित केली. पण कमल पांडे प्रत्येक मुलात काही ना काही दोष दाखवी.

एक दिवशी कमल पांडेची बायको लक्ष्मी त्याला म्हणाली - "मी जे म्हणते ते तुम्हाला आवडणार नाही. पण बोलल्याशिवाय मला रहावत ही नाही. आपल्या मुलीशी लग्न करायला कोण चांगला मुलगा तयार होईल? माझ्या वडिलांच्या मित्राचा मुलगा राघव आपल्या मुलीशी लग्न करायला तयार आहे. आपण हे स्थळ पसंत केलं तर आपण आपल्या जबाबदारीतून मुक्त होऊन जाऊ."

बायकोचं बोलणं कमल पांडेला रुचलं नाही. नाराज होऊन तो म्हणाला - "या राघव मध्ये अशी काय विशेष गोष्ट आहे की आपण आपली मुलगी त्याला द्यावी ? मुन्सफाच्या दोन एकर जमिनीत शेती करून तो कसा-बसा आपला उदर-निर्वाह करतो आहे. आपली जन्मकुंडली सुद्धा त्याला

**आकाश बारटक्के**



वाचता येत नाही. नुसता ताडासारखा उंच वाढलाय ! आपल्याला हे स्थळ मुळिच पसंत नाही.''

बिचारी लक्ष्मी नवऱ्याला विरोध करू शकली नाही. ती मुकाट्याने घरामागील परसात निघून गेली. दारामागून आई-वडिलांचे बोलणे नीलांबरी ऐकत होती. ती ही आईच्या मागोमाग गेली.

काही दिवसांनंतरची गोष्ट. सुप्रभाती रघुवीर कमल पांडेच्या घरी आला. स्वारी खुशीत होती. एकादं छान स्थळ सुचवायला आला आहे असं वाटलं. कमलने रघुवीरचे मोठ्या प्रेमाने स्वागत केले. रघुवीर ठाण मांडून बसला नि सांगू लागला - ''पांडेजी, नीलांबरीसाठी शिवपुरीत एक उत्तम स्थळ आहे. एकुलता एक मुलगा आहे. त्याचं नाव आहे शुक्र ! मोठं सार्थक नाव आहे पहा !''

''काय म्हणालात? नाव सार्थक आहे? पण हे तर सांगा की एकच का दोन्ही?'' कमल पांडेने विचारले.

रघुवीरने सांगितले - ''एकच का? दोन्ही ! दिवसा शुक्र तर रात्री तो कुब्जनाथ असतो !''

''मुलाचे शिक्षण नि संगीत-ज्ञानाबद्दल आपण काही सांगितलं नाही?'' पंडिजींनी प्रश्न केला.

रघुवीरने माहिती दिली - ''सांगतो ना. रामायण, महाभारताची पानं खूप उलटतो तो. तो कालिदास नि वाल्मीकीच्या वंशातला आहे. अन् मुलाचं संगीत-ज्ञान? त्याचं वर्णन निदान मला तरी करता येणार नाही. तो वीणा बासरी सारखी वाजवतो. बासरी वाजवायला लागला की मृदंगाचा आवाज निघतो.''

हंसत कमल पांडेने पुढील प्रश्न विचारला - ''मुलाची शरीर-यष्टि कशी आहे ? उंची, चाल-चलन, चपळता यांबाबत काही सांगा बरं !''

''काय सांगू? एक उदाहरण देऊन सांगतो. ऐका. या उदाहरणातून तुम्हाला सगळं काही समजेल. मुलाच्या घरी परसात एक शेवग्याचे झाड आहे. झाडाला शेंगा लगडल्या आहेत. या झाडावर तो सहज चढून जातो आणि माकडासारखा फांदीच्या टोकावर पोचून सगळ्या शेंगा तोडून आणतो.'' रघुवीरने विचित्र वर्णन करीत सांगितले.

''बरं, त्याचं घर कसं काय आहे? जमीन-जुमला?'' पुढचा प्रश्न.

रघुवीर म्हणाला - ''घराबाबत विचारता ? दिवसा घरात बसून सूर्य दिसतो, तर रात्री चन्द्र आणि नक्षत्रे ! त्याच्या घरच्या स्थितीबाबत मी काय सांगू ? असा सुरेख तरुण आपल्याला जावई म्हणून मिळणार हे आपलं भाग्यच समजा.''

हे सगळं ऐकून कमल पांडे काही वेळ काही बोललाच नाही. मग रघुवीरनेच विचारले - ''दोन-तीन दिवसात आपली बैठक ठरवू या? तुम्हीच सगळं पाहून घ्या एकदा !''

नाराज होत कमल पांडे म्हणाला - ''नको, काही जरूर नाही. मी आताच ठरवलंय की नीलांबरीचं लग्न राघवशी करायचं !''

'बरं आहे.' म्हणून रघुवीर निघून गेला.

लक्ष्मी मुकाट्याने नवऱ्याकडे पहात राहिली. त्याच्या निर्णयाबाबत ती जरी खुश झाली, तरी शुक्रला न पाहताच हे स्थळ त्याने का नाकारले हे काही तिच्या लक्षात येईना.

बायकोच्या मनातील शंका जाणून कमलने समजावून सांगितले - ''हे बघ लक्ष्मी, रघुवीर मोठा वाचाळ माणूस आहे.



आपल्या वाक्-चातुर्याने मला भुलवण्याचा त्याने प्रयत्न केला, पण तो फसला ! तो काय म्हणाला हे तुला नीट समजलं का?

वराचं नाव आहे शुक्र आणि ते मोठं सार्थक आहे ! याचा अर्थ असा की राक्षसांचा गुरू शुक्राचार्य यांच्याप्रमाणे मुलाला एकाच डोळ्याने दिसते. शुक्राचार्यांचा दुसरा दोष म्हणजे त्यांचे मद्यपान ! रघुवीर म्हणाला मुलगा दारू पितो. तो म्हणाला - मुलगा दिवसा शुक्र आणि रात्री कुरुनाथ आहे. याचा अर्थ असा की रात्री मुलगा घराबाहेरच पडत नाही.

शुक्राच्या शिक्षणाबाबत रघुवीर म्हणाला - तो रामायण व महाभारताची पाने उलटतो. ज्याला अक्षर-ज्ञान नाही तो पुस्तकाची पाने उलटण्याशिवाय काय करणार? रघुवीरने वाल्मीकी व कालिदास यांचा उल्लेख केला. हे दोघे प्रथम अशिक्षितच होते.

संगीत-ज्ञानाची गोष्ट निघाली तेव्हा रघुवीर म्हणाला की तो बासरीप्रमाणे वीणा वाजवतो आणि बासरीतून मृदुंगाचा आवाज काढतो. एका वाद्यातून दुसऱ्या वाद्याचा आवाज कसा काढता येईल? रघुवीरचा आशय असा की शुक्राला संगीताचे ज्ञान मुळीच नाही.

नंतर तो म्हणाला की घरात बसलं की दिवसा सूर्य आणि रात्री चंद्र व नक्षत्रे दिसतात. याचा अर्थ असा की घरावर छप्परच नाही. म्हणजे ती एकादी झोपडी असावी नि वरचं गवत वा पानं सडून गेलेली असावीत."

कमल पांडेने रघुवीरच्या बोलण्याचा आशय बायकोला सांगून मग तो तिला म्हणाला - "लक्ष्मी, शिवपुरीचा मुलगा नकोच आपल्याला. दुरून डोंगर साजरे ! आपल्या नीलांबरीला राघवच बरा. शिवाय तू म्हणतच होतीस की दोघांनी एकमेकांना पसंत केलय ! माझी या विवाहाला आता मान्यता आहे."

दरवाजामागे उभी असलेली नीलांबरी खुश झाली नि घरात निघून गेली.





# महाभारत

द्वारकेतले सर्व लोक महोत्सव पहाण्यासाठी अंतर्द्वीपात गेले. यामुळे अर्जुन व सुभद्रेचा विवाह निष्कंटकपणे साजरा झाला.

त्याच्या सेवेत मग्न असलेल्या सुभद्रेला अर्जुन म्हणाला, "ज्या विवाहात पिता किंवा भाऊ अग्निसाक्ष कन्यादान करतो, तोच खरा विवाह. परन्तु असा विवाह आपल्या नशिबी नाही. प्रियकर-प्रेयसी या नात्याने आपण रात्री गांधर्व-विवाह करू शकू. हा विवाह क्षत्रीय धर्मात योग्य ठरतो. अशा गांधर्व विवाहाला तुझी तर काही हरकत नाही ना?" सुभद्रा या प्रश्नाचे काहीच उत्तर देऊ शकली नाही. ती मनातल्या मनात आपला बन्धु श्रीकृष्ण याचे स्मरण करत राहिली. तिचे डोळे भरून आले होते.

आपली इच्छा पूर्ण होणार नाही, असे वाटून अर्जुनाने इन्द्राचे स्मरण केले. फलस्वरूप स्वतः इन्द्र आपल्या पत्नी शची व अरुन्धती, नारद वशिष्ठ व अन्य काही ऋषिगण व काही अप्सरा यांच्यासह अर्जुनाकडे येऊन पोचला.

त्याच मुहूर्तावर कृष्णही अक्रूर, सात्यकी आदींना घेऊन तेथे पोचला. त्यावेळी बलराम अंतर्द्वीपात गाढ झोपलेला होता. देवकीदेवी व रुक्मिणीही कृष्णाबरोबर आल्या होत्या.

इन्द्राने कृष्णाला खुशाली विचारली आणि उपचार म्हणून विचारले, "माझा पुत्र अर्जुन याचा विवाह तुझी बहीण सुभद्रा हिच्याशी करून द्यायला कबूल आहेस ना?"

मुक्तकंठाने यादव उत्तरले, "आम्हाला



याहून अधिक काय हवे?'' कृष्णानेही आपली संमति व्यक्त केली.

नंतर इन्द्राने अर्जुनाला मंगलस्नान करवले. दिव्य पुष्पमाळा आणि उत्तम वस्त्राभरणांनी सुसज्जित करून त्याला विवाहमंडपात आणले.

या अवधीत अरुन्धती, शची, देवकी, रुक्मिणी या स्त्रियांनीही रुक्मिणीला मंगलस्नान करवून, अमूल्य आभरणे, दागिने वगैरे घालून सजवले अन् मंडपात आणून अर्जुनाशेजारी बसवले. दिक्पालकांना साक्षी ठेवून, नारद, वशिष्ठ आदि ऋषींच्या उपस्थितीत विवाह सोहळा शास्त्रोक्त पद्धतीने साजरा झाला. यानंतर देवलोकीचे सर्वजण परत गेले. यादवही जेंव्हा अंतर्द्वीपाकडे जायला निघाले, तेंव्हा कृष्ण अर्जुनाला म्हणाला, ''अर्जुन, तू आणखी वीस दिवस इथेच रहा. नंतर सुभद्रेला घेऊन रथातून इन्द्रप्रस्थाकडे जा.'' नंतर सैन्य, सुग्रीव, मेघपुष्प व सलाहाका नावाचे घोडे जोडून त्यांच्यासाठी तयार असलेला रथही त्याने अर्जुनाला दाखवला.

कृष्णाने सुचवल्याप्रमाणे अर्जुन वीस दिवस द्वारकेत राहिला. नंतर तो सुभद्रेला म्हणाला, ''माझा चातुर्मास आता पूर्ण झालाय. ब्राह्मणांची समाराधना करायची आहे मला. तू आवश्यक ती व्यवस्था कर.''

समाराधनाही व्यवस्थित पार पडली. नंतर अर्जुनाने सुभद्रेला सांगून रथ तयार करवला. रथात सुभद्रा व तिच्या दासींना घेऊन अर्जुन वेगाने इन्द्रप्रस्थाकडे जायला निघाला.

नगरातील यादवांनी हे दृश्य पाहिले. अर्जुन सुभद्रेचे अपहरण करून घेऊन चालला आहे असे वाटून त्यांनी त्याला अडवले व ते अर्जुनावर बाणांचा वर्षाव करु लागले. अर्जुनाने त्यांना हरवले व स्वतःचा बचाव करून त्याने रथ रैवतक पर्वताच्या दुसऱ्या बाजूकडे नेला.

ही बातमी अन्तर्द्वीपात समजली व अर्जुन सुभद्रेला पळवून नेत असल्याची बातमी सर्वांना समजली. सेना पाठवून, अर्जुनाचा



पराभव करून सुभद्रेला परत आणायचा निर्णय यादवांनी घेतला. बलरामाने त्यांना थांबवले व तो कृष्णाला कटु शब्दात म्हणाला, ''पाहिलंस, अर्जुनाने केवढा द्रोह केला आपल्याशी? तू गप्प का आहेस? असल्या अपमानापेक्षा मृत्यु लाख बरा ! तू फक्त 'हो' म्हण, की मी आत्ताच्या आत्ता जाऊन संपूर्ण कौरववंशाचं निखंदन करून येतो.''

समजूत काढत कृष्ण बलरामाला म्हणाला, ''अर्जुनाने असा काय मोठा गुन्हा केलाय ? काय दुष्कृत्य केलंय त्यानं? आपल्या सुभद्रेला याहून उत्तम वर कुठे शोधला असता आपण? राक्षसविवाह धर्मसंमतच आहे ना? अन् सर्वजण मिळून तरी अर्जुनाला हरवण्याचं सामर्थ्य आहे का तुमच्यात? कदापि शक्य नाही ते. तुम्ही स्वतःच विचार करा न, कि त्याच्या कडून हार खाऊन अपमानित व्हायचं, की त्याच्याशी चांगलं नातं जोडायचं? मला हा दुसरा मार्गच प्रशस्त वाटतोय.''

यादवांना कृष्णाचा हा सल्ला योग्य वाटला. अर्जुन सुभद्रेसह इन्द्रप्रस्थाला पोचला. त्याने पोचल्याबरोबर मातेला व वडील बंधूंना नमस्कार केला. आणि सुभद्रेला बरोबर घेऊन तो द्रौपदीच्या अंतःपुरात गेला. त्याला पाहून द्रौपदी म्हणाली, ''सुभद्रे बरोबर द्वारकेतच राहून मजेत दिवस घालवू शकला असतात की ! नाहीतरी राजेलोकांचं नवनवीन स्त्रियांच्या प्रेमात अडकून रहाणं नैसर्गिकच आहे ना? अन् शिवाय, कितीही दृढ बंधनं असली, तरी जुनी झाल्यावर तुटतातच ना? प्रेम कधीही स्थायी नसतं.'' द्रौपदीच्या स्वरात द्वेष पुरेपूर भरलेला होता. अर्जुनाने तिला खूप समजावले.

अर्जुनाने इशारा करताच सुभद्रेने कुन्ती व द्रौपदी यांना नम्रतेने नमस्कार केला. द्रौपदीने तिला मिठीत घेऊन मोठ्या आनन्दाने आशिर्वाद दिला.

इन्द्रप्रस्थातील सर्व व्यवहार सुरळितपणे चालू होते. बलराम, अक्रूर, उद्धव, सात्यकी, कृतवर्मा, सांब, प्रद्युम्न आदि यादवांना कृष्ण आपल्याबरोबर घेऊन इन्द्रप्रस्थात आला. धर्मराजाला ही वार्ता कळल्याबरोबर आपल्या चारही बन्धूंना त्याने त्यांच्या स्वागतासाठी पाठवले. अशा प्रकारे यादवांचा नगरप्रवेश चांगलाच थाटात झाला.

यादवांनी आपल्याबरोबर हजारो घोडे, हत्ती, रथ, गायी व आभरणे आणली होती. पांडवांनी या सर्वांचा स्वीकार केला. त्यांनीही यादवांना अुचित भेटवस्तु दिल्या आणि काही दिवस आपले खास अतिथि म्हणून आपल्याकडे सुखात ठेवले. कृष्ण सोडून बाकी सर्वजण नंतर द्वारकेला परत गेले.

कालक्रमाने सुभद्रा-अर्जुन यांना पुत्रलाभ झाला. त्याचे नाव 'अभिमन्यु' असे ठेवले गेले. अभिमन्यु या शब्दाचा अर्थ आहे - निर्भय व क्रोधी. द्रौपदीलाही प्रतिविन्ध्य, सुतसोम, श्रुतसोम, शतानिक व श्रुतसेन असे पाच पुत्र झाले. अर्जुनाने या सर्वांना स्वतः धनुर्विद्येचे धडे दिले. परन्तु या सर्वात केवळ अभिमन्युच 'अर्जुनासारखा धनुर्धारी' म्हणवला गेला.

कृष्ण इन्द्रप्रस्थात असतानाच अतिशय गरमी पडली. अरण्ये जळू लागली अन् त्यावरून येणारी हवा खूपच गरम होऊन वाहू लागली. नद्या सुकून गेल्या, पश्चिमेकडून येणाऱ्या गरम झळांमुळे सारे प्राणिमात्र कळवळू लागले.

त्या ग्रीष्मकाळात अर्जुन एकदा कृष्णाला म्हणाला, ''अशा हवेत आपण यमुनाकिनारीच्या अरण्यात घरे बनवून रहावे हे बरे. तिथेच राहून आपण शिकारही करत जाऊ.''



कृष्णाला अर्जुनाचा हा विचार आवडला. काही मित्र व बाकी परिवार घेऊन ते तेथे जाऊन सुखाने राहू लागले. एके दिवशी ते सर्वजण खांडववनाजवळच्या चन्दनाच्या झाडाखाली बसले. कुंजात बसून त्यांनी भोजन अुरकले. कृष्णार्जुनांबरोबर द्रौपदी व सुभद्राही तेथे होत्या. सर्वांनी अंगाला चंदनाचा लेप लावला होता व गळ्यात पुष्पमाला घातल्या होत्या. सर्वजण गप्पा मारण्यात मग्न होते.



त्याच वेळी एक वृद्ध ब्राह्मण त्यांच्या जवळ आला. तो खूपच उंच असून त्याचे शरीर तेजस्वी दिसत होते. त्याने सुती कपडे धारण केले होते. त्याच्या डोक्यावर जटा लटकत होत्या. मिशांचा रंग गोरोचना सारखा होता. तो कृष्णार्जुनांना म्हणाला, ''महाराज, मी भोजनप्रिय आहे. मला भोजन दिलंत तर जेवेन मी.''

त्याचे बोलणे ऐकून ते दोघे म्हणाले, ''बोल ब्राह्मणा ! कसलं भोजन हवं तुला?''

''मी अग्निहोत्र आहे. मला दुसरं कसलं भोजन नको. हे खांडववनच खायचा माझा विचार आहे. मी कित्येक वेळा तसा प्रयत्न केलाही. पण दरवेळी इन्द्राने मुसळधार पाऊस पाडून माझे प्रयत्न विफल केले. नेहमीच विघ्न आणले त्याने. तक्षकासारख्या सर्पांची मदत घेऊन तो या वनाचं रक्षण करतो. आपल्यासारख्या महान लोकांची मदत मिळाली, तरच मी हे कार्य सफलतेनं पार पाडू शकेन. आपण मला त्यासाठी मदत करावी.''

अग्निहोत्रच्या खांडव-वन दहन करण्या-मागे एक प्रबळ कारण होते.

पूर्वी श्वेतकी नावाचा एक राजा होता. तो एकापाठोपाठ एक यज्ञ करत राहिला. एकदा त्याने एक दीर्घ याग केला. त्यामुळे त्यासाठी श्वेतकीला मदत करणाऱ्या ब्राह्मणांचे डोळे धुराने खराब झाले. श्वेतकीने मग त्यांच्या जागी दुसरे ब्राह्मण बोलावून यज्ञ पूर्ण केला.

परन्तु श्वेतकीने पुन्हा जेव्हा यज्ञ करण्याची इच्छा दर्शवली, तेंव्हा मात्र सर्व ब्राह्मणांनी त्यासाठी येण्यास नकार दिला. राजा जेव्हा गयावया करू लागला, तेंव्हा त्यांनी स्पष्टच सांगितले की, ''केवळ शिवच तुझ्या यज्ञाचा ऋत्विज बनू शकेल. त्याच्या कडूनच यज्ञ सिद्ध होऊ शकेल.''

श्वेतकीने लगेच कैलासावर जाऊन तपस्या केली. शिव त्याच्यासमोर प्रत्यक्ष होऊन म्हणाला, ''केवळ ब्राह्मणच ऋत्विज बनू शकतात. तरीही तू सतत बारा वर्षपर्यंत अग्नीची प्रार्थना केलीस, तरच हे शक्य होईल.''

शिवाच्या म्हणण्यानुसार श्वेतकीने अग्नीची प्रार्थना केली. अन् तो त्यावेळी अग्निला तुपाची आहुती देत राहिला. नंतर तो परत शिवाकडे गेला.

शिव म्हणाला, ''मी तर तुला प्रथमच सांगितले होते की, केवळ ब्राह्मणच ऋत्विज बनू शकतो. मी स्वतः त्यासाठी योग्य नाहीय. पण माझ्या वतीने दुर्वास ऋत्विज बनून येईल. यज्ञासाठी योग्य ती सोय करून ठेव.''

श्वेतकीने सारी तयारी करून ठेवली. शिवाने दुर्वासाला पाठवून दिले. त्याने यज्ञ केला व आपली दक्षिणा घेऊन तो निघून गेला.

नंतर अशी हकिकत घडली: अग्निहोत्रचे आहुतीच्या तुपाने पोट तुडुंब भरलेले होते. त्याला अजीर्ण झाले. त्याचे तेज लोपले. शेवटी ब्रह्मदेवाकडे जाऊन त्याने उपाय विचारला.

त्याच्याकडे पाहून ब्रह्मदेवाला हसू आले. ते म्हणाले, ''अमर्याद तूप प्यायल्यामुळे तुला अजीर्ण झालंय. खांडववनाचं दहन केलंस तर तू बरा होऊ शकशील, तुझं तेज परत येईल. खांडववनात अनेक प्रकारचे प्राणी, औषधी वनस्पती, महावृक्ष व दिव्य औषधे आहेत. ते सर्व खाल्लंस की तुझा रोग दूर होईल.''

ब्रह्मदेवाने सांगितलेला मार्ग अनुसरून अग्नीने खांडववनात प्रवेश केला व दहनकार्य सुरू केले. परन्तु ताबडतोब मुसळधार पाऊस सुरू झाला. वनातले हत्ती, सर्प आदि सर्व प्राणी तोंडात पाणी भरून आणून अग्निहोत्रावर मारू लागले. त्याचा प्रयत्न विफल झाला.

अग्नीने सात वेळा खांडववन जाळायचा प्रयत्न केला. पण ते सातही प्रयत्न विफल झाले. अग्नि पुन्हा ब्रह्माकडे गेला व त्याने आपली असमर्थता प्रकट केली. अजूनही आपण अजीर्णाने पीडित असल्याबद्दलची तक्रार त्याने व्यक्त केली.



## बालकांविषयी बातम्या

### पाठ्यपुस्तकात स्थान

महापुरुषांविषयीच्या वैशिष्ट्यांना पाठ्यपुस्तकात स्थान दिले जाते, ही तर सामान्य गोष्ट झाली. हे महापुरुष बालक-बालिकांना मार्गदर्शन करतात व त्यांनी सुचवलेल्या मार्गाने जायला प्रोत्साहन देतात. मल्याळी मातृभाषा असलेला चि. राजेश हा अकरा वर्षांचा बालक मद्रासच्या एका शाळेत शिकत आहे. सध्या तो सहावीत आहे. या बालकाच्या वैशिष्ट्याची माहिती त्याच्या फोटोसह पाठ्पुस्तकात सामिल केली गेली आहे. गेल्या वर्षी कॅनडातील लीम ब्रिड्स येथे कराटे चैम्पियन शिपच्या स्पर्धा झाल्या. पंधरा वर्षाखालील मुलांसाठी आयोजित असलेल्या स्पर्धेत चि. राजेशला स्वर्णपदक मिळाले. १९९३ मधे जमशेटपुरला झालेल्या नॅशनल चैम्पियनशिप व १९९५ मधे जबलपुरला झालेल्या स्पर्धांमधेही त्याने सुवर्णपदके मिळवली. शाळेत दाखल होण्यापूर्वीच तो कराटे शिकला. आठ वर्षांचा असतानाच त्याने ब्लॅक बेल्ट मिळवला. शाळेत दाखल झाल्यावर ही तो रोज चार तास कराटेचा अभ्यास करत असे. राजेश कॅनडाहून परत आला, तेंव्हा राज्याच्या मुख्यमंत्र्यांनी स्वत: त्याचे स्वागत केले व विचारले, "बोल, तुला काय हवे?" त्याने कराटेच्या अभ्यासासाठी थोड्याशा जागेची मागणी केली. राजेशला जागा देण्याचे मुख्य मन्त्र्यांनी मान्य केले.



### चित्रकार व अभिनेता

केरळचा के. डेव्हिड हा बारा वर्षांचा विद्यार्थी आहे. त्याचे नाव 'गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्ड्स्' मधे दाखल व्हावे, अशी शिफारस करण्यात आलेली आहे. आतापर्यन्त त्याने ३५,००० चित्रे रेखाटून एक अुच्चांक स्थापित केला आहे.



लहानपणी तो नुसत्या पेन्सिलीने चित्रे काढत असे. पेन्सिलची जागा पेनने व नंतर ब्रशने घेतली. चित्रे काढण्यासाठी तो जलरंग व तैलरंगांचा अुपयोग करतो. कॉम्प्यूटरच्या साह्यानेही त्याने आपल्या कित्येक चित्रांना रूप दिले आहे. चित्रपटात अभिनय करण्यासाठी लहान मुलांची गरज असल्याची जाहिरात एकदा त्याने पाहिली व लगेच त्यासाठी अर्ज केला. त्याची निवडही झाली. अभिनेता डेव्हिड याचा एक मल्याळी चित्रपट सध्या काही चित्रपटगृहातून चालू आहे.

### बहुमुखी प्रतिभावान

'सेंटर स्टेज' ही बंगलोरची एक संस्था आहे. या संस्थेने मद्रासच्या एन्. आरावमुदन नावाच्या विद्यार्थ्याच्या बहुमुखी प्रतिभेचे खूप कौतुक केले व 'या वर्षाचा बालक' म्हणून त्याचा गौरव केला. हा मुलगा सध्या अकरावीत शिकत असून भविष्यात त्याला खूप शिकता यावे म्हणून त्याला ही संस्था एक लाख रुपयांचा पुरस्कार देत आहे. शालेय शिक्षणाबरोबरच लेखन, कोडी, चित्रकला व मृदुंगवादन आदि क्षेत्रातही आरावमुदन पहिल्या क्रमांकावर आहे. त्याच्याच शाळेत शिकणारा कौशिक जयराजन हाही 'या वर्षाचा वर्धमान विद्यार्थी' म्हणून घोषित झाला आहे व दहा हजार रुपये बक्षिसाचा मानकरी ठरला आहे.



**आपल्या देशाची वृक्षसंपदा**

# अग्निपुष्प

अग्निवृक्ष आपल्या देशात सर्वत्र दिसत असले तरी हे बिहार, बंगाल व समुद्रकिनारीच्या वनप्रदेशात जास्त करून आढळतात. वृक्षशास्त्रात याला 'एरिजिना इंडिका' असे म्हणतात. हा लाल फुलांचा वृक्ष आहे व तो भारतात आढळतो, असे हे शब्द सूचित करतात. या लांबट लाल फुलांच्या पाकळ्या फारशा अुघडत नाहीत. याची पाने काहीशी मोठी व त्रिदल असतात. काही प्रान्तात ही त्रिदल पाने ब्रह्मा, विष्णु व महेश यांचे प्रतीक मानली जातात. आपल्या देशातील काही ख्रिश्चन माणसे यांना पिता, माता व परिशुद्ध आत्मा-म्हणजेच येशु-असे मानतात. खालच्या बाजूच्या दोन पानांचे देठ एकमेकांसमोर असतात.

भरपूर पाने असलेले हे झाड पंधरा मीटरपर्यन्त अुंच वाढते. राखीव बगीचे व रस्त्यांच्या दुतर्फा शोभेसाठी व छायेसाठी ही झाडे मुद्दाम लावली जातात. यांची मुळे जमिनीला सुपीक बनवतात, म्हणूनच चहाच्या मळ्यात अधून मधून ही झाडे लावतात. याच्या फांद्यांना व डहाळ्यांना लहान लहान काटे असतात. पण झाडे जसजशी पक्की होत जातात तसतसे खोडांवरचे व जाड फांद्यांवरचे काटे नाहीसे होतात.

फेब्रुवारी, मार्च मधे पाने झडू लागून फुले येअू लागतात. फुलांच्या मोसमात संपूर्ण झाड लाल फुलांनी भरून जाअून विस्तवासारखे दिसते, म्हणूनच या झाडांना 'अग्निवृक्ष' असे म्हणतात.

हिन्दीत या वृक्षाला 'पांग्री', मराठीत 'पांगारा' किंवा 'अग्निवृक्ष', बंगालीत 'रक्तमंदार', मल्याळीत 'मंदार', तमिळमधे 'मुळ्ळुमुरंगु' व तेलगूत 'बाडिता' असे म्हणतात.



आपल्या देशातील ऋषि-मुनि : १०

## कपिल

सूर्यवंशी राजा सगर याने अश्वमेध यज्ञ करण्याचा निश्चय केला. सर्व सुलक्षणांनी युक्त असा एक घोडा सजविण्यात आला व त्याला दिग्विजय-यात्रेसाठी सोडण्यात आले. घोड्यामागे सगराचे साठ हजार राजकुमार ही गेले.

घोड्याने निरनिराळ्या देशात संचार केला. कोठे ही कोणी त्याला अडवले नाही. पण एके दिवशी अकस्मात् घोडा दिसेनासा झाला. राजपुत्रांनी घोड्याची खूप शोधाशोध केली, पण तो कोठे ही दिसला नाही. आता घोड्याला शोधून काढणे आपल्याला जमणार नाही अशी जेव्हा त्यांची खात्री झाली तेव्हा त्यांनी आपल्या पित्याला ही वार्ता कळवली. सगर महाराज म्हणाले - "यज्ञाचा घोडा जर पृथ्वी-तलावर सापडत नसेल तर पाताळ-लोकात जाऊन त्याचा शोध घ्या. जमीन उकरा नि पाताळात जा."

सगर-पुत्रांनी जमीन खोदायला सुरुवात केली. खूप खूप खोदल्यावर शेवटी ते पाताळ-लोकात पोचले. तिथे त्यांना एक तेजस्वी मुनि तपश्चर्येत मग्न असलेले दिसले. त्यांच्या जवळच यज्ञाचा घोडा बांधलेला दिसला. हे दृश्य पाहून राजकुमारांचा राग अनावर झाला व त्यांनी त्या मुनींना शिव्यागाळ करायला सुरुवात केली. त्यांना पकडण्याचा ते प्रयत्न करू लागले. तपोभंग होऊन मुनींनी आपले डोळे उघडले. त्यांच्या तेजस्वी दृष्टीने सर्व राजकुमार जळून भस्म होऊन गेले ! इंद्राने घोड्याचे अपहरण केले व त्याला येथे आणून बांधले हे राजकुमारांना माहीत नव्हते.

सगर महाराजांचा नातू भगीरथ याने अत्यंत कठोर तपश्चर्या केली आणि स्वर्गातील गंगेला पृथ्वीवर घेऊन आला. तो या गंगेला पाताळात ही घेऊन गेला. सगर-पुत्रांच्या राखेवरून जेव्हा गंगा वाहू लागली तेव्हा त्यांचा उद्धार झाला. अशा रीतीने भगीरथाने आपल्या पूर्वजांना वाचविले.

आपल्या दिव्य दृष्टीने सगर-पुत्रांना भस्मसात करणारे हे मुनि म्हणजे कपिल ! ते विष्णूचे परम भक्त होते, देवदूतांचे पुत्र होते. पित्याच्या मृत्यूनंतर त्यांनी आपल्या मातेला ज्ञानोपदेश दिला व तिला मुक्त केले. आपल्या षड्-दर्शनांपैकी सांख्य दर्शनाचे प्रवर्तक होते कपिल मुनि !



## तुम्हाला माहीत आहे काय?

१. नाझींचे संस्थापक कोण?
२. हिन्दु पुराणांनुसार प्रथम मृत झालेला मानव कोण?
३. पितळ हा धातु कसा तयार करतात?
४. 'दन्त मन्दिर' कोठे आहे?
५. तेरा बेटांवर मिळून तयार झालेले शहर कोणते?
६. कोळ्याला किती डोळे असतात?
७. बांगला देशातील सर्वात अधिक प्रमाणात असणारे पीक कोणते?
८. ऑस्ट्रेलियातील बेट असणारे राज्य कोणते?
९. 'दि कर्नल' म्हणून ओळखले जाणारे भारतीय क्रिकेट खेळाडू कोण?
१०. 'अंकारा' पूर्वी तुर्कस्तानची राजधानी कोणती होती?
११. आपल्या राष्ट्रीय झेंड्यात असलेल्या अशोकचक्राला किती आरे आहेत?
१२. ग्रीस करन्सीचे नाव काय?
१३. फत्तेपुरशिक्री कोणी वसवली?
१४. सुएझ कालवा केंव्हा सुरू करण्यात आला?
१५. भारताकडून एक दिवसीय सामन्यात खेळून 'सेंचरी' करणारा पहिला क्रिकेटखेळाडू कोण?
१६. टेलिव्हिजनचा संशोधक कोण?
१७. 'तात्कालिक प्रधानमन्त्री' म्हणून दोन वेळा जबाबदारी संभाळणारे प्रधानमन्त्री कोण? केंव्हा केंव्हा त्यांनी हे काम केले?
१८. 'सुमो' नावाची कुस्ती कोणत्या देशात खेळली जाते?
१९. 'हॉर्स पॉवर' या शब्दाचा वापर प्रथम कोणी केला?
२०. सर्वात मोठे बेट कोणते?

### उत्तर

१. अॅडॉल्फ हिटलर.
२. यम.
३. तांबे व जस्त या दोन धातूंच्या मिश्रणापासून.
४. श्रीलंकेतील कँडीमधील मंदिरात बुद्ध-दंत सुरक्षित ठेवलेला आहे.
५. स्वीडनची राजधानी स्टॉकहोम.
६. आठ.
७. ताग (ज्यूट).
८. टास्मानिया.
९. दिलीप वेंगसरकर व सी.के. नायडू.
१०. इस्तंबूल.
११. चोवीस.
१२. राक्मा.
१३. अकबर बादशहा.
१४. १८६९ मधे.
१५. कपिलदेव (१९८३).
१६. जॉन लॉगी बाईड.
१७. गुलझारीलाल नंदा (१९६४, १९६६).
१८. जपान.
१९. जेम्स वॉट.
२०. ग्रीनलंड.



# रसिकतेचे मूल्यमापन

रामशर्मा नावाचा एक सहृदय कवि होता. तो आपल्या कविता लोकांना ऐकवी आणि ते संतोषाने जे काही देत ते स्वीकारी.

एकदा रामशर्माला समजलं की शहरात सत्यवादी नावाचा एक सधन काव्य-रसिक व्यापारी आहे. रामशर्मा त्याला भेटण्यासाठी निघाला. चालता चालता तो थकून विश्रांतीसाठी एका झाडाखाली बसला.

थोड्याच वेळात एक गरीब माणूस तेथे आला. शेतात काम करून थकून आराम करण्यासाठी तो तिथं आला होता. रामशर्माला पाहून तो म्हणाला - "महाराज, आपली मुद्रा मोठी तेजस्वी दिसत आहे. आपण कोणी कवि तर नाही?"

रामशर्माने होकारार्थी मान हलवली. गरीब माणूस लगेच म्हणाला - "मी काही शिकला-सवरलेला माणूस नाही. पण माझ्या जीवनाशी संबंधित काही कविता ऐकवल्यात तर आनंद वाटेल मला."

गरीबाने रामशर्माला आपली कहाणी ऐकवली. त्याचे आई बाप म्हातारे होते. त्याची बायको मोठी गुणवती होती. त्यांना दोन वर्षांचा एक मुलगा होता. शेतात काम करून त्याला रोज दहा रुपये मजुरी मिळे. त्यातून तो आपल्या सर्व गरजा भागवी. बायको फुरसतीच्या वेळात काही खाद्य-पदार्थ बनवून विकत असे. सर्व परिवार सुखाने रहात असे. या गरीब माणसाला कविता ऐकायचा छंद होता. तो काव्य-रसिक होता.

त्याची गोष्ट ऐकून रामशर्माला स्फूर्ती येऊन त्याने त्या गरीबाच्या जीवनावर दहा कविता रचल्या. त्या ऐकून गरीबाला खूप आनंद झाला. त्याचे डोळे आनंदाश्रूंनी भरून आले. तो रामशर्माला म्हणाला - "माझ्यावर कविता करून त्या निःसंकोचपणे आपण ऐकवल्यात! मला खूप संतोष वाटला. आता मी जी फूल ना फुलाची पाकळी म्हणून हे दहा रुपये देत आहे; ते स्वीकारायला संकोच करू नका. आपण जर ते घेतले नाहीत तर मला आपला अपमान झाल्यासारखे वाटेल."

रामशर्माने दहा रुपये घेतले. गरीब माणसाला पुन्हा कामावर जायचे होते. रामशर्माचा निरोप घेऊन तो निघून गेला. आता रामशर्मा शहराकडे जायला निघाला. वाटेत त्याला राजाचा एक नातेवाईक भेटला. तो आपल्या गाडीत बसून चालला होता. हा एक कवि आहे हे जेव्हा त्याला समजले तेव्हा तो फार खुश झाला. त्याने रामशर्माला गाडीत बसवून घेतले.

या गृहस्थांना ही कविता ऐकण्याचा षौक होता. त्यांनी विनंती केली - 'कविराज, माझ्यावर एकादी कविता रचून मला ऐकवा ना! रामशर्माने त्याच्याकडून त्याची गोष्ट ऐकून घेतली.

त्याच नाव होतं श्रवण. राजाचे त्याच्यावर फार प्रेम होते. आपल्या राज्यात कोठे कोठे निसर्गरम्य प्रदेश आहेत हे पाहण्याचे काम राजाने त्याच्याकडे सोपविले होते. या कामासाठी त्याला दरमहा पन्नास हजार रुपये मिळत. नेहमीच कामासाठी बाहेर जावे लागत असल्यामुळे त्याला आपल्या प्रिय पत्नीचा सहवास क्वचितच घडे.

त्याची आत्मकथा ऐकताच रामशर्माची काव्य-प्रतिभा जागृत झाली. श्रवणाच्या पत्नीच्या विरह-वेदनेवर त्याने एक सुरेख कविता रचली. कविता ऐकताना श्रवणला



सविता वाघ



भास झाला की जणू आपण आपल्या घरीच आहेत.

थोड्याच वेळात गाडी शहरात पोचली. रामशर्माच्या हाती ५०० रुपये देत श्रवण म्हणाला - ''कविराज, ही आपल्या कवितेची किंमत नाही. संतोषाने मी आपली अल्प सेवा करीत आहे.''

रामशर्माने मिळालेल्या धनाचा स्वीकार केला, आणि पुढे तो सत्यवादीच्या घरी पोचला. सत्यवादीचा भव्य महाल पाहून रामशर्माचे डोळे दिपून गेले. तो घरात प्रवेश करीत असताना सत्यवादीची पत्नी रुक्मिणी म्हणाली - ''आपण मोठे तेजस्वी दिसताहात. आपण कोणी प्रसिद्ध कवि तर नाहीत ?''

रामशर्मा हसून 'होय' म्हणाला. रुक्मिणीने आपल्या नवऱ्याबद्दल बरेच काही सांगितले - ते एक मोठे व्यापारी आहेत. घरातून सकाळी बाहेर पडतात, ते रात्रीच घरी परत येतात. ते मोठे भाग्यशाली आहेत. जो व्यापार हाती घेतात, त्यात यशस्वी होतात. रोज कमीत कमी दहा हजार रुपये मिळवतात. कधी कधी पन्नास हजार रुपये सुद्धा मिळवतात.

सत्यवादी मोठे काव्य-रसिक आहेत. कविता ऐकायची संधि मिळाली तर दुसरे कोणते ही महत्त्वाचे काम ते सोडून देतील. रुक्मिणीने आपल्या नोकरांना नवऱ्याला शोधण्यासाठी शहरात पाठविले.

ते घर नि तेथील वातावरण पाहून रामशर्मा रुक्मिणीला म्हणाला - ''मी तर नंतर ही येऊं शकेन. नोकरांना पाठविण्याची गरज नाही.''

रुक्मिणी म्हणाली - ''आपणासारखे महाकवि घरी आले म्हणजेच ते घरात असणार ! आपण आलात, आणि आमचं घर पवित्र झालं. आजचा दिवस सुवर्णाक्षरांनी लिहिण्यासारखा आहे !''

थोड्या वेळाने सत्यवादी घरी पोचला. दुपारची उन्हाची वेळ होती. रुक्मिणीने दोघांना थंडगार सरबत दिले.

सत्यवादी रामशर्माला म्हणाला - ''एकादी नवी कविता मला ऐकवा. अथवा आपली इच्छा असेल तर जुन्या कवितांतील काही निवडक कवितांचे वाचन करा. आज कविता ऐकण्याची नामी संधी मिळालीय !''

रामशर्माने आपल्या काव्यातील एकेक ओळ आपल्या मधुर स्वरात ऐकवायला सुरुवात केली. सत्यवादी तन्मय होऊन काव्याचा आस्वाद घेऊं लागला. घरातील सर्व लोक बैठकीत येऊन बसले. नोकर चाकर सुद्धा आले. मोठ्या श्रद्धेने सर्वांनी कविता ऐकल्या. रुक्मिणीने आपल्या काही नोकरांना भोजनाची तयारी करायला सांगितली.

अंधार पडेपर्यंत काव्य-गायन चालू राहिले. कार्यक्रम समाप्त झाल्यावर सर्वजण जेवायला बसले. भोजन चालू असताना रामशर्मा व सत्यवादी यांच्यात काव्यासंबंधी चर्चा होत राहिली. सत्यवादीने काव्याबाबत आपल्या काही शंका विचारल्या व रामशर्माने मोठ्या चतुराईने त्यांचे निराकरण केले.

सत्यवादीने रामशर्माला एक हजार एक रुपये दिले आणि म्हणाला - ''कविराज, आपल्या काव्याचे मूल्यमापन करणे माझ्या शक्तीबाहेर आहे !''

रुक्मिणी हंसत म्हणाली - ''हा पुरस्कार आपल्या काव्य-गायनासाठी नव्हे. त्यामुळेच आज माझे पतिराज बराच वेळ घरात राहिले म्हणून !''

रामशर्मा रात्री सत्यवादीच्या महालातच राहिला. झोपायला जाताना सत्यवादी म्हणाला - ''आपण आता विश्रांति घ्या. उद्या सकाळी सावकाश घरी जा. आपण सकाळी



उठाल, तेव्हा मी बहुतेक बाहेर पडलेलो असेन !''

दुसऱ्या दिवशी रामशर्मा जागा होण्यापूर्वीच सत्यवादी आपल्या कामासाठी बाहेर पडला. सर्वांचा निरोप घेऊन रामशर्मा आपल्या गावी परत आला. घडलेली सर्व हकिकत त्याने आपल्या बायकोला सांगितली. सत्यवादीची त्याने तोंड भर स्तुति केली.

तेव्हा रामशर्माची बायको म्हणाली - ''मला वाटतं सत्यवादीने आपल्याला जी भली मोठी रक्कम दिली त्यामुळे आपल्याला मोठा आनंद झालेला आहे. श्रवणने प्राप्तीच्या एक चतुर्थांशिहून अधिक रक्कम आपणास दिली. बिचाऱ्या गरीब शेतकऱ्याने आपली एक दिवसाची संपूर्ण कमाई आपणास दिली. खरं म्हणजे त्या गरीबाचं आपण सर्वात अधिक कौतुक केलं पाहिजे.''

जोरजोरात हसत रामशर्मा म्हणाला - ''तू पण अगदी मूर्खच ! अग, पूर्वजांनी जी संपत्ति आपल्याला दिली आहे, त्यातून आपल्या चार पिढ्या खात-पीत राहतील. मला पैशांचा मोह मुळिच नाही. माणसाची किंमत त्याने दिलेल्या धनावरून करायची मला सवय नाही. शेतकऱ्याने आपल्या फुरसतीच्या वेळात माझी कविता ऐकली. श्रवण गाडीत बसून चालला होता, आपल्या प्रवासाच्या वेळात त्याने माझ्या कविता ऐकल्या. सत्यवादी एकच असा माणूस होता, जो आपला व्यापार व त्यात मिळणाऱ्या फायद्याची गोष्ट विसरून गेला, आणि माझ्या कविता ऐकल्या, काव्याबाबत चर्चा केली. आपला अमूल्य वेळ माझ्यासाठी खर्च केला. कारण तेवढ्या वेळात त्याने काही हजार रुपये कमवले असते. काही फायदा होण्याऐवजी त्याचा तोटाच झाला. मी त्या वेळाचे मूल्यमापन करतोय, त्याने दिलेल्या रकमेचं नाही. या दृष्टिकोणातून पाहिलंस तर सत्यवादी सारखा दुसरा कोणी नाही. समजलं?''

कवि-हृदयच काव्य-रसिकाला जाणते हे आता रामशर्माच्या बायकोच्या लक्षात आले.





# गरीब नवरदेव

दूर देशात एका लहान राज्याचा एक राजा होता. फार काही धनवान नव्हता तो. त्याला गुणवती नावाची एक सुंदर कन्या होती. कन्येचा स्वतःच विवाह करून द्यावा, इतकी आर्थिक सुस्थिरताही त्याच्याजवळ नव्हती; म्हणून त्याने तिच्या स्वयंवराची घोषणा केली. स्वयंवराची अट अशी होती की, स्वयंवरात भाग घेणारांनी आपल्या शक्ती सामर्थ्याप्रमाणे भेटी आणाव्या. त्यापैकी गुणवतीला जो आवडेल, त्याच्याशी ती विवाह करील.

गुणवतीच्या स्वयंवरासाठी आलेल्यांच्यात एक भद्र नावाचा राजपुत्र होता. त्याने आपल्याबरोबर खूपशा मौल्यवान भेटी आणल्या होत्या. त्याच्या पित्याचे नाव होते दुर्जय. दुर्जय अत्यन्त क्रूर व अत्याचारी प्रवृत्तीचा होता. आपल्या दुष्टपणामुळे त्याने कित्येक राजांना अस्वस्थ करून ठेवले होते. त्याच्या अत्याचारांनी पिडलेल्या दहा राजांनी एक बैठक बोलावली व सर्वांनी मिळून त्याच्यावर आक्रमण करायचे ठरवले. बैठक संपवून परत जात असताना दुर्जयने त्या दहांपैकी पाचांना पकडून कैदेत ठेवले. त्यांच्याकडून त्याने खूपसे धन व सोने वसूल केले व नंतरच त्यांना मुक्त केले.

गुणवतीच्या स्वयंवरासाठी भद्र ज्यावेळी राजद्वारी पोचला, त्याच वेळी वीर नावाचा आणखीही एक राजपुत्र तेथे आला. तो एका म्हाताऱ्या घोड्यावर बसलेला होता अन् त्याच्या कवचालाही भोके पडलेली होती. दिसायलाच तो खूप गरीब दिसत होता. ज्या पाच राजांना भद्रने कैद केले होते, त्यातलाच एक या वीरचा बापही होता. त्यामुळेच वीरची परिस्थिती अशी हीन झालेली होती.

वीर व त्याचा म्हातारा घोडा पाहून अवहेलनाभरल्या दृष्टीने त्याच्याकडे पहात भद्र व्यंगाने हसला आणि पुढे गेला. त्याला तसाच

चान्दोबात पंचवीस वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट



कमी बहादुर नव्हता. द्वन्दयुद्धात भद्रने एकूण जितक्या स्पर्धकांना हरवले, त्यापेक्षा अधिक स्पर्धकांना वीरने हरवले. परन्तु प्रत्यक्षात भद्र व वीर यांच्यातच द्वन्द्वयुद्ध झाले, तेंव्हा वीर हरला. अर्थात् असे घडले त्यात आश्चर्य काहीच नव्हते. भद्रजवळ अनेक घोडे होते. निरनिराळ्या स्पर्धांशी लढताना दरवेळी त्याने नवा घोडा वापरला. पण वीरचा एकुलता एक घोडा सर्वच स्पर्धेत भाग घेत राहिला अन् थकून गेला होता. शिवाय तो म्हाताराही होता. यामुळेच वीर हरला.

सूर्यास्त झाल्याबरोबर सर्व पाहुणे दरबारात येऊन बसले. एकेक करून सर्वांनी बरोबर आणलेल्या भेटी गुणवतीला दिल्या. भद्रने आणलेल्या भेटींपुढे तर बाकीच्यांच्या भेटींची काहीच मातब्बरी नव्हती. वीर सर्वात शेवटी आला. आपली तलवार काढून ती भेट म्हणून गुणवतीसमोर ठेवत तो म्हणाला, "मी गरीब आहे. माझ्यापाशी असलेली एकच एक बहुमूल्य वस्तु म्हणजे हीच."

पुढे जाऊ देऊन वीर त्याला ऐकू जाईल अशा आवाजात म्हणाला, "राजांच्या पुढे पुढे नोकरच चालत असतात नेहमी." त्याच्या या बोलण्याने भद्र खूप खवळला. पण त्याने विचार केला की, वेळ आली की त्याला चांगला धडा शिकवता येईल.

स्वयंवराचा पहिला भाग होता राजकमारांच्या बलप्रदर्शनाचा. यासाठी एक आख डा तयार करण्यात आला होता. तो कार् क्रम पहाण्यासाठी गुणवती आणि राज रेवारातील बरेच सदस्य आले होते. जमः ल्या राजकुमारांत भद्र नक्षत्रांमधे चन्द्र दिसावा तसा अुठून दिसत होता. सगळ्या स्पर्धात तो जिंकत राहिला. पण वीरही काही

व्यंग्यभरल्या स्वरात भद्र भरल्या दरबारात म्हणाला, "या तलवारीचं असं काय महत्त्व आहे? तिनं तुला हरू दिलं नाही, असं तर नाही ना घडलं?"

वीर अुत्तरला, "आपल्या दोघांच्यात खड्गयुद्ध झालं असतं ना, तर कळली असती माझ्या तलवारीची महानता !"

दुसऱ्या दिवशी सर्व पाहुणे राजकुमार आपापल्या घोड्यांवरून जंगलात शिकारीला गेले. होय, वीरसुद्धा त्या सर्वांबरोबर गेला; पण आपल्या घोड्याला पळायला लावून त्याला त्रास द्यायची वीरची इच्छा नव्हती. भद्र मात्र सर्वांच्या पुढे जात राहिला होता. या सर्वांबरोबर खुद्द गुणवती अन् अन्य राजकुमारही होते. थोडे पुढे गेल्यावर गुणवतीचा अुत्साह कमी झाला आणि ती परत जायला निघाली. इतक्यात तिला वीर दिसला.

गुणवतीने वीरला विचारले, "तुम्हाला शिकारीची आवड नाही का?"

वीर म्हणाला, "आवड तर आहे, पण माझा घोडा आहे म्हातारा, आमच्या वंशातल्या लोकांची सेवा करत करत थकून गेला आहे तो. त्याला त्रास द्यायची इच्छा नाही माझी."

"योग्य घोडा नसल्यामुळे तुम्ही मागे पडला आहात असं वाटतंय. माझा घोडा घ्या तुम्ही, अन् तुमचा मला द्या." गुणवतीने सुचवले.

"अहं ! आपल्या घोड्यावर फार प्रेम आहे माझं, बऱ्याच कालापासून तो आमच्या सेवेत आहे. कुण्णालाही देणार नाही मी तो." वीर दृढ आवाजात अुत्तरला.

"काल तलवार देताना ती खूप महत्त्वाची आहे असं म्हणाला होता न तुम्ही? पण ती द्यायला तयार झालात, मग तुमचं कालचं बोलणं खोटं की आजचं?" असे बोलत राजकुमारीने आपल्या घोड्याला टाच मारली अन् वीरकडे न पहाताच ती भरधाव निघूनही





गेली. वीरला या गोष्टीचे फार वाईट वाटले. रस्त्यात त्याला एक गुराखी दिसला.

गुराख्याला थांबवून वीर म्हणाला, ''हे बघ, आता तू जे काही पहाशील त्याचं सगळं व्यवस्थित वर्णन आपल्या राजकुमारीकडे जाऊन सांग.'' नंतर वीर घोड्यावरून उतरला. म्यानातली तलवार उपसून त्याने घोड्याला मारून टाकले अन् त्या मेलेल्या घोड्याकडे पहात तो म्हणाला, ''राजकुमारी गुणवतीसाठी तू स्वतःचा बळी दिलास.'' नंतर तो तेथून निघून गेला.

या घटनेनंतर एक आठवड्याने वीरला आढळले की, आपल्या घरासमोर एक जातिवन्त घोडा बांधलेला आहे. तो गुणवतीनेच पाठवला असल्याचे वीरने ओळखले. त्याला यामुळे फार आनन्द वाटला.

एक महिना निघून गेला. गुणवतीचा निर्णय जाणून घेण्यासाठी पुन्हा एकदा सर्व राजकुमार तिच्या दरबारात हजर झाले. सर्वांनाच वाटत होते की हजार हिश्शांनी गुणवती भद्रचीच निवड करणार. पण तिने सर्वांसमक्ष घोषित केले की, वीर हाच माझा पती होईल. गुणवतीच्या निर्णयाचे सर्वांना मोठे आश्चर्य वाटले. भद्र तर फारच नाराज झाला.

''विवाहापूर्वी मी त्याला द्वंद्वयुद्धाचं आव्हान देत आहे.'' भद्र आवेशाने बोलला.

वीर म्हणाला, ''आज शिकारीला जाऊ या, परत आल्यावर आपणापैकी कोणाशीही युद्ध करायला तयार आहे मी.''

सर्व पाहुणे शिकारीला गेले. अन् दिवसभर शिकार करत राहिले. संध्याकाळी सर्वजण आपापली शिकार बरोबर घेऊन परतले. भद्र अन् वीर मात्र परत आले नाहीत. गुणवती घाबरून स्वतःशीच विचार करू लागली की, ''कोणा हींस्र जनावरांनी त्यांना खाऊन तर नाही टाकलं ना?'' पण तसे घडले नाही. संध्याकाळ होता होता आपण मारलेली जनावरे घेऊन भद्र परत आला. वीरचा मात्र अजूनही पत्ता नव्हता. बराच वेळ सर्वजण त्याची प्रतीक्षा करत राहिले. शेवटी सर्वजण भोजनासाठी बसले, तेंव्हा कुठे वीरही परत आला. पण त्याच्याकडे पहाताच सहज समजून येत होते की त्याने एकाही प्राण्याची शिकार केलेली नाहीय.

''बराच वेळ लावलास परत यायला? मला तर वाटलं होतं की तू अनेक जनावरं बरोबर घेऊन येशील. दाखव तर खरं, काय शिकार मारलीस ती!'' भद्रने विचारले.

''मी जास्त जनावरांची शिकार केली नाही. शिकार मिळणं न मिळणं ही दैवाधीन गोष्ट आहे.'' वीर उत्तरला.

पण भद्र जोर देत म्हणाला, ''पण काय शिकार केलीस, ती दाखव तर खरी !''

''घे'' म्हणत वीरने दुशाल्यात लपेटलेले एक मानवी शीर बाहेर काढले अन् ते भद्रच्या पायाशी फेकले. ते दुर्जयचे मस्तक होते ! भद्रच्या पित्याचे !

हे दृश्य पाहून सर्वजण अवाक् झाले, डोळे फाडफाडून पहातच राहिले. पण जेंव्हा ते भानावर आले, तेंव्हा त्यांच्या आनन्दाला सीमाच उरल्या नाहीत. कित्येकांना दुर्जयने हीनदीन करून टाकले होते. सर्वांच्या डोळ्यात तो सलत होता. इतक्या मोठ्या काळानन्तर वीरने त्याचा अन्त केला होता. त्यामुळे तेथे हजर असलेले सर्व राजकुमार इतकी मोठी शिकार केल्याबद्दल त्याची वाहवा करू लागले. त्याच्याबद्दल त्यांच्या मनात आदर उत्पन्न झाला.

आता भद्र मात्र एकदम थंड पडला ! आपल्या पित्याच्या बळावरच तर तो आपली लायकी दाखवत राहिला होता. इतक्या शूर वीराला मारणाऱ्या पराक्रमी वीरला पाहून तो भयभीत झाला. त्यामुळे आता त्याला द्वंद्वयुध्दाचे आव्हान देण्याचे साहस त्याच्यात उरले नाही. पित्याचा वध करणाऱ्याचा सूड घ्यायचाही प्रयत्न त्याने केला नाही.

यानन्तर वीर व गुणवती यांचा विवाह झाला. स्वयंवराला आलेल्या सर्वांनी या समारंभात भाग घेतला. भद्र आपला किल्ला सोडून काही मोजक्या लोकांना बरोबर घेऊन पळून गेला. वीरने तो किल्ला आपल्या ताब्यात घेतला. आपल्या शेजारील राजांशी त्याने मैत्रीचे संबंध स्थापित केले व पत्नीसह आपल्या राज्याचे शासन व्यवस्थितपणे चालवू लागला.



**Statement about ownership of CHANDOBA (Marathi)**
**Rule 8 (Form VI), Newspapers (Central) Rules, 1956**

| | |
|---|---|
| *1. Place of Publication* | 'CHANDAMAMA BUILDINGS'<br>188, N.S.K. Salai<br>Vadapalani, Madras-600 026 |
| *2. Periodicity of Publication* | MONTHLY<br>Ist of each calender month |
| *3. Printer's Name* | B.V. REDDI |
| *Nationality* | INDIAN |
| *Address* | Prasad Process Private Limited<br>188, N.S.K. Salai<br>Vadapalani, Madras-600 026 |
| *4. Publisher's Name* | B.VISWANATHA REDDI |
| *Nationality* | INDIAN |
| *Address* | Chandamama Publications<br>188, N.S.K. Salai<br>Vadapalani, Madras-600 026 |
| *5. Editor's Name* | B.NAGI REDDI |
| *Nationality* | INDIAN |
| *Address* | 'Chandamama Buildings'<br>188, N.S.K. Salai<br>Vadapalani, Madras-600 026 |
| *6. Name and Address of individuals who own the paper* | CHANDAMAMA PUBLICATIONS<br>PARTNERS:<br>1. Sri B. VENKATRAMA REDDY<br>2. Sri B.V. NARESH REDDY<br>3. Sri B.V. SANJAY REDDY<br>4. Sri B.V. SHARATH REDDY<br>5. Smt. B. PADMAVATHI<br>6. Sri B.N. RAJESH REDDY<br>7. Smt. B. VASUNDHARA<br>8. Kum. B.L. ARCHANA<br>9. Kum. B.L. ARADHANA<br><br>'Chandamama Buildings'<br>188, N.S.K. Salai<br>Vadapalani, Madras-600 026 |

I, B Viswanatha Reddi, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

**B. VISWANATHA REDDI**
*Signature of the Publisher*

1st March 1996


**विश्व-समाचार**

# पोलिओचे समूळ उच्चाटन

**पो**लियो मुलांना विकलांग बनवणारा एक भयंकर रोग आहे. पोलियो-पीडित मुलांकडे पाहिले की त्यांच्या आई-वडिलांच्या मनोव्यथेची सहज कल्पना करता येते. दूषित वातावरणात या रोगाचे कीटाणु बालकांच्या शरीरात प्रवेश करतात. त्यामुळे पाठीच्या मणक्यांची हाडे सुजतात, त्याचा मज्जा-रज्जूंवर परिणाम होतो आणि आपल्या नसांवर नियंत्रण ठेवता येत नाही. या रोगाने पछाडलेल्या मुलांना आपल्या हाता-पायांचा नीट उपयोग करता येत नाही. एकदा हा रोग झाला की त्याच्या तावडीतून सुटणे साधारणत: शक्य होत नाही. म्हणून या रोगापासून मुलांना वाचवण्याचा एकच मार्ग आहे, नि तो म्हणजे या रोगापासून दूर राहाणे.

अमेरिकेचे सुप्रसिद्ध मायक्रो बायॉलॉजिस्ट जोनास एडवर्ड साक यांनी १९५४मध्ये पोलियो निरोधक लशीचा शोध लावला. एका निर्धारित वयाच्या आतील मुलांना ही लस टोचणे भावश्यक आहे. ही लस टोचल्यामुळे बऱ्याच मुलांचे पोलिओपासून संरक्षण झाले. या लशीने पोलिओचे उच्चाटन करणे शक्य आहे हे श्री. साक यांनी जाणले. परंतु या साक-व्हॅक्सीनचा फायदा फार थोड्याच मुलांना होऊ शकला. बहुसंख्य बालक या लशीपासून वंचितच राहिले.

काही वर्षांनंतर अमेरिकेचे एक दुसरे मायक्रो बायॉलॉजिस्ट अल्बर्ट ब्रूस शॉबिन यांनी पोलिओ निरोधक आणखी एका औषधाचा शोध लावला. या शॉबिन-व्हॅक्सीनचे काही थेंब तोंडा द्वारे बालकांना द्यायचे. या सोप्या पद्धतीमुळे औषध सर्वसामान्य लोकांच्या आवाक्यात आले. निरनिराळ्या देशांच्या सरकारांनी हे औषध मागविले व आपल्या देशातील बालकांसाठी त्याचा उपयोग केला. या औषधाचे दोन थेंब मुलाच्या तोंडात टाकले म्हणजे झाले, पण हे सर्व मुलाच्या तिसऱ्या वर्षापर्यंत झाले पाहिजे.

दोन दशकांपूर्वी देवी हा ही असाच भयंकर रोग मानला जाई. त्याचे उच्चाटन करण्यासाठी प्रयत्न केले गेले व त्यात सफलता मिळाली. सन १९९५ च्या शेवटापर्यंत चौदा देशांनी आपल्याला 'पोलियो-रहित देश' म्हणून घोषित केले. आपला देश ही अन्य सत्तर देशांबरोबर आपल्याला पोलियो-रहित बनवण्याचा प्रयत्न करीत आहे.

जगात पोलियो-पीडित जेवढे लोक आहेत, त्यातील अर्ध्याहून अधिक रोगी तर आपल्याच देशात आहेत. म्हणून जगाचे लक्ष आपल्यावर केन्द्रित झाले आहे. आपल्या सरकारच्या लक्षात ही गंभीर परिस्थिति आली आणि आता भारताने पोलिओ-उच्चाटनासाठी कंबर कसली आहे. भारताने ९ डिसेंबर व २० जानेवारी हे दोन दिवस 'पोलिओ उच्चाटन दिन' म्हणून घोषित केले. तीन वर्षांच्या सर्व बालकांना जवळच्या आरोग्य-केन्द्रात नेऊन त्यांना पोलिओ-प्रतिबंधक औषधाचे थेंब पाजले जावेत असे जनतेला आवाहन करण्यात आले. आपल्या देशातील ७५० लाख बालकांना या औषधाची आवश्यकता आहे. गेल्या ९ डिसेंबर व २० जानेवारी या दोन दिवशी संपूर्ण देशभर लाखो बालकांना हे औषध देण्यात आले.

हा कार्यक्रम यशस्वी बनविण्यासाठी केवळ सरकारच नव्हे तर अनेक गैरसरकारी संस्था ही मदत करीत आहेत. हा कार्यक्रम असाच उत्साहाने आणखी तीन वर्षे सतत चालू राहिला तर आपला देश सुद्धा 'पोलिओ-रहित देशां'च्या यादीत येऊ शकेल.

आपण आपले मित्र, नातेवाईक, शेजारी यांना या कार्यक्रमाची सविस्तर माहिती द्यावी. जगातून पोलिओचे समूळ उच्चाटन करण्यासाठी सर्वांच्या सहकार्याची अपेक्षा आहे.



# इच्छा आणि आवश्यकता

विदेहचा राजा वेषांतर करून राज्यात हिंडत असे. एकदा तो असाच हिंडत असता अंधारात पडला आणि त्याच्या पायांना व डोक्याला जखमा झाल्या. एका गरीब माणसाने काही झाड-पाल्याचा रस काढून तो जखमांवर लावला.

राजाला थोड्या वेळात बरे वाटले व त्याने गरीबाची विचारपूस केली.

''मी आपला एक गरीब माणूस आहे. माझ्याबाबत काही जाणून आपण काय मिळवणार?'' गरीबाने विचारले.

''तुझ्या इच्छा पूर्ण करण्याचा मी प्रयत्न करीन.''

गरीबाने आपली इच्छा सांगितली - ''मी या देशाचा राजा होऊ इच्छितो.''

''धन, कीर्ति आणि सुख सर्वांनाच हवं असतं. पण राजाच्या भाग्यात या गोष्टी नसतात हे तुला माहीत नाही असं वाटतंय.'' हसत राजा म्हणाला.

''असं का बरे आपण म्हणताहात?'' आश्चर्याने गरीबाने विचारले.

''राजा जवळ खूप धन असतं, पण ते सर्व धन प्रजेचं असतं. राजाला कीर्ति मिळते, पण त्याहून अधिक अपकीर्ति. राजाला पुष्कळ सुख मिळतं, पण त्याहून अधिक जबाबदाऱ्या त्याच्यावर असतात. म्हणून या तिन्ही गोष्टींमुळे सामान्य माणसाला जरी सुख मिळाले तरी राजाला मिळत नाही.'' राजा म्हणाला.

''तुझं म्हणणं बरोबर आहे. काही जबाबदारी नसली म्हणजे कसं छान वाटतं. आता राहिली संपत्तीची गोष्ट! धन शाश्वत वस्तु नाही. कीर्ति मिळाली की त्याच्या बरोबर अपकीर्ति येतेच. धन, कीर्ति वा सुखासाठी राजा बनायची माझी इच्छा नाही. पण माझ्या समोर कोणी माझी प्रशंसा करावी असं मला फार वाटतं. राजाला उद्देशून कित्येक काव्यं रचली जातात. सामान्य माणसाच्या भाग्यात हे नसतं.'' गरीब बोलला.

हसत राजा म्हणाला - ''ठीक आहे तर. तुझी ही इच्छा पूर्ण होईल.''

जोरात हसत गरीब म्हणाला - ''इथून पुढे तू सावध रहा हं. पुन्हा असा कुठे पडू नकोस.'' आणि तो निघून गेला.

राजा त्याच्या मागे जात राहिला. जवळच्या त्याची झोपडी होती. तिथे तो एकटाच रहायचा.

दुसऱ्या दिवशी राजाने एका कवीला त्या गरीबाच्या घरी पाठवले. त्याला पाहून गरीबाला मोठे आश्चर्य वाटले. त्याने विचारले - ''महाशय, आपण माझ्या घरी कशासाठी आला आहात बरं?''

''तुझ्यावर मी एक काव्य-रचना करू इच्छितो!'' कवि म्हणाला.

गरीबाने विचारले - ''माझ्यात अशी काय विशेषता आहे?''

''आपण आपले जीवन मला सविस्तर सांगा. त्यातून मी योग्य तो आशय निवडीन.'' कवि म्हणाला.

गरीबाचा जन्म झाला आणि लवकरच त्याचे वडील वारले. जो दहा वर्षांचा झाला नि त्याची आई त्याला सोडून गेली. गावातील काही प्रतिष्ठित लोकांना वाटले की हा जेथे राहील तेथे नुकसान होईल, म्हणून त्यांनी



त्याला एक झोपडी बनवून दिली व तेथे तो राहू लागला. तो सकाळी जंगलात जाई नि लाकूड-फाटा गोळा करून आणी. तो विकून तो आपला उदर-निर्वाह कसा-बसा करी.

''तू रोज जंगलात जातोस, मग कधी एकादं धाडसाचं काम केलंस की नाही?'' कवीने प्रश्न विचारला.

''मला जंगलात एकदा एक कोल्हा दिसला. मला भीति वाटली नि मी पळून आलो. पण लाकडं आणली नाहीत तर खाऊ काय? म्हणून पुन्हा जंगलात जायला सुरुवात केली.'' गरीबाने आपल्या धाडसाची कहाणी सांगितली.

''तू मोठा दयाळू दिसतो आहेस. संकटात

पुष्पा देव



सापडलेल्या लोकांना मदत करतोस की नाही?'' कवीने विचारले.

एक दीर्घ श्वास सोडीत गरीब म्हणाला - ''वेळ आली तर माझ्याकडून जमेल तेवढी मदत करण्याचा प्रयत्न करतो मनापासून. पण याचा अर्थ मी मोठा दयाळु आहे असा नाही. स्वतः परमेश्वर निरनिराळ्या वेषात येऊन भक्तांची परीक्षा घेतो असं म्हणतात. अशा परीक्षेत पास व्हावं असं वाटतं मला.''

''वेळ मिळाला तर आणखी काय काय करतोस? कविता वगैरे वाचतोस?'' कवीने विचारले.

''खूप मेहनत करतो. काही काव्य वाचायला घेतलं की झोप येते. मग मस्त झोपतो !'' गरीबाने उत्तर दिले.

''अरे वा! तुझ्या सारख्या गरीबाला काव्याची आवड आहे ही विशेष गोष्ट आहे. याबद्दल तुझी प्रशंसा करावी तेवढी थोडीच.'' आश्चर्य व्यक्त करीत कवि म्हणाला.

गरीब उत्साहपूर्वक म्हणाला - ''काव्याची अभिरुचि नसली तर चालेल कसं? भविष्यात कोणी माझ्यावर काव्य-रचना केली, तर ते काव्य मला समजायला नको का?''

''अरे अभाग्या, तू तर कर्म-दरिद्री ! तुझ्या सारख्या दरिद्री माणसावर मला काव्य रचायला लागावं हे माझं दुर्भाग्य !'' असं म्हणत कवीने एका ताड-पत्रावर एक छोटं खंड-काव्य लिहिलं आणि ते त्याच्या हाती देऊन कवि निघून गेला.

गरीबाने आनंदाने ते खंड-काव्य वाचले. त्याच्यावरच ते काव्य रचलेलं होतं. प्रत्येक कडव्यात त्याची प्रशंसा केलेली होती.

त्या दिवसापासून रोज रात्री गरीब आपल्या झोपडीजवळच्या झाडाखाली एक दिवा लावून बसे आणि येणारा-जाणाराला ते काव्य ऐकवी. शेवटी तो प्रश्न करी - ''ही कविता कुणावर रचली आहे माहीत आहे? माझ्यावर, म्हटलं माझ्यावर !''

कविता ऐकून लोक म्हणत - ''इतकी सुंदर कविता करणाऱ्या कवीला तुझ्या सारख्या दरिद्री माणसावर काव्य रचायला लागलं हं! महादरिद्री आहे तो. अशा कवीला तुझ्यावर काव्य-रचना करावी लागली हे त्याचे केवढे दुर्भाग्य! या देशाचा राजाच याला जबाबदार आहे !'' या सर्व गोष्टी राजाच्या ही कानांपर्यंत पोचल्या.

एके दिवशी राजा नेहमीप्रमाणे वेषांतर करून त्या गरीबाच्या झोपडीपाशी आला. त्याने मुद्दामच पडण्याचं नाटक केलं. पण या वेळी गरीब जागचा उठला नाही. तो झाडाखालीच बसून राहिला.

थोड्या वेळाने राजा स्वतःच उठला आणि गरीबाजवळ जाऊन म्हणाला - ''यापूर्वी मी तुला एकदा आशीर्वाद दिला होता. तुला जे पाहिजे ते मिळालं. जर यावेळी मला मदत केली असतीस, तर तुझी आणखी एकादी इच्छा पूर्ण करायचा माझा विचार होता. पण तू मला मदत केली नाहीस, आता मी तुला आशीर्वाद कसा देऊ?''

''तुझ्या आशीर्वादाची मला भीतीच वाटते !'' गरीब म्हणाला.

राजाने विचारले - ''का बरे?''

डोकं खाजवीत गरीब म्हणाला - ''मी मूर्ख, माझी इच्छा पण मूर्खासारखी ! तू तर बुद्धिमान आहेस. ज्यामुळे मी सुखी होईन, असा तरी आशीर्वाद द्यायचा होतास. तसं न करता तू माझी इच्छा पूर्ण केलीस. कवीने माझ्यावर कविता केली आणि निघून गेला. त्यामुळे माझे पोट थोडेच भरणार? मी गरीबच राहून गेलो. त्या काव्याचा मला काय फायदा? मी ज्यांना हे काव्य ऐकवतो, ते माझ्या



मूर्खपणावर हसतात. कवीला नि देशाच्या राजाला शिव्या देतात. निदान कवीला तरी संतोष वाटायला हवा, तो ही नाही ! काव्य-रचना केल्यावर कवीने मला नि आपल्याला दोष दिला. तुझ्या आशीर्वादामुळे कुणालाच संतोष वाटला नाही!''

''तू तर त्या दिवशी असं बोलत होतास की तुला सर्व काही माहीत आहे. तुला उपयुक्त अशी एकादी इच्छा तेव्हा का प्रकट केली नाहीस?'' राजा नाराज होत म्हणाला.

गरीब दीनतापूर्वक म्हणाला - ''महाराज, मनुष्य आपल्या इच्छांबाबत किती अनभिज्ञ आहे हे परमेश्वर जाणतो. म्हणून ज्यात माणसाचे कल्याण आहे, तेच परमेश्वराने माणसाला दिले आहे. माणसाला मृत्यु नको असतो, परंतु मृत्यूमुळे मनुष्याच्या जीवनाला अर्थ प्राप्त होतो हे सत्य आहे. मनुष्याला रोग नको असतो, पण आरोग्य-सुखाचा आनंद तेव्हांच समजतो, जेव्हा रोग त्याला पछाडतो. माणसाला वेदना नकोशा असतात, पण वेदनांवाचून रोगाचे ज्ञान कसे होईल. रोगमुक्त होण्यासाठी त्याची चिकित्सा तो कशी करील? परमेश्वराने मनुष्याला जे जे दिले आहे, त्यातील त्याच्या कल्याणाची इच्छा माणसाला ठाऊक नसते. मनुष्याच्या सुख-शांतीसाठी परमेश्वराने अनेक गोष्टी दिलेल्या आहेत. मी तुला परमेश्वर समजून काही मागितले आणि मी जे मागितले ते तू दिलेस. तुझ्यात शक्ति आहे, तुझ्या आशीर्वादात बळ आहे, पण तू परमेश्वर नाहीस. तुझ्या आशीर्वादामुळे माझ्यातील परोपकाराची प्रवृत्ति नष्ट झाली, दुसऱ्यांना मदत करण्याचा माझ्यातील गुण लुप्त झाला.''

गरीबाच्या भाबड्या बोलण्यात राजाला एक गूढ अर्थ सापडला. दुसऱ्याच दिवशी राजाने गरीबाला एक नोकरी दिली. आता तो सुखाने आपले जीवन जगू लागला. राजाने एक खूणगाठ बांधली - लोकांची काय इच्छा आहे, यापेक्षा त्यांची आवश्यकता काय आहे हे पाहून त्यांना योग्य ती मदत करायची. यामुळे राजा अधिक लोकप्रिय झाला व त्याची कीर्ति सर्वत्र पसरली.





# लुटारू राजा

खूप जुनी गोष्ट. विन्ध्य प्रान्तात अनेक लहान लहान राज्ये असत. त्यातल्या अलकनन्दा राज्याचा राजा होता अमरसिंह. अमरसिंह वीस वर्षांचा असतानाच त्याच्या पित्याचे निधन झाले. 'आसपासची लहानसहान राज्ये जिंकून आपण त्यांचा सम्राट बनावे' अशी त्याची आधीपासूनच इच्छा होती. परन्तु त्याची सैनिकसंख्या कमी होती.

मन्त्री धर्मपाल याला अमरसिंहची इच्छा माहीत होती, त्यामुळे तो 'आपली राज्य विस्ताराची आकांक्षा उचित नव्हे' असे म्हणून राजाला अनेकदा सावध करी.

परन्तु अमरसिंहला आपला मन्त्र्याचा हितोपदेश आवडत नसे. त्याला वाटे - ''सैन्याच्या मदतीनं मी आसपासच्या राज्यांवर कब्जा मिळवीन. मग एकादा महाराजा नक्कीच आपल्या कन्येशी विवाह करून देईल.''

आपल्याला आवश्यक असणारे अपार धन मिळवण्यासाठी त्याने एक योजना बनवली. या योजनेनुसार त्याने आपल्या सैन्याच्या लहानलहान तुकड्या बनवल्या अन् त्या त्या तुकड्यांच्या अधिकाऱ्यांना आसपासच्या राज्यात घुसून तेथील जनतेला लुटायची आज्ञा दिली.

आपल्या गावातून होणाऱ्या या लुटींबद्दल जनतेने आपापल्या राजांकडे तक्रार केली. हे लुटारू अलकनन्दा राज्यातले असल्याबद्दल ही ते म्हणाले. निकट भविष्यातच या लूटमारी बन्द केल्या जातील असे आश्वासन त्या राजांनी प्रजेला दिले.

या लहान राजांपैकीच एक वज्रपुरीचा राजा होता. आपल्या राज्यात चालणारा प्रकार कळवण्यासाठी त्याने आपला एक दूत अमरसिंहकडे पाठवला.

अमरसिंहाने दूताचे सादर स्वागत केले

अविनाश कांबळे

आणि तो म्हणाला, "ते लुटारू केवळ तुमच्याच नव्हे, तर माझ्याही राज्यात धुमाकूळ घालत आहेत. आपली राज्यं डोंगराळ अन् वनप्रदेशात असल्यामुळे ते आपलं काम बेधडक करत आहेत. त्यांचा समाचार घ्यायचं काम मी करीनच असं सांग आपल्या राजाला."

या खेपेला प्रधान धर्मपालने जोरदारपणे सावधगिरीचा इशारा देत अमरसिंहला म्हटले, "महाराज, आपली ही वागणूक राजधर्माच्या अगदी विरुद्ध आहे. कधी ना कधी इतर राजांना खरी गोष्ट कळून चुकेलच अन् मग ते एकत्र होऊन आपल्या राज्यावर हल्ला करतील."

पण मोठ्या बेपर्वाईने हसत अमरसिंह बोलला, "प्रधानजी, तुम्ही मुळिच घाबरू नका. ते सर्वजण एकत्र येण्यापूर्वीच मी लुटलेल्या धनाच्या मदतीनं मोठ्ठं सैन्य उभारून त्यांच्यावर हल्ला करीन. मग कसला धोका आपल्याला ?"

इकडे वज्रगिरीच्या राजाला आपल्या गुप्त हेरांकडून नक्की समजले की, उटारूंची पथके पाठवणारा स्वतः अमरसिंहच आहे. त्याने एके दिवशी स्वतःच अचानक अमरसिंहाच्या किल्ल्यावर हल्ला केला. त्याचे जे काही थोडे सैन्य होते ते सारे निरनिराळी पथके बनून लूटमारीसाठी जंगले व डोंगरातून फिरत होते. त्यामुळे आता त्याच्या किल्ल्याचे रक्षण होणे अशक्य झाले.

स्वतः राजा अमरसिंह आपल्या मंत्र्यासह कसाबसा गुप्त द्वारावाटे जीव वाचवून पळून गेला. मन्त्र्याला तो विचारू लागला, "प्राण रक्षणासाठी आता आपण काय करावं?"

शान्त स्वरात मन्त्री उत्तरला, "आता ना आपण राजा आहात आहात, अन् ना मी मंत्री आहे. आपली अन्यायाची कमाई आसपासच्या राजांना जिंकू शकली नाहीच, पण उलट तुमच्यावरच संकट गुदरलं, तुमचे प्राण संकटात सापडले. आता तुम्ही इथून कुठेतरी पळून जावं हेच श्रेयस्कर !"

अमरसिंहाला आपली चूक कळून चुकली अन् तो जंगलाकडे पळून गेला.






७

(रूपधर प्राणरहित अशा पितृलोकात गेला व युद्धात मेलेल्या अनेक वीरांच्या प्रेतात्म्यांना भेटला. त्यांच्याशी बोलून व भविष्यातल्या आपल्या सुखदुःखांची सांकेतिकडून माहिती जाणून घेऊन तो आपल्या साथीदारांसह स्वदेशी जायला निघाला. वाटेत त्याने स्वतःचे व साथीदारांचे नागकन्यांपासून रक्षण केले व तो सूर्यभगवानाची पशुसंपदा असलेल्या बेटाजवळ पोचला. तेथील पशूंशी आपल्याला काही देणे-घेणे नाही किंवा त्यांच्याकडे नुसते पहाणारही नाही असे वचन घेऊनच रूपधरने आपल्या साथीदारांना तेथे उतरायची परवानगी दिली.) -यानंतर

**ग्री**कांनी आपली नाव पाण्याबाहेर ओढून बांधून ठेवली. जवळच एक पाण्याचा वाहता झरा होता. झऱ्याजवळच सर्वजण बसून स्वयंपाक करू लागले. नंतर त्यांनी भोजन उरकले. विध्वंसिनी राक्षसीने ज्यांना आपला ग्रास बनवले, त्या साथीदारांची त्यांना आठवण आली. त्यांच्याबद्दल बोलतच ते सर्वजण झोपून गेले.

रात्री तिसऱ्या प्रहरी भयानक वादळ सुरू झाले. आकाश ढगांनी भरून गेले. दक्षिणेकडून जोरदार वारे वाहू लागले. ग्रीकांनी आपली नौका एका सुरक्षित गुहेत ओढून नेली. साथीदारांना पुन्हा एकदा इशारा देत रूपधर म्हणाला, "दोस्तांनो, आपल्याकडे खाण्यापिण्याचा भरपूर साठा आहे. तेव्हा इथे असणाऱ्या पशूंकडे ढुंकूनही पाहू नका. त्यांच्यापासून दूरच रहा. यात जराही आगळीक घडली, तरी आपण

ग्रीक पौराणिक कथा



सूर्यदेवतेशी द्रोह केल्यासारखे होईल. अन् तसं घडलं, तर मात्र आपला बचाव होण्याची मुळीच शक्यता नाही. सावध रहा सर्वजण!''

रूपधरच्या साथीदारांचीही हकनाक मरायची इच्छा नव्हती, त्यामुळे त्यांनी आपल्या सरदाराचा इशारा नीट लक्षात ठेवला व आपली कसलीही हानी होणार नाही अशी त्यांनी काळजी घेतली. एक महिनाभर हवा वादळीच राहिली. नौकेतला अन्नसाठा संपून गेला. नंतर तेथील पक्ष्यांची शिकार करून त्यांना आपले पोट भरावे लागले, मासेही पकडावे लागले. पण एवढ्याने त्यांचे पोट पुरेसे भरेनासे झाले; ते अर्धपोटी राहू लागले.

या संकटातून सर्वांना बाचवण्यासाठी रूपधर एका गुहेत बसून प्रार्थना करू लागला. त्याला तेथेच झोप लागली.

इकडे मायावी आपल्या साथीदारांना म्हणाला, ''दोस्तांनो, आता माझं बोलणं लक्षपूर्वक ऐका. माणसानं भुकेनं मरणं हा प्रकार अत्यंत वाईट! तेंव्हा आता आपण कसलाही संकोच न बाळगता इथले पशु पकडू या. इथाकाला कधीं पोचू शकलोच, तर तिथं सूर्यदेवतेचं अेक भलंमोठं मंदिर बनवू आपण. पण आत्ता पशु आणून आपण पद्धतशीरपणे प्रार्थना करून त्यांना बळी देऊ अन् नंतर त्यांना खाऊन आपले प्राण बाचवू. इतकं करूनही आपल्यावर सूर्यदेवतेचा कोप झाला, अन्य देवतांची आपल्यावर कृपा न झाली, अन् आपण समुद्रात मधेच बुडून गेलो तरी बेहत्तर ! या वेदनेतून मुक्त तरी होऊ. या निर्जन बेटावर भुकेनं तडफडून मरण्यापेक्षा खारं पाणी पोटात घेऊन मरू या.''

मायावीच्या या बोलण्याने ते ग्रीक सैनिक फार खूश झाले. निर्भय होऊन निःसंकोचपणे त्यांनी चांगली धष्टपुष्ट जनावरे पकडून आणली. शास्त्रोक्त बळीविधी करून नंतर त्यांचे मांस शिजवायला त्यांनी सुरुवात केली.

इतक्यात रूपधर जागा होऊन आपल्या साथीदारांकडे येऊ लागला. लांब अंतरावर असतानाच त्याला मांस शिजत असल्याचा वास आला. आपल्या अनुपस्थितीत आपल्या माणसांनी सूर्यदेवाशी द्रोह केल्याचे त्याने ओळखले. तो त्यांच्यावर खूप रागावला. पण आता काय अुपयोग? व्हायचे ते होऊन गेले होते.

जे पशु ग्रीकांनी मारले होते, त्यांचे मांस ते सहा दिवस खात राहिले. सातव्या दिवशी वादळ थांबले. रूपधर व त्याच्या साथीदारांनी ताबडतोब नौका समुद्रात नेली व ते निघाले. पहाता पहाता ते सूर्याची पशुसंपदा असलेल्या त्या बेटापासून दूर गेले. आता समुद्र व आकाश यांशिवाय नजरेला काहीच दिसत नव्हते.



अशातच आकाशाच्या मध्यावर एक काळा ढग दिसू लागला. पश्चिमेकडून भयानक आवाज करत वारा येऊ लागला. प्रलय होणार असे वाटू लागले. नौकेची डोलकाठी 'कडाड्कड्' आवाज करत मधेच तुटून कर्णधाराच्या डोक्यावर कोसळली. तो जागच्या जागीच मरून समुद्रात कोसळला. इतक्यात नावेवर वीज कोसळली आणि ती तुटून छिन्नभिन्न झाली. रूपधरचे सारेच साथीदार समुद्रात पडले.

रूपधरला मात्र एक लाकडी खांब सापडला व त्याच्या आधाराने तरंगत तो पोहत राहिला. आता पश्चिमवारा थांबून दक्षिणवाऱ्याने जोर धरला. 'हा वारा कदाचित आपल्याला एकाद्या धोक्यात अडकवील किंवा पुन्हा अुलट दिशेला नेऊन विध्वंसिनीच्या तोंडी देईल' अशी भीती त्याला वाटू लागली. त्याची शंका खरी निघाली व सकाळपर्यंत त्याच्या खांबाने वाऱ्यामुळे त्याला त्या भोवऱ्याकडे नेले. पण केवळ भाग्यामुळेच त्या दोन्ही संकटातून तो वाचला.

रूपधर अशा प्रकारे नऊ दिवस हवेचे धक्के खात समुद्रातून वहात राहिला. दहाव्या दिवशी रात्री तो ओगीजिया नामक बेटावर पोचला. या बेटावर एका गुहेत सम्मोहिनी नावाची देवी रहात असे. गुहेभोवतालचे वातावरण मोठे स्वच्छ व सुंदर होते. सर्वत्र जंगली झाडी होती. झाडीबाहेर मात्र छान हिरवेगार मैदान व पाण्याचे लहानमोठे



धबधबे होते. गुहेच्या द्वारावर द्राक्षाचे वेल लटकत होते. त्यांवर द्राक्षांचे गुच्छच्या गुच्छ लगडलेले होते.

रूपधरने या बेटावर पाऊल ठेवले अन् कसातरी स्वतःचा तोल संभाळत, अडखळत, चालू लागला. सम्मोहिनीने पुढे होऊन त्याचे स्वागत केले. ती त्याला आपल्या गुहेत घेऊन गेली. तिने त्याला रुचकर जेवण व स्वच्छ पाणी दिले. नंतर ती त्याला म्हणाली, ''तू माझा पति बनून कायम इथेच रहाणार असशील, तर तुला मी म्हातारपणातून मुक्त करीन; तू चिरतरुण रहाशील.''

रूपधर तिला नकार देऊन दुसरे काही करण्याच्या स्थितीत नव्हता. सम्मोहिनीशी विवाह करून पाच वर्षं तो त्याच बेटावर राहिला. पण स्वदेशी परत जाण्याची त्याची इच्छा जास्त जास्तच प्रबळ होत राहिली. बिचारा मन मारून समुद्रकिनाऱ्यावर बसून वेळ काढी.

सम्मोहिनीने रूपधरच्या मनातली इच्छा बरोबर ओळखली. तो आपला देश विसरू शकणार नाही, हेही तिने ओळखले. एके दिवशी ती त्याला म्हणाली, ''तुला पाहून दया येतेय मला. तुला स्वदेशी पाठवायचं ठरवलं आहे मी. काळजी करू नकोस. ऊठ, झाड तोडून ओंडक्यांचा एक तराफा बनव स्वतःसाठी. प्रवासात खाण्यासाठी पुरेसा अन्नसाठा देण्याची व्यवस्था करीन मी. कपडे देईन अन् अनुकूल हवाही देईन. तिच्या मदतीनं सुखरूप स्वदेशी जा.''

तिचे बोलणे ऐकून रूपधरचे शरीर भयाने थरथरले. तो म्हणाला, ''यात नक्कीच काही काळंबेरं आहे; तुझं काहीतरी कारस्थान असावं यात. नाही तर केवळ एका तराफ्याच्या साह्यानं मी घोर समुद्रातून प्रवास करावा असा सल्ला कसा दिला असतास तू? चांगल्या मजबूत नावासुद्धा समुद्रात मोडून जातात, तेंव्हा या नुसत्या तराफ्याचा काय भरंवसा? 'तू मनापासून मला पाठवत आहेस' याची जोपर्यन्त मला खात्री पटत नाही तोपर्यंत माझा इथून निघायचा प्रश्नच येत नाही.''



''तुझी बुद्धीच वाकडी आहे, म्हणून तुला संशय येतोय. तुला वाटत असेल तर मी शपथ घेते. तुला मदत करावी, एवढाच उद्देश आहे माझा. मला इतकी कठोर समजू नकोस. तुझी अवस्था पाहून, दया आली मला तुझी!'' सम्मोहिनी बोलली.

रूपधरला आपल्या गुहेत घेऊन जाऊन तिने त्याला जेवण दिले. नन्तर ती त्याला म्हणाली, ''घरी परतायची तुझी इच्छा अगदी नैसर्गिक आणि योग्य अशीच आहे. पण घराच्या वाटेवर तुला किती कष्टातून जावं लागणार आहे, ते कळलं तर तू जायचं नावच घेणार नाहीस. आपला निर्णय बदलशील तू. माझा तर असा सल्ला आहे की मृत्यु आणि म्हातारपण यांतून वाचून इथेच रहा कायमचा.''

यावर रूपधर म्हणाला, ''घरी जायची तर माझी अगदी तीव्र इच्छा आहे. मी खरोखरच या संधीच्या प्रतीक्षेत आहे. याच प्रयत्नात तर मी कित्येक कष्ट झेलले; किती संकटांना तोंड दिलं. या वेळीही जर मी संकटात सापडलो किंवा एकादे वेळी मी असहाय्य झालो, तरी समजेन की मी आणखी एका संकटातून पार होत आहे; अडचणींच्या मागपैकी हाही एक आहे. यापेक्षा आणखी तर काही नाही होणार नं? पहा, मी तसा खूपच सहनशील आहे.''

दुसऱ्या दिवशी सकाळीच सम्मोहिनीने



एक धारदार कुऱ्हाड आणि कोयता रूपधरच्या हवाली केले आणि ती स्वतः त्याच्या बरोबर जंगलात गेली. तेथे अुंच अुंच झाडांचा एक समूह होता. रूपधरने त्यातली वीस झाडे तोडली व ती कोयत्याने तासून काढली. त्यातून त्याने एक छोटीशी नाव बनवली. वल्ही आणि डोलकाठी ही त्याने नावेवर बसवली. शिडासाठी जरूर असणारे वस्त्र सम्मोहिनीने त्याला दिले. नंतर ती नाव रूपधरने समुद्रात नेली.

हे काम पुरे होताहोता चार दिवस गेले. पाचव्या दिवशी सम्मोहिनीने त्याला स्नान घातले, प्रवासासाठी आवश्यक सर्व वस्तु दिल्या. आता वल्ही पकडून रूपधर नावेत बसला.



प्रवासासाठी अनुकूल वारे वाहू लागले. रात्री रूपधर जराही झोपला नाही. आकाशातल्या ताऱ्यांच्या आधारे दिशा ठरवून तो सफर करत राहिला. तो निघाला, त्यावेळी सम्मोहिनीने त्याला सांगितले होते की, 'सप्तर्षी तारे डावीकडे रहातील याकडे नीट लक्ष ठेवून प्रवास करत रहा.'

पंधरा दिवस प्रवास झाल्यानन्तर वादळ सुरू झाले. एकाएकी आकाश दाट ढगांनी भरून गेले, वेगवान वारे वाहू लागले. रूपधरला तर वाटू लागले की, आपला मृत्यु आता निश्चित आहे.

''कित्ती दुर्दैवी आहे मी ! ट्रॉय युद्धात मेलेले वीरच खरे भाग्यवान! त्यांच्या प्रेतांचा दहनसंस्कार होऊ शकला. पण मी मात्र या अथांग समुद्रात अनाथासारखा मरून जाणार आहे. असल्या मरणापेक्षा त्या वज्रकायचा मृत्यु फार बरा! तसलं मरण माझ्या नशिबी नाही !'' राहून राहून असले विचार त्याच्या मनात येऊ लागले.

'देवतांनी आपला सूड घ्यायचा ठरवलेलं दिसतंय' असेही त्याला वाटले. वाऱ्याच्या धक्क्याने वल्हे त्याच्या हातून सुटले अन् दुसऱ्याच क्षणी नाव जागच्या जागी गोल फिरू लागली. रूपधर पाण्यात पडला; तरीही प्रसंगावधान राखून पटकन् पाण्यावर येऊन तो नावेत चढून बसला. खालीवर होणाऱ्या लाटांमुळे अजूनही त्याची नाव गरगर फिरत होती अन् एकाद्या चेंडूसारखी इकडून तिकडे फेकली जात होती.

याच वेळी रक्षकी नावाची एक देवी समुद्रपक्षाच्या रुपाने त्याच्या नावेच्या टोकावर येऊन बसली. तिच्या चोचीत एक वस्त्र होते. ती म्हणाली, ''रूपधर, तुझ्या जिवाला काहीच धोका नाहीय. देवता तुला संकटात टाकू शकतील, पण तुझी ही नाव अगदीच निरुपयोगी आहे. तू हे वस्त्र घेऊन ते आपल्या कमरेला बांध अन् नाव सोडून देऊन समुद्रात उडी मार. तसं केलंस म्हणजे बुडायचा नाहीस तू. अगदी सुरक्षित किनाऱ्याला लागशील.

रूपधरला रक्षकीच्या बोलण्याचा मुळीच विश्वास वाटला नाही. त्याला वाटले की, आपल्याला नवनव्या संकटात ढकलण्यासाठीच जाळे विणले जात आहे. 'आता आकाश कोसळलं, तरी आपण नाव सोडायची नाही.' या विचाराने तो नावेत अगदी घट्टपणे बसून राहिला.

परन्तु थोड्याच वेळात वाऱ्याच्या जोरदार थपडेने त्याची नौका तुटून तिची छकले झाली. त्याच्या हाती एका गोल खांबाचा तुकडा आला आणि तो त्यावर घोड्यावर स्वार झाल्यासारखा बसला. रक्षकीने सांगितल्याप्रमाणे ते वस्त्र रूपधरने आपल्या कमरेला बांधले अन् पाण्यावर उताणा पडून हाताने पाणी कापू लागला.

त्या कोलाहलमय समुद्रात अशा प्रकारे तो दोन दिवस पोहत राहिला. तिसऱ्या दिवशी सकाळीच वादळ शान्त झाले अन् थोड्या अंतरावर त्याला किनाराही दिसू लागला. रूपधरला वाटले की, आता आपले कष्ट संपत आलेत. पण क्षणभरात त्याच्या लक्षात आले की पुन्हा इथेही मृत्यु आपली प्रतीक्षा करत आहे. तो संपूर्ण किनारा मोठमोठ्या खडकांनी भरलेला होता. समुद्राच्या लाटा खडकांना जोराने धडका देत होत्या. 'एकाद्या लाटेने आपल्याला असे खडकावर नेऊन आपटले तर काय होईल आपले?' अशी भीती त्याच्या मनात उभी राहिली.

त्याने विचार केल्याप्रमाणेच घडले. एक जबरदस्त लाट त्याला किनाऱ्याकडे घेऊन गेली. रूपधरने सावधपणे समोरची शिळा घट्ट पकडली. पण परत फिरताना ती लाट त्याला पुन्हा समुद्रात घेऊन गेलीच. त्याचे हात मात्र या प्रयत्नात सोलून निघाले.

दुसऱ्या वेळी रूपधरने आपल्या पोहोण्याची दिशा बदलली. तो तटाला समांतर पोहू लागला. थोड्या वेळाने तो एका नदीच्या मुखाशी पोचला. ते पाहून रूपधरच्या जिवात जीव आला. आपल्याला वाचवण्यासाठी तो नदीची प्रार्थना करू लागला. कसातरी तो जमिनीवर पोचला आणि दुसऱ्याच क्षणी बेहोश होऊन पडला.



# अंतर

बेलापुरहून सुगंधपुर बारा मैल अंतरावर आहे. राजेंद्रला काही जरूरी कामासाठी तेथे जायचे होते. नोकर कामावर न आल्यामुळे त्याला स्वत:लाच घोडागाडी घेऊन जावे लागले.

गावापासून जेमतेम दोन मैलांवर आला असेल, इतक्यात त्याला बारा तेरा वर्षाचा एक मुलगा चिंताक्रान्त अवस्थेत वाटेत अुभा असलेला दिसला. राजेन्द्रने त्याला प्रेमाने विचारले, ''काय झालं रे बाळा? काळजीत दिसतोस? कुठं जायचंय तुला?''

''माझं गाव इथून दोन मैलांवर आहे. इथवर आलो कसाबसा; पण आता पुढे चालणं अशक्य झालंय मला. खूप थकलोय; पायही दुखत आहेत फार !'' मुलगा अुत्तरला.

राजेन्द्र त्याला म्हणाला, ''बस माझ्या गाडीत; मी सोडतो तुला तुझ्या गावी.''

दोन मैल पुढे गेल्यावर राजेन्द्रने गाडी थांबवून विचारले, ''कुठंय तुझं गाव.''

मुलगा म्हणाला, ''आता आणखी तीन मैल अंतर कापावं लागेल.''

आणखी तीन मैल गेल्यावर राजेन्द्र व्यंगाने म्हणाला, ''काय, आता तरी आलं का तुझं गाव?''

''नाही. आणखी सहा मैल जावं लागेल आता. तिथंच आहे माझ्या मामाचं गाव. मी जिथे गाडीत बसलो ना, तिथून मागे दोन मैलांवर माझे आई वडील रहातात. खरंच सांगतोय मी, खोटं नाही यात थोडं सुद्धा!'' मुलगा बोलला.

त्याचे बोलणे ऐकून त्याच्या लबाडपणाचे राजेन्द्रला मोठेच आश्चर्य वाटले!



# वचन भंग

दृढनिश्चयी राजा विक्रमादित्य पुन्हा झाडापाशी आला. त्याने झाडावरून प्रेत उतरवले आणि आपल्या खांद्यावर टाकले. तो नेहमीप्रमाणे स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतातील वेताळ बोलू लागला - ''हे राजा, कित्येक सूज्ञ व सत्प्रवृत्त माणसे कधी कधी वचनभंग करायला प्रवृत्त होतात. पण दोष तर त्यांचा स्वत:चा असतो. उदाहरणार्थ राणी कीर्तिमतीची गोष्ट मी तुला सांगतो. एका सुप्रसिद्ध देशाची राणी असून ही, तिने गंधर्वकन्या चित्रलेखा हिला दिलेले वचन निभावले नाही. गोष्ट ऐकता ऐकता तुझा थकवा ही अमळ दूर होईल. ऐक तर....'' वेताळ गोष्ट सांगू लागला:

चंद्रधर कुंदन देशाचा राजा होता, त्याच्या राणीचं नाव होतं कीर्तिमती. चंद्रधरच्या आईने तिला लहानपणीच आपल्या घरी आणून ठेवले होते. 'मी तुला आपली सून बनवीन'

## वेताळ कथा



असे वचन ही तिने तिला दिले होते.

चंद्रधर आणि कीर्तिमती लहानपणापासूनच एकमेकांच्या सान्निध्यात राहिले. त्यामुळे त्यांचे परस्पर प्रेम वाढत गेले. पण जेव्हा लग्नाचा प्रश्न पुढे आला, तेव्हा कीर्तिमतीने विवाहाला नकार दिला. तिच्या दृष्टीने चंद्रधर फारच रूपसंपन्न युवक होता. त्यामानाने तिचे स्वतःचे रूप साधारण होते.

मनमोहक व अद्‌भुत रूपवान चंद्रधर एका साधारण सुंदरी कीर्तिमतीशी लग्न करणार - या विषयावर सेवक-सेविका आपापसात कुजबुजत. 'चंद्रधर कीर्तिमतीशी लग्न करील ही, पण भविष्यात तो एकाद्या सुंदर गंधर्व-कन्येशी विवाह करील.' अशी भविष्यवाणी सर्व जण वर्तवू लागले.

कीर्तिमतीने ही बोलणी एक-दोनदा ऐकली पण, तिला फार वाईट वाटले. तिच्याच्याने हे सर्व सहन होईना आणि शेवटी एक दिवशी ती चन्द्रधरला म्हणाली - "मला वाटतं तुम्ही आपणाला योग्य अशा एकाद्या सुंदर स्त्रीशी विवाह करावा."

स्मितहास्य करीत चंद्रधर म्हणाला - "कीर्ति, अग मी लग्न केलं तर तुझ्याशीच करीन."

चंद्रधरच्या या बोलण्याने कीर्तिमतीचे बरेच संशय दूर झाले. काही दिवसांनी त्या दोघांचा विवाह ही थाटामाटात साजरा झाला. परंतु लग्नानंतर काही वर्षे जाऊन ही जेव्हा त्यांना अपत्य-लाभ झाला नाही, तेव्हा असंतोषाची सुरुवात झाली. आणि ही भावना दिवसें दिवस वाढू लागली.

अशा परिस्थितीत पौर्णिमेच्या रात्री पति-पत्नि जेव्हा नौका-विहार करीत होते, तेव्हा आकाश-मार्गातून जाणाऱ्या चित्रलेखा नावाच्या एका गंधर्व-कन्येने त्यांना पाहिले.

चित्रलेखा विद्युन्मय नावाच्या एका राजाची मुलगी होती. गंधर्व-लोकात सौंदर्य-सम्राज्ञी म्हणून ती प्रसिद्ध होती. सर्व गंधर्वगण तिच्या सौंदर्याची तोंड भरून स्तुति करीत. कुठल्या ही गंधर्व-पुरुषाशी ती लग्न करायला तयार नव्हती, कारण तिच्या दृष्टीने तिच्याशी विवाहाला योग्य असा कोणी युवक गंधर्व-



लोकी नव्हता. तिने जेव्हा तेजस्वी व अतिसुंदर चन्द्रधरला पाहिले, तेव्हा त्याच्यावर मोहित झाली. मनातल्या मनात ती त्याच्या सौंदर्याची प्रशंसा करू लागली. ती अदृश्य स्वरूपात त्याच्या मागे राहू लागली. हे दोघे राजदंपति असून संतान-प्राप्तीच्या अभावी दुःखी आहेत हे तिला समजलं.



चित्रलेखा गंधर्व-लोकी परत गेली खरी, पण तिला चैन पडेना. एक दिवशी चंद्रधर राजोद्यानात एकटाच हिंडत होता, तेव्हा ती त्याच्या समोर येऊन उभी राहिली. तिने आपला परिचय करून दिला आणि आपणाशी विवाह करण्याबाबत चंद्रधरला विनंती केली.

या अनपेक्षित घटनेचे चंद्रधरला खूप आश्चर्य वाटले. गोड स्वरात त्याने हा प्रस्ताव फेटाळून लावला.

तरी पण चित्रलेखा आपल्या परीने प्रयत्न करीतच राहिली. ती कीर्तिमतीला एकांतात भेटली. तिने तिला आपली इच्छा सांगितली आणि चन्द्रधरने नकार दिल्याचे ही सांगितले. मग ती कीर्तिमतीला म्हणाली - "चन्द्रधरचं तुझ्यावर फार प्रेम आहे. म्हणूनच माझ्या सारख्या रूपसुंदरीच्या प्रेमाची त्याने अवहेलना केली आणि तुझ्यासारख्या सामान्य स्त्रीबरोबर जीवन जगण्याचा त्याचा हट्ट आहे. त्याचा निर्णय म्हणजे काळ्या दगडावरील रेघ! सौंदर्याची गोष्ट जाऊं दे, पण तुझ्यापासून त्याला अपत्य-लाभ होणार नाही याबाबत तुला काय वाटतं? त्याला तू असाच राहू देणार का?" चित्रलेखेच्या या बोलण्याने कीर्तिमतीचे अंतःकरण व्यथित झाले. तरी दृढ स्वरात तिने प्रश्न केला - "अगोदर मला हे सांग की या साऱ्या गोष्टी तू मला कशासाठी ऐकवीत आहेस?"

चित्रलेखा म्हणाली - "मी उगाचच तुझ्याशी कशाला बोलू? जर तुला आपल्या नवऱ्याला सुखी पहावयाचे असेल आणि तू जर स्वार्थी नसशील तर आपल्या पतीने माझ्याशी विवाह करावा असे काही कर. त्याला समजाऊन सांगून माझ्याशी लग्नाला तयार कर. एक वर्षाच्या आत त्याला संतान-प्राप्ति होईल आणि त्याच्या जीवनात आनंदी-



आनंद होऊन जाईल. माझ्याशी विवाह केला की त्याचे तुझ्यावरील प्रेम कमी होईल असे समजू नकोस. उलट तुझ्या त्याग-वृत्तीमुळे तो प्रसन्न होईल आणि त्याचे तुझ्यावरील प्रेम वाढेल. तुझा निस्वार्थीपणा पाहून तो तुझी प्रशंसा करील. त्याच्या दृष्टीने तू महान् बनशील !''

कीर्तिमती थोडा वेळ काही बोलली नाही. मग म्हणाली - ''पण माझी एक अट आहे.''

आश्चर्याने चित्रलेखेने विचारले - ''अट? सांग बरं तुझी काय अट आहे?''

''आज चैत्र शुद्ध पंचमी आहे. आजपासून मला एक वर्षाची मुदत दे, येणाऱ्या चैत्र शुद्ध पंचमी पर्यंत मी जर माता बनू शकले नाही, तर चंद्रधरशी तुझे लग्न व्हावे यासाठी मी यथाशक्ति प्रयत्न करीन. मी तुला वचन देते.'' कीर्तिमतीने आपली अट सांगितली.

'ठीक आहे' म्हणून चित्रलेखा निघून गेली.

एक दिवशी कीर्तिमती देवीची पूजा करून जेव्हा मंदिराबाहेर पडली, तेव्हा कोपऱ्यात बसलेल्या एका वृद्ध साधूने तिला आपल्याकडे बोलवले.

कीर्तिमती साधूजवळ आली आणि नम्रतापूर्वक प्रणाम केला. मंदस्मित करीत साधूने तिला आशीर्वाद दिला आणि विचारले - ''मूल-बाळ नसल्यामुळे तू दुःखी आहेस. होय ना?''

कीर्तिमतीने होकारार्थी मान हलवली.

''जरा हात दाखव बरं!'' म्हणत त्याने तिचा डावा हात आपल्या हाती घेतला आणि हस्तरेषांचे निरीक्षण करीत म्हणाला - ''तुझ्या हातावर संतान-रेषा नाही. परंतु ती नसली तरी तुझं भविष्य उज्ज्वल दिसतंय! एक काम करू शकशील?''

''सांगा बरं, मी काय करू ते?'' कीर्तिमतीने विचारले.

''या देशाच्या उत्तरेला विद्रुम पर्वतराजी आहे हे तुला माहीत असेलच. या डोंगराच्या मध्यभागी एक दरी आहे. त्या दरीच्या उत्तर भागात महर्षि व्योमकेश यांचा आश्रम आहे. ते मोठे महात्मा आहेत. तू आपल्या नवऱ्यासह चैत्र शुद्ध पंचमीच्या सुप्रभाती तेथे जा.





महर्षींना सांग की शरत्कारने आपल्याला इथं पाठवलंय. मग काय करायचं ते ते तुला सांगतील.''

आता कीर्तिमतीच्या मनात आशा जागृत झाली. ती म्हणाली - ''स्वामीजी, मी आपल्या आदेशानुसार सर्व काही करीन. आम्ही उभयता तेथे अवश्य जाऊ.'' साधूला अभिवादन करून ती घरी परतली.

त्या दिवशी रात्री साधूचे सर्व बोलणे तिने आपल्या नवऱ्याला सविस्तार सांगितले आणि म्हणाली - ''ही माझी शेवटची संधि आहे. यावेळी आपलं भाग्य आजमावून पहावं असं मला वाटतं. तुम्ही मला मदत कराल?'' अधिक काही ती बोलू शकली नाही. गप्प राहिली.

पत्नीचा उद्वेग पाहून चंद्रधर म्हणाला - ''कीर्ति, अग आपण पति-पत्नी आहोत. सुख-दुःख आपण दोघांनी ही वाटून घ्यायचं आहे. मुलाची इच्छा केवळ तुलाच आहे असं नाही, मला ही आहेच की ! किती ही कष्ट झाले, तरी आपण दोघे ही तेथे जाऊ.''

मग कीर्तिमती आणि चंद्रधर दोघे ही महर्षींना भेटायला निघाले. चैत्र शुद्ध पंचमीच्या दिवशी सकाळी व्योमकेश ऋषींच्या आश्रमात पोचले. वयोवृद्ध दयाळू महर्षींनी मोठ्या प्रेमाने उभयतांचे स्वागत केले, त्यांचे कुशल-क्षेम विचारले.

चंद्रधरने आपल्याला अपत्य नसल्याचे दुःख महर्षींना सांगितले व कीर्तिमतीला देवळात भेटलेल्या साधु शरत्कार यांची गोष्ट ही सांगितली.

तेव्हा व्योमकेश म्हणाला - ''बेटा चंद्रधर, जरा तुझा उजवा हात दाखव बरं मला.''

महर्षि काही वेळ त्याच्या हातावरील रेषांचे निरीक्षण करीत राहिला. आणि नंतर म्हणाला - ''तुझ्या हस्त-रेषांमध्ये संतान-रेषा दिसत नाही. परंतु शरत्कारच्या कल्पनेनुसार एकादा अद्भुत चमत्कार घडू शकेल!''

''अद्भुत चमत्कार !'' राजदंपतीच्या आश्चर्याला पारावर राहिला नाही. व्योमकेश पुढे म्हणाला -



"तर मग त्याबाबतची माहिती मी आता तुम्हाला देतो. इथून तीन कोसांच्या अंतरावर एक शिवमंदिर आहे. त्या मंदिरात एक अतिप्राचीन आम्र-वृक्ष आहे. त्या वृक्षाला वर्षातून एकच एक फळ लागते. या झाडाखाली उभे राहून आपल्या इच्छापूर्तीसाठी जर कोणी श्रद्धापूर्वक परमेश्वराची प्रार्थना केली तर ते फळ थेट त्याच्या ओंजळीत येऊन पडते. मात्र ही इच्छा न्याय-संमत व धर्म-संमत असली पाहिजे. जर त्याची इच्छा धर्म-संमत नसेल तर फळ ओंजळीत न पडता जमिनीवर पडेल. ते फळ खाल्ले तर त्याचा काही उपयोग होणार नाही. ओंजळीत पडलेले फळ खाल्ले तर मात्र इच्छा-पूर्ति अवश्य होईल. रात्री चंद्रोदयाच्या वेळी तेथे जा आणि आपल्या भाग्याची परीक्षा पहा.

महर्षींचे हे बोलणे ऐकून कीर्तिमतीला अमळ संतोष वाटला. ती म्हणाली - "स्वामीजी, माझी दुसरी काही इच्छा तर नाही. एक विवाहित स्त्री म्हणून संतान-प्राप्तीची माझी इच्छा न्यायोचित व धर्मसंगत नाही का?"

कीर्तिमतीच्या या बोलण्यावर महर्षि विचित्रपणे हसत म्हणाला - "धर्माचे स्वरूप अति सूक्ष्म असते. धर्माची गूढता केवळ परमेश्वराला माहीत !"

नंतर महर्षींनी सांगितल्याप्रमाणे चंद्रधर व कीर्तिमती चंद्रोदयापूर्वी आंब्याच्या झाडाखाली पोचले. झाडावर एकच एक आंबा सुवर्ण-फळासारखा चमकत होता. कीर्तिमतीने त्या फळाकडे मोठ्या भक्तिभावाने पाहिले व नमस्कार केला. आपली ओंजळ पुढे करीत ती उभी राहिली. चंद्रधर ही थोड्या अंतरावर ओंजळ पुढे करून उभा राहिला. चंद्रधर असे करील अशी कीर्तिमतीने कल्पना ही केली नव्हती.

चंद्रोदय झाला. झाडावरील एकुलता एक आंबा हळू हळू खाली आला आणि चंद्रधरच्या ओंजळीत येऊन पडला.

हे दृश्य पाहून कीर्तिमती स्तब्ध झाली. पण थोड्याच वेळात तिने आपल्याला सावरले. चंद्रधरने अर्धा आंबा कीर्तिमतीला दिला आणि



तिने तो आनंदाने स्वीकारला. दोघांनी ही अर्धे अर्धे फळ खाल्ले.

आतापर्यंत मौन असलेली कीर्तिमती म्हणाली - "प्रभु, आपली काय इच्छा आहे ते मला सांगाल?"

गंभीरपणे चन्द्रधरने उत्तर दिले - "कीर्ति, तू स्वतः विद्यावती आहेस, विवेकसंपन्न आहेस. मी जे काही बोलतो व करतो, त्यामुळे तुला आनंद होत असावा असे मला वाटते. महर्षींनी सांगितलेल्या गोष्टी तू विसरली नसशील. ते म्हणाले होते की आपली इच्छा धर्मसंमत असली पाहिजे. आपल्याला अपत्य नाही ही आपल्यातील एक उणीव आहे. पण सृष्टीच्या संबंधात याचा विचार केला, तर यात काही अधर्म आहे असे मला वाटत नाही. विधि-विधान अपूर्व असते. आपण त्याचा आदर केला पाहिजे. आपण त्यात बदल करू शकत नाही! असेच काही विचार माझ्या मनात येत राहिले. चोर चोरी करून धन कमवतो, अग्नीला साक्षी ठेवून विवाह-बंधनात बांधून घेतलेला नवरा निःसंतान पत्नीची उपेक्षा करून अन्य स्त्रीशी विवाह करतो - ही कामं धर्मविरुद्ध आहेत. गेले काही दिवस मी वंशवृद्धीसाठी असे धर्म-विरुद्ध कार्य करावे यासाठी मला आग्रह करण्यात येत आहे. म्हणून मी आज या पवित्र वृक्षाला प्रार्थना केली - "हे धर्ममूर्ति, आम्हाला आशीर्वाद दे की अग्नीच्या साक्षीने पवित्र विवाह-बंधनात



बांधले गेलेले आमचे जीवन शेवट पर्यंत आनंदाने व्यतीत व्हावे."

कीर्तिमतीला थोडे वाईट वाटले खरे, पण दुसऱ्याच क्षणी तिचा आनंद गगनात मावेना. संतति नसली तरी असा उत्तम व आदर्श पति मिळवून आपण धन्य झालो असे तिला वाटले. दुसऱ्या दिवशी पति-पत्नी आपल्या राजधानीला परत आले. काही दिवसांनंतर चैत्र शुद्ध पंचमीच्या दिवशी आपल्या वायद्यानुसार चित्रलेखा कीर्तिमतीला येऊन भेटली.

कीर्तिमतीने मोठ्या प्रेमाने तिला बसवले व तिचा आदर-सत्कार करून म्हणाली - "चित्रलेखे, मला क्षमा कर. मी वचन-भंगाचे

पाप करीत आहे. माझा नवरा एकपत्नीव्रती आहे !'' आणि घडलेली सारी कहाणी तिने चित्रलेखेला ऐकवली.

आशीर्वाद देत चित्रलेखा म्हणाली - ''कीर्तिमती, तू मोठी भाग्यवान आहेस, तू लवकरच माता बनशील !'' आणि ती निघून गेली.

एक वर्षात कीर्तिमती खरोखरच माता बनली. तिला एक सुंदर मुलगा झाला.

एवढी गोष्ट ऐकवून आता वेताळाने राजाला प्रश्न केला- ''राजा, कीर्तिमतीने वचन-भंग तर केलाच. यात तिचा स्वार्थ स्पष्ट दिसतो. हातावर संतान-रेषा नसताना ही ती माता बनली ही मोठी विचित्र गोष्ट नाही का? माहीत असून ही माझ्या या शंकेचे निराकरण केले नाहीस, तर तुझ्या मस्तकाचे तुकडे-तुकडे होतील हे तू जाणतोसच.''

शंकेचे समाधान करीत राजा विक्रमादित्य म्हणाला - ''कीर्तिमतीने स्वार्थी बनून वचन-भंग केला असं म्हणता येणार नाही. निःसंतान राहून धर्म-संमत कार्य करण्याच्या तिच्या नवऱ्याच्या प्रवृत्तीमुळे ती असहाय्य बनली होती. तिने दिलेले वचन पाळले असते, तर चंद्रधरच्या म्हणण्यानुसार ते धर्मविरुद्ध वर्तन झाले असते. तेव्हां ते पाप तिला करायचं नव्हतं. चंद्रधरच्या प्रार्थनेतील हे द्वंद्व आपण समजून घेतले पाहिजे. एक आहे - विधिलिखित बदललं जावं आणि त्याला संतान-भिक्षा प्राप्त व्हावी. यामुळे पति-पत्नीचे जीवन आनंदाने भरून जाईल. दुसरी गोष्ट आहे - दुर्भाग्याने संतान-प्राप्ति न झाली तरी परमेश्वराने आशीर्वाद द्यावा की त्यांना जीवनात आनंद उपभोगता येईल. चन्द्रधरच्या धर्म-सूत्रातील ही सूक्ष्मता आपल्या लक्षात आली पाहिजे. आणि यामुळेच त्याची भाग्य-रेषा बदलून गेली. चंद्रधरला धर्म-अधर्माचे सखोल ज्ञान होते. आणि म्हणूनच त्याच्या प्रार्थनेमुळे असाध्य ही साध्य झाले.''

अशा रीतीने राजाचा मौन-भंग झाल्यावर वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला.





# मुंबईच्या वाटेवर

मूळ पाठ : मीरा नायर ■ चित्रकारी : गौतम सेन



▲ दमण - समुद्रकिनाऱ्यावरील झाडांच्या रांगा

▼ डहाणूचे सुप्रसिद्ध चिकू



दमण हा गुजराथ व महाराष्ट्र यांच्या मधे असणारा केन्द्रशासित प्रदेश आहे. याच्या किनाऱ्याची लांबी १२ कि.मी. असून त्यावर मासे पकडण्याऱ्या कोळ्यांची सुंदरशी लहान लहान खेडी वसलेली आहेत. संपूर्ण किनाऱ्यावर खडशेरणीची (कॅज्युरिना) झाडे आहेत. मोती व नानी दमण हे किल्ले पूर्वी इथे शासन करणाऱ्या वसाहतवाल्या पोर्तुगीजांची आठवण देत उभे आहेत.

गुजराथचा सागरकिनारा दमणपर्यन्त येऊन संपतो आणि दमणनन्तर ७२० कि.मी. लांबीचा कोकणकिनारा सुरु होतो. याच्या उत्तर टोकाला सागरकिनारी शान्त असे डहाणू शहर वसलेले आहे. १८८० मधे इथे येऊन इराणी लोकांनी या जागेचे फळबागांच्या क्षेत्रात रूपान्तर करेपर्यन्त ही फक्त काही झाडे झुडपे असणारी ओसाड जागा होती.

डहाणू शहर तेथील चिकूसाठी फार प्रसिद्ध आहे. हा आपल्या देशांतील मुख्य चिकू उत्पादनाचा प्रान्त आहे. इथले चिकू मुंबईला नेले जाऊन, तेथून देशभर त्यांचे वाटप केले जाते.

डहाणूपासून मुंबईपर्यन्तच्या अर्ध्या किनारी

रस्त्यावर नाला सोपारा हे खेडेगाव आहे. प्राचीन काळी हे एक गजबजलेले बंदर असताना त्याला 'शूर्परक' नावाने ओळखले जाई. शूर्परक वरून नाव मिळालेली 'सुपारी' व्यापाराची मुख्य वस्तु होती. मलबार व अन्य भागातून सुपारी इथे आणली जाअून नंतर ती अुत्तरेकडील निरनिराळ्या ठिकाणी पाठवली जात असे. मोत्याचे शिंपले वेचणे हा इथला एक महत्त्वाचा अुद्योग होता आणि त्यातून काढलेले मोती चीनमधे पाठवले जात.

अशी एक दन्तकथा आहे की गौतम बुद्ध आपल्या एका पूर्वावतारात येथे जन्मला होता. या प्रदेशात स्तूप इत्यादि अनेक बौद्ध अवशेष सापडले आहेत.

नाला सोपारापासून दहा कि.मी. दक्षिणेकडे असणाऱ्या वसईत पाण्डीचा बोटी बांधण्याचा कारखाना आहे. इथला सागरकिनारा पूर्वी खैर, कळंब, साग वगैरे झाडांनी व्याप्त होता. हे लाकूड बोटी बांधण्यासाठी अुत्तम समजले जाते. पोर्तुगीजांच्या शासनाखाली १६ व्या व १७ व्या शतकात बोटी बांधायच्या अुद्योगाची चांगलीच भरभराट झाली होती. आपला दिमाख दाखवणाऱ्या किल्ल्यांचे, चर्चेसचे आणि अमीर अुमरावांच्या रहाण्याच्या हवेल्यांचे अवशेष आजही त्या काळच्या पोर्तुगीज शासकांची आठवण करून देतात. आज मुंबई शहराला भाजीपाला पुरवण्याचे वसई हे एक महत्त्वाचे केन्द्र आहे.


वज्रेश्वरीचे गरम पाण्याचे झरे

या प्रान्तातून वहाणाऱ्या तानसा नदीच्या खोऱ्यात व आसपास अनेक ठिकाणी 'अुन्हेरी' म्हणजेच गरम पाण्याचे झरे आहेत. त्यात वज्रेश्वरी व गणेशपुरी येथील झरे जास्त प्रसिद्ध आहेत. वज्रेश्वरी हे स्थान वसईरोड रेल्वे स्टेशन पासून १० कि.मी. अंतरावर आहे. यांतील बऱ्याच झऱ्यांभोवती हौद व टाक्या बांधण्यात आलेल्या आहेत. या पाण्याचे तापमान सामान्यतः ११० ते १३५ फॅरनहाईट इतके असते. तीव्र गंधकाच्या वासाचे बुडबुडे या पाण्यातून बाहेर पडत असतात. गणेशपुरीच्या एका झऱ्याचे तापमान इतके जास्त आहे की, त्यात हात बुडवणेही अशक्य होते.

मुंबईच्या बोरिवली या अुपनगरापासून जवळच कान्हेरी कोरीवलेणी आहेत. कान्हागिरी टेकड्यांवरून लेण्यांना हे नाव मिळाले आहे. पश्चिम भारतातील सर्वात मोठा असा बौद्ध लेण्यांचा हा गट आहे. ही एकूण १०७ लेणी आहेत. या गुहांमधे बौद्ध भिक्षूंनी इसवी सनाच्या दुसऱ्या व दहाव्या शतकात केलेली कोरीवकामे, शिल्पे, स्तंभ व स्तूप आहेत. झऱ्यांवरील हौदातून येथे वर्षभर पाणीपुरवठा होतो. सांडपाण्याच्या निचऱ्याची व पावसाळ्यातील अधिक पाणी टेकडीवरून नळांच्या साह्याने खाली नेण्याची फार अुत्तम व्यवस्था इतक्या जुन्या काळात केलेली असल्याचे आढळते.

येथील सर्वात आकर्षक अशा दोन गुफा म्हणजे दरबार व चैत्यगुंफा होत. दरबार गुंफेच्या मुख्य आयताकृती जागेत दगडी ठेंगण्या बाकांच्या ओळी आहेत. बौद्ध भिक्षु या बाकांचा बहुधा प्रार्थना सभांसाठी अुपयोग करत असावेत. भव्य चैत्य गुंफेत एक प्रचंड स्तूप व बुद्धाच्या मोठाल्या

*मुंबईपासून ३५ कि.मी. वरील वसईचा किल्ला*



*कान्हेरीच्या चैत्यगुंफेतील स्तूप*



*कान्हेरी येथील महान् चैत्यलेणे*



*कान्हेरीची चैत्यगुंफा*





*अंबरनाथ येथील शिवमंदिर*

मूर्ती आहेत.

जोगेश्वरी येथील या कान्हेरी लेण्यांपासून थोड्या कि.मी. अंतरावर दगडात कोरलेले एक शिवमंदिर आहे. आठव्या शतकाच्या दुसऱ्या भागात ते बांधले गेले आहे.

मुंबईपासून ५४ कि.मी. दूर असणाऱ्या अंबरनाथ येथील शिवमंदिर ही खूप प्रसिद्ध आहे. हे मंदिर एका खोलगट जागेत काळ्या पाषाणाने बांधलेले आहे. स्वयंभू मानले गेलेले इथले शिवलिंग जमिनीपासून आठ फूट खोल आहे. पाकिस्तानातून आलेल्या सिंधी लोकांनी अंबरनाथला वस्ती केल्यापासून या मंदिराची भरभराट झाली आहे.

मुंबईच्या सीमेवरील ठाण्याच्या खाडीपलिकडे ठाणे शहर वसले आहे. खाडीकडेच्या लांबच लांब पट्ट्यात भरतीच्या पाण्याची दलदल व मिठागराचे वाफे आहेत. खाडी अरुंद असून ती ठाण्यापासून ते मुख्य भूमीवरील ट्रॉम्बेपर्यंत दक्षिणोत्तर १८ कि.मी. पसरलेली आहे.

ट्रॉम्बे येथे आपल्या देशातील सर्वात प्रमुख असे 'भाभा अॅटॉमिक रीसर्च सेंटर' हे अणुसंशोधन केन्द्र आहे.



*भाभा अणु संशोधन केन्द्र*



# वाईट स्वप्न

चमेली मोठी गर्विष्ठ होती. आपली सासू मंगला हिला तर ती कस्पटासारखी माने. तिला जे काही थोडं फार खायला देई तोही तिला 'आपण मोठा अुपकार करतोय' असे वाटे, मोठे पुण्यकार्य केल्यासारखे वाटे. सासूने कोणतेही काम केले तरी चमेली त्यात खोट काढी.

सासू देवळातून परत आली की चमेली तिला विचारी, "काय सुनबाई मरून जावी, तिचा सर्वनाश व्हावा, असा काही नवस बोलून आलात की नाही?"

सुनेला घाबरून बिचारी मंगला कुठेही बाहेर जायचे सोडून नुसतीच बाहेरच्या कट्ट्यावर जाअून बसली, की चमेली म्हणे, "हुं:! येणारी-जाणारी माणसं मोजत बसला आहात काय? पोटभर खायचं, अन् बसायचं रिकामटेकडं ! तेंव्हा इतकंही काम न केलं, तर पचेल कसं खाल्लेलं?"

जेवताना आणखी थोडं वाढायला सांगितलं तर चमेली सासूला म्हणे, "काय म्हणलात? आणखी हवंय? पण आणू कुठून आणखी? असं खात राहिलात, तर दिवाळंच काढाल की मुलाचं!" अन् इतके बोलून पानात अगदीच थोडेसे वाढल्यासारखे करी.

एकाद्या दिवशी काहीही न बोलता मुकाट्याने वाढलेलेच फक्त जेवली तर चमेली सासूला, "न खाअून आजारी पडलात अन् बिछान्यावर पडून राहिलात, तर तुमच्या सेवेला इथं कोणी दासदासी नाहीयेत." असे म्हणून भांड्यातले सगळेच अन्न तिच्या ताटात अुपडे करी.

सुनेच्या असल्या वागण्याने मंगला बिचारी दु:खी झाली. चमेलीच्या नवऱ्याला-चन्द्रूला-हे सारे दिसे, कळे; पण बायकोपुढे त्याचे काहीच चालत नसे. तिच्यापुढे तो अगदी ओठ शिवून राही. बायकोने 'अूठ' म्हटले, तर

शरदिनी कोल्हापुरे



अुठावे, 'बस' म्हटले, तर बसावे अशी त्याची वागणूक असे. याचे एकच कारण होते - ते म्हणजे चन्द्रूची निर्धनता ! स्वतः काही अुद्योग सुरू करावा, इतके भांडवल त्याच्याजवळ नव्हते. चमेलीच्या बापानेच त्याला फुलांचा व्यापार सुरू करून दिला होता.

दिवसाकाठी एकदा तरी चमेली चन्द्रूला म्हणेच, "पहा, माझ्या बाबांचीच कृपा आहे ही ! त्यांनी मदत केली नसती, तर तुम्हाला अन् तुमच्या आईला कुठेतरी मोलमजुरी करून आयुष्य कंठावं लागलं असतं."

एके दिवशी सकाळी सकाळीच चमेलीला एक भयानक स्वप्न पडले. अन् दचकून एकदम पलंगावर अुठून बसली. स्वप्नात तिला असे दिसले की, दाट ढगांनी व्याप्त आकाशातून चार माणसे लाकडांना बांधलेले कसलेसे ओझे घेअून जात आहेत अन् त्यांच्या मागोमाग एक म्हातारी हमसून रडत चालली आहे. तिने आपले स्वप्न चन्द्रूला सांगून विचारले, "या स्वप्नाचा काय अर्थ असेल बरं? या भयानक स्वप्नानं माझी झोप अुडाली अन् मला खूप भीतीही वाटतेय."

चन्द्रूने थोडा विचार केला आणि आपल्याला सर्वकाही समजल्यासारखा चेहरा करत तो म्हणाला, "दिवसा आपल्याला दिसणाऱ्या स्वप्नांना घाबरण्याचं काही कारण नाही; पण रात्रीची स्वप्नं मात्र फार धोकादायक असतात. मुख्यतः चौथ्या प्रहरातली स्वप्न तर फारच धोक्याची ! ती अगदी खरी होतात. आता अगोदर सांग पाहू, तुला हे स्वप्न कोंबडा आरवल्यानन्तर पडलं की अगोदर ?"

चन्द्रूच्या बोलण्यावर चिडत चमेली म्हणाली, "वा रे वा ! असं भाषण चालवलंयत की जसे काही स्वप्न-शास्त्र पचवून बसला आहात! तुम्हाला तर चमेली अन् कमळ या फुलांमधला फरकही नाही कळत! मला रडवण्यासाठी सारं नाटक चाललंय काय?"

चन्द्रू गंभीरपणे म्हणाला, "ही काही खेळ किंवा हसवण्यारडवण्याची गोष्ट नव्हे. तुझ्या वाईट स्वप्नामुळे मी आणि तू, म्हणजे आपण दोघंही मोठ्या संकटात पडणार आहोत. आपल्या गावच्या पूर्वेस जो तलाव आहे नं,



त्याच्या अुत्तरेकडच्या बाभूळवनात एक मुका बैरागी आलाय बघ. गेलं वर्षभर तो कुठेकुठे फिरत होता. चार दिवसांपूर्वीच परत इथे आला आहे तो. स्वप्नांचा अर्थ छान कळतो त्याला. एक वर्षापूर्वी, म्हणजे आपल्या लग्ना-आधी माझ्या एका स्वप्नाचा अर्थही त्यानंच सांगितला होता मला."

चमेलीने कुतुहलाने यावर विचारले, "तुम्हाला सुद्धा असं काही वाईट स्वप्न पडलं होतं?"

"वाईट नव्हतं, चांगलंच स्वप्न पडलं होतं मला." चन्द्रू बोलला. अुत्सुकतेने चमेलीने म्हटले, "मग सांगा बरं ते चांगलं स्वप्न?"

"हं, ऐक! स्वप्नात मी एका सुंदर तरुणीच्या मागेमागे चाललो होतो. ती मला एका फुलबागेत घेअून गेली आणि अचानक नाहीशी झाली!"

"बरं झालं; छान झालं!" चुटकी वाजवून हसत चमेली म्हणाली.

"अगं मला सांगू दे तर खरं! मधेमधे बोलू नकोस. मी मग स्वप्नाबद्दल त्या बैराग्याजवळ बोललो. बराच वेळ विचार करून तो म्हणाला, - 'तुझ्याशी लग्न करणारी मुलगी तुझ्या जीवनात नंदनवन फुलवील. तिचं नावही एका फुलाचंच असेल. बघ, त्याचं बोलणं अगदी खरंच निघालं ना?"

"हो, खरंच निघालं. पण तुम्ही तर म्हणत होता, की बैरागी मुका आहे? त्यानं कसं



सांगितलं हे सारं?" चमेलीने शंका व्यक्त केली.

"तुला तो सगळं बोटानं जमिनीवर लिहून दाखवील. जा संध्याकाळी त्याच्याकडे, अन् आपल्या वाईट स्वप्नाबद्दल विचार त्याला." चन्द्रूने सांगितले.

संध्याकाळी चमेलीने आपल्या सासूला ओरडून बजावले, "मी बाहेर चाललेय. माझ्या अनुपस्थितीचा फायदा घेअून शेजारघरी जाअून बसू नका. आपल्या घराकडे लक्ष ठेवा नीट." अन् ती बैराग्याला भेटायला बाभूळवनाकडे निघून गेली.

चमेलीची चाहूल लागताच बैराग्याने आपले डोळे अुघडले. आणि तो आपल्या लांब दाढीवरून हात फिरवू लागला. चमेली जरा



दूर बसली. मोठ्या श्रद्धेने त्याला नमस्कार करून नंतर तिने विचारले, "स्वप्नांचा अर्थ सांगू शकणारे महात्मा आपणच का स्वामीजी?"

"स्वप्नांचा अर्थ विचारलास, तर सांगू शकेन. पण मी काही कुणी महात्मा वगैरे नव्हे." बैराग्याने मातीत लिहून सांगितले.

चमेलीने आपले स्वप्न सविस्तर सांगून विचारले, "या वाईट स्वप्नाचा काय अर्थ स्वामी?"

बैराग्याने काही वेळ डोळे मिटून घेतले. नंतर डोळे उघडून त्याने लिहिले, "तुला स्वप्नात जी व्यक्ती दिसली तिचं नाव मला आठवत नाहीय. पण ज्याला ते ओझं बांधलं होतं, ते पापी माणसांना नरकात पोचवायचं साधन होतं. तू ही लवकरच नरकात जाणार आहेस."

ते वाचून चमेली एकदम घाबरली. ती म्हणाली, "स्वामी, ज्या चार माणसांना पाहिलं, ती माणसं आपलं ओझं ढगातून वाहून नेत होती. नरक तर खाली पाताळात आहे ना?"

हा प्रश्न ऐकून आपल्या दाट दाढीत हसत बैरागी म्हणाला, "तू पाहिलेस ते ढग नव्हेत. दिली जाणारी शिक्षा सहन न झाल्यानं पापी लोकांच्या डोळ्यातल्या पाण्याची वाफ होती ती!" अर्थात् हे सर्व त्याने जमिनीवरच लिहून सांगितले.

आता मात्र आपण बेशुद्ध पडणार असे चमेलीला वाटले. पण स्वतःला कसेबसे सावरत दीन स्वरात ती बोलली, "माझं नुकतंच लग्न झालंय. मला अजून एकादं मूलही नाही झालेलं. इतक्याशा वयात माझी अशी दुर्दशा का व्हावी? मागोमाग रडत येणारी म्हातारी म्हणजे माझी आईच ना?"

"अहं! ती रडणारी म्हातारी तुझी आई नव्हे. ती तर सासू होती तुझी. तुझ्यावर मनापासून प्रेम करणारी जगात तीच एक बाई आहे. ती मेल्यावर तिच्या एकुलत्या एका मुलाची काळजी वहाणारी तूच असशील नं? अन् त्याला मुलं देऊन त्याचा वंश तूच पुढे चालू ठेवणार नं? म्हणूनच तिचं तुझ्यावर फार प्रेम आहे. ज्या वेळी तुझं प्रेत पलंगावरून खाली जमिनीवर ठेवलं गेलं, तेव्हा तीच बिचारी एकटी काय ती रडत राहिली. इतक्या चांगल्या बाईला तू जरा सुद्धा मान देत नाहीस, एकाद्या कुत्र्यासारखी वागवतेस तू तिला. दिवसेंदिवस तुझा पापाचा भार वाढत आहे. तो डोक्यावर उचलून लवकरच तू नरकात जाणार आहेस." बैराग्याने लिहिले.

ते वाचून पश्चात्तापाने चमेलीच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. तिने विचारले, "या पापाला काहीच प्रायश्चित्त नाही का? या आपत्तीतून मार्ग सुचवून तुम्हीच उद्धार करा माझा."

डोळे बन्द करून बैरागी पुन्हा विचार करू लागला. हातातली काठी हवेत फिरवून त्याने मातीत लिहिले, "आहे की मार्ग! अगदी या क्षणापासून सासूला मान द्यायला लाग. तिला आपला प्राणच समज. ती नक्की क्षमा करील तुला. मग तुझ्या वाईट स्वप्नाचा दोष दूर होईल. तुझं आयुष्य वाढून, मुलं होऊन तू सुखी होशील."

नंतर इशाऱ्याने बैराग्याने तिला परत जायला सांगितले. घरी पोचल्याबरोबर मंगलेचे पाय धरून चमेली म्हणाली, "सासूबाई, गर्वामुळं मी आजपर्यन्त फार त्रास दिला तुम्हाला. अज्ञानानं मी आपलं कर्तव्यही विसरले. क्षमा करा मला!"

दुसऱ्या दिवशी परसातल्या विहिरीवर चन्द्रू आंघोळ करत असताना, झाडांना पाणी घालायच्या निमित्ताने तेथे जाऊन मंगला म्हणाली, "अरे, सुनेत हा आमूलाग्र बदल कसा झाला?"

हसत चन्द्रू म्हणाला, "हा सर्व तिच्या वाईट स्वप्नाचा प्रभाव, अन् बैराग्याची महत्ता!"

"मग मीही जाते त्याचं दर्शन घ्यायला." मंगला म्हणाली.

चन्द्रू एकदम म्हणाला, "अग आई, ते नाही जमायचं. कारण सकाळीच तो दुसरीकडे निघूनही गेला!"

'बैरागी आपणच होतो' ही गोष्ट चन्द्रूने आईलाही सांगितली नाही.





# विंचवाचा डंख

एका गावात दोन मित्र रहात होते. त्यातला पद्मनाभ हा स्वभावाने प्रेमळ होता अन् धर्मवीर होता कंजूष. पद्मनाभला मूलबाळ नव्हते, त्यामुळे तीर्थयात्रा करून पुण्यसंचय करायचे त्याने ठरवले. त्याच्याजवळ दोनशे मोहोरा होत्या. त्यातल्या शंभर आपल्याबरोबर वाटखर्चासाठी न्यायचे ठरवून उरलेल्या शंभर तीर्थयात्रेला निघण्यापूर्वी कोठे तरी सुरक्षित ठेवाव्या असा विचार त्याने केला. पण ही रक्कम कोठे लपवावी, हे त्याला कळेना. त्याने आपला मित्र धर्मवीर याच्याजवळ सल्ला विचारला.

धर्मवीर म्हणाला, "तुझी रक्कम आपल्याजवळ ठेवली तर माझ्या हातून ती एकादे वेळी खर्च होईल अशी भीती मला वाटतेय. तेंव्हा गावाबाहेरचं मोठं वडाचं झाड आहे ना, त्याच्याखाली तू या मोहोरा पुरून ठेवाव्यास हे बरं. कोणाला कळणारही नाही. तू परत आलास, की ते काढून म्हणजे झालं."

पद्मनाभला मित्राचा हा सल्ला पटला. पण दिवसाढवळ्या झाडाखाली रक्कम पुरली, तर कोणी पाहील अशी भीती वाटल्याने हे काम अंधारात करावे असे पद्मनाभने ठरवले. अंधारात एकट्याने जायचे भय वाटल्यामुळे त्याने धर्मवीरलाही बरोबर नेले. त्याच्या समक्षच पद्मनाभने जमीन खोदून त्यात शंभर मोहोरा ठेवून खड्डा बुजवला. दुसऱ्याच दिवशी आपल्या बायकोसह तो तीर्थयात्रेला निघून गेला.

आपला नवरा त्या रात्री बराच उशीरा घरी आलेला पाहून धर्मवीरच्या बायकोने त्याला कारण विचारले. पद्मनाभने वडाखाली मोहोरा पुरून ठेवल्याची बातमी त्याने तिला सांगितली. त्याबरोबर त्याच्या बायकोची बुद्धी फिरली. तिने ती रक्कम काढून आणण्याबद्दल नवऱ्याजवळ हट्ट धरला. प्रथम धर्मवीरने ते कुकर्म करायला नकार दिला. पण तसे न केल्यास विहिरीत उडी मारून जीव देण्याची धमकी बायकोने देताच तो त्या झाडाकडे गेला अन् त्याने रक्कम काढून आणून तिला दिली. तिने त्यातून स्वतःसाठी दागिने घडवले.

काही दिवसांनी पद्मनाभ परत आला. त्याच दिवशी वडाखाली जाऊन त्याने जमीन खोदली. पण तिथे मोहोरा नव्हत्या. हे काम धर्मवीरचेच असल्याचे त्याने ओळखले. सरळ गावपाटलाकडे जाऊन त्याने तक्रार नोंदवली.

सर्व हकिकत कळल्यावर पाटील म्हणाला, "पद्मनाभ, आता काही उपयोग नाही. तू मागून धर्मवीर धन नक्की परत देणार नाही. वडाखाली तू मोहोरा पुरल्यास, याला कोणी साक्षीदारही नाही. तेंव्हा एक काम कर." अन् त्याने त्याच्या कानात काही सांगितले.

पद्मनाभ तेथून सरळ धर्मवीरकडे गेला. त्याला पाहून धर्मवीरचे हृदय भीतीने धडधडू लागले. पण पद्मनाभच्या चेहऱ्यावरून त्याला अजून काही कळल्याचे जाणवत नव्हते. तो अजून वडाकडे गेलाच



नसावा असे वाटून धर्मवीर त्याचे स्वागत करत उत्साहाने म्हणाला, "अरे, ये ये पद्मनाभ. कशी झाली यात्रा?"

"हो, तुझ्या दयेने यात्रा छानच झाली. पण आता परत आपल्या दोघांना वडाखाली जायला हवं. कारण, यात्रेत सौभाग्यानं मी एक हजार मोहोरा कमवू शकलो. आता ते धनही पहिल्या ठिकाणीच गाडून ठेवायचंय. मग निश्चिन्त होऊन या खेपेला काशीयात्रा करायचा विचार आहे माझा. उद्या रात्री येईन मी तुझ्याकडे. मग दोघं मिळून वडाकडे जाऊ." पद्मनाभ बोलला.

हे ऐकून धर्मवीर घाबरलाच! 'हो'

**अशोक वारसोडे**

म्हणून त्याने पद्मनाभला रवाना केला. नंतर लगेच त्याने ही हकीकत बायकोला सांगून म्हटले, "आता अडकलो की मी ! कसा जाऊ उद्या त्याच्याबरोबर मी? माझी चोरी उघड होईल ना!"

"इतके काय भिता? माझे दागिने गहाण ठेवून मोहोरा आणा अन् आजच त्या पुन्हा वडाखाली लपवून या. त्या पाहून विश्वासानं पद्मनाभ आपल्या हजार मोहोराही तिथेच ठेवील. तो यात्रेला गेला की आपला आणखीच फायदा होईल ना?" धर्मवीरची बायको बोलली.

बायकोच्या हुषारीवर खुश होऊन धर्मवीर दागिने गहाण ठेवून शंभर मोहोरा घेऊन आला आणि त्याने त्या वडाखाली पुरून टाकल्या.

दुसऱ्या दिवशी रात्री धर्मवीरने पद्मनाभाची खूप वाट पाहिली. पण त्याचा काहीच पत्ता नाही. शेवटी मध्यरात्री पद्मनाभकडे जाऊन त्याने त्याचा दरवाजा ठोठावला. झोपलेला पद्मनाभ डोळे चोळत आला अन् त्याने विचारले, "काय झाल धर्मवीर इतक्या मध्यरात्री कसा काय आलास?"

"अरे, तूच तर आज रात्री वडाखाली जायचं म्हणाला होतास ना?" धर्मवीरने विचारले.

"ओहो, त्या कामासाठी आलास होय? मी आपली काशीयात्रा रद्द केल्याचं तुला सकाळी येऊन सांगणार होतो. संध्याकाळी एकटाच जाऊन झाडाखालच्या मोहोरा काढूनसुद्धा आणल्या मी !"

आता धर्मवीर एकदम गारच पडला ! घरी येऊन दुःखाने त्याने सर्व काही बायकोला सांगितले. ती रडू लागली.

ती म्हणाली, "इतकं फसवलं त्यानं? आता गहाण टाकलेले दागिने आणायचे कसे?" धर्मवीरही रडू लागला. पण करणार काय? चोरी करायला गेला, अन् विंचवाने डंख मारला. सांगणार कोणाला? ओठ शिवून बसण्यावाचून गत्यंतरच नव्हते.





# महाभारत

अग्निहोत्रने आपले दुःख जेंव्हा ब्रह्मदेवाला निवेदन केले, तेंव्हा क्षणभर विचार करून ब्रह्मदेवाने त्याला सांगितले, "नर-नारायण हे कृष्ण-अर्जुन बनून पृथ्वीवर अवतरित झालेले आहेत. ते लवकरच खांडववन प्रान्ताकडे येणार आहेत. वेळ पाहून तू त्यांना भेट. त्यांनी तुला मदत करायचं मनावर घेतलं, तर इन्द्रच काय, सर्व देव मिळून सुद्धा तुझं काहीही नुकसान करू शकणार नाहीत. तुझं काम निर्विघ्नपणे पार पडेल."

त्यासाठीच अग्नि आज कृष्णार्जुनांची मदत मागायला आला होता.

अर्जुन अग्निहोत्रला म्हणाला, "अग्निहोत्रा, इन्द्रादि देवतांशी लढण्यासाठी कोणत्या अस्त्रांचा उपयोग करायला हवा, हे मला माहीत आहे. परन्तु आत्ता माझ्याजवळ चांगलं धनुष्यही नाहीय अन् उत्तम घोडे जोडलेला मजबूत रथही नाहीय. मला अन् कृष्णाला जरूर ती अस्त्रं देण्याची व्यवस्था केलीस, तर तुझी इच्छा पूर्ण होऊ शकेल." अग्निहोत्रने वरुणाचे स्मरण केले अन् वरुण प्रकट झाला. अग्निहोत्र त्याला म्हणाला, "महाराज, चन्द्राने तुम्हाला गांडीव धनुष्य आणि अक्षय भाता दिला आहे, कपिध्वजाकडून सुसज्ज असा रथही मिळाला आहे तुम्हाला. याशिवाय तुमच्याजवळ चक्र आयुधही आहे. मला या सर्व वस्तूंची गरज आहे. त्या मला उधार द्या ना."

अग्निहोत्रने मागितलेल्या सर्व वस्तु त्याला वरुणाने दिल्या. अन् त्याने त्या कृष्णार्जुनांहाती सुपूर्त केल्या. कृष्णाने सुदर्शनचक्र घेतले अन् अर्जुनाने गांडीव धनुष्य व अक्षय भाता उचलला. गांडीव हे काही सामान्य धनुष्य नव्हते. ते एकटेच



लाख आयुधांइतके प्रभावशाली होते. रथ व अक्षय भाता यांची निर्मिती विश्वकर्माने खूप पूर्वीच केलेली होती. देव व असुरांच्या युद्धात या अस्त्रांचा चन्द्राने अुपयोग केला होता.

कृष्णाने घेतलेल्या चक्रात शत्रूचा विनाश करून परत येण्याची शक्ती होती. तेथून अंतर्धान होण्यापूर्वी वरुणाने अग्नि-होत्रला कौमोद नावाची गदाही दिली.

आयुधे स्वीकारल्यानन्तर कृष्णार्जुन अग्निहोत्रला म्हणाले, "हे अग्निदेवा, खांडववन जाळायला आता सुरुवात कर. इन्द्रही तुझं काही वाकडं करू शकणार नाही बघ."

अग्निहोत्र अुत्साहाने फुलून गेला. त्याने खांडववनात प्रवेश केला आणि तेथील महावृक्ष, लतावेली, औषधी व अन्य वनस्पति जाळू लागला. अग्नीची अुष्णता सहन न झाल्याने वनातले विविध प्राणी तेथून पळून जाऊ लागले. पण कृष्णार्जुन त्यांना अडवून त्यांची अग्नीत आहुती देत राहिले. आकाशात अुडून जायचा प्रयत्न करणारे पक्षी आगीची धग सहन न झाल्याने भाजून पुन्हा अग्निज्वाळांमधेच स्वाहा होऊ लागले.

खांडववनाला दारुण आग लागलेली होती. जणू प्रलयच झाल्यासारखे वाटत होते. सर्व देव भयभीत होअून इन्द्राकडे गेले. त्यांनी सांगितले की, या आगीने तीन्ही लोक जळून खाक होतील. त्यांनी इन्द्राला खांडववनावर मुसळधार पाअूस पाडायची विनन्ती केली.

जोरदार पाअूस पडू लागला, पण ते पाणी खाली न पोचता अुष्णतेमुळे मधेच वाफ होअून जाअू लागले. ते पाहून इन्द्राचा स्वतःवरील ताबा सुटून त्याने ढगांना मुसळधार पाअूस पाडायची आज्ञा दिली.

परन्तु केवळ खांडववनावरच नव्हे, तर आसपासच्याही कुठल्या भागावर पाण्याचा एकही थेंब पडू नये, म्हणून अर्जुनाने बाणांनी त्याच्यावर आच्छादन घालून जणू मांडवच तयार केला. यामुळे खांडववन जळण्यात कोणतीही अडचण आली नाही.

खूप काळापासून तक्षक हा त्या वनाचा रक्षक होता. कृष्णार्जुनांच्या मदतीने अग्निहोत्र खांडववन जाळण्याचे आपले कार्य सफल करणार असे जेंव्हा त्याने पाहिले, तेंव्हा तो मुकाट्याने ते वन सोडून पळाला व कुरुक्षेत्री पोचला.

तक्षकाचा पुत्र अश्वसेन हा जेंव्हा आपल्या आईचा आडोसा करून पळून जाअू पहात होता, तेंव्हा अर्जुनाने त्याला पाहिले. त्याने लगेच तक्षकपत्नीचे डोके कापले अन् अश्वसेनची शेपटीही तोडली. परन्तु शेपटी कापली जाअूनही अश्वसेन तेथून पळालाच.

यानन्तर इन्द्र व अर्जुन यांच्यात घनघोर लढाई झाली. पण इन्द्र अर्जुनाचा पराभव करू शकला नाही. खांडववनात रहाणाऱ्या काही राक्षसांनीही युद्धात भाग घेतला. त्यांना कृष्णाने आपल्या चक्राने मारून टाकले. मय नावाचा एक राक्षसही जेंव्हा तेथून पळून जायचा प्रयत्न करू लागला, तेंव्हा कृष्ण त्याला मारायला धावला. तेंव्हा मयाने अर्जुनाचा आश्रय घेतला.

अग्निहोत्र पंधरा दिवसपर्यन्त खांडववन जाळत राहिला. त्या वनात जेवढे प्राणी होते, ते सर्वच्या सर्व जळून खाक झाले. त्यांच्यातून फक्त तक्षक, त्याचा पुत्र अश्वसेन, मय व शारङ्गक हेच फक्त वाचले.



शारङ्गक हे मन्दपाल नावाच्या मुनींचे पुत्र. मंदपालांनी ब्रह्मचर्यव्रत धारण करून बराच काळ तपस्या केली. आपल्या तपोबलाच्या साहयाने ते स्वर्गात गेले. परन्तु स्वर्गात त्यांना सुख वाटले नाही. देवगणांना त्यांनी विचारले की, "स्वर्गलोकात मला सर्व सुखं प्राप्त व्हायला हवी होती. तसे का झाले नाही?"

देव अुत्तरले, "तपस्या करून देवऋण तर तू चुकवलेस. पण पुत्र प्राप्त करून पितरांचं ऋण चुकवलं नाहीस. यामुळेच तुला स्वर्गात सुख प्राप्त होत नाहीय."

तेंव्हा मन्दपालच्या मनात आले की, 'आता अपत्यप्राप्ती अगदी लवकरच

व्हावयास हवी. पक्ष्यांना अपत्यप्राप्ती खूपच लवकर होते. मग आपण पक्षी का बनू नये?' मन्दपालने शारङ्गपक्ष्याचे रूप धारण केले व जरिता नावाच्या पक्षिणीकडून चार अपत्ये प्राप्त करून घेतली. नन्तर परत मानवी रूपात ते आपल्या आश्रमात परतले व लपिता नावाच्या आपल्या पत्नीसह दाम्पत्त्य-जीवन व्यतीत करू लागले.

या अवधीतच एकदा त्यांना खांडववन जाळायला निघालेला अग्निहोत्र दिसला. आपल्या शक्तीद्वारा त्यांनी अग्निहोत्रचा उद्देश ओळखला व ते त्याला म्हणाले, ''अग्निहोत्रा, खांडववनात माझी अपत्त्ये आहेत. त्यांना मात्र मारू नकोस हां!'' अग्निहोत्रने ते कबूल केले. यामुळेच चारही शारङ्गक वाचले.

काहीही असो. खांडववन पूर्णपणे जळून खाक झाले; अग्निहोत्रची अजीर्णाची तक्रार दूर झाली. विजयी कृष्णार्जुनांजवळ त्यांनी आपली कृतज्ञता व्यक्त केली व ते निघून गेले.

इन्द्रानेही कृष्णार्जुनांच्या शौर्याची खूप प्रशंसा केली आणि सर्व देवांसह त्यांच्यासमोर प्रकट झाला. त्यांनी इन्द्राला नमस्कार केला. इन्द्राने त्यांना वर मागायला सांगितले, तेंव्हा अर्जुनाने दिव्यास्त्रांची मागणी केली.

इन्द्र अर्जुनाला म्हणाला, ''महेश जेंव्हा प्रकट होतील, तेंव्हा त्यांच्या समक्ष मी तुला अस्त्रं देईन.'' जाता जाता ''तुम्हा दोघांचा स्नेह शाश्वत होईल'' असा आशिर्वादही दिला. यानन्तर कृष्णार्जुन यमुनाकिनारीच्या आपल्या विहारस्थलावर पोचले. त्यांच्याबरोबर मयही तेथे गेला. त्याने अर्जुनाला प्रणाम करून म्हटले, ''महात्मा, आपणामुळेच मी खांडववनातून जिवन्त सुटलो. कृष्ण व अग्निहोत्र यांनी मला नक्कीच जाळून टाकलं असतं. मी कशा प्रकारे या ऋणाची परतफेड करू? मी राक्षसांचा विश्वकर्मा आहे. तेंव्हा आपण म्हणाल ते बनवून देईन मी. सांगा आपली इच्छा, ती पूर्ण करून परत जाईन मी.''





अर्जुनाने कसलीच मागणी न करता फक्त इतकेच म्हटले की, ''तुझी मैत्री फक्त मला पुरेशी आहे.'' परन्तु मयाने हट्ट धरला की, मी काही निर्माणकार्य करूनच परत जाईन. यावर अर्जुनाने कृष्णाचा सल्ला विचारला. कृष्ण मयाला म्हणाला, ''धर्मराजासाठी एक प्रशस्त अशी सभा बांध, ती खूप सुंदर असावी अन् त्याबरोबर तिच्यात काही दिव्य लक्षणंही असावीत.''

मयाने हा प्रस्ताव स्वीकारला. कृष्णार्जुन त्याच्यासह इन्द्रप्रस्थाला गेले. त्यांनी खांडववनदहनाचा पूर्ण अहवाल धर्मराजाला सादर केला. अर्जुनाने मयाला कसे वाचवले अन् त्याच्या बदल्यात तो आपल्यासाठी कशी सभा बांधून देऊ इच्छित आहे, ते सर्व धर्मराजाला कळले. त्याने मोठ्या आनन्दाने मयाचा योग्य सत्कार केला.

एके दिवशी भल्या सकाळी मयाने मंगलस्नान केले, ब्राह्मणांना दक्षिणा दिली व सभा बांधण्याचे काम सुरू केले. हे भवन एका समतल स्थानी बांधायचे व त्याची लांबीरुन्दी दोन्हीही दहा हजार वीतीइतकी असावी असे ठरले.

नन्तर कृष्ण द्वारकेला निघून गेला. तो अर्जुनाच्या रथातूनच गेला. पांडवांनी बऱ्याच दूरपर्यन्त जाऊन त्याला निरोप दिला.

निर्धारित वेळेच्या आतच मयाने आपले काम पूर्ण केले. खूप पूर्वीची गोष्ट. विषपर्व नामक राक्षसासाठी त्याला एक भवन बांधायचे होते. त्यासाठीच त्याने बिन्दु सरोवराच्या तटावर विविध रत्ने लपवून ठेवली होती. या वस्तूंमधेच वरुणाचा देवदत्त-शंख व गदाही होती. मयाने गदा भीमाला व शंख अर्जुनाला अर्पण केला.

सभानिर्मितीची मयाची पद्धत मोठी अद्भुत होती. यात त्याने काही तलाव बांधले. त्यांच्या भिंतींना रत्ने, खांबांना वैडूर्य व पायऱ्यांना स्फटिक जडवले. सोन्याची कमळे व मासे, कासवे इत्यादि बनवली. पाणी व जमीन त्याने एकाच पातळीवर ठेवले. त्यामुळे त्यांच्यातला फरक एकदम लक्षात येत नसे. सभेच्या बाकीच्याही सर्व खांब, भिंती व चबुतऱ्यांना रत्ने जडवलेली होती. सभेत इतरही काही आकर्षणे होती. यामुळे सभा पहाणारे संभ्रमित होऊन जात.

अशी लोकोत्तर सभा निर्माण करणाऱ्या मयाचा धर्मराजाने उचित सन्मान करून त्याची रवानगी केली. नन्तर निर्मिति कार्याची समाराधना म्हणून दहा हजार ब्राह्मणांना दाने दिली. त्यांचा आशिर्वाद घेऊन धर्मराजाने आपल्या बंधूसह मयसभेत प्रवेश केला.

कित्येक देशच्या राजांनी धर्मराजाची श्रेष्ठता मान्य केली. त्याला अगणित घोडे, सुवर्ण, आभरणे, रत्ने, सुन्दर दास-दासी इत्यादी भेटीदाखल दिले. या भेटी आणणाऱ्यांच्यात अंग, वंग, कलिंग, आंध्र, पुंड्रक, किरात, मगध, मत्स्य, मालव, केकय, करूष, कांभोज, मद्र, पौंड्र इत्यादि देशांचे राजे होते. खूपसे ऋषिगणही तेथे आले व त्यांनी पांडवांना अनेक कथा सांगितल्या. या निमित्ताने नारदही पारिजात, दैवत आदि आपल्या शिष्यांसह तेथे आले. धर्मराजाने त्यांचे श्रद्धापूर्वक स्वागत केले.

नारदाने धर्मराजाला राजांची कर्तव्ये काय असतात याबद्दल सविस्तर माहिती सांगितली. त्याने दिक्पालांच्या सभांचे वर्णनही केले. राजसूय यज्ञ केल्याने स्वर्गप्राप्ती होते अशी माहिती त्याने पांडवांना दिली. हरिश्चन्द्रासारख्या मोठ्या राजांनी हा यज्ञ केल्यामुळेच आज ते स्वर्गलोकात रहात असल्याचे त्यांना सांगितले. पण त्याबरोबरच सावधगिरीचा असा इशाराही दिला की, राजसूय यज्ञ निर्विघ्न पार न पडला तर असं युद्ध होईल की ज्यात अगणित जनता मृत्यु पावेल.

हा इशारा देऊन नारद धर्मराजाला म्हणाले, ''राजा, नीटपणे विचार करून तुला जो निर्णय घ्यावासा वाटेल, तो घे.'' आणि धर्मराजाचा निरोप घेऊन नारद द्वारकेकडे निघून गेले.



# चांदोबाच्या बातम्या

### एक क्षणाचा उशीर

नव-वर्षाच्या आगमनाला एक क्षणाचा उशीर झाला. १९९६ हे लीप-वर्ष आहे. म्हणून फेब्रुवारी महिन्यात ज्याप्रमाणे एक दिवस अधिक वाढवावा लागला, त्याप्रमाणे ३१ डिसेंबर रोजी वैज्ञानिकांना सर्व अविराम घड्याळांना एक क्षण पुढे करावे लागले. तसं पाहिलं तर नव-वर्ष एक क्षण उशीरा आलं. भूभ्रमणानुसार वैज्ञानिकांना अविराम घड्याळांना बदलावे लागते. पृथ्वीच्या पृष्ठभागावर तीन-चतुर्थांश भागात पाणी असल्यामुळे भरती-ओहोटी प्रमाणे भू-भ्रमणात थोडे-बहुत अंतर पडत राहते. त्या अंतरानुसार वैज्ञानिकांना अविराम घड्याळात बदल करावा लागतो.

### माशाला कांचेचा डोळा

पाण्याचे नाव काढले की आपल्याला माशाची आठवण येते. अमेरिकेतील नॉर्थ करोलिना राज्यातील एका मत्स्यालयात एका माशाच्या डोळ्यावर शस्त्र-क्रिया करण्यात आली. त्याच्या एका डोळ्याची दृष्टि गेली होती, म्हणून त्याच्या जागी एक सोनेरी रंगाच्या कांचेचा डोळा बसविण्यात आला. अर्थात् शस्त्र-क्रिया पाण्याच्या बाहेर करण्यात आली. गेल्या नोव्हेंबर मध्ये नार्थ करोलिनाच्या पशु-चिकित्सा केन्द्रात ज्या डॉक्टरने ही शस्त्र-क्रिया केली, त्याने नेहमीपेक्षा लहान अस्त्रांचा उपयोग केला होता. त्यावेळी माशाला भूल ही देण्यात आली होती.

### पांडा क्लब

छोट्या पांडाशी खेळत असताना घेतलेला पं. जवाहरलाल नेहरू यांचा फोटो प्रसिद्ध आहे. त्यांनी दिल्लीतील आपल्या त्रिमूर्तिभवनात हा पांडा पाळला होता. याचे डोळे टपोरे असतात, आणि डोळ्यांच्या चारी बाजूंना काळ्या रेषा असतात. शरीरावर पांढऱ्या व काळ्या रंगाचे केस असतात. पांडा हा चीन व तिबेट मधील प्राणी आहे. गेल्या १४ नोव्हेंबर रोजी पं. नेहरू जयंतीच्या सुमुहूर्तावर 'पांडा क्लब ऑफ इंडिया' नावाची एक अंतर्राष्ट्रीय संस्था स्थापन करण्यात आली. सहा ते सोळा वर्षांचे किशोरच या क्लबचे सदस्य होऊ शकतात. या क्लबच्या मद्रास शाखेचे जवळ जवळ शंभर सभासद आहेत. १४ नोव्हेंबर रोजी जेव्हा सर्व सभासद जमले तेव्हा त्यांनी 'जेट पांडा' शी हस्तांदोलन केले. प्रमुख टेनिस खेळाडू विजय अमृतराज या संस्थेचे संस्थापक आहेत. त्यांनी क्लबच्या सर्व सभासदांचे शुभ-चिंतन केले व संस्थेच्या भविष्यकालीन योजना समजाऊन सांगितल्या. तुम्हाला या संस्थेचे सभासद व्हायचे असेल तर खालील पत्त्यावर लिहा - पांडा क्लब आफ इंडिया, २, कृष्णमाचारी रोड, नूंगंबाक्कम्, मद्रास - ६०० ०३४.





# अर्जुन

वृक्षाचे अर्जुन हे नावच मोठे आकर्षक आहे. पण खरेच या नावाचे झाड असेल का, असे विचाराल. महाभारताचा नायक अर्जुन याला हे नाव आपल्या पित्याच्या-इंद्रदेवाच्या-चमकदार पांढऱ्या रंगावरूनच प्राप्त झाले होते. लाकडाच्या इतर रंगांपेक्षा अर्जुनवृक्षाचे लाकूड जास्त पांढरे असते. तमिळमधे याला वेळ्ळेमरुदु (वेळ्ळे-पांढरे), तेलगूत येरमड्डी, मल्याळम्‌मधे स्वर्णक्रम, असामीत सोनारू, बंगालीत सोदाल बंदरलाठी व कानडीत अराजिना असे म्हणतात.

असाम, बंगाल, केरळ, दक्षिण व उत्तर कॅनरा (कर्नाटकचा पश्चिम किनारा) या भागात ही झाडे विपुल प्रमाणात आढळतात. बाष्पयुक्त ठिकाणे व नदीकिनारी ती उत्तम प्रकारे वाढतात. खरे पाहता, अनेक संस्कृत रचनांतून यांचा 'नदीसरजा', म्हणजेच 'नदीकिनारी वाढणारे झाड' असा उल्लेख आढळतो.

याचे लॅटिन नाव 'टर्मिनालिया अर्जुना' असे सुचवते की याला ठरीव काळाने फुले येतात. त्यांचा रंग पिवळसरपांढरा असून ती पेल्याच्या आकारात फुलतात. मध्यावर ती खूप दाट असतात. मार्च ते जून हा फुले येण्याचा काळ असतो. हिरव्यागार रंगाची याची पाने डहाळीला एकमेकांसमोर लागलेली असतात. थंडीत पाने गळत असली तरी झाड कधीच अगदी उघडेबोडके दिसत नाही. गळण्यापूर्वी पानांना तांब्यासारखा लाल रंग येतो व झाड शोभिवंत दिसू लागते.

लाकूड हलके असले तरी चांगले टिकाऊ असून त्याचा सामान्यत: दारे व खिडक्यांसाठी उपयोग करतात. शेतकी औजारासाठीही याचा वापर होतो.



आपल्या देशातील ऋषि-मुनि - ११

# जनक

विश्वामित्र मुनि हे अगोदर एका देशाचे राजा होते. तपोमहिमा जाणून त्यांनी राजसिंहासनाचा त्याग केला व तपस्या करून ते राजर्षि बनले. पुढे त्यांना 'ब्रह्मर्षि' असेही संबोधण्यात आले.

परन्तु मिथिलाधिपति जनकाने 'राजा' म्हणून कर्तव्ये निभावीत गृहस्थजीवनातच आध्यात्मिक साधना केली. ज्ञान व वैराग्य हे त्यांच्या जीवनाचा भाग बनले. राज्यकारभारामुळे त्यांच्या आध्यात्मिक साधनेत कसलाही अडथळा आला नाही. याचे कारण म्हणजे 'राजा असण्याबद्दलचा गर्व नसणे.' त्यांनी शासनभार ही देवसमर्पणभावानेच चालवला आणि संभाळला. त्यामुळेच ते कर्मयोगी व राजर्षि म्हणून ख्यातनाम झाले. त्यांची कीर्ती चारी दिशांना पसरली.

वाल्मिकी-रामायणातील जनक हे एक अुदात्त पात्र होय. यज्ञ करायचे ठरवून त्यासाठी भूमि नांगरत असताना त्यांना एका सुवर्णपेटीत एक अतीव तेजस्वी बालिका मिळाली. तिचे 'सीता' असे नामकरण करण्यात आले. मोठ्या प्रेमाने जनकांनी तिचे लालनपालन केले; शिवधनुष्य भंग करणाऱ्या श्री रामाशी तिचा विवाह करून दिला.

जनक महाराज अनेकदा विशेष सभा बोलावून विज्ञ लोकांशी धर्म, वेदान्त व शास्त्रांबद्दल गंभीर चर्चा करत. त्यांचे कुलगुरु होते मुनि याज्ञवल्क्य. यांच्याबरोबर जनकाच्या झालेल्या चर्चा प्रसिद्ध आहेत. त्यातील काही प्रश्नोत्तरे अशी -

जनक - मुनिवर, मानवाला मार्गदर्शक प्रकाश कोणता?

याज्ञवल्क्य - सूर्य, हे राजा !

जनक - मग सूर्यास्तानंतर ?

याज्ञवल्क्य - नंतर चन्द्र प्रकाश देतो, हे राजा !

जनक - पण सूर्य किंवा चन्द्र दोन्ही नसतील तेव्हा ?

याज्ञवल्क्य - तेव्हां अग्नि प्रकाश देतो; हे राजा !

जनक - पण अग्निही नसेल तेव्हा?

याज्ञवल्क्य - वाचा, हे राजा !

जनक - वाचाही काम करत नसेल तेव्हा, मुनिवर?

याज्ञवल्क्य - अशा वेळी आत्मा हाच मानवाला प्रकाश देतो, हे राजा!



## तुम्हाला माहीत आहे का?

१. गेली बारा वर्षे अणु-शस्त्र रहित असलेला देश कोणता?
२. भारतीय राष्ट्रीय कांग्रेसने आपली शंभरावी जयंति केव्हा साजरी केली?
३. ग्रहात आकाराने सर्वात मोठा ग्रह कोणता?
४. दिल्लीतील तत्कालीन व्हाइसरॉयच्या निवास-स्थानाची (आजचे राष्ट्रपति भवन) शिल्प-रचना कोणी केली?
५. पुराणातील इंद्राची राजधानी कोणती होती?
६. रेल्वेचे डबे बनविणारी 'इंटीग्रल कोच फॅक्टरी' कोठे आहे?
७. यूरोप मध्ये वहाणाऱ्या नद्यात सर्वात मोठी नदी कोणती?
८. पोस्टाचे तिकिट सर्वप्रथम कोणत्या देशात निघाले?
९. गांधीजींनी स्थापित केलेल्या पहिल्या आश्रमाचे नाव कोणते?
१०. मानव-शरीरातील सर्वात मोठा अवयव कोणता?
११. आपल्या देशातील 'हरित क्रान्ति' चे सूचक पीक कोणते?
१२. शक वर्षाची स्थापना करणारा राजा कोणता?
१३. 'आधुनिक इटलीचे पिता' म्हणून प्रसिद्ध असलेली व्यक्ति कोण?
१४. आपल्या देशातील कोणत्या राज्यात सर्वात जास्त दगडी कोळसा मिळतो?
१५. बुद्धाचे 'निर्वाण' कोठे झाले?
१६. 'ब्ल्यू चिप' म्हणजे काय?
१७. सिनेमा थिएटर नसलेला जगातील देश कोणता?
१८. 'क्विट इंडिया' चळवळ केव्हा सुरू झाली?

### अुत्तर

१. न्यूझीलंड.
२. १९८५ मध्ये.
३. गुरु ग्रह.
४. सर एड्‌विन लुटियन्स.
५. अमरावती.
६. पेरंबूर, मद्रास.
७. वोल्गा नदी.
८. ग्रेट ब्रिटन.
९. दक्षिण आफ्रिकेतील डर्बन जवळचा फिनिक्स आश्रम.
१०. पाठीचा कणा.
११. गहू.
१२. कनिष्क.
१३. ग्यारी बाल्डी.
१४. बिहार.
१५. कुशीनगर.
१६. सतत समृद्ध होत जाणारी सुस्थिर संस्था.
१७. सौदी अरेबिया.
१८. ८ ऑगस्ट, १९४२.



# राक्षसाचा सौदा

सीतापुर गावात लल्लू नावाचा एक गरीब माणूस रहात असे. त्याला तीन मुलं अन् दोन मुली होत्या. सर्वात थोरला सोम सोडला, तर बाकी सर्वजण मेहनत करून थोडी फार कमाई करत असत. तरीही त्यांचे दिवस कष्टातच पार पडत.

सोम मात्र पक्का आळशी होता. काम तर करत नसेच, पण अुलट तीन माणसांचं अन्न मात्र तो एकटाच फस्त करी. त्यामुळे तो चांगला लठ्ठ झाला; खूप चरबी चढली त्याच्या अंगावर. दिवसाचा बराच वेळ तो झोपून काढी. तब्येत थोडी जरी बिघडली, तरी खूप आरडाओरडा करी, अन् शेवटी वैद्याला बोलावून आणणे भाग पडे. घरच्यांच्या एकूण कमाईतला सर्वात मोठा भाग तर त्याच्याच औषधात अन् खाण्यापिण्यात खर्च होई.

चन्द्रनाथ नावाचा एक माणूस एकदा शहरातून लल्लूकडे आला. तो या कुटुम्बाचा दूरचा नातेवाईक होता. लल्लूची स्थिती पाहून तो त्याला म्हणाला, "कुठवर इथं राहून अशी हाडं झिजवशील? येवढंच काम शहरात केलंत, तर मजेत राहू शकाल सर्वजण."

चन्द्रनाथच्या प्रोत्साहनाने लल्लू आपल्या परिवारासह शहराकडे निघाला. रस्ता एका जंगलातून जात होता. थोडे अंतर चालल्यावर रात्र झाली. सर्वजण एका झाडाखाली बरोबर आणलेले पदार्थ खायला बसले.

सोमला चालायची मुळीच सवय नव्हती. खूप दमला तो, खूप जोरदार भूकही लागली त्याला. खाणं बांधून आणलेलं गाठोडं सोडताच त्यानं झडप घालून ते हस्तगत केलं अन् सर्वांचं जेवण त्यानं एकट्यानंच फस्त केलं. नंतर तिथेच लवंडून तो गाढ झोपी गेला.

लल्लूला आपल्या या थोरल्या मुलाचा अतिशय राग आला. त्याला चांगला मार द्यायचा विचार केला त्याने. पण बायकोनं त्याला अडवलं. नंतर लल्लूने सोमला तसाच झोपेत जंगलात सोडून पुढे जायचं ठरवलं, पण त्याची आई अन् भावंडांनी तसं करु दिलं नाही.

"बोला, आता आपली भूक कशी भागवायची? आसपास कुठे फळझाडंही नाहीत. नुसतं पाणीच पिअून पोट भरायचं म्हटलं, तर आसपास कुठे तलाव वगैरे आहे की नाही कुणास ठाअूक! अन् असला तरी आता अंधारात दिसणार तरी कसं? काय करावं हेच कळत नाहीय!" लल्लू हताश होअून अुद्‌गारला.

"तुम्ही फक्त खायचाच विचार करताय. मला तर इकडे जंगली जनावरांची भीती पडलीय! रात्र इथेच घालवणं बरं नव्हे." लल्लूच्या बायकोनं शंका काढली.

जनावरांची गोष्ट निघताच सर्वजण घाबरले. सर्वांनी ठरवलं, की रात्रभर चालत रहावं लागलं तरी चालेल, पण आपण जंगल ओलांडून जाअू या. मग त्यांनी सर्वांनी सोमला अुठवायचा खूप प्रयत्न केला. पण काही केल्या तो काही अुठेना.

"आळशी आहे नुसता. याला इथेच सोडून देअून आपण निघून गेलो तर बरं होईल. पिडा टळेल एकदाची!" लल्लू हट्टाला पेटला. पण तरी बाकी कुटुम्बीय ऐकेनात.

याच गोष्टीवर त्यांची चर्चा चालली होती,



इतक्यात अचानक झाडावरून एक पोटली त्यांच्यामधेच येअून पडली. दिसायला लहान असली, तरी वजनानं जड अशी ती पोटली अुघडून पहाता, त्यात कित्येक सोन्याच्या मोहरा आढळल्या!

लल्लू म्हणाला, "हे डबोलं घेअून आपण सीतापुरला परत जाअू. आणि शेतजमीन खरेदी करून आरामात आयुष्य घालवू."

पण लल्लूच्या बायकोने शंका काढली, "कुणाचं धन आहे हे, कुणास ठाअूक! कदाचित झाडावर कुणी माणूस बसलेला असेल." अन् पुढे ती काही बोलणार, इतक्यात झाडाच्या फान्दीवरून एका माणसानं खाली अुडी ठोकली. तो चांगला धट्टा कट्टा

हुताशनी मुजुमदार



आणि काळा कुट्ट होता.

''हे धन माझं आहे. माझी अट मानलीत तर ते तुमचंच समजा.'' तो काळा माणूस म्हणाला.

लल्लूनं विचारलं, ''बोल, काय अट आहे तुझी?''

काळा माणूस बोलला, ''तुम्ही जी माणसं इथे हजर आहात, त्यापैकी एकाला माझ्या हवाली करायचं.''

''बोल, कोण हवं तुला?'' लल्लूनं विचारलं.

काळ्या माणसानं सोमची निवड केली.

'या आळशाला निवडलं यानं, हे एका परीनं बरंच झालं.' लल्लूनं हा प्रस्ताव लगेच मान्य केला.

पण त्याची बायको बिचारी घाबरून गेली. ती म्हणाली, ''अहो, अशी कशी कबुली दिलीत एकदम? हा कोण, काय, याची आपल्याला काहीच माहिती नाहीय. कमीत कमी त्याला विचारून तरी घ्या, कि याला आपल्या मुलाशी काय काम?''

काळा माणूस कडवटपणे म्हणाला, ''आता आमचा सौदा पक्का झालाय. यापेक्षा जास्त काही बोलणं, मला मुळीच पसन्त नाही. धन घ्या अन् पटकन चालू लागा इथून !''

''ठीक आहे, असंच करू आम्ही. पण आता सांग तर खरं, कि आमच्या सोमचं काय करणार आहेस तू?'' लल्लूनं विचारलं.

''सांगितलं, तर वाईट वाटेल तुला. मी याचं काय करणार, हे तू न जाणणंच बरं.'' काळा माणूस टाळाटाळ करीत म्हणाला.

पण लल्लूनं हट्टच धरला की, 'ते कळल्यावरच हा सौदा होऊ शकेल.' तेंव्हा तो माणूस म्हणाला, ''मी खऱ्या रूपात समोर प्रकट झालो की तुम्ही सर्वजण भिऊन जाल, हे माहीत आहे मला. मी एक राक्षस असून माणूस हे खाद्य आहे माझं! पण राक्षस असूनही मी नियम कसोशीनं पाळतो. नीतिमान आहे मी; म्हणून स्वत:चं खाणं मी धन देऊन खरेदी करतो नेहमी.''

त्याचं बोलणं ऐकताच सोमची आई जोराने रडू लागली. लल्लूने राक्षसाचं धन त्याला परत देऊ केलं. पण त्याने साफ नकार दिला. तेंव्हा कुटुंबातली सर्व माणसं एक एक करून पुढे येत, ''मला खा, मला खा. सोमला सोडून दे.'' असं म्हणू लागली.

पण राक्षस स्पष्टपणे म्हणाला, ''तुम्ही सर्वजण अगदी काडीपहिलवान आहात. तुम्हाला कुणाला खाऊन माझं पोट नाही भरणार. माझी भूक नाही भागणार. हा तरुणच फक्त चांगला धट्टा-कट्टा आहे. चांगली चरबी चढलीय याच्या अंगावर. मला हाच आवडला. हाच हवा मला!''

लल्लूच्या कुटुंबातले सर्वजण रडू लागले. राक्षस हसत म्हणाला, ''रडा, खूप रडून घ्या! तुमच्या रडण्यामुळे हा जागा तरी होईल. मी तर झोपल्या माणसाला नाही खात.''

बास, सर्वांनी एकदम रडणं बन्द केलं. सोम अजूनही मस्त झोपलेला दिसला राक्षसाला.

''हा तर सकाळपर्यन्त उठणार नाहीसं दिसतंय. माझा तर असाही नियम आहे की, जे काही खायचं, ते अंधार संपण्यापूर्वीच खायचं!'' असं म्हणत राक्षस विचारात पडला.

सोम सकाळ होण्यापूर्वी उठणं शक्यच नव्हतं. त्याची ती नेहमीचीच सवय होती. त्यामुळे 'आता सोम नक्कीच वाचणार' अशी त्याच्या कुटुंबियांची खात्री झाली.

पण राक्षसाने हार न मानायचं ठरवलं. तो



प्रयत्न करत राहिला. जंगलात जाऊन तो चार हत्ती घेऊन आला. ते हत्ती भयानक आवाज करत झाडाभोवती फिरू लागले. तरी सोमची झोप जराशीही चाळवली नाही.

राक्षस पुन्हा एकदा जंगलात जाऊन दोन सिंह घेऊन आला. अन् त्यांच्या शेपट्या जोरजोराने पिरगळू लागला. सिंह वेदनेनं गरजत राहिले. त्या गर्जना जंगलभर दुमदुमत राहिल्या. पण सोमवर त्याचा ढिम्मसुद्धा परिणाम होईना. तो जराही हलला नाही. राक्षसाने आणखी एक उपाय योजला. दोन जंगली मांजरं पकडून आणून त्यानं त्यांचं भांडण लावलं. ती मांजरं भयानक आवाजात एकमेकांवर गुरगुरून तोंडानं विचित्रसे आवाज

काढू लागली. पण सोमच्या घोरण्यानं त्यांना अुलट साथच दिली.

पहाता पहाता सकाळ झाली. राक्षसानं लल्लूला म्हटलं, "तुम्ही लोक आता आपल्या गावी परत जा. मी बरोबर एक वर्षानं परत येईन. त्यावेळी या तुंदिलतनूला माझ्या हवाली कर. त्यावेळी त्याला दिलं नाहीस, तर माझी रक्कम परत कर."

"आम्हाला नकोच आहे तुझं धन. आत्ताच घे नं परत." लल्लूची बायको म्हणाली.

"अहं! तसं नाही होणार. एकदा सौदा झाला, तो पक्काच समज. पुढे काय करायचं हे सांगितलंय मी, अन् ते तुला मानायलाच हवं." म्हणून राक्षस तिथून निघून गेला.

आणखी थोड्या वेळानं सोमू जागा झाला. आईनं त्याला सारी हकिकत सांगितली. ती नंतर म्हणाली, "तू दुसरीकडे कुठे तरी निघून जा. अन् एक वर्ष संपल्यानंतर ये परत."

आश्चर्य प्रकट करत सोमू यावर म्हणाला, "का आई? जवळ धन नव्हतं, तेंव्हाही तू माझं चांगलं पालनपोषण केलंस. आता पैसा आहे, तर मला दुसरीकडे जायला सांगते आहेस?"

"अरे पण तू इथं असलास, तर सारा पैसा खलास होऊन जाईल. म्हणूनच काही दिवस दुसरीकडे जा रहायला. राक्षस जेंव्हा एक वर्षानन्तर येईल, तेंव्हा त्याला धन परत करू अन् त्याच्या तावडीतून मुक्त होऊ." आईनं गयावया करून सोमूला सांगितलं. पण सोमूनं आईच्या बोलण्याची मुळीच पर्वा केली नाही. आळशीपणा आता त्यानं सोडून दिला अन् तो मेहनत करू लागला. खाणंही कमी खाऊ लागला तो. त्याच्या शरीरावरची चरबीही कमी झाली. आणि तोही हळूहळू इतरांसारखाच बारीक, वाळकुडा होत चालला.

एक वर्षानन्तर आलेला राक्षस त्याला पाहून म्हणाला, "गेल्या वर्षीचा गोलमटोल असलेला तरुण हाच?" अन् चिडून आपलं धन घेऊन तो परत गेला.

लल्लूच्या कुटुम्बानं समाधानाचा थंड श्वास घेतला अन् म्हटलं की, "राक्षसाच्या सौद्यामुळं फायदाच झाला की आपला!"





# राजा आणि राजर्षि

कर्पूर देशाचा राजा वसंत मोठा प्रामाणिक होता. तो स्वतःला आपल्या प्रजेचा सेवक मानीत असे. म्हणून राजाला मिळणाऱ्या वैभवापासून तो दूर रहात असे.

कर्पूर देशाचे राजभवन विशाल होते. त्यात पन्नास दालने होती, एक नाट्य-शाळा होती आणि पांच सर्व सोयींनी युक्त स्नानगृहे होती. शंभर सेवक आणि पन्नास सेविका राजभवन स्वच्छ ठेवण्याच्या कामी गुंतलेल्या असत. वीस तरुण व उमदे शिपाई रात्रंदिवस राज-भवनावर पहारा देण्याचे काम करीत.

राजा झाल्यावर वसंतने या राजभवनाचे रुपांतर कलाकेन्द्रात केले. विविध कलाकारांना कलेचे प्रशिक्षण देण्याची व्यवस्था केली. स्वदेशातीलच नव्हे तर विदेशातून ही प्रसिद्ध कलाकार इथे येऊन नाट्य, नृत्य, संगीत, चित्रकला आदींचा अभ्यास करीत.

वसंत स्वतः किल्ल्याच्या आत एका छोटेखानी घरात राही. त्याच्या घरात मूल्यवान वस्तु त्याने ठेवल्या नाहीत. महिना भरासाठी आवश्यक ते सामान खरेदी करून तो घरात व्यवस्थित ठेवत असे. आपल्यासाठी आवश्यक त्या सुखसोयी त्याने घरात करून घेतल्या होत्या.

याच वेळी विकल्प देशाची राजकुमारी विनीला हिचे स्वयंवर झाले. वसंत या स्वयंवरासाठी गेला. त्याच्या सौंदर्यावर मोहित होऊन विनीलाने वरमाला त्याच्या गळ्यात घातली.

विनीलाचा हात आपल्या हाती घेत वसंत म्हणाला - "या क्षणापासून तु माझी धर्मपत्नी आहेस. विकल्प राजाला माझी नम्र प्रार्थना आहे की त्यांनी तुला राजोचित अलंकारांनी न सजविता साधारण वस्त्रांसह माझ्या बरोबर पाठवावे. भेट-वस्तूंचा स्वीकार माझ्या तंत्रात बसत नाही!"

चांदोबात पंचवीस वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट



या गोष्टी ऐकून विनीलाच्या पित्याला मोठे आश्चर्य वाटले. तो म्हणाला - "विवाहाच्या वेळी आपल्या मुलीला काही भेट-वस्तु देणे माझे कर्तव्य आहे. त्यांचा स्वीकार अवश्य करावा."

"प्रजेच्या धनातून दिलेल्या भेटींचा स्वीकार करणे माझ्या तत्त्वात बसत नाही. आपण कमवलेली संपत्ति आपल्या जवळ असेल तर आपण विनीलाला भेट-स्वरूपात काही देऊ शकता!" वसंत म्हणाला.

विनीलाच्या वडिलांनी विचारले - "तर मग आपल्या वडिलांकडून आपल्याला जे धन मिळाले ते त्यांनी स्वतः मिळवलेले का?"

"होय विकल्पराज, कर्पूरदेश त्यांच्या कार्यक्षमतेनेच शक्तिशाली बनला. त्यांनी देशाचे शासन माझ्यावर सोपविले. मी बालपणापासून देशाच्या संरक्षणाचा भार उचलला. लहानपणापासून त्यांनी मला प्रशिक्षण दिले. राजा बनल्यावर मी केवळ राज्यभार संभाळला, राज्यधन नव्हे. मी राजवैभव स्वीकारले नाही. मी आपल्याला प्रजेचा सेवक मानतो आणि राजासाठी निर्धारित वेतन फक्त घेतो. आपली आवक लक्षात घेऊन एका छोट्याशा घरात राहतो आणि आपल्या आवश्यक वस्तु खरेदी करतो." वसंतने आपल्या शाही जीवन-पद्धतीचा परिचय करून दिला.

नाराज होत विकल्प राजा म्हणाला - "विनीलाला मी मोठ्या कोड-कौतुकाने लहानाची मोठी केली. वैभवात राहण्याची तिला सवय लागली आहे. तुमच्या बरोबर राहून तिला राजवैभव उपभोगता येणार नाही. विनीलाला हे अगोदरच माहीत असतं, तर तिने अशी चूक केली नसती. तुम्ही राजर्षि आहात, वैराग्यसंपन्न आहात, माझ्या मुलीचे जीवन तुम्ही दुःखाने भरून टाकले. हे उचित आहे का?"

आपल्या वडिलांना थांबवीत विनीला म्हणाली - "नाही पिताजी, मी काही चूक केली नाही. माझा निर्णय अटळ आहे. पतीचे अनुगमन करणे हाच माझा धर्म ! आम्ही उभयता त्यांच्या आदर्शाचे पालन करीत जीवनानंदाचा उपभोग घेऊ. आपण माझी चिंता करू नये."

वसंत आणि विनीला आपल्या देशात पोचले. विनीलाने जेव्हा किल्ल्यात प्रवेश केला तेव्हा आपलं छोटेखानी घर पाहून तिला वाईट वाटलं. तिने पतीला विचारले - "हे घर महाराणीला राहण्यायोग्य आहे का? याहून मोठं घर आपल्याला मिळणार नाही का?"

हसत वसंत म्हणतात - "विनीला, जर पुरुष देशाचे शासन करीत असले तर त्याला महाराज म्हणतात. जर स्त्री राज्य-कारभार चालवीत असेल तर लोक तिला महाराणी म्हणतात. तू महाराजाची पत्नी फक्त आहेस. मला दरमहा या घराचं भाडं द्यावं लागतं. सेवकांना वेतन द्यावं लागतं. मिळणाऱ्या वेतनात याहून अधिक मोठं घर आपल्याला घेता येणार नाही."

विनीलाला हे सगळं बोलणं पटलं नाही. पण आपल्या सुंदर [illegible] तिने ते सहन केलं. त्या घरात एक दास, एक दासी नि एक पहारेकरी होता. त्या तिघांकडून जमेल तेवढी कामे ती करून घेऊ लागली. एक दिवशी ती वसंतला म्हणाली - "तुम्ही नसलात म्हणजे मी अगदी कंटाळून जाते. एकटी काय खेळ खेळू? कोणी मैत्रीण नाही, काही खेळाचे साहित्य नाही. सगळं जीवन नीरसवाणं चाललंय!" विनीलाने आपली व्यथा ओकून टाकली.

वसंतने समजाऊन सांगितले - "आपला अमूल्य वेळ असा व्यर्थ दवडू नकोस. आपलं





ग्रंथालय छोटं असलं तरी त्यात मोठमोठे पुस्तक आहेत. हे ग्रंथ वाचून काही नव्या विद्या व कला शीक. क्रीडा-मंडळात लोक खेळ खेळत असतात, खेळात भाग घेतलास तर तब्येत उत्तम राहील. निरर्थक कामे करीत राहिलीस तर केवळ माझ्या बरोबर राहून तुला काही लाभ होणार नाही. माझ्या बरोबर राहण्याचा ही तुला कंटाळा येईल, तू चिडचिडी होशील. नीट विचार कर.''

अशा रीतीने एक वर्ष गेले. आता येथील जीवन तिच्या अंगवळणी पडलं, पण नवऱ्याच्या अनुपस्थितीत मात्र ती त्रासून जाई.

वसंत एक चतुर शासक होता. मंत्री व राजकर्मचारी यांच्या कामावर त्याची सतत देखरेख असे, त्यामुळे प्रजेचे नित्य हितसाधन होई. एक समर्थ शासक कमी वेतनावर काम करीत आहे हे पाहून त्यांनी ही कमी वेतनावर सेवा करायला सुरुवात केली.

एके दिवशी विन्यास नावाचा एक तपस्वी राज्यात आला. वसंतने त्याचा स्वागत-सत्कार केला. त्याने वसंतची खूप तारीफ केली आणि आपला येण्याचा उद्देश त्याला सांगितला.

विन्यासने अनेक वर्षे हिमालयात घोर तपस्या केलेली होती. अपार तपोबल प्राप्त केले. प्रत्यक्ष परमेश्वर विन्यासपुढे येऊन म्हणाला - ''हे तपस्वी, प्रजेचे श्रेय हेच ज्या राजाचे ध्येय आहे, अशा एखाद्या राजाची इच्छा पूर्ण करून ये. नंतर तुला मोक्ष मिळेल.''

विन्यास अशा राजाच्या शोधार्थ निघाला. त्याला प्रसेनजित नावाचा एक राजर्षि भेटला.

परंतु प्रसेनजित विन्यासला म्हणाला - ''तपस्विन्, मी एक राजर्षि आहे. माझी अशी काही इच्छा नाही. माझ्या राज्यात नित्य सुख-शांति नांदावी हीच माझी एकमात्र इच्छा होय. माझी ही इच्छा कितपत योग्य आहे हे मला माहीत नाही. कर्पूर देशाचा राजा एकच एक प्रामाणिक व आदर्श राजा आहे. तू त्याला जाऊन भेट आणि मग काही निर्णय घे.''

यासाठीच विन्यास आता वसंतकडे आला होता. तपस्व्याचे बोलणे ऐकून वसंतने थोडा वेळ विचार केला. नंतर तो विन्यासला म्हणाला - ''मुनिवर, या देशाला सुखी व संपन्न ठेवणे हा माझा धर्म होय. दक्षतेने शासन करून मी आपली जबाबदारी पार पाडीनच. हा भार मी परमेश्वरावर टाकणार नाही. यासाठी मला परमेश्वराची कृपा-दृष्टि नको. होय, फुरसतीच्या वेळी विलास करावेसे मला ही वाटते. माझी ही इच्छा पूर्ण झाली तर माझ्या पत्नीला ही संतोष मिळेल. जर यात काही अनुचित नसेल, तर माझी ही अतृप्त इच्छा आपण पूर्ण करू शकता.''

हे सर्व ऐकून विन्यास प्रसन्न झाला. वसंतच्या हाती एक बाहुली ठेवीत त्याने सांगितले - ''राजन्, आजपासून ही बाहुली तुझी इच्छा-पूर्ति करील. पण एक गोष्ट लक्षात ठेव. या बाहुलीचा उपयोग केवळ तूच करू शकशील. अन्य कोणी नाही.''

आश्चर्याने वसंत म्हणाला - ''मुनिवर, आपण प्रसेनजितलाच वर द्याल असं मला वाटलं होतं. प्रसेनजित् व मी या दोघात प्रसेनच अधिक निःस्वार्थी आहे. त्याला काही इच्छाच नाहीत. असे असताना आपण हा वर मला कशासाठी देत आहात?''

हसत हसत विन्यासने स्पष्ट केले - ''प्रसेनजित् राजर्षि आहे. जो इच्छांच्या पलीकडे पोचलेला आहे. असा माणूस भोग-विलासापासून दूर राहिला तर त्यात विशेष असे काय? आणि तू? तू मात्र विश्वाससमान समर्थ राजा आहेस! विलासमय जीवनाची तुला आवड आहे, पण त्यासाठी तू राजकोषातून काही घेतले नाहीस. म्हणून माझ्या दृष्टीने तू प्रसेनजितहून महान् आहेस. विलासी जीवनाची आशा असेल, तर एक राजा म्हणून प्रजेचे धन तुला खर्च करता आले असते. पण तू आपल्या मनावर नियंत्रण ठेवलेस. तुझा हा प्रामाणिकपणा निःसंशय प्रशंसनीय आहे. म्हणून माझा हा वर प्राप्त करण्याचा तुला अधिकार आहे.''

यानंतर वसंत तपस्व्याने दिलेल्या बाहुलीच्या साह्याने सुखमय जीवन जगू लागला. परंतु तो महत्त्व देत असे प्रजेच्या कल्याणाला! त्याच्या राज्य-काळात प्रजेला कशाची कमतरता पडली नाही.



# व्हीएटनाम बंधन-मुक्त !

**दु**सरं विश्वयुद्ध (१९३१-४५) संपल्यानंतर सुमारे तीस वर्षे पर्यंत व्हीएटनाम मध्ये हिंसाचार सतत चालू राहिला. होचिमिन्हच्या नेतृत्वाखाली अनेक स्वतंत्रताप्रेमी लोक आठ वर्षे पर्यंत फ्रेंच सैनिकांना पळवून लावण्याचा प्रयत्न करीत होते. फ्रेंच सैनिक निघून गेल्यानंतर १९५४ मधे जिनेवा येथे एक तह झाला. त्यानुसार व्हीएटनाम देश दोन भागात वाटला गेला - एक कम्यूनिस्ट उत्तर व्हीएटनाम आणि दुसरा दक्षिण व्हीएटनाम.

तरी पण संघर्ष मात्र चालूच राहिला. दक्षिण व्हीएटनामचे गोरिला, उत्तर व्हीएटनामच्या सैनिकांच्या मदतीने दक्षिण व्हीएटनामच्या सैन्याशी लढत राहिले. अमेरिकेने दक्षिण व्हीएटनामला मदत केली. १९५१ ते १९६१ च्या काळात अमेरिकेने सुमारे ५,५०,००० सैनिक पाठविले. अमेरिकेचे हजारो सैनिक या युद्धात मारले गेले. व्हीएटनाम मध्ये अमेरिकी सेना न पाठविण्याबाबत अमेरिकेत एक आंदोलन झाले. १९७२ मध्ये अमेरिकेने व्हीएटनाम मधून आपली सेना काढून घेतली. तरी पण भारत-चीन द्वीपकल्पात लढाई बंद व्हायला आणखी दोन वर्षे लागली.

व्हीएटनाम मध्ये झालेला आपला अपमान अमेरिका विसरू शकली नाही. यामुळे दोन देशात जवळ जवळ वीस वर्षे शत्रुत्व धुमसत राहिले. अमेरिकेने व्हीएटनाम वर आर्थिक बंधने लादली. अमेरिकेचे अध्यक्ष बिल क्लिंटन यांना १९९४ मध्ये ही बंधने पूर्णपणे हटविण्यासाठी नैतिक बळ मिळाले. एक वर्षानंतर अमेरिकेने व्हीएटनाम मध्ये आपला दूतावास स्थापित करण्याबाबत विचार केला.

"जखमा भरून आल्यानंतर आता संबंध अधिक दृढ करण्याची वेळ येऊन ठेपली आहे!" असे म्हणून बिल क्लिंटन यांनी, अब्राहम लिंकनच्या पावलावर पाऊल ठेवत व्हीएटनामशी हस्तांदोलन केले.

याचा संतोषजनक परिणाम असा झाला की अमेरिका आणि व्हीएटनाम यांचे मैत्रीचे संबंध स्थापित झाले. ते अधिक दृढ होतील अशी आपण आशा करू या.





# अलौकिक व्यवहारज्ञान

पंडित विश्वनाथांची कीर्ति देशभर पसरलेली होती. जगपति नावाचा एक तरुण गावाहून त्यांचा शिष्य बनण्यासाठी त्यांच्याकडे आला.

पंडित विश्वनाथजींनी त्याचे प्रेमाने स्वागत केले आणि म्हणाले - "माझे सर्व विद्यार्थी आपापल्या अध्ययनात मग्न आहेत. तुला काही दिवस माझ्या येथे राहिलं पाहिजे, माझ्या बरोबर फिरले पाहिजे."

जगपति तेव्हा तर 'ठीक आहे' म्हणाला, पण संध्याकाळी तो एका शिष्याला भेटला आणि त्याने त्याला विचारले - "पंडित विश्वनाथजी मला आपला सेवक बनवू इच्छितात. तुला सुद्धा प्रथम असेच का करावे लागले?"

तो शिष्य म्हणाला - "एकदा त्यांच्या बरोबर भ्रमंति केलीस तर तुला अध्ययन करावसंच वाटणार नाही."

व्यवहार-ज्ञान मिळविण्यासाठी पंडितजीं सह भटकणं व्यर्थ आहे, असे जगपतीला वाटले. झोपण्यापूर्वी तो पंडितजींकडे गेला नि म्हणाला - "पंडितजी, माझ्या गावातला प्रत्येक माणूस माझ्या व्यवहार-ज्ञानाची तारीफ करतो. या ज्ञाना बरोबर आपणात पांडित्य ही असावं या उद्देशाने मी आपणाकडे आलो."

पंडित विश्वनाथ हसले आणि गप्प राहिले. दुसऱ्या दिवशी सकाळी जगपतीला बोलवून ते म्हणाले - "चल आता माझ्या बरोबर. झोपेतून जागी झालेली वनश्री पाहू या. महाकवींनी निसर्गाचं वर्णन करणारी अनेक काव्यं रचली आहेत. त्यांचं परिशीलन तुला करायचं आहे. कवि आणि कवीची अभिव्यक्ति यांच्यातलं अंतर तू जाणून घ्यायचं आहेस. हेच व्यवहार-ज्ञान आहे."

पंडितजींना नम्रपणे प्रणाम करीत जगपति म्हणाला - "गुरुवर, महाकवि सुंदर स्त्रीच्या मुखाची तुलना चन्द्रबिंबाशी करतात. परंतु स्त्री किती ही जवळ असली तरी सुंदर दिसते. चंद्रमा पृथ्वीसारखाच एक ग्रह आहे. पण जवळून पाहिला तर तो किती ओबड-धोबड दिसतो. एक कल्पना आहे नि दुसरी वास्तविकता !"

पंडित विश्वनाथ म्हणाले - "वा! तुला तर बरीच काही माहिती आहे." त्यांच्या बरोबर जाण्याशिवाय आता त्याला गत्यंतर उरलं नाही.

जाताना वाटेत त्यांना प्रथम महाकवि महादेव भेटले. ते नदीत स्नान करीत होते. पं. विश्वनाथजींना पाहताच किनाऱ्यावर येऊन त्यांनी त्यांना प्रणाम केला आणि म्हणाले - "आर्य, आज आपण भोजनासाठी माझ्याकडे यावे अशी प्रार्थना करतो."

"आज काय विशेष?" पंडितजींनी प्रश्न केला.

"माझ्या सासुरवाडीहून एक स्वयंपाकी आलेला आहे. कालच त्याला परत जायचं होतं. पण त्याने बनविलेली स्वादिष्ट पक्वान्ने आपल्याला खाता यावीत म्हणून एक दिवस मी त्याला थांबवलंय. आपण आज आलंच पाहिजे." महादेवने प्रार्थना केली.

नकार देत पंडितजी म्हणाले - "आजकाल माझी तब्येत जरा सुस्त आहे. निदान एक आठवडाभर तरी पक्वांनांपासून दूर राहिलेलं बरं !"



"त्या स्वयंपाक्याला आणखी एक आठवडा थांबवलं असतं, पण मला उद्याच एका ठिकाणी जायचंय. नकुलपुरच्या नरेन्द्रला माझं एक काव्य समर्पण करायचं आहे." महाकवि महादेवने सांगितले.

"पण या काव्यात काही दोष राहून गेलेले आहेत. त्यांचं काय?" पंडितजींनी विचारले.

महादेवने उत्तर दिले - "आपण ते दोष सुधारून द्याल म्हणून तर मी आपल्याला घरी बोलवलं होतं. पण आपण तर 'नाही' म्हणताहात."

"काव्यातील दोष जरूर दूर केले पाहिजेत. पण त्यासाठी ते प्रथम ध्यानपूर्वक वाचायला तर हवं. पण एवढं थांबणं तुम्हाला

सुलोचना महांबरे



शक्य नाही.'' पंडित विश्वनाथ म्हणाले.

''माझंच दुर्भाग्य!'' म्हणत महादेव निघून गेला.

आता पंडितजी जगपतीला म्हणाले - ''माझी प्रकृति अगदी छान आहे. महादेवकडे जेवण घेण्याची माझी इच्छा नव्हती, म्हणून मी खोटं बोललो.''

हे ऐकून जगपतीच्या मनात अनेक शंका आल्या. पण करणार काय? काही अंतर चालून गेल्यावर त्यांना भूषण नावाचा एक सधन शेतकरी भेटला. तो गावात शेती-वाडी करी, अन् शिवाय शहरात व्यापार. पंडितजींना प्रणाम करीत तो म्हणाला - ''आज आपण माझ्याकडे भोजनासाठी यायचं. नकार देऊं नका. सगळी व्यवस्था झालेली आहे.''

''आज काही विशेष आहे काय?'' पंडितजींनी विचारले. भूषणने सांगितले - ''आज माझ्या मुलाचा अर्थशास्त्राचा अभ्यास सुरू होत आहे.''

पंडितजी हसत म्हणाले - ''काही असलं तरी अध्ययनात तू व्यापाराला प्रथम स्थान दिलंस हं! आपल्या मुलाला अर्थ-शास्त्रात प्रवीण बनवणार आहेस. छान !''

''पंडितजी, सगळे काव्य वाचू लागले तर व्यापार बंद नाही का पडणार? नुकसान न होता जनतेची सेवा करण्यासाठी अर्थ-शास्त्राचे ज्ञान आवश्यक आहे. आपण तर अनेक शास्त्रात पारंगत आहात. आपल्या मुलाला अर्थशास्त्र शिकवण्याबाबत मी आपणास विनंती केली, पण आपण नकार दिला. शेवटी मला शहरातल्या एका प्राध्यापकाकडे धाव घ्यावी लागली. तो कितपत सुयोग्य आहे हे आपण मला सांगावं.'' भूषण म्हणाला.

''आज मी आलो असतो, पण दुसऱ्या एका ठिकाणी येण्याचा वायदा केलेला आहे. दिलेला शब्द न पाळणं व्यापाऱ्याला कदाचित् योग्य वाटेल, माझ्यासारख्या पंडिताला ते योग्य नाही.'' असे म्हणत पंडितजी पुढे निघाले.

थोडे अंतर चालल्यावर पंडितजी जगपतीला म्हणाले - ''मी दुसऱ्या कोणाला ही शब्द दिलेला नाही. भूषणला खोटंच सांगितलं मी !''

जगपति काही बोलला नाही. पण आपल्या मनात म्हणाला - ''आपले गुरुजी तर खोटं बोलण्यात तरबेज आहेत!''

पुढे जाता जाता त्यांना रामचंद्र नावाचा एक जवाहिऱ्या भेटला. पंडितजींना नमस्कार करीत तो म्हणाला - ''आपणासाठीच मी ही गाडी होऊन आलो आहे. आपण माझ्या गावी चला, माझं आतिथ्य ग्रहण करा. आज आपल्याला माझ्याकडे भोजन केलेच पाहिजे. मला संतोष होईल.''

''कां बरं? आज काही विशेष?'' पंडितजींनी विचारले.

''दरमहा दशमीच्या दिवशी एकाद्या महापुरुषाचा सत्कार करण्याची आमची रीत आहे. माझ्या या गुणाबद्दल आपल्या देशाच्या राजाने माझे अभिनंदन केले आणि 'सन्मान सुधाकर' अशी पदवी मला बहाल केली. यावेळी आपला सत्कार करायचा मी निश्चय केला आहे. पांडित्याचा बाबतीत आपली बरोबरी करणारा निदान आपल्या देशात तरी कोणी नाही.'' रामचन्द्र म्हणाला.

पंडितजींनी हसत नकार देत म्हटले - ''माझा एक दूरचा नातेवाईक निवर्तला आहे. या महिन्यात कोणाचा सन्मान स्वीकारणे योग्य होणार नाही. कुठल्याही उत्सवात भाग घेणे बरोबर नाही. म्हणून मी येऊं शकत नाही. गैरसमज करून घेऊं नका.''

''माझंच दुर्भाग्य ! काय करू? आपणास दुरून पाहिलं, नि धावत-पळत इकडे आलो.





आता शेजारच्या गावातल्या बुद्धिबळपटूला घेऊन येण्याचा प्रयत्न करतो." असे म्हणून रामचन्द्र निघून गेला.

रामचन्द्र गेल्या बरोबर पंडितजी शिष्याला म्हणाले - "घाबरू नकोस. माझा कोणी ही नातेवाईक मेलेला नाही."

जगपतीला काही समजत नव्हतं. त्याची बुद्धि काम करीनाशी झाली. ते दोघे एका आमराईतून जाऊ लागले. इतक्यात मागून एक आवाज आला - "महाराज, मीही आपल्या बरोबर येऊ का?" दोघांनी ही मागे वळून पाहिले.

एक मध्यम वयाचा, हाडकुळा, साधे कपडे घातलेला माणूस तिथं उभा होता.

त्याच्याकडे पहात पंडितजींनी विचारले - "धवल, तू? कसा काय आहेस? इकडे कोठे?"

धवल उत्तर देत म्हणाला - "स्वामी, शेजारच्या गावात शेती-वाडीत काम करण्यासाठी मजुरांची आवश्यकता होती. मला तिथे जाऊन एक महिना झाला. आजच आपल्या गावी परत निघालो आहे. आज तुम्ही भोजनासाठी माझ्याकडे या हेच सांगायला मी इथं आलो. आपल्या बरोबर थोडा वेळ इथं काढीन. जेवायची वेळ झाली की आपण घरी जाऊ."

"मला तुझं घर चांगलं माहीत आहे. तू जा. मी जेवायच्या वेळेला येईन. तुझं काही काम असेल तर करीत बस." पंडितजींनी प्रेमाने सुचवलं.

"स्वामीजी, एक छोटी प्रार्थना आहे. मजुरीच्या गावी जाण्यापूर्वी मी आपला गीतोपदेश ऐकला होता. तो ऐकून माझ्या मनाला अपूर्व शांति लाभली. आपण दर आठवड्याला आमच्या गावी येऊन गीतेवर प्रवचने देतच असता. गेले चार आठवडे मला आपल्या प्रवचनांचा लाभ मिळू शकला नाही. आपल्याला काही अडचण नसेल तर गेल्या चार प्रवचनांचे सार सांगाल?" धवलने विचारले.

पंडितजी म्हणाले - "तर मग चल."

पंडितजींनी मागील चार प्रवचनांचे सार थोडक्यात सांगितले. जगपति आणि धवल दोघे ही ऐकत राहिले. पहाता पहाता भोजनाची वेळ झाली.

जगपतीची कल्पना होती की पंडितजी काही तरी कारण दाखवून भोजनाचे टाळतील. पण या वेळी मात्र असं झालं नाही. ते धवलच्या झोपडीत गेले. चांगलं पोट भरून जेवले. परत येताना पंडितजींनी जगपतीला विचारले - "तुझ्या व्यवहार-ज्ञानाला माझ्या बद्दल काय वाटतं?"

प्रथम तर जगपतीला अमळ संकोच वाटला. पण नंतर गुरूच्या प्रोत्साहनामुळे म्हणाला - "मला वाटतं आपलं व्यवहार-ज्ञान शून्य आहे. चांगली मेजवानी आणि सत्काराचा अव्हेर करून आपण झोपडीतल्या साध्या जेवणाचा स्वीकार केला - हे काय दाखवतं? आपल्याजवळ व्यवहार-ज्ञान मुळिच नाही. अजून आपल्याला ते शिकावं लागेल."

पंडितजींनी शांतपणे निवेदन केले - "महादेवचा उद्देश होता की मी त्याच्या काव्यातील दोष काढून टाकावेत, भूषणची इच्छा होती की मी त्याच्या मुलाच्या गुरूची परीक्षा करावी, रामचन्द्रला 'सन्मान-सुधाकर' पदवी मिळालेली होती. आपल्या पदवीची मर्यादा राखण्यासाठी त्याची इच्छा होती की त्याच्याकडे मी भोजन करावं. कोणी ही प्रयत्नपूर्वक माझ्याकडे आला नाही. ते माझ्यावर अवलंबून नव्हते. मी 'नाही' म्हणालो तर ते दुसऱ्या कोणाकडे जाऊ शकत होते. मोल-मजुरी करणाऱ्या धवलची गोष्ट तशी नाही. माझ्या पांडित्याचा लाभ घेण्यासाठी तो माझ्याकडे आला, प्रेमाने मला घरी बोलवले. त्याला मी गीता-सार सांगितलं. तेच माझं खरं भोजन. त्याच्या झोपडीत पोचण्यापूर्वीच माझी पोटाची भूक भागलेली होती. धवल सारख्या श्रोत्यांना काही उपदेश देण्यात जे समाधान आहे, ते भोजनात नाही. सामान्य माणसाच्या दृष्टीने विचार केला तर तुझं व्यवहार-ज्ञान ठीक आहे. पण पंडितांपाशी असलं पाहिजे अलौकिक व्यवहार-ज्ञान!"



# नित्यानंदाचा प्रामाणिकपणा

अमरावती नगरीत राघवेन्द्र नावाचा एक श्रीमंत माणूस रहात असे. त्याच्याकडे एक नोकर होता - नित्यानंद. तो फार प्रामाणिक होता. घरातील सर्व कामे तर तो करीच, बाहेरच्या कामात ही सर्वांना मनापासून मदत करी.

एक दिवशी केर काढताता पलंगाखाली त्याला चांदीची एक मोहर सापडली. ती त्याने लगेच राघवेन्द्रच्या हातात दिली. राघवेंद्र नित्यानंदाच्या प्रामाणिकपणावर खुश झाला आणि त्याने ती मोहर त्याला देऊन टाकली.

काही दिवसांनंतर राघवेन्द्रच्या मुलीचा रत्नहार कुठे दिसेनासा झाला. तिने आपल्या वडिलांना ही गोष्ट सांगितली. घरातील सर्व पेट्या व कपाटे धुंडाळली, पण रत्नहार मात्र सापडला नाही. शेवटी राघवेन्द्रने नित्यानंद व इतर सर्व नोकरांना बोलावले व रत्नहाराबद्दल चौकशी केली.

नित्यानंद म्हणाला - ''मालक, दोन दिवसांपूर्वी मला न्हाणी-घरात तो हार सांपडला !''

हे ऐकून रागाने राघवेन्द्रने विचारले - ''दोन दिवसांपूर्वी तुला हार सापडला, मग आता पर्यंत मला का नाही सांगितलंस? माझ्यापासून ही गोष्ट लपवलीस कशासाठी?''

नित्यानंदने भोळेपणाने उत्तर दिले - ''मालक, मला सापडलेला हार मी आपल्याला दिला असता, तर माझ्या प्रामाणिकपणाची प्रशंसा करीत तो आपण मलाच देऊन टाकला असता ना? आपण तर कामात गुंतलेले होतात, म्हणून मी आपणास उगाच त्रास दिला नाही. मी हार आपल्यापाशी ठेऊन दिला.''

नित्यानंदच्या या उत्तरावर काय बोलावे हे राघवेन्द्रला कळेना.






८

(रूपधरच्या साथीदारांनी आपले वचन पाळले नाही. रूपधर पूजेत मग्न असताना मायावीने फूस लावली, अन् त्यांनी सूर्यदेवतेच्या पशूंना ठार केले व शिजवून खाऊन टाकले. त्यांना याबद्दलची प्रचीतीही लगेच मिळाली. समुद्रात मधेच रूपधरची नाव बुडाली अन् रूपधर सोडून बाकी सर्वजण बुडून मेले. एकटा रूपधरच काय तो मोठ्या कष्टाने किनाऱ्यावर पोचू शकला.) - पुढे

त्या देशाच्या शासक राजाचे नाव होते बुद्धिमान. वारुणी ही त्याची कन्या होती. त्या दिवशी पहाटेपहाटेच तिला एक स्वप्न पडले. त्या स्वप्नात तिला दिसलेली तिची मैत्रीण म्हणाली, ''अग वारुणी, इतकी आळसलीस कशी? कित्तीतरी मळके कपडे धुवायचे पडलेत. उद्या लग्न आहे ना तुझं? मळके कपडे घालून लग्नाला उभी रहाणार आहेस? लोक टोमणे नाही मारणार? सकाळ झाल्याबरोबर कपडे धुवायला जाऊ या, चल; मीही येईन तुझ्यावरोबर. आपल्या बाबांना सांगून रथ जोडून तयार ठेव. इतक्या लांबवर कपड्यांचं ओझं घेऊन चालणं कठीण होईल.''

वारुणी ताबडतोब उठून बसली. तिला दिसले की आता दिवस उजाडत आहे. स्वप्नात पाहिलेले प्रत्यक्षात करून टाकायचा निश्चय तिने केला. आपण कपडे धुवायला

ग्रीक पौराणिक कथा



जाणार असल्याबद्दल तिने आपल्या मातेला सांगून टाकले. नंतर ती आपल्या पित्याला भेटायला निघाली. त्याचवेळी राजा बुद्धिमान आपल्या सेनापतीला भेटायला निघाला होता.

"बाबा, मला एक मोठ्ठा रथ हवा. मी नदीवर कपडे धुवायला जाणार आहे, खूप दिवसात कपडे धुतले गेले नाहीयेत. घरात माणसंही खूप जमलीयत. सर्वच जण कपडे धुवून हवे असल्याची मागणी करत आहेत." वारुणी राजाला म्हणाली.

"घे ना, नोकरांना सांगून हवा तो रथ तयार करायला सांग." राजाने संमति दिली.

ताबडतोब रथ व खेचरांची व्यवस्था केली गेली. वारुणी व तिच्या मैत्रिणींनी आवश्यक ती भोजन सामग्रीही बरोबर घेतली. गाडीत बसून हातातला चाबूक खेचरांना मारत वारुणीने ती हाकायला सुरुवात केली. बऱ्याचशा दासीही आपापसात गप्पा मारत रथामागोमाग निघाल्या.

शेवटी सर्वजणी नदीकिनारी पोचल्या. खेचरे मोकळी करून त्यांना चरायला सोडण्यात आले. सर्वजणी गाणी गातगात कपडे धुवू लागल्या. काम संपल्यावर स्नान उरकून त्यांनी कपडे वाळवले अन् भोजनही केले. नंतर त्यांनी चेंडू खेळायला सुरुवात केली. खेळता खेळता चेंडू उडून पाण्यात पडला अन् सर्वजणी ओरडू लागल्या.

त्यांच्या आरडाओरडीमुळे रूपधर जागा झाला. झाडीतून बाहेर येऊन तो वारुणी व तिच्या सख्यांकडे पाहू लागला. झाडीतून बाहेर पडलेली व धुळीने माखलेली ती आकृती पाहून वारुणीच्या दासी घाबरून गेल्या व भीतीने झाडाझुडुपांमागे जाऊन लपून राहिल्या. वारुणी स्वतः मात्र जराही न घाबरता जागच्या जागी तशीच उभी राहिली.

रूपधर दूरच उभा राहून मोठ्या विनयाने तिला म्हणाला, "हे सुन्दरी, तू मानवच आहेस की कोणी देवता आहेस, हे म[illegible] माहीत नाही. तुझी उंची अन् सौन्दर्य पाहून तर असं वाटतंय की तू देवताच असावीस; पण मानव असशील, तर तुझ्या जन्मदात्यांना भाग्यवानच म्हणायला हवं. तुझी भावंडंही किती भाग्यशाली! अन् तुझ्याशी विवाह करणाऱ्या भाग्यवन्ताच्या बाबतीत तर काय म्हणू? शब्दात वर्णन करताच नाही येणार. मी आजपर्यन्त अनेक देश हिंडलोय. पण आजवर असलं सौन्दर्य कुठेच पाहिलं नाही. मी आता अत्यन्त दीन अवस्थेत आहे. वीस दिवसपर्यन्त मी समुद्रात अनेक संकटांना तोंड दिलंय. कालच कसाबसा या किनाऱ्यावर येऊन पडलोय. हा देश नवाच आहे मला. आता तूच एकटी काय ती माझं रक्षण करू शकशील. माझ्यावर दया कर अन् अंगावर घालायला काही वस्त्र दे. मी आता कोणत्या दिशेला जावं, तेही सांग मला. इतके उपकार केलेस, तर आभारी होईन मी तुझा."

"तुम्ही तर चांगलेच बुद्धिमान वाटताय मला. सुख केवळ देवच प्रदान करू शकतात, पण आता तुम्ही माझ्या देशात आहात. इथे तुम्हाला अन्नवस्त्राची ददात पडणार नाही. मी आश्वासन देत आहे तुम्हाला. मी तुम्हाला आमच्या नगराचा रस्ता सांगेन. हा पैयासिया देश असून इथला राजा बुद्धिमान याची मी कन्या आहे." नंतर आपल्या दासींना बोलावून वारुणी त्यांना म्हणाली, "एहेरे! भित्र्या भागुबाया! पळून गेलात? यांना खायला द्या काही अन् त्यांची नदीत स्नानाचीही व्यवस्था पहा."



दासींनी रूपधरला स्नानाची जागा दाखवली अन् नंतर कपडेही दिले. पाण्यात उतरून रूपधरने आपले अंग नीट चोळून स्नान केले. अंगावर खूप माती अन् मीठ लागलेले होते. ते सर्व धुवून काढल्यावर त्याने मिळालेले कपडे चढवले. अन् एखाद्या सुदृढ मनोहर मूर्तीसारखा चमचमत तो समोर आला. वारुणीने प्रथम त्याला पाहिले, तेव्हा तिला तो खूप घाणेरडा अन् कुरूप वाटला होता; पण आता तो एखादा 'स्वर्गातला निवासी' वाटत होता. 'असा पति आपल्याला मिळाला, तर काय छान होईल! त्याने कायम आपल्याच देशात रहावे' असे



तिला वाटू लागले.

दासींनी यानन्तर रूपधरला जेवण दिले. अन्न पोटात गेल्याला त्याला कितीतरी दिवस झाले होते.

मधल्या वेळात 'आता पुढे काय करावे' याबद्दल वारुणी विचार करत होती. आपण तरुण व अविवाहित आहोत; या देशात आपल्याशी विवाह करायला इच्छुक असे कितीतरी युवक आहेत. अन् आपण त्या सर्वांना नकार दर्शवला आहे. अशा परिस्थितीत हा माणूस आपल्याबरोबर आला तर ते बरं दिसणार नाही. एका अपरिचिताला पति बनवून घेऊन आली, असं म्हणून सर्वजण नावं ठेवतील आपल्याला.

त्यामुळे अशा माणसाला अतिथि म्हणूनही आपणाबरोबर न नेण्याचे तिने ठरवले. अुलट तो स्वतःच पाहुणा बनून आपल्या घरी जावा हेच अुचित होईल असे तिला वाटले.

दासी वाळलेले कपडे गोळा करू लागल्यावर ती रूपधरला म्हणाली, "आता आम्ही निघतो. बाकीच्या लोकांबरोबर तुम्ही गाडीमागे येत रहा. किल्ल्याच्या दारापर्यन्त असेच या. पण माझ्याबरोबर नगरात मात्र प्रवेश करू नका. लोक अुगाच काहीतरी बोलत सुटतील. नगराबाहेरच्या अुद्यानात जरा विश्राम करा. मी पोचल्यानंतर काही वेळ जाअू देअून नंतर सरळ आमच्या वाड्यात प्रवेश करा. पोरंसोरं सुद्धा पत्ता सांगतील तुम्हाला. वाड्यात पोचल्यावर अधेमधे कुठेही न थांबता सरळ आतपर्यन्त या. माझे आईबाबा दिसतील तुम्हाला. निःसंकोचपणे माझ्या आई जवळ जाअून हुशारीने बोला तिच्याशी. तिचं आतिथ्य मागा. तुमची वर्तणूक आवडली, तर तुमचं काम सहज साधून जाईल. राजभवनात माझ्या आईचा शब्द खाली पडत नाही. तुमचं भाग्य चांगलं असेल, तर तुम्हाला आवश्यक ती मदत मिळून जाईल."

यानन्तर वारुणी गाडीत बसली अन् तिने खेचरांना आवाज दिला. गाडी चालू लागली. मागोमाग इतर सर्वही निघाले. बगीचाजवळ



पोचल्यावर रूपधर तिथेच थांबला अन् बाकी सर्व आपापल्या स्थानी गेले. सूर्यास्तानन्तर आपली इष्टदेवता बुद्धिमती हिचे स्मरण करून रूपधर राजभवनाकडे निघाला.

वारुणी घरी पोचल्यावर तिच्या भावांनी धुतलेले कपडे आत नेले. घरात चुली पेटवून स्वयंपाकाचे काम ही सुरू झाल्याचे वारुणीला आढळले.

रूपधरने नगरात प्रवेश केला. अंधारात त्याच्याकडे कुणाचे लक्षही गेले नाही. एक लहान मुलगी भांडी घासताना आढळली; तिला रूपधरने विचारले, "मी एक परदेशी माणूस आहे. मला राजा बुद्धिमानचं घर दाखवतेस?"

"या काका, दाखवते मी. इथं इतरांजवळ असं काही बोलू नका. कारण इथली माणसं परदेशी लोकांकडे संशयाने पहातात. तेव्हा चुपचाप माझ्या मागे येत रहा."

रूपधर त्या मुलीबरोबर राजभवनात पोचला. भवन चांगले भव्य होते. आत प्रवेश करताना त्याला काहीसा संकोच वाटला. बराच वेळ त्या अर्धवट प्रकाशात तिथे काम करणाऱ्या दासींकडे पहात तो अुभा राहिला. नंतर त्याला तिथे एकूण चार एकर जमिनीवर पसरलेली एक फळबाग दिसली. शेवटी आपले धैर्य एकवटून त्याने आत पाअूल ठेवले. वारुणीने सांगितल्याप्रमाणे तो



सरळ आत गेला.

आत एका विशाल मंडपात नगरातले मोठे लोक भोजनासाठी बसलेले होते. रूपधर त्यांच्या बाजूनेच पुढे जात आत पोचला. तिथे त्याला राजा व राणी दोघेही दिसले. राणीसमोर जाअून तिच्यापुढे गुडघे टेकून तो म्हणाला - "महाराणी, मी एक अभागी माणूस आहे. एक शरणार्थी म्हणून आपल्याजवळ आलो आहे. आपण व आपले कुटुंबीय सुखी राहोत ! मला स्वदेशी परत जाण्यासाठी आपल्या मदतीची अपेक्षा आहे."

त्याचे बोलणे ऐकून तेथे अुपस्थित सर्वजण चकित झाले! शेवटी एक वृद्ध माणूस



महाराजांना म्हणाला, "राजा, आपल्या अतिथीला असे जमिनीवर बसवून ठेवल्याने आपल्या प्रतिष्ठेला धक्का लागतोय. तेंव्हा याला आपण स्वतः योग्य आसनावर बसवून भोजन करायलाही बोलव."

बुद्धिमान राजाने स्वतः रूपधरचा हात पकडून त्याला जवळच्या आपल्या थोरल्या मुलाच्या जागेवर बसवले. रूपधरसाठी त्या तरुण राजकुमाराने आपले आसन रिकामे केले व तो स्वतः दुसऱ्या एका आसनावर जाऊन बसला. नंतर सर्वांनी मिळून भोजन केले.

भोजनानंतर बुद्धिमान अुभा राहून अुपस्थित सज्जनांना म्हणाला, "तुम्हा सर्वांचे भोजन अुरकले आहे. आता जाअून आराम करा. अुद्या भल्या पहाटेच पुन्हा भेटू आपण. आपल्या या अतिथीचं तेंव्हा आपण मनोरंजन करू आणि त्याच्या पुढील प्रवासा बद्दल चर्चा करू. याचा देश किती का दूर असेना, त्याला सकुशल तेथे पोचवणं हे आपलं परम कर्तव्य आहे. आपण खूप व्यवस्थित योजना करूनही त्याला पुन्हा कष्ट झेलावे लागले, तर ते आपलं दुर्भाग्यच म्हणावं लागेल. हा मानवरूपात कोणी देवता असला, तरी आपल्याला ही काही नवी गोष्ट नव्हे. देवताही कधीकधी मनुष्य रूपात अवतरतात अन् आपल्याबरोबर भोजनही करतात. मनोरंजनाच्या कार्यक्रमात भागही घेतात ते. हे सर्व बऱ्याच जुन्या काळापासून असंच चालत आलेलं आहे."

हे सारे ऐकल्याबरोबर रूपधर म्हणाला, "महाराज, आपण असल्या काही भ्रमात राहू नका. मी कोणी देवता वगैरे नव्हे, सामान्य मानवच आहे मी; अगणित कष्ट झेललेला माणूस. कदाचित माझ्याइतके कष्ट अुपसलेला माणूस या जगात कुठेच नसेल! म्हणूनच यातून माझ्या अुध्दारासाठी मला मदत करा. आता माझी एकच इच्छा आहे. माझं ते एकच ध्येय म्हणजे आपल्या देशात परत जाअून पोचणे; तिथं जाअून आपली सारी माणसं पाहून मग मरून जाणे! बास."

त्याच्या बोलण्यामुळे सर्वांना त्याच्याबद्दल सहानुभूती वाटली. ती त्यांनी प्रकटही केली. सर्वजण तेथून गेल्यावर फक्त राजाराणीच काय ते अुरले त्या जागी.

राणीने रूपधरकडे निरखून पाहिले. तिच्या लक्षात आले की त्याच्या अंगावरची वस्त्रे तर, आपण आपल्या हातांनी शिवलेली वस्त्रे आहेत. ती विचारू लागली, "बेटा, पहिला प्रश्न मीच विचारते तुला. तू कोण आहेस? कुठून आलायस? ही वस्त्रं तुला कोणी दिली? तू तर म्हणालास की, आपण समुद्रातून वहात या देशात पोचलो?"

आता सम्मोहिनीच्या कैदेतून सुटून या देशाच्या समुद्रकिनाऱ्यावर पोचेपर्यन्तची सारी हकीकत त्याने राणीला सविस्तर सांगितली. सत्य न लपवता त्याने हे ही सांगून टाकले की, वारुणीची आपली भेट किनाऱ्यावर कशी झाली अन् तिने कशी आपल्यावर दया दाखवून भोजन व वस्त्रे ही दिली.

सर्व काही ऐकून घेतल्यावर बुद्धिमान रूपधरला म्हणाला, "महाशय, माझ्या मुलीने एक मोठीच चूक केलीय. तिनं तुम्हाला स्वतःबरोबरच इथं आणायला हवं होतं."

"महाराज, तिच्यावर रागावू नका. तिनं तर मला बरोबरच यायला सांगितलं होतं. पण मीच तसं करायला कचरलो." रूपधर बोलला.

"माझ्या मुलीशी विवाह करून इथेच रहायची तुमची इच्छा नसेल, तर अुद्या मी तुमच्या प्रवासाची व्यवस्था करून देईन. तुम्हाला सुखरूप रवाना करणं ही माझी जबाबदारी समजतो मी. आमच्या जहाजांसारखी जहाजं अन् अुत्तम नाविक या जगात अन्यत्र कुठेच नसतील." राजा म्हणाला.

या बोलण्यात ते गुंतलेले असतानाच राणीने रूपधरच्या झोपण्याची व्यवस्था केली. आपले सर्व कष्ट विसरून रूपधर निद्राधीन झाला.

-क्रमशः



# शेजाऱ्याला मदत!

उन्हाळ्याचे दिवस होते. रामपुर गावातील एका झोपडीला आग लागली. आग विझवण्यासाठी शेजार-पाजारचे काही लोक विहिरीतून पाणी काढीत होते, तर काही लोक ते पाणी झोपडीपर्यंत नेऊन आग विझवीत होते. काही लोक जवळच्या तलावातून पाणी आणीत होते.

एवढं सगळं चालू असलं तरी नकुल मात्र लिंबाच्या झाडाच्या छायेत बसून गाणं गुणगुणत होता.

याच वेळी शेजारच्या गावातील एक माणूस तिकडून चालला होता. नकुलकडे पाहून त्याला मोठे आश्चर्य वाटले. त्याने नकुलला विचारले - ''कसा माणूस आहेस तू? लोक शेजाऱ्याला मदत करण्यासाठी खपत आहेत, आणि तू मात्र आरामात झाडाच्या सावलीत बसून गुणगुणतो आहेस!''

नकुलने आरामात उत्तर दिले - ''मीच तर त्यो शेजारी आहे. आज माझ्या झोपडीला लागलेली आग जे विझवीत आहेत, त्यांच्याजवळ मी काल थोडे पैसे मागितले होते. त्यावेळी मला कोणी ही मदत केली नाही. आता ही ते काही मला मदत करीत नाहीयेत !''

शेजारच्या गाववाल्याने आश्चर्याने विचारले - ''काही तरी बडबड नको करूस. तुझ्या झोपडीला लागलेली आग सर्व जण विझवीत आहेत; ही ते तुला करीत असलेली मदतच नाही का?''

''मुळिच नाही ! आजू-बाजूच्या झोपड्यांना आग लागू नये म्हणून ते स्वत:ला मदत करीत आहेत, समजलं?'' नकुलने ठणकावले.



# स्वप्न-सुंदरी

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ आला. त्याने झाडावरून प्रेत खाली उतरवले व ते आपल्या खांद्यावर टाकून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतातील वेताळ बोलू लागला - ''हे राजा, या स्मशानात राहून तू एवढे कष्ट कशासाठी उपसत आहेस? काही ही असलं तरी एक गोष्ट पक्की लक्षात ठेव-अपूर्व नि अलौकिक अनुभव शेवटी मनुष्याच्या दु:खाला कारणीभूत होतो. उदाहरणादाखल मी तुला पुष्पहार नावाच्या एका युवकाची गोष्ट सांगतो.'' आणि वेताळाने गोष्ट सांगायला सुरुवात केली.

फार पूर्वीची गोष्ट आहे. एका देशात पुष्पहार नावाचा एक तरुण रहात असे. तो राजवंशांतील धनसंपन्न पुरुष होता. दिसायला तो फार सुरेख होता. दूर दूरच्या देशातून लग्नासाठी त्याला मुली सांगून येत. पण त्याला कुठलीच मुलगी पसंत पडत नसे. त्याचं एक

## वेताळ कथा



कारण ही होतं. त्याच्या मनात एक स्वप्न-सुंदरी ठाण मांडून बसलेली होती.

गंधमादन पर्वतीय प्रदेशात एक सरोवर आहे आणि पूर्णिमेच्या रात्री तेथे गंधर्व-कन्या येतात असं पुष्पहारने ऐकलं होतं. आपल्या मनातील स्वप्न-सुंदरीचा शोध घेत तो त्या सरोवरापर्यंत पोचला.

हे सरोवर एका गंधर्व राजाचे होते. त्याच्या सुकन्या नेहमी स्नान करण्यासाठी तेथे येत असत. प्रियवादिका नावाच्या एका राजकुमारीला पुष्पहारने पाहिले. तिला पाहताच त्याला वाटलं की आपली स्वप्न-सुंदरी हीच. तो आपल्या मनातील गोष्ट तिला सांगणार, एवढ्यात तिने सरोवरात उडी मारली व ती अदृश्य झाली.

निराश न होता तो त्या सरोवराच्या परिसरात राहू लागला. तिसऱ्या पूर्णिमेला त्याला प्रियवादिका पुन्हा तेथे आलेली दिसली. तेव्हा तो स्वतः झाडांच्या आड लपला आणि ती त्याच्या आवाक्यात येताच त्याने तिचा हात पकडला. प्रियवादिकेने जोर लावून आपला हात सोडवून घेतला. तिने पुन्हा सरोवरात उडी मारली नि ती अदृश्य झाली.

तिला शोधून काढण्यासाठी तो सरोवरात उडी मारणारच होता. इतक्यात एक गंभीर आवाज त्याच्या कानावर पडला - 'थांब!' लगेचच गंधर्व राजा, आपल्या एक सारख्या दिसणाऱ्या तीन मुलींसह सरोवरातून बाहेर आला. तो पुष्पहारला म्हणाला - "या तिघी जणी माझ्या मुली आहेत. या तिघींपैकी कोणावर तुझे प्रेम आहे ते सांगशील? तू जर बरोबर उत्तर दिलंस तर माझी ती मुलगी मी तुला देऊन टाकीन."

पुष्पहारने तिघींना एकदा न्याहळून पाहिले. त्या तिघी ही गुलाबाच्या पाकळ्यांसारख्या समानच दिसत होत्या. तो विचार करू लागला की आपण ज्या स्वप्न-सुंदरीला पाहिले, ती या तिघींपैकी कोणती? एकदम त्याला एक कल्पना स्फुरली. तिघींच्या ही उजव्या हाताकडे त्याने निरखून पाहिले. एकीच्या उजव्या हाताचे मनगट अमळ सुजलेले त्याच्या लक्षात आले.



आता आपली स्वप्न-सुंदरी कोणती हे पुष्पहारने ओळखले. त्याने गंधर्व राजाला ती मुलगी दाखवली. गंधर्वराजा त्याच्या बुद्धिमत्तेवर खुश होऊन म्हणाला - "शाबास! तू अगदी बरोब्बर ओळखलंस. माझी कन्या प्रियवादिकेचे ही तुझ्यावर प्रेम बसले आहे. पण माझी एक अट आहे. शांत-गुण हा आम्हा गंधर्वांचा धर्म आहे. तुला या धर्माचे पालन करावे लागेल. कधी रागावून, आपल्या मनावरील ताबा सुटून तीन वेळा तू काही विपरीत केलंस तर ही तुला सोडून स्वगृही परत येईल." असं म्हणून गंधर्व राजाने प्रियवादिकेला तेथे सोडले, व बाकीच्या दोन कन्यांसह तो अदृश्य झाला.



प्रियवादिका लाजेने मान खाली घालून उभी राहिली. पुष्पहारने तेथेच गांधर्व पध्दतीने प्रियवादिकेशी विवाह केला व तिला घेऊन तो आपल्या नगरीत आला.

काही दिवसांनी आपल्या बालपणच्या एका मित्राकडे त्याला पत्नी सह जावे लागले. या मित्राला मुलगा झाला होता. पुष्पहारने आणलेला आहेर मुलाच्या आईच्या हाती दिला व मुलाला उचलून त्याचा एक पापा घेतला.

परंतु मुलाला पाहताच प्रियवादिकेने आपले तोंड फिरवले. त्या मुलाबद्दलची घृणा तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होती. ती तत्काळ तेथून निघाली. तेथे असलेले सर्व लोक तिचा हा व्यवहार पाहून आश्चर्यचकित झाले. पुष्पहारला ही फार आश्चर्य वाटलं. घरी पोचताच त्याने तिला विचारले - "छोट्या लेकराला पाहताच तोंड फिरवून तू अशी परत का फिरलीस?"

प्रियवादिका म्हणाली - "त्याला आपल्या मांडीवर घ्यावं असं मला मुळिच वाटलं नाही."

"मी तुला विचारतोय तुला असं का वाटलं नाही?" पुष्पहारने पुन्हा प्रश्न विचारला.

"कारण मी नाही सांगणार !" प्रियवादिकेने स्पष्ट शब्दात सांगून टाकलं. पुष्पहार आपल्यावर नियंत्रण ठेवू शकला नाही नि त्याने प्रियवादिकेच्या गालावर एक चापट मारली.

प्रियवादिकेच्या डोळ्यात अश्रू आले. ती



म्हणाली - ''त्या मुलाला पाहताच आपल्याला माहीत नसलेल्या काही गोष्टी मला समजल्या. मोठा झाल्यावर हा मुलगा मोठा दुष्ट होणार आहे. तो अनेकांची हत्या करील आणि शेवटी त्याला फाशी दिली जाईल. अशा पाप्याला स्पर्श करणं मला योग्य वाटलं नाही. आपण मात्र माझ्यावर खूप रागावलात. आपण पहिल्यांदा माझ्यावर हात टाकला हे नीट लक्षात ठेवा.''

पुष्पहारला वाटले आपल्या हातून चूक घडली. येथून पुढे सावध राहण्याचा त्याने निश्चय केला. राग आला तरी त्याला सीमेबाहेर जाऊ देऊ नये. तेव्हांपासून तो प्रियवादिकेशी अधिक प्रेमाने व्यवहार करू लागला.

एक महिन्यानंतरची गोष्ट. गावाचा नगराध्यक्ष पुष्पहारचा मित्र होता. पुष्पहारला नगराध्यक्षाच्या मुलीच्या लग्नाला प्रियवादिके-सह जावे लागले.

नगराध्यक्षाने पुष्पहार व प्रियवादिका यांचे मनःपूर्वक स्वागत केले. त्यांना तो विवाह-मंडपात घेऊन गेला. थोड्याच वेळात वर वधूच्या गळ्यात मंगळसूत्र बांधणार होता. या आनंदमय वातावरणात प्रियवादिका अचानक जोर-जोरात रडू लागली. आश्चर्यचकित होऊन सर्व लोक तिच्याकडे पाहू लागले.

तेव्हा पुष्पहारने प्रेमळ स्वरात पत्नीला विचारले - ''काय झालं? तू या मंगल वेळी अशी रडते का आहेस?

प्रियवादिका म्हणाली - ''काय सांगू नि कसं सांगू? हे वर-वधू एकमेकांना योग्य नाहीत. लग्नानंतर दोघे ही शत्रूसारखे आपापसात झगडत राहतील. ते संसाराचं रणांगण बनवतील !'' प्रयत्न करून ही तिला आपले रडणे आवरता येईना.

लग्न-समारंभात उपस्थित मंडळींनी हे बोलणे ऐकले. त्यातील एक जण शेजारच्याला म्हणाला - ''बिचारा ! आपल्या बायकोला कह्यात ठेवण्याचं सामर्थ्य नाही याच्यात. कसा तिला गप्प बसवणार?''

हे त्याचे बोलणे ऐकून जोराने प्रियवादिकेचे खांदे हलवीत चंद्रहार म्हणाला - ''रडू नकोस, शांत हो.''

प्रियवादिका म्हणाली - ''आपण दुसऱ्यांदा माझ्यावर हात टाकलात!'' आणि ती लग्न-मंडपातून उठून घरी आली.

या घटनेनंतर पुष्पहार बायकोबाबत फारच सावधान राहू लागला. तिला सोडण्याची तर त्याची इच्छा नव्हती. आता केवळ एक संधी शिल्लक राहिली होती.

आणखी काही दिवसांनी पुष्पहारला आपल्या बायकोला घेऊन काकांच्या घरी जाण्याचा प्रसंग आला. कारण काकांचा मुलगा मरण पावला होता. हा मुलगा जवळ जवळ पुष्पहारच्याच वयाचा होता. त्याची बायको प्रेताजवळ बसून विलाप करीत होती. तिचे रडणे ऐकून सर्वजण शोकमग्न झाले होते. सर्वांच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. अशा दुःखमय वातावरणात प्रियवादिका अेकदम मोठमोठ्याने हसू लागली. सर्व जण तिच्याकडे पाहू लागले. पुष्पाहारने हळूच तिच्या कानात सांगितले - ''अशा वेळी हसणं योग्य नाही. घरातील एका तरुणाच्या मृत्यूमुळे सर्वजण इथे दुःखी आहेत.'' तरी पण प्रियवादिका खदखदा हसतच राहिली. आता पुष्पहारचा आपल्यावरील ताबा सुटला आणि त्याने प्रियवादिकेला जोरात एक गुद्दा मारला.

हसायचं थांबून प्रियवादिका म्हणाली - ''जो मेला, तो मोठा भाग्यवान आहे ! एका सम्राटाच्या घरी त्याला नवा जन्म प्राप्त झाला



आहे. अशा भाग्यशाली माणसाबद्दल सर्व जण रडत आहेत याचं मला हसू आलं. बरं, ते सगळं राहू द्या आता. माझ्या वडिलांना दिलेल्या वचनाचा तुम्ही भंग केलेला आहे. आता मी तुमच्या बरोबर राहू शकत नाही.'' असं म्हणून ती गंधमादन पर्वताकडे जायला निघाली. पुष्पहारने तिला थांबवण्याचा प्रयत्न केला नाही. ती ज्या वाटेने गेली, तिकडे तो निर्लिप्तपणे पहात राहिला.

एवढी गोष्ट सांगून आता वेताळ विक्रमादित्याला म्हणाला - ''राजा, जे काही घडलं, त्याबाबत माझ्या मनात काही शंका आहेत. पुष्पहारने गंधर्वराजाच्या अटीचे पालन का केले नाही? प्रियवादिका त्याला सोडून

निघाली, तेव्हा पुष्पहारने तिला अडवले का नाही? पत्नीवरील प्रेम कमी झाले म्हणून का त्याने असे केले? माहीत असून ही माझ्या या शंकांचे समाधान तू न केलेस तर तुझे शिर धडावर राहणार नाही हे तू जाणतोसच.''

विक्रमादित्य शंकांचे समाधान करीत म्हणाला - ''मानव आणि गंधर्व यांच्यात होणारा विवाह तसा धर्मविरुद्ध आहे. खरे म्हणजे हा विवाह विवाहच नव्हे. पुष्पहारने प्रियवादिकेवर मनापासून प्रेम केले. पण तिच्या स्वभावात तो बदल घडवू शकला नाही. तसेच प्रियवादिका ही आपल्या गंधर्व-स्वभावात काही बदल घडवून आणू शकली नाही. दोघांचे गुण-धर्म एकमेकांविरुद्ध होते. त्याप्रमाणे दोघे ही आचरण करीत राहिले. मनुष्य देवांच्या धर्मांचे पालन करू शकणार नाही. स्त्रीवर केवळ प्रेम करून मनुष्य आपले जीवन परिपूर्ण करू शकणार नाही. पुष्पहारने तीन वेळा जेव्हा आपल्या बायकोवर हात उचलला, प्रत्येक वेळी त्याने विचार केला - अशा परिस्थितीत लोकांना माझ्याबद्दल काय वाटत असेल? त्यावेळी प्रियवादिकेच्या वडिलांना दिलेले वचन तो विसरला. गंधर्वकन्या असल्यामुळे प्रियवादिकेजवळ अद्भुत शक्ति होती. आपल्या या शक्तीच्या आधारेच ती कोणाचे ही भविष्य जाणू शकत होती. म्हणून तिला जे योग्य वाटले, ते तिने केले. मी एका मानवाची पत्नी आहे आणि आपल्या काही मर्यादा आहेत हे ती विसरून जात असे. मानव समाजाच्या रीतींचे पालन ती करू शकली नाही. आपल्या दोघांचे गुण-धर्म एकमेकांच्या विरोधी आहेत हे पुष्पहारने जेव्हा जाणले, तेव्हा हे कठोर सत्य त्याला पटले की आपण दोघे पति-पत्नी म्हणून एकत्र राहू शकणार नाही. दोघांचे वैवाहिक जीवन शाश्वत होऊ शकणार नाही. म्हणूनच पित्याकडे निघालेल्या प्रियवादिकेला थांबवण्याचा प्रयत्न त्याने केला नाही.''

राजा विक्रमादित्याचे हे समर्पक उत्तर ऐकून बेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडावर जाऊन बसला.

**आधार : धर्मनंदन पंत यांची एक कथा**





# योग्याचा सल्ला

**गो**पी नावाच्या एका तरुणाला गावच्या जमीनदाराकडे एक छोटी नोकरी मिळाली. आता त्याला मुली सांगून येऊ लागल्या. कमला नावाच्या एका छोट्या पण संपन्न परिवारातील मुलीशी त्याचे लग्न झाले.

कमला जेव्हा सासरी आली तेव्हा आसपासच्या संपन्न महिलांकडे पाहून गोपी कडे दागिने, साड्या इत्यादींची मागणी करू लागली. वस्तु न मिळाल्या म्हणजे ती चिडे.

घरातील या अशान्त वातावरणात गोपी त्रस्त होऊन गेला. जमीनदाराकडील कामात ही त्याचे लक्ष लागेना. परिणाम असा झाला की त्याला नोकरीला मुकावे लागले.

एक दिवशी संध्याकाळी गोपी एका योग्याकडे गेला नि म्हणाला - ''स्वामी, माझ्या बायकोने माझा छळ मांडलाय. मला जीवनाबद्दल मुळिच आसक्ति राहिली नाही. आपण सिद्ध योगी आहात असं ऐकून आहे. मला एकादा नवा जन्म द्या.''

त्याचे बोलणे ऐकून योगी हसत म्हणाला - ''बेटा, तुला कोणता जन्म हवा ते तरी सांग.''

गोपी काही उत्तर देणार एवढ्यात वाऱ्याने झाडावरील काही फुले त्याच्या डोक्यावर पडली. सुगंध पसरविणारी ती फुलं पाहून गोपी म्हणाला - ''स्वामी, मला फुलाचा जन्म द्या.'' योग्याने गोपीला डोळे मिटायला सांगितले आणि त्याच्या डोक्यावर आपल्या हाताने काही लिहिले. लगेच गोपीला फुलाचा जन्म लाभला. पण त्याच्या मनात निरनिराळ्या शंका येऊ लागल्या. आपण ज्या झाडावर आहोत त्याला कोणी पाणीच घातले नाही तर? अचानक एकाद्या मुलीने आपल्याला तोडले आणि सुकल्यावर आपल्याला उकिरड्यात फेकून दिलं तर?

भयाने त्याचा थरकाप झाला. जोराने

**सुशीला गायतोंडे**

ओरडत त्याने आपले डोळे उघडले आणि त्याला झाडावर बसलेले एक कबुतर पंख फडफडवीत असलेले दिसले.

गोपी योग्याला म्हणाला - ''स्वामीजी, मला फुलाचा जन्म नको. मला पक्षाचा जन्म मिळाला तर बरें होईल !''

योगी म्हणाला - 'तथास्तु' !

दुसऱ्याच क्षणी गोपी पक्षी बनला. एका शिकाऱ्याने त्याला पाहिले नि त्याच्यावर बाण सोडला. पण शिकाऱ्याचा नेम चुकला आणि बाण एका फांदीवर जाऊन पडला. यावेळी आणखी जोराने ओरडत गोपी म्हणाला - ''स्वामीजी, मला हा पक्षाचा जन्म नको. या जन्मात तर संकटावर संकटं दिसताहेत. केंव्हा बाण येऊन शरीरात घुसेल सांगता येत नाही. मला आपला तुम्ही बकरीचा जन्म द्या. आरामात हिरवं-गार गवत खाईन अन् मजेत जीवन जगेन !''

योग्याने प्रेमपूर्वक गोपीच्या खांद्यावर हात ठेवला नि म्हणाला - ''बेटा, तुला बकरीचा जन्म मिळाला, तर कसाई लोक तुला सुखाने जीवन जगू देतील का?''

हे ऐकताच गोपीने योग्याच्या पायावर डोके ठेवले आणि म्हणाला - ''मी आपला मनुष्य आहे तोच बरा. नको मला दुसरा कोणाचा जन्म !''

गोपीच्या मस्तकावर हात ठेवीत योगी म्हणाला - ''पुत्रा, मी तुला फुलाचा जन्म ही दिला नाही, न कबुतराचा. असा जन्म देण्याची शक्ति माझ्यात नाही. मी क्षण भर त्या त्या जन्माची अनुभूति मात्र तुला दिली. निदान आता तरी मनुष्य-जीवनाचा खरा अर्थ समजून घे. जीवनाकडे पाहण्याचा योग्य दृष्टिकोण शीक. मनापासून आपल्या पत्नीत योग्य ती सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न कर. माझी खात्री आहे की तू तिच्यात बदल घडवू शकशील. दुसरी एकादी नोकरी पहा आणि श्रद्धा व निष्ठेने आपले काम कर. मग तुझं जीवन सार्थक होईल. हेच जीवन तुला जगण्यासारखे वाटू लागेल.''

गोपीने योग्याला साष्टांग नमस्कार केला आणि संतुष्ट होऊन घराकडे परत आला.





# महानगर मुंबई

आलेख : मीरा नायर

चित्रकार : गौतम सेन



ग्रेट ब्रिटनचा दुसरा चार्ल्स्



पोर्तुगीज राजकन्या कॅथरिन द ब्रॅगान्झा

पाच शतकांपूर्वी जेंव्हा पोर्तुगीज लोक भारतात आले, तेंव्हा आजचे मुंबई शहर ज्या सात बेटांनी मिळून बनले आहे, ती मच्छीमार कोळी लोकांची निरनिराळी सामान्य सात गावे होती. १६६१ मधे पोर्तुगीज राजकन्या कॅथरिन द ब्रॅगान्झा हिचा दुसऱ्या चार्लसशी विवाह झाला, तेंव्हा यांपैकी मुंबई हे बेट पोर्तुगीजांनी त्याला आंदण दिले. पुढे बाकीची सहा बेटे ही त्यांना ब्रिटिशांहाती सोपवावी लागली. पुढील काही वर्षात ही बेटे पुलांच्या साह्याने एकमेकांना जोडण्यात आली व लवकरच मुंबई शहर हे भारताच्या व्यापाराची राजधानी बनले.



मुंबईची सात बेटे

मुंबईला एकूण ६४ कि.मी. लांबीचा समुद्रकिनारा लाभला आहे. नैऋत्येला वर्सोवा किंवा वेसावे हे मच्छीमारीचे गाव आहे. मुंबईचे मूळ निवासी असणाऱ्या बहुसंख्य कोळी लोकांची येथे वस्ती आहे. पुरुष लोक समुद्रावरून मासे पकडून आणतात व बायका ते बोटींवरून अुतरवून घेणे, बाजारात नेअून विकणे, वाळवणे इ. कामे करतात. मुंबई या नावावरून प्रसिद्धी मिळालेला 'बॉम्बे डक' किंवा 'बोंबिल' हा येथील मासे खाणाऱ्या लोकांचा आवडता मासा होय.

वर्सोव्यापासून दोन कि.मी. अंतरावर प्रवासी लोकांचा लाडका 'जुहू बीच' नावाने प्रसिद्ध असणारा किनारा आहे. अरबी समुद्राच्या अुसळत्या लाटा व हवेच्या मन्द झुळुका प्रवाशांना आल्हाद देतात. भेळ-पुरी इ. चटकदार खाद्यवस्तूंची हारीने अुभी असलेली दुकाने हे ही येथील एक आकर्षण आहे.

जुहूला हौशी विमान चालकांसाठी एक हवाई-अड्डा आहे. १९३२ मधे श्री.जे.आर्.डी. टाटा यांनी आपले पुस मॉथ हे विमान येथे अुतरवले होते. कराची



टाटांनी ज्यातून ऐतिहासिक अुड्डाण केले ते पुस मॉथ



जे.आर्.डी.टाटा

ते मुंबई हे आपल्या देशातील पहिले उड्डाण होते. टाटा-विमान-सेवेचे नाव नंतर 'अेयर इंडिया' असे झाले.

येथून आणखी दक्षिणेकडे समुद्रकिनाऱ्यावर, वान्द्रा उपनगराच्या एका टेकडीवर 'माऊंट मेरी' हे चर्च आहे. १६४० मधे पोर्तुगीजांनी ते बांधले होते. दरवर्षी सप्टेंबरमधे येथे मोठा उत्सव असतो. सर्वधर्मीय लोक उत्सवासाठी येथे गर्दी करतात.


माऊंट मेरी चर्च

आणि 'हाजी अली दर्गा' तर समुद्रामधल्याच एका खडकावर बनवलेला आहे. पीर अली हजरत बुखारीच्या कबरीवर बनवलेला हा दर्गा ८०० वर्षांचा जुना आहे. हे एक संपन्न व्यापारी असून हज यात्रेला जाण्यापूर्वी यांनी आपली सगळी संपत्ती गरीबांना वाटून टाकली अन् यात्रेहून परतल्यावर समुद्रातल्या या छोट्याशा खडकावर राहू लागले. त्यांच्या निधनानन्तर तेथेच त्यांचे दफन करून भक्तांनी दर्गा बांधला. दर्ग्यावर पोचण्यासाठी असलेला पूल भरतीच्या वेळी पाण्यात बुडत असल्यामुळे फक्त ओहोटीच्या वेळीच तेथे जाता येते.


हाजी अली दर्गा

'मलबार हिल' च्या खाली मुंबईची सुप्रसिद्ध 'चौपाटी' आहे. संध्याकाळी भेळपुरी, पाणी-पुरी इ. अन् हवा खाण्यासाठी हजारो लोक येथे जमतात. जुहू प्रमाणेच चौपाटीलाही विमानोड्डाणाचा इतिहास आहे. बरोबर शंभर वर्षांपूर्वी एक वैदिक पंडित शिवकर बापूजी तळपदे यांनी स्वतः बनवलेले विमान चौपाटीवरून उडवले होते. राईट बंधूंच्याही ८ वर्षे अगोदर हे उड्डाण घडले.

'चौपाटी' नाव उच्चारल्याबरोबर 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे!' असे ठणकावणाऱ्या लो. बाळ गंगाधर टिळक यांची आपल्याला आठवण येते. दाह-संस्कार केल्याजागी आज चौपाटीवर त्यांचा कांशाचा भव्य पुतळा उभा आहे. गणेशोत्सवाला सार्वजनिक स्वरूप त्यांनीच दिले. गणपतीच्या लहान-मोठ्या हजारो मूर्ती अनंतचतुर्दशीच्या दिवशी येथे समुद्रात विसर्जित केल्या जातात व चौपाटीवर माणसांचा महासागर गोळा होतो.


विसर्जनासाठी नेण्यात येणारी गणेशमूर्ती

भारताच्या स्वातंत्र्यासाठी झालेल्या अनेक चळवळींना मुंबई नगर साक्षी आहे. इंडियन नॅशनल कॉंग्रेसची स्थापना १८८५ त इथेच झाली. ८ ऑगस्ट १९४२ रोजी 'भारत छोडो' आन्दोलन येथेच सुरू झाले. या दोन्ही घटनांशी संबंधित स्थान 'गवालिया टॅंक' हे होय.

मुंबई नगरात सर्व धर्म, जाती आणि वर्गातले लोक रहातात, त्यामुळे येथे सर्व धर्मांची प्रार्थनास्थाने बनलेली आहेत. नगराच्या माझगाव भागात मुंबईतल्या जवळजवळ ३००० चिनी नागरिकांसाठी १८० वर्षांपूर्वी बनवलेले चिनी मंदिर आजही अस्तित्वात आहे. शहरात एक जपानी मन्दिर व कित्येक यहुदी सिनेगॉग्जही आहेत. पारशांसाठी अनेक अग्याऱ्या (अग्नि मन्दिरे) तर आहेतच.

मुंबईच्या स्टॉक एक्स्चेंज (सट्टा बाजार) कडून संपूर्ण देशाचे व्यापारक्षेत्र संचालित केले जाते. हे देशातील सर्वात जुने स्टॉक एक्स्चेंज होय. प्रथम १८५० मधे सहा दलालांनी एका वडाच्या झाडाखाली बसून याची सुरुवात केली होती. दलाल स्ट्रीटवरील गगनचुंबी इमारत १९७७ मधे बांधली गेली.

आता चला शहराच्या पूर्व समुद्रकिनारी. नगराच्या सर्व गोद्या (डॉक) याच बाजूला आहेत. ससून डॉक, प्रिन्सेस डॉक, अलेक्झांड्रा, इंदिरा (व्हिक्टोरिया) डॉक इ. सर्व गोद्या १८७० व १९७५ च्या दरम्यान बनवल्या गेल्या. मुंबईच्या बंदरावरील जहाजांची गर्दी हटवण्यासाठी एक आधुनिक बंदर बनवण्यात आले आहे. ते म्हणजे न्हावा-शेवा बेटांवर बनवले गेलेले जवाहरलाल नेहरू बंदर.

१४ एप्रिल १९४४ रोजी मुंबई बंदरात एक मोठा स्फोट झाला. खूप दूरवर त्याचा आवाज ऐकू आला. घरांची तावदाने फुटली. काही घरांतून सोन्याच्या लगडी व बिस्किटे येऊन पडली. दुसरे महायुद्ध तेव्हा चालू होते. लोकांना वाटले की जपानी बॉम्बवर्षक येऊन पोचले आहेत. पण स्फोट झाला होता ब्रिटिश जहाज एस् एस् स्टाइकिनवर. हे जहाज कराचीहून आले होते व त्यावर मोठ्या प्रमाणावर स्फोटक पदार्थ लादलेले होते. मालात खूपसा कापूस व करोडो रुपयांचे सोनेही भरलेले होते. जहाजावर अचानक आग लागली व स्फोटक पदार्थांचा स्फोट झाला. मग काय एका जहाजामुळे दुसऱ्याला


मुंबईचे सर्वधर्मीय, सर्व जातीय रहिवासी



आग लागत गेली व समुद्रात अुभी अन्य १४ जहाजेही 'अग्नये स्वाहा' झाली. आग विझवायला २४ बंबांची गरज पडली. जवळजवळ १०,००० मजूर मोडतोड झालेले सामान सहा महिने हलवण्याचा प्रयत्न करत होते. बरीच माणसे जखमी झाली व बरीच मेली.

या महानगरीला स्वप्ननगरी व भारताचे हॉलिवुड असेही संबोधण्यात येते. भारतातील सर्वात मोठा सिनेव्यवसाय इथेच आहे नं !

७ जुलै १८७६ रोजी शहरातील वॉटसन हॉटेलमधे देशातली पहिली फिल्म दाखवण्यात आली. हे स्थान सध्याच्या एस्प्लनेड बिल्डिंगचा एक भाग आहे. गोरेगाव या अुपनगरात कित्येक एकर क्षेत्रावर फिल्मसिटी अुभारण्यात आलेली आहे. तेथे अनेक प्रकारचे सेट कायम स्वरूपात बनवून ठेवण्यात आलेले आहेत. वर्षभर येथे शूटिंग चालूच असते.

मुंबईच्या दक्षिण टोकाला नौसेना भा.नौ.पो. आंग्रेच्या परिसरात ४०० वर्षांचे जुने सौरघड्याळ आहे. घड्याळावर काही मानवी व जनावरांच्या विचित्र आकृति कोरलेल्या आहेत. तीन मीटर अुंचीच्या या घड्याळाचे तोंड समुद्राकडे आहे. पोर्तुगीजांनी ते अशासाठी बनवले की बंदरात येणाऱ्या जहाजांना आपल्या प्रवेशाची वेळ कळावी.

चारशे वर्षांचे सौरघड्याळ

दक्षिणटोकावरच मुंबईचे सुपरिचित 'गेटवे ऑफ इंडिया' आहे. पिवळ्या बेसॉल्ट दगडाने बनवलेले एक महिरपाकार बनवलेले द्वार आहे. अन् अगदी समुद्राला लागून बनवलेले आहे. १९११ मधे ब्रिटनचे सम्राट पंचम जॉर्ज व राणी मेरी हे राजदाम्पत्य भारतात आले. भारतभेटीसाठी येणारे हे पहिलेच राजदाम्पत्य. तेव्हा त्यांच्या स्वागतासाठी प्लॅस्टर ऑफ पॅरिसच्या साह्याने हे द्वार मोठ्या गडबडीने बनवले गेले. नंतर त्याच स्थानी १९२७ मधे आजचे गेटवे ऑफ इंडिया निर्माण केले गेले.

भारत स्वतन्त्र झाल्यानन्तर इंग्रज सैनिकांची शेवटची तुकडीही याच द्वारातून बाहेर पडून जहाजातून ब्रिटनकडे रवाना झाली.



गेट वे ऑफ इंडिया





## हजार रुपयांचा झब्बा

**जा**मनगर मधे दोन मित्र रहात होते - ब्रह्मा आणि भोगी. दोघे ही खूप मेहनत करीत. एक वर्षी दुष्काळ पडला. काम मिळविण्यासाठी दोघे शहरात आले. तेथे त्यांना चांगली कामे मिळाली. दोघांनी ही खूप पैसे मिळवले.

आपल्या गावी जाऊन लोकांना आपलं वैभव दाखवावं असा विचार ब्रह्माच्या मनात आला. भोगीही गावी यायला तयार झाला.

ब्रह्मा भोगीला म्हणाला - "हात हलवीत आपल्या गावी जाणे योग्य होणार नाही. आपल्या मित्र-मंडळींसाठी काही भेटी घेऊन जाऊ या."

जामनगर मधे ब्रह्माचे निदान दहा दोस्त तरी होतेच. म्हणून त्याने निरनिराळ्या दहा वस्तु खरेदी केल्या. त्याला शंभर रुपये खर्च करावे लागले. भोगी ब्रह्माला म्हणाला - "शहरात आपण कसे वैभवात आहोत हे लोकांना समजावं अशी इच्छा असेल तर चांगल्या मूल्यवान वस्तु घेऊन गेलं पाहिजे."

ब्रह्मा फटकन् म्हणाला - "माझ्या ऐपतीप्रमाणे मी आपल्या वस्तु खरेदी केल्या आहेत."

दोघे जण बाजारात भटकत राहिले. एक व्यापारी जोरजोरात ओरडत होता - "अरे बाप रे! एवढ्या मोठ्या शहरात माझा माल खरेदी करणारा श्रीमंत कोणी नाही?"

भोगी व्यापाऱ्याला म्हणाला - "दाखव पाहू तुझा माल."

एक झब्बा दाखवीत व्यापारी म्हणाला - "हे कापड चीनहून आलंय. याच्यावर जे नक्षीकाम आहे ते सोनं नि चांदीच्या धाग्यांनी विणलंय! या झब्ब्यात कुठे कुठे मोती पण दिसतील. माझी किंमत आहे फक्त हजार रुपये!"

कोंडिबा सुरकुले



''झब्ब्याची किंमत हजार रुपये ! आरामशीर जीवन जगणाऱ्या एकाद्या श्रीमंताला दाखव, तो घेईल कदाचित्! असल्या वस्तु नको आणत जाऊस या बाजारात.'' ब्रह्मा म्हणाला.

पण भोगीला हा सौदा करावासा वाटत होता. व्यापारी एक हजारावरून खाली यायला जरा ही तयार नव्हता. भोगीने आपल्या जवळचे पैसे काढून मोजले. नऊशे रुपयेच होते त्याच्या जवळ. ब्रह्माकडून भोगीने शंभर रुपये कर्जाऊ घेतले नि तो झब्बा खरेदी केला.

आश्चर्य करीत ब्रह्माने विचारले - ''एवढ्या भारी किंमतीचा झब्बा तू कोणासाठी खरेदी केलास? आपल्या गावच्या पाटलाला भेट म्हणून देणार आहेस? जरा आठव, त्याने आपल्याला कधी काही मदत केली कां? दुसऱ्या कोणाला देण्याचा विचार असेल, तर तो हा झब्बा घालण्याच्या लायकीचा आहे का हे अगोदर पहा.''

भोगी हंसत म्हणाला - ''दुसऱ्या कोणासाठी हजार रुपये खर्च करणारा मूर्ख मी नाही. हा झब्बा घालून मी गावात हिंडू लागलो म्हणजे सर्व गावकरी माझ्याकडे पाहून थक नाही का होणार?''

''आपले वैभव दाखवण्यासाठी हजार रुपये खर्च करून बसलास! हा घालून तुला असं काय मोठं सुख मिळणार रे? 'यासाठी आपण हजार रुपये मोजलेत' एवढं फक्त तुला आठवत राहील!'' ब्रह्माने भोगीला समजून सांगण्याचा प्रयत्न केला.

''ब्रह्मा, तुला सुखाचा उपयोग घेण्याची कला माहीत नाही. दुसऱ्यांसाठी जो खर्च करशील, तो सगळा व्यर्थ आहे. कारण त्यामुळे त्यांचे समाधान कधीच होत नाही. आणि आपल्याला ही काही मिळत नाही. आपण स्वत:साठी खर्च केला तर आपले सुख वाढते, मन संतुष्ट होते. मी म्हणतो तसं केलंस तर कल्याण होईल बघ तुझं!'' भोगीने ब्रह्माला हितोपदेश दिला.

ठरलेल्या दिवशी दोघे जण आपल्या गांवाला जायला निघाले. गावाच्या सीमेवर एक तलाव होता. भोगी स्नान करण्यासाठी तिथेच थांबला. तो ब्रह्माला म्हणाला - ''मी स्नान करून हजार रुपयांचा झब्बा घालीन, आणि मगच गावात पाऊल ठेवीन.''

ब्रह्मा ताबडतोब गावात गेला आणि सगळ्या भेट-वस्तु देऊन आला. सर्वांनी त्याचा आदर-सत्कार केला आणि भोगी बाबत विचारपूस केली.

ब्रह्मा म्हणाला - ''भोगीचं काय सांगू? आपल्या गावात भटकण्यासाठी तो हजार रुपयांचा झब्बा घालून येणार आहे!''

भोगी आल्याची बातमी समजताच काही लोक गावाच्या सीमेवर त्याला भेटायला आले. तोपर्यंत त्याची आंघोळ झालेली होती. हजार रुपयांचा झब्बा पण त्याने आपल्या अंगावर चढवला होता.

गाववाले भोगीच्या अवती-भोवती जमा झाले आणि म्हणाले - ''ब्रह्माने आम्हाला सांगितले की तू हजार रुपयांचा एक झब्बा आणला आहस! एवढा मूल्यवान झब्बा कसा असेल ते पहायचंय आम्हाला. एकदा दाखवशील?''

भोगीच्या चेहऱ्यावरचा रंग उडाला. अंगांत घातलेला झब्बा दाखवीत तो म्हणाला - ''पहा ना, तोच झब्बा तर मी घातला आहे.''

गावकऱ्यांनी निरखून झब्ब्याकडे पाहिलं. त्यांच्यातील एक जण बोलून गेला - ''शहरातले लोक मोठे धोकेबाज असतात





असं आम्ही ऐकलं होतं. हा झब्बा, अन् हजार रुपयांचा! भोगी, हा तर अगदीच साधारण दिसतोय. असल्या झब्ब्यासाठी आपल्या गावातला कोणी हजार रुपये कधीच देणार नाही!''

भोगीला मनांतल्या मनात वाईट वाटलं. पण ते लपवीत गंभीरपणे तो म्हणाला - ''यातील सोन्या चांदीचे धागे पहा !'' पण गाववाल्यांवर याचा काही परिणाम झाला नाही. उलट ते म्हणू लागले - ''दिसायला तर हे पिवळे नि पांढरे धागे दिसताहेत, आणि तू ज्याला मोती म्हणतोस, ते तर काचेचे तुकडे ! समज की हे खरेच सोन्या-चांदीचे धागे आहेत आणि यात खरोखरीचे मोती जडवले आहेत. पण त्याचा काय फायदा? तू जोपर्यंत सांगत नाहीस, तोपर्यंत कोणाच्या लक्षात येणार नाही. असला झब्बा शंभर रुपयात शिवून घेता येईल. आता तरी सांग खोटं बोलत आहेस की नाही?''

तेंव्हा भोगी त्यांच्या बरोबर गावात गेला आणि ब्रह्माची साक्ष काढली. ब्रह्माने जेंव्हा सांगितले की झब्ब्याची किंमत खरोखरीच हजार रुपये आहे तेंव्हां सर्व जण एका सुरात त्याला म्हणाले - ''तू बरोबर होतास आणि व्यापाऱ्याने भोगीला फसवलं याकडे मुळिच लक्ष दिले नाहीस!''

''नाही, नाही. यात ब्रह्माची काहीच चूक नाही. ब्रह्माकडून अगोदरच तुम्हाला माझ्या झब्ब्याबद्दल समजले होते. म्हणून तुम्ही काही तरी भव्य-दिव्य कल्पना केलीत. अगोदर काही माहीत नसतं तर माझा हा झब्बा नक्कीच तुम्हाला आवडला असता.''

हजार रुपयांचा झब्बा घालून भोगी गावात कित्येक मंडळींना भेटला. काही लोकांनी त्याला त्याच्या चपलांबद्दल विचारले, तर काहींनी त्याच्या हातातल्या छडीबद्दल! काही लोक म्हणाले - भोगी शहरात जाऊन खूपच बदलला आहे. दुसरे काही म्हणाले - याच्या मिश्या जमीनदाराच्या मोठ्या मुलाच्या मिश्यांसारख्या दिसताहेत. पण नाही, आणि त्याने स्वत:च एक-दोन जणांना विचारले - ''माझा झब्बा कसा वाटला तुम्हाला?'' त्यांनी उडत उडत उत्तर दिले - ''बरा आहे, पण त्यात विशेष असे काही नाही.''

दोन दिवस गावात राहिल्यानंतर दोन्ही मित्र शहराकडे परत निघाले. दोघांना ही जाणणाऱ्यांपैकी काही लोकांनी ब्रह्माला सल्ला दिला - ''बाबारे, भोगीला नीट संभाळ हं!'' नंतर भोगीकडे पाहून ते म्हणाले - ''हे बघ, मेहनत करून मिळवलेला पैसा वायफटपणे खर्च करू नकोस. ब्रह्मा कसा शहाणा आहे, त्याच्या सल्ल्याप्रमाणे वागून आपल्याला सुधार.''

रस्त्यात भोगी ब्रह्माला म्हणाला - ''आपल्या गावचे लोक मोठे स्वार्थी आहेत. तू त्यांना भेटी दिल्यास, म्हणून त्यांनी तुझी तोंड भरून तारीफ केली. मी केवळ स्वत:साठी खर्च केला, म्हणून त्यांनी माझा अपमान केला. मी पुन्हा कधी ही या गावात पाऊल ठेवणार नाही!''

ब्रह्मा हसत म्हणाला - ''तू तर स्वत:लाच अजून नीट ओळखलं नाहीयेस, गाववाल्यांच्या बद्दल तू कसलं काय जाणतोस? हजार रुपयांचा झब्बा काय तू स्वत:साठी खरेदी केला होतास? मुळिच नाही, दुसऱ्यांनी आपली प्रशंसा करावी म्हणून! जर स्वत:साठी खरीदला असतास, तर तो घालून तुला आनंद वाटला असता. त्याच्या किंमतीचा अंदाज करण्यात खरं म्हणजे कुणाची काही चूक नव्हती, तू उगाचच त्यांच्या बद्दल गैरसमज करून घेतलास. हजार रुपयांचा झब्बा घालून लोकांकडून आपली तारीफ तुला ऐकायची होती. यापेक्षा त्यांना काही छोट्या वस्तु दिल्या असत्यास तर त्यांनी तुझी तारीफ केली असती. आपली प्रशंसा ऐकण्याचीच तुझी इच्छा होती, तर हा अधिक सोपा मार्ग होता. जरा नीट विचार करून पहा, तू दुसऱ्यांसाठी काही केलं नाहीस, उलट त्यांना स्वार्थी म्हणत आहेस!''

भोगीला आता आपली चूक समजली. समाजात कसे वावरावे हे त्याच्या लक्षात आले. त्याने ब्रह्माला धन्यवाद दिले.





# आता नको युद्ध!

कमलपूर मध्ये राजा कमलध्वज राज्य करीत असे. त्यांच्या मुलाचं नाव शूरध्वज, आणि मुलीचं शालिनी. शूरध्वज आपल्या नावाप्रमाणे शूर-वीर होता. तो सर्व विद्या व कलांमध्ये प्रवीण होता. पराजित होणं जणू त्याला ठाऊकच नव्हतं. त्याचं नाव काढताच शत्रु थरथरू लागत.

कमलध्वजाने शूरध्वजाला युवराज बनवलं आणि स्वतः नाममात्र राजा बनून राहिला. राजा शालिनीसाठी योग्य वराचे संशोधन करू लागला. हे समजल्यावर शूरध्वज पित्याला म्हणाला - ''माझ्या बहिणीचा विवाह एकाद्या महावीराशीच झाला पाहिजे. माझा जो पराभव करील, त्याच्याशी तिचा विवाह होईल.''

राजा म्हणाला - ''तुझा विचार योग्यच आहे. पण हे युद्ध तुझ्याशी नव्हे, अन्य एकाद्या वीरा बरोबर होईल.''

शूरध्वजाला वडिलांचं म्हणणं पटलं नाही. त्याला युद्धात जो पराभूत करील, त्याच्याशीच शालिनीचे लग्न होईल असा त्याने हट्ट धरला. त्याने तशी घोषणा ही करवली.

काही दिवस त्याच्याशी सामना करायला कोणी ही राजकुमार पुढे सरसावला नाही. शूरध्वजला आपण जिंकू शकू असा कोणाला विश्वास नव्हता. पण शेवटी श्यामल देशाचा राजकुमार वायुवर्मा शूरध्वजला पराजित करून शालिनीशी विवाह करण्यासाठी पुढे आला.

राजाला वाटलं की वायुवर्मा सर्व दृष्टींनी शालिनीला योग्य पति आहे. शालिनीला पण तसंच वाटलं. पण शूरध्वजला युद्धात पराभूत करण्याची अट होती. या युद्धासाठी एक मुहूर्त निश्चित करण्यात आला.

परंतु युद्धाच्या आदल्या दिवशी एक दुर्घटना घडली. राजकुमारी शालिनी जेव्हा राजोद्यानात हिंडत होती तेव्हा काही दुष्टांनी तिला पळवून नेले.

शूरध्वजाने वायुवर्माला बोलावून सांगितलं - ''माझ्या बहिणीचं काही दुष्टांनी अपहरण केले आहे. तिचा शोध घेण्यासाठी मी निघालो आहे. आपलं युद्ध आता नंतर होईल.''

''तिचा शोध करायला मी पण तुझ्या बरोबर येतो. त्या दुष्टांना मारूनच टाकीन.'' वायुवर्मा म्हणाला.

दोघे जण आपली शस्त्रे घेऊन निघाले. प्रथम ते राजोद्यानात गेले. जरा बारकाईने पाहिल्यावर बदमाश लोक शालिनीला कुठल्या दिशेला घेऊन गेले हे त्यांच्या लक्षात आलं. बुद्धिमती शालिनी आपण वेचलेली फुलं रस्त्यात टाकत गेली होती. फुलांचा मागोवा घेत दोघे ही जात राहिले. राजधानीपासून बरंच दूर गेल्यावर त्यांना झाडाखाली बसलेला एक योगी दिसला.

पुढे रस्त्यावर फुले दिसेनात. कदाचित् शालिनी जवळची फुले संपली असतील असा विचार करून दोघे जण योग्याकडे आले आणि त्यांनी त्याला विचारलं - ''योगीवर, एकाद्या स्त्रीला जबरदस्तीने इकडून कोणी घेऊन गेलं का?''

योगी म्हणाला - ''होय, चार धष्ट-पुष्ट माणसं एका बाईला घेऊन जात होती, हे मी पाहिलं. ते तिला जंगलाच्या बाजूला घेऊन गेले.''



जंगलाकडे जाणाऱ्या त्या रस्त्यावर एक गुहा होती. गुहेपासून काही अंतरावर त्यांना एक फूल दिसले.

वायुवर्मा म्हणाला - ''दुष्टांनी शालिनीला या गुहेत लपवलेलं दिसतंय. मी जाऊन तिला सोडवून आणतो!''

''नको, नको. तू इथंच बाहेर थांब.'' असे म्हणत शूरध्वजाने म्यानातून तलवार उपसली आणि त्याने गुहेत प्रवेश केला.

तो आत गेला अन् गुहेचे मुखद्वार एका विशाल शिलेने बंद झाले.

गुहेच्या बाहेर उभ्या असलेल्या वायुवर्माने

अशोक पवार

एका स्त्रीचा आर्त स्वर ऐकला. ज्या दिशेने हा स्वर आला, तिकडे वायुवर्मा जात राहिला. काही अंतर चालून गेल्यावर वायुवर्माने शालिनीला एका झाडाला बांधून ठेवलेले पाहिले. आणि चार धिप्पाड माणसे तिला धमकावत होती. त्यांचा नायक शालिनीला म्हणत होता - "अग वेडे, तुला सोडवण्यासाठी जो वीर आला होता, त्याला माझ्या सेवकांनी गुहेत बंद करून ठेवले आहे. आता तर तुला माझ्याशी लग्न केलेच पाहिजे. आता कोणी तुझे रक्षण करू शकणार नाही."

वायुवर्मा तलवार उपसून त्या नायकावर तुटून पडला. हे पाहून चारी जणांनी एकवटून त्याच्याशी सामना दिला. थोडा वेळ ते त्याच्याशी लढत राहिले, पण जेव्हा त्यांच्या लक्षात आले की वायुवर्मापासून आपले रक्षण करणे कठिण आहे, तेव्हा ते जंगलात पळून गेले. वायुवर्माने शालिनीला बंधन-मुक्त केले आणि तिला घेऊन तो गुहेजवळ परत आला.

त्याच वेळी काही अरण्यवासी तेथे आलेले होते. त्यांच्या मदतीने त्याने गुहेच्या द्वारावरील शिला दूर सारली आणि आत बंद असलेल्या शूरध्वजाची सुटका केली.

शूरध्वज आणि वायुवर्मा शालिनीसह राजधानीत परत आले. राजाने पुरोहिताला बोलवले आणि वायुवर्मा व शालिनी यांच्या विवाहाचा शुभ-मुहूर्त काढायला सांगितला. शूरध्वज म्हणाला - "युद्धात माझा पराभव केल्यानंतरच हा विवाह होऊं शकेल. ते दुष्ट लोक शालिनीला घेऊन गेले नसते, तर आतापर्यंत युद्ध होऊन गेलं असतं !"

"तुझं युद्ध आज झालं. मला मुक्त करण्यासाठी वायुवर्माने तुझ्याशी युद्ध केले नि तो जिंकला पण! आता नको युद्ध !" शालिनी म्हणाली.

शूरध्वजाने लज्जित होऊन मान खाली घातली. त्याला माहीत नव्हतं की शालिनीचं अपहरण हे केवळ एक नाटक होते. आणि ते घडवून आणले होते राजा आणि शालिनीने!





# महाभारत

नारदांच्या प्रयाणानन्तर धर्मराजाने राजसूय यज्ञाबद्दल आपल्या बंधूंशी चर्चा केली. राजसूय यज्ञ सफलतेने पूर्ण झाला तर युद्ध सुरू होईल, मोठ्या प्रमाणावर जीवहत्या होईल अशी भीती एका बाजूला होती, तर दुसरीकडे हा यज्ञ केल्याने दिव्यलोक प्राप्तीची आशाही होती. 'आता काहीही होवो, पण यज्ञ करायचाच' असा निर्णय शेवटी त्याने घेतला.

हा निर्णय म्हणजे धर्मराजाला एक व्यसनच होऊन बसले. सदा सर्वकाळ तो त्याबाबतच विचार करू लागला. राजसूय यज्ञासाठी करावयाचे प्रयत्न या विषयावरच तो सभेत बोलू लागला. राजसूय यज्ञ करण्याची आपली योग्यता आहे किंवा नाही - याबद्दल तो मन्त्रीगणांना विचारू लागला.

"महाराज, राजसूय यज्ञ करायला आपण सर्वतोपरी योग्यच आहात; तो विजयपूर्वक पूर्ण करून आपण सम्राट म्हणून राज्यशकट उत्तम तऱ्हेने हाकू शकाल !" मन्त्र्यांनी अभिप्राय व्यक्त केला.

मन्त्र्यांच्या प्रोत्साहनामुळे धर्मराजाने आपला निर्णय आणखी दृढ केला. 'माझे भाऊ बलशाली आहेत. शत्रु-राजांना जिंकून ते त्यांच्याकडून कर वसूल करू शकतील. सर्व परिस्थिती अनुकूल अशीच आहे.' असा विचार त्याच्या मनात येऊ लागला. पण 'युद्धाला तोंड लागले तर अनेक माणसे मारली जातील' असा विचार करायलाही तो तयार नव्हता. तरीही त्याला इतके मात्र



वाटत होतं की, याबाबत कृष्णाचा विचार घेणंच अुचित होईल.

धर्मराजाने ताबडतोब द्वारकेला निरोप पाठवला व कृष्ण काही लोकांना बरोबर घेअून इन्द्रप्रस्थाला आला. अुचित आदर-सत्कार, खुशालीची चौकशी इ. झाल्यावर धर्मराज कृष्णाला म्हणाला, ''कृष्णा, राजसूय यज्ञ करायची माझी प्रबळ इच्छा आहे. शिवाय माझे अन्य हितचिंतकही सर्वजण मला प्रोत्साहन देत आहेत. पण राजसूय यज्ञ करण्यासाठी खूप शक्ती व सामर्थ्याची आवश्यकता आहे. इतकं सगळं माझ्या एकट्याच्या आवाक्यातलं नव्हे. इतरांचा सल्लाही पूर्णतः विश्वसनीय वाटत नाहीय. मला तुझा सल्ला हवा, कृष्णा ! तू 'नको' म्हणालास तर नाही करणार मी यज्ञ. बोल, तुझं काय मत आहे?''

कृष्ण अुत्तरला, ''धर्मराज, कोणत्याही दृष्टिकोनातून पाहिलं, तरी राजसूय यज्ञ करायला तू पूर्णतः योग्य असाच आहेस. तुला सर्व ज्ञान आहे. पूर्वी परशुरामाने क्षत्रीय वंशाचं निर्मूलन केलं. इक्ष्वाकु वंशाचे राजे हेच खरे क्षत्रीय आहेत. कालक्रमाने ते पुढे एकूण एकशे एक वंशात वाढले. या सर्वांना पराजित करून जरासन्ध सम्राट बनला. तो महाबलवान असून घमेंडखोरही आहे. त्याला जिंकणं म्हणजे अशक्य कार्य होय. त्याचा सेनापती आहे शिशुपाल. पश्चिमेकडचा राजा भगदत्त हा तुझ्या पित्याचा मित्र आहे. तरीही तो जरासंधाच्या सेवेत आहे. त्याच्या पक्षात आणखीही कित्येक बलवान राजे आहेत. त्या जरासंधाला त्रासूनच तर आम्ही द्वारकेला निघून गेलो अन् तिथलेच रहिवासी झालो. जरासन्ध जिवन्त असेपर्यन्त तुमचा राजसूय यज्ञ सफल होणार नाही. प्रथम त्याचाच काटा काढायला हवा.''

कृष्णाचे बोलणे ऐकून धर्मराज थंडच झाला! तो कृष्णाला म्हणाला, ''प्रत्येक राजा स्वतःसाठी सुखसाधनं जमवण्यातच मग्न आहे. आपलं साम्राज्य स्थापायचा विचार कोणीच करत नाहीय. कुणाचा तसा अुद्देश असला, तरी तो अंमलात आणणं सोपं नव्हे. मीही आपला हा विचार सोडून देतो आता. भविष्यात माझ्या वंशात हा याग करणारा कोणी तरी निपजेल अशी आशा बाळगून मी समाधान मानीन. जरासंधाला तूही तोंड देअू शकला नसशील, तर आम्ही बिचारे काय पराक्रम दाखवणार? आम्ही तर तुझ्याच बळावर अवलंबून ना?''

परन्तु भीमाला आपल्या वडीलबंधूचे बोलणे मान्य नव्हते. तो म्हणाला, ''सुरुवातीला हातपाय गाळणारे, पुढे काहीच मिळवू शकणार नाहीत. आपला पराजय आपण मानणाऱ्याला विजय कसा बरं मिळेल? आपल्याला अुपाय सांगायला कृष्ण तर आहेच अन् वर माझा अन् अर्जुनाचा पराक्रम ! बलवानावर जय मिळवणं हाच खरा विजय !''

'काही अुपायाने जरासन्धाला मारता येईल' असे कृष्णही म्हणाला. परन्तु धर्मराजाचाच धीर होत नव्हता. तो कृष्णाला म्हणाला, ''तुला आणि माझ्या दोन नेत्रांसमान असलेल्या भीमार्जुनांना साम्राज्याच्या आशेनं जरासंधाशी लढायला पाठवू नाही शकणार मी. तुम्ही त्याला जिंकू शकणार नाही. मला राजसूय यज्ञ मुळी करायचाच नाही.''

अर्जुन यावर म्हणाला, ''जो कसला प्रयत्नच करत नाही, त्याचा जन्म व्यर्थ होय.'' तो पुढे असेही म्हणाला, ''मग



माझ्याजवळचं गांडीव धनुष, अक्षय भाता आणि रथ या वस्तु शत्रुसंहारासाठी नव्हेत, तर कशासाठी आहेत?''

आता धर्मराजाला जरासंधाची माहिती जाणून घ्यायची अुत्सुकता वाटू लागली. कृष्ण जरासंधाबद्दल सांगू लागला -

बृहद्रथ नावाचा एक राजा मगध देशाचा शासक होता. तो इन्द्रासारखा होता. त्याच्याजवळ तीन अक्षौहिणी सैन्य होते. काशीराजाच्या दोन जुळ्या राजकन्यांशी त्याचा विवाह झाला. पण खूप काळपर्यन्त तो संतानहीनच राहिला. त्याने यासाठी केलेल्या पूजाअर्चा व्यर्थ झाल्या. तेंव्हा सन्तानप्राप्तीची इच्छा धरून आपल्या दोन्ही



पत्नींसह तो तपस्येसाठी बाहेर पडला.

वनात एका आंब्याच्या झाडाखाली चण्डकौशिक नावाच्या एका तपस्व्याशी बृहद्रथाची भेट झाली. हा एक अुत्तम तपस्वी होता. त्याचा वंश होता गौतम. बृहद्रथाने या तपस्व्याची निष्ठापूर्वक सेवा केली.

चण्डकौशिक एके दिवशी म्हणाला, "पुत्रा, दीर्घकाळपर्यन्त माझ्या सेवेत मग्न आहेस. तुझ्या सेवेने तृप्त झालोय मी. बोल, काय हवंय तुला?"

"स्वामी, मी खूप प्रयत्न केले, पण अजून संतानहीनच आहे. शेवटी विरक्त होअून तपस्या करायला इथे आलो मी. आता माझी इच्छा काय असणार?" राजा बृहद्रथ लीनतेने म्हणाला.

त्याच क्षणी एक पिकलेला आंबा चण्डकौशिकच्या मांडीवर पडला. ते फळ ताबडतोब राजाच्या हवाली करत तो म्हणाला, "राजा, तुला पुत्र नक्की होणार. आता तू आपल्या राजधानीला परत जा."

ते फळ घेअून दोन्ही राण्यांसह बृहद्रथ नगरात परतला. दोन्ही पत्नींवर सारखेच प्रेम असल्याने त्याने फळाचे दोन भाग करून दोघींना दिले. फलस्वरूप दोघीही एकाच वेळी गर्भवती झाल्या.

योग्य समयी दोघींना निरनिराळी मुलेही झाली; पण दोन्ही मुलांची शरीरे अर्धी अर्धीच होती. दोन्हींना एक डोळा, एक हात, एक पाय, एक कान, अर्धे तोंड, अर्धे नाक असे अवयव होते. ही विकृत मुले पाहून राण्या घाबरून रडू लागल्या. तेंव्हा दायांनी ती मुले अुचलून नगरात जमलेल्या कचऱ्यात टाकून दिली.

त्या प्रान्तात जरा नावाची एक राक्षसी रहात असे. ती या दोन अर्धशिशूंना घेअून जाण्यासाठी आली व चुकून ती दोन्ही शरीरे तिने एकत्र पकडली. त्याबरोबर ते दोन्ही भाग एकमेकांना चिकटून एक संपूर्ण बालक तयार झाले व ते जोराने रडू लागले. त्याचे रडणे ऐकून राण्या व राजा अंतःपुरातून धावत बाहेर आले.

हा शिशु राजवंशातला आहे हे जाणून जरेने मानवी रूप धारण केले व ते बालक राजाहाती सोपवत तिने बालकाची इत्यंभूत हकिकत जाणून घेतली. दोन्ही राण्या मोठ्या खुशीने मुलाला घेअून गेल्या व प्रेमाने त्याचा सांभाळ करू लागल्या.

बृहद्रथाने या पुत्राचे नाव ठेवले जरासंध. मुलाचा जन्मोत्सव दर वर्षी साजरा केला जावा अशी घोषणाही त्याने केली. जरासंध मोठा झाला. तो असामान्य शूरवीर गणला गेला. कित्येक राजांना त्याने पाणी पाजले. युद्धात त्यांना पराजित केले.

कृष्णाने कंसाला मारल्याची वार्ता कळली, तेंव्हा जरासन्धाने मथुरेवर आक्रमण केले. कारण कंसपत्नी जरासंधाच्या कन्या होत्या.

कृष्ण धर्मराजाला म्हणाला, "राजा, जरासंध कोणत्याही अस्त्रानं वा शस्त्रानं मरू शकणार नाही. पण भीम त्याला मल्लयुद्धात सहज मारू शकेल. माझ्या बोलण्यावर विश्वास असेल, तर भीमार्जुनांना माझ्या बरोबर पाठव."

"बाप रे ! तू हे काय बोललास कृष्णा! तुझ्याशिवाय आम्हाला आधार तरी कोणाचा आहे? तू जर जरासंधाला मारायचे मनावर घेतले असशील, तर तो मेलाच, असे मी समजतो. तुझा संकल्प असेल, तर माझा राजसूय यज्ञ निष्कंटक पार पडेल. तू बरोबर असशील तर भीमार्जुनांहातून होअू शकणार नाही, अशी गोष्टच नाही. आता तुम्ही तिघंही निघा आणि विजयश्री घेअून सक्षेम



परत या.'' धर्मराज म्हणाला.

कृष्ण व भीमार्जुन ब्राह्मणवेषात इन्द्रप्रस्थाबाहेर पडले. पद्मसरोवर, कालकूट, गंडकी, महाशोण पार करून पूर्वकोसल, मिथिला या नगरांतून पूर्व दिशेकडे प्रवास करत राहिले. मगधदेशात पोचल्यावर गोरधगिरीवर चढून त्यांनी राजधानी पाहून घेतली. नगराला घेरून किल्ल्यांसारखे पाच पहाड होते. यामुळेच त्याचे नाव 'गिरिव्रज' पडले होते. गिरीव्रजाला घेरून असलेल्या पहाडांपैकी चैत्यका नावाच्या पहाडावर तीन भेरी होत्या. कोणी परकीय नगरप्रवेश करू पहातील, तर या भेऱ्या आपोआप मोठ्याने वाजू लागत. म्हणूनच प्रथम तेथे जाऊन भीमार्जुनांनी त्या भेऱ्याच फोडून टाकल्या. परन्तु त्या प्रान्ताच्या नगरद्वारावर सशस्त्र सैनिक तैनात केलेले होते. म्हणून त्या बाजूने नगरात प्रवेश न करता ते चैत्यक पर्वतावर चढले, नगराचा तट पार करून त्यांनी नगरप्रवेश केला.

यावेळेपर्यन्त जरासंधाला 'आपले काही तरी वाईट होणार' असा भास होऊ लागला होता. त्यामुळे स्नान उरकून शांतीसाठी तो पूजेत मग्न झाला. इतक्यात कृष्ण व भीमार्जुन माळ्याकडे गेले व जबरदस्तीने त्याच्या हातातून फुलांचे हार हिसकून त्यांनी ते आपल्या गळ्यात घातले; शरीरभर चन्दन चोपडले व ते ब्राह्मणवेषात जरासंधाकडे गेले.

खरेखुरे ब्राह्मण समजून जरासंधाने त्यांचे चांगले स्वागत केले. परन्तु त्यांनी तो सत्कार स्वीकारला नाही. ते मौन राहिले.

कृष्णाने भीमार्जुनांकडे निर्देश करून जरासंधाला इतकेच सांगितले की, ''राजा, या दोघांनी मौन-व्रत धारण केलेलं आहे. मध्यरात्रीनंतरच ते तुझ्याशी काही बोलतील.''

''ठीक आहे तर. मध्यरात्रीनन्तरच मी यांचा सत्कार करीन.'' असे म्हणत जरासंधाने त्या तिघांना यज्ञशाळेकडे रवाना केले.

**क्रमशः**



# 'चांदोबा'च्या बातम्या



**वाढदिवसाची भेट**

साधारणपणे मुलांना त्यांच्या जन्मदिवशी भेटी मिळतात. नातेवाईक व मित्र-मंडळींकडून या भेटी मिळतात. या भेटी स्वीकारताना त्यांच्याकडे पाहून कधी कधी खूप आनंद होतो. केरळातील कंनूर जिल्ह्यातील तालिपरंबा येथील पंधरा वर्षाच्या प्रवीणला आपल्या वाढदिवशी मिळालेली एक भेट पाहून मोठे आश्चर्य वाटले. ही भेट-वस्तु काय होती माहीत आहे? त्याने स्वतः रचलेल्या कवितांचा संग्रह ! आपल्या कविता प्रकाशित होणार आहेत हे प्रवीणला माहीत होतं, पण त्या इतक्या लवकर प्रकाशित होतील अशी त्याला अपेक्षा नव्हती. सामान्यतः मुले गोष्टी लिहितात, कविता करतात आणि प्रकाशित करण्यासाठी वृत्त-पत्रिकांकडे पाठवितात. परंतु पुस्तकाच्या स्वरूपात छापलेल्या कविता फार कमीच आढळतात. तालिपरंबाच्या केन्द्रीय विद्यालयात दहावीत शिकणारा प्रवीण हिंदी व संस्कृत मध्ये कविता रचतो.

**तबला-वादन-पटु**

आकाशवाणी वरील संगीत कार्यक्रमात भाग घेण्याची संधि मिळण्यासाठी निदान सोळा वर्षांचे वय असावे लागते. पण आकाशवाणीच्या अधिकाऱ्यांनी बारा वर्षाच्या दीपक मेहताची संगीत-प्रतिभा पाहून हा नियम मोडला व त्याला बी ग्रेड दिली. दीपकने सहा वर्षापूर्वी स्वतःच तबला वाजवायला सुरुवात केली. नंतर त्याला शिकविण्या साठी शिक्षक नेमण्यात आले. आता तो तबला-वादनातील सगळे बारकावे शिकला. त्याने 'नॅशनल टॅलेंट स्कॉलरशिप' मिळवली. वयाच्या विसाव्या वर्षापर्यंत त्याला ही मिळणार आहे. 'झी टी.व्ही.' दीपकवर एक डाक्युमेंटरी तयार करणार आहे.

**बुद्धिबळनिपुण भारतीय बालिका**

ब्राझील मधील साबलोरेंको येथे १० ते १४ या वयोगटातील बालक-बालिकांसाठी एक 'वर्ल्ड यूथ चेस फेस्टिव्हल' आयोजित केला होता. त्यात भारता-तर्फे ७ मुलांमुलींनी भाग घेतला. यात दिल्लीच्या टानिया सचदेव नावाच्या मुलीचं वय फक्त आठ वर्षे आहे. 'इंटरनॅशनल चेस फेडरेशन' ने या स्पर्धेत भाग घेण्यासाठी टानियाला प्रोत्साहित केले. फेडरेशनचे अध्यक्ष म्हणाले - "भारताच्या या बुद्धिबलनिपुण बालिकेला या बुद्धिबळ स्पर्धेत भाग घेण्यासाठी पाठविताना मला फार आनंद होत आहे." तिची प्रशंसा करीत एशियन फेडरेशनचे अध्यक्ष म्हणाले - "टानिया चे या खेळातील कौशल्य अप्रतिम आहे. असे नैपुण्य क्वचितच अन्यत्र पहावयास मिळेल.





आपल्या देशाची
वृक्ष-संपदा

# ट्यूलिप

सर्वप्रथम १९८० मध्ये ट्यूलिप वृक्ष आफ्रिकेतील अंगोलाहून श्रीलंकेत आणला गेला असे म्हणतात. नंतर तो भारतात आला. आता ट्यूलिप वृक्ष जगात सर्वत्र आढळतो. महाराष्ट्रातील समुद्र-किनारी भागात ट्यूलिप विशेषेकरून दिसतात. उत्तर भारतात हा वृक्ष वर्षभर हिरवागार दिसतो, तर दक्षिणेत उन्हाळ्यात याची पाने झडतात.

याची गर्द हिरव्या रंगाची पाने एकमेका समोर असतात. थंडीच्या दिवसात या वृक्षावर हिरव्या रंगाच्या सुरेख नाजुक कळ्या येतात. फांद्यांच्या कोपऱ्यातून घंटेच्या आकाराची फुले झुपक्याने फुलतात. सप्टेंबरपासून मे महिन्यापर्यंत या झाडावर फुले दिसतात. उन्हाळ्यात या झाडांवर फळे दिसतात. फळे लांबडी व टोकदार असतात. हळू हळू या वृक्षाचा विस्तार होत राहतो. ट्यूलिपचे लाकूड मऊ असते, त्यामुळे त्याचा विशेष काही उपयोग होत नाही.

इंग्रजीत या झाडाला 'स्कार्लेट बेल' म्हणतात, कारण फुले लाल रंगाची व घंटेच्या आकाराची असतात. ट्यूलिपच्या कळ्या दाबल्या की त्यातून पाण्याचे थेंब बाहेर पडतात. म्हणून इंग्लिश मधे या झाडाला 'फाउंटन ट्री' ही म्हणतात.

वनस्पति-शास्त्रात याचे नाव आहे 'स्पातोडी कांपा तुलाहा'. फुले घंटेच्या आकाराची असतात, यावरूनच हे नाव पडले. हा मुख्यतः अलंकारिक वृक्ष आहे.



आपल्या देशातील ऋषि-मुनि : ११

# पराशर

कल्माषपाद नावाचा राजा शिकारीसाठी जंगलात गेला. रस्ता चुकून तो जेव्हा डोंगरावरील अरुंद वाटेने चालला होता, तेव्हा वसिष्ठ ऋषींचा पुत्र शक्ति समोरून येत होता. राजाने त्याला रस्त्यातून दूर हटायला सांगितले. शक्ति म्हणाला - 'तू बाजूला हो आणि मला जाऊ दे.'

यावर राजा संतापला. त्याने एक बाण सोडला नि शक्तीला मारून टाकलं. मरता मरता शक्तीने शाप दिला - "तुझा हा व्यवहार माणसाला शोभेसा नाही. तू जनावरासारखा वागतो आहेस. आता तुला पहिल्यांदा जे जनावर दिसेल, त्याची लक्षणे तुझ्यात उतरतील."

एवढ्यात राजाला जंगलाच्या वाटेने जाणारा एक वाघ दिसला. दुसऱ्याच क्षणी राजा वाघाप्रमाणे डरकाळ्या फोडीत आवेशात येऊन शक्तीवर तुटून पडला आणि त्याला गिळून टाकले. मग त्याने राक्षसाचे रूप धारण केले व पुढे निघाला.

शक्ति मुनीची पत्नी अदृश्यन्ती गर्भवती होती. परंतु बारा वर्षे झाली तरी ती प्रसूत झाली नाही. आसपास राहणारे मुनि सांगत - अदृश्यन्तीच्या गर्भात असलेला शिशु वेद-मंत्रांचे अध्ययन करीत आहे. नंतर जेव्हा मुलाचा जन्म झाला तेव्हा त्याचे नाव ठेवण्यात आले 'पराशर'. कपिल, पुलस्ती आदि गुरुंजवळ त्याने शिक्षण घेतले.

आपल्या वडिलांना एक राक्षसाने गिळले हे जेव्हा आईकडून पराशरला समजले तेव्हा तो संतापला. आणि सर्व राक्षस-जातीचा संहार करण्यासाठी त्याने एक यज्ञ आरंभिला. हे समजल्यावर पराशरचे आजोबा वशिष्ठ अन्य मुनींसह त्याच्याकडे आले. त्यांनी नातवाला यज्ञ थांबवायला सांगितले. पराशराने यज्ञ तर थांबवला, पण यज्ञकुंडात अग्नि धगधगत होता. तो तसाच सोडून देणं इष्ट नव्हतं. म्हणून पराशरने त्या अग्नीला गिळलं आणि हिमालयाच्या उत्तर दिशेला फेकून दिलं.

हिमालयात कधी कधी अग्नि प्रज्वलित झालेला दिसतो. आणि तो जंगलांना जाळून टाकतो. असा समज आहे की पराशराने जो अग्नि फेकून दिला, त्यामुळेच हिमालयातील बर्फाचे पाणी होते!



# तुम्हाला माहीत आहे का?

१. कोणत्या पक्षाला शांतीचे चिन्ह मानले जाते?
२. ब्रिटनची सर्वप्रथम महिला प्रधान मंत्री कोण?
३. ग्रहात सर्वात मोठा ग्रह कोणता?
४. साप डोळे उघडे ठेवून का झोपतो?
५. राजस्थानातील कोणता पक्षी सापांना खाऊन टाकतो?
६. 'प्रार्थना-चक्र' कोठे आहे? त्याचा उपयोग कोण करतात?
७. जपान मधील पुष्पालंकरण कलेचे नाव काय?
८. जगातील सर्वात अधिक लांबीची भिंत कोणती?
९. 'एफेल टॉवर' कोठे आहे?
१०. थर्मामीटर मध्ये कोणत्या द्रवाचा उपयोग करण्यात येतो?
११. अमेरिकेचे पहिले अध्यक्ष कोण?
१२. टेलीफोनचा शोध कोणी लावला?
१३. कोणत्या सणाला 'रंगांचा उत्सव' म्हणतात?
१४. जगातील सर्वात प्राचीन धर्माचे नाव कोणते?
१५. प्रथम श्रीलंकेचे नाव काय होते?
१६. जगातील सर्वात उंच मिनार कोणता?
१७. भारतीय नागरिकत्व स्वीकारलेल्या कोणत्या विदेशी स्त्रीला नोबेल पारितोषिक मिळाले?
१८. बॅडमिंटन हा खेळ कोठे सुरू झाला?
१९. महात्मा गांधी सर्वांना हाताने बनविलेल्या कापडाचा उपयोग करण्यास सांगत. ते कापड कोणते?
२०. दिल्ली जवळून वाहणारी नदी कोणती?

## उत्तरे

१. कबुतर.
२. मार्गारेट थॅचर.
३. गुरु ग्रह.
४. कारण त्यांना पापण्या नसतात.
५. कंकण पक्षी (बॅस्टर्ड) (बाज)
६. तिबेटांतील बौद्ध.
७. इकेबाना.
८. चीनची भिंत.
९. फ्रान्स मधील पॅरिस शहर.
१०. पारा.
११. जॉर्ज वॉशिंग्टन.
१२. अलेक्झांडर ग्रॅहॅम बेल.
१३. होळी.
१४. हिन्दू धर्म.
१५. सिलोन.
१६. दिल्ली येथील कुतुबमिनार.
१७. मदर थेरेसा.
१८. भारतात.
१९. खादी.
२०. यमुना.



# सून चांगली, नि सासू पण !

नागोर गावात पौरव रहात असे. त्याच्या लग्नानंतर एक आठवड्या भरात आषाढ महिना सुरू झाला. आषाढात सासूने सुन-मुख पहायचं नसतं; म्हणून पौरवने आपल्या बायकोला माहेरी रवाना केलं.

आषाढ संपून श्रावण मास सुरू होताच पौरवचे वडील त्याला म्हणाले - "दक्षिणा घेऊन तू शास्त्रींच्या घरी जा. तुझी आई पण तुझ्या बरोबर येईल. मग दोघेजण सूनबाईच्या माहेरी जा आणि तिला इकडे घेऊन या."

पौरवच्या आईने थाळीत एक शेर तांदूळ, दोन केळी, थोडंसं मीठ आणि काही चिंचा ठेवल्या. ताट घेऊन पौरव शास्त्री-जींच्या घरी गेला. ताटात दक्षिणा नाही हे त्यांच्या लक्षात आलं. त्यांना थोडासा राग ही आला. पण तो प्रकटपणे न दाखवता शास्त्रीजी म्हणाले - "अरे पौरव, अर्धा तास चांगला मुहूर्त नाही. तोपर्यंत मागे परसात ठेवलेल्या तुरी घरात आणून टाक. अर्धा तास मी पंचांगाला शिवणार सुद्धा नाही. तुला सासुरवाडीला जाण्यासाठी चांगला मुहूर्त मग मी तुला सांगेन!"

पौरव बिचारा करणार काय? मुकाट्याने परसात गेला आणि कामाला लागला. त्याच वेळी शास्त्रीबुवांची बायको पूजेची उपकरणी स्वच्छ करण्यासाठी तेथे आली.

पौरवला पाहून शास्त्रीण बाई म्हणाल्या - "बायकोला घेऊन आलास म्हणजे ती सासूची सेवा करील असं बघ हं. माझी पण सून आहे, काय सांगू तिचं? तिला तर माझी मुळिच पर्वा नाही."

पौरव काही बोलणार एवढ्यात शास्त्रीजींची सून स्वयंपाक करता करता बाहेर आली. ती म्हणाली - "सासूबाई, अहो, घरातली भांडणं चव्हाट्यावर का मांडायची?"

थोडा वेळ दोघी जणी अरे-तुरे वर येऊन बोलत राहिल्या. उद्या आपल्या घरात ही अशीच दृश्ये दिसू लागतील अशी पौरवला चिंता वाटू लागली.

आपलं काम उरकून पौरव शास्त्रीजीं कडे आला. ते त्याला म्हणाले - "पौरव, मुहूर्त तर काढलाय मी. पण वरलक्ष्मी व्रताच्या वेळी शास्त्रीजींना त्यांची दक्षिणा ही दिली पाहिजे." शास्त्रीजींनी रागाने त्याला सूचना दिली.

दुसऱ्या दिवशी निश्चित मुहूर्तावर पौरव आईला घेऊन सासुरवाडीला आला. विहीण बाईंनी केलेल्या सुरेख पाहुणचारावर आई खुश झाली. आई नि मुलगा सुनेला घेऊन आपल्या घरी आले.

पौरवच्या जीवनात आता आनंदी-आनंद पसरला. त्याची बायको घरातल्या सर्व कामात तरबेज होती. सासू सुनेवर बेहद्द खुश! ती नवऱ्याला म्हणे - "चांगली मुलगी असली म्हणजे घरात जिथं बसावं, तिथं छान आरामशीर जीवन जगावं - असं म्हणतात. पण मुलगी आपली कुठ असते? मुलगी म्हणजे परक्याचं धन! परमेश्वराच्या कृपेने सून सख्ख्या मुलीसारखी माझी सतत काळजी घेत असते."

पौरवच्या आईची बहीण लक्ष्मी नव्या सुनेला पाहण्यासाठी रामापुरहून आली. सुनेनं मावशी बाईंची चांगली सेवा केली नि सिद्ध केलं की सासू करीत असलेली



कुमुद डिके



प्रशंसा योग्यच आहे.

आपली ताई सुनेच्या इतकी आहारी गेलेली पाहून लक्ष्मीला घरात आपल्याला स्वातंत्र्य नसल्यासारखं वाटू लागलं.

घरी जायला निघाली तेव्हा लक्ष्मी बहिणीला म्हणाली - ''ताई, मला तुझी दयाच येते. नवरा आणि मुलगा यांनी तुझ्याबद्दलचा विचार सोडूनच दिल्यासारखा दिसतोय. सुनेची तारीफ सतत चालू असते. मला तर वाटतंय या घरात तुला काहीच स्थान नाही!''

बहीण गेल्यावर पौरवची आई याच गोष्टींचा विचार करू लागली. त्या विसरून जाण्याचा तिने प्रयत्न केला, पण व्यर्थ ! तिच्या कानात बहिणीचं बोलणं दुमदुमत राहिलं. स्नान, भोजन, शेतावर जाणं इत्यादि सर्वांबाबत बाप नि मुलगा सुनेशीच बोलत. हे सर्व पाहून मनातल्या मनात ती चिंता करू लागली. तिला वाटू लागलं, आपण सगळीकडे डावलले जात आहोत.

अशात कपडे धुऊन आणणारी परटीण गौरी एकदा तिच्याकडे आली. पौरवची आई तिच्याशी काही बोलणार, एवढ्यात ती म्हणाली - ''आता या वयात घरातल्या बारीक-सारीक गोष्टीत तुम्ही का उगाच लक्ष घालताय आजी? राम-नामाचा जप करा आणि शांतपणे पडून रहा. सून सगळं काही पहात आहे.''

गौरीचं हे बोलणं ऐकून सासूला वाटलं - आपण तर घरात कोणीच नाही. तिला फार दुःख झालं. हळू हळू तिच्यात बदल घडून येऊ लागला. घरातील सर्व जबाबदारी तिने आपल्यावर घेतली. सुनेच्या प्रत्येक कामात ती दोष काढू लागली. यामुळे सासू व सून यांच्यात भांडणे होऊ लागली. दोघी एकमेकींचे दोष काढू लागल्या. घरातील शांततेचं वातावरण नष्ट झालं. दोघी पौरव जवळ एकमेकीं बद्दल तक्रार करू लागल्या. बिचाऱ्या पौरवची स्थिति दयनीय झाली. त्याच्या जीवनातील आनंद नष्ट झाला.

सासू-सुनेची ही भांडणं पौरवला असह्य झाली, शेताची रखवाली करण्याचे निमित्त पुढे करून तो रात्रं-दिवस बाहेरच राहू लागला. पौरवच्या वडिलांच्या लक्षात सर्व गोष्टी आल्यावर ते मुलाला म्हणाले - ''तुझी मावशी येऊन गेल्यापासून आई बदलली आहे. तिला चांगला धडा शिकवला पाहिजे. मी सांगतो तसं कर. तू सर्व बाबतीत आपल्या बायको वरच विश्वास ठेवतोस असं नाटक कर. आईवर वारंवार रागवीत जा.'' आणि मग मुलाने काय काय करावे ते सर्व वडिलांनी समजाऊन सांगितले.

त्या दिवशी पौरव शेतावरून घरी आला तेव्हा आईने सुनेबद्दल तक्रार करायला सुरुवात करताच नाराज होत तो म्हणाला - ''सून सगळं आयतं खायला देतीय, तुझी सेवा करतीय आणि तू? तू फक्त तिच्या उखाळ्या-पाखाळ्या काढती आहेस. तुला स्वतःला सुख नाही, आणि आम्हाला ही कोणाला तू सुखाने राहू देत नाहीस. आमचं इथं रहाणं तुला पसंत नसलं तर सांग, आम्ही नवरा-बायको दुसरीकडे रहायला जातो. मला आपल्या इस्टेटीतलं काही नको आहे !''

आता पौरवची आई एकदम भडकली आणि नवऱ्याकडे जाऊन म्हणाली - ''खरं आहे, बायको आली नि आई गेली ! मी गुळासारखी झाले, आणि ती साखर !'' मुलगा जे काही बडबडला ते सारं तिने नवऱ्याला ऐकवलं.

पौरवचे वडील बायकोला घेऊन मुलाकडे आले आणि म्हणाले - ''बघ, बायकोला



ताब्यात ठेवणं तुला जमत नसलं तर चालू लाग तिला घेऊन. आई बद्दल चकार शब्दाने काही बोललास तर याद राख!''

पौरवची आई खुश होत म्हणाली - ''असं याला जरा ताळ्यावर आणा. बायकोच्या नादाने हा फार बिघडत चाललाय अलिकडे!''

व्यंगाने हंसत पौरव आईला म्हणाला - ''आई, बाबा तुझं ऐकनात, तर मी माझ्या बायकोचं ऐकतो ! तिच्या संरक्षणाची जबाबदारी माझ्यावर आहे की नाही? बाबा जे म्हणतील त्याला तू होकार देतेस, आणि मी मात्र आपल्या बायकोचं म्हणणं ऐकू नये असं तुला का वाटतं? मी बायकोकडे दुर्लक्ष करावं असं तुला का वाटतं? नवरा नि बायको एकोप्याने राहिले तरच कुटुंबात शांति नांदेल ना? आपला सासूचा अधिकार कोणी तरी हिसकाऊन घेतलाय अशा भ्रमात आहेस तू.''

आता आपली चूक आईच्या लक्षात आली. उदास होऊन म्हणाली - ''बेटा, माझ्या बहिणीने माझ्या सुखात विष ओकले. मला वाटू लागलं की माझ्या घरात माझा काहीच अधिकार राहिला नाही. पण खरं पाहिलं तर माझी सून आईसारखं माझ्यावर ही प्रेम करते. सासू म्हणून जो अहंकार माझ्यात होता, त्यामुळे मी आंधळी बनले!''

जवळच उभ्या असलेल्या सुनेने सासू-सासऱ्यांचे पाय धरले. ती म्हणाली - ''मी लहान तोंडी मोठा घास घेऊ इच्छित नाही. त्याचं असं आहे - आई ओरडली म्हणजे म्हणतात ती मुलीला सन्मार्गावर आणीत आहे, सासू ओरडली की ती सुनेला सतावीत आहे असं म्हणतात. सासू रागाऊन काही म्हणाली, तर मला वाटतं त्यात आपलं कल्याणच आहे. माझ्या दृष्टीने सासू आईसारखी आहे.''

यानंतर सास्वा-सुना एकोप्याने आनंदात राहू लागल्या. सर्व लोक म्हणू लागले - ''सासू-सून असावी तर अशी ! सून चांगली, नि सासू पण !''





# खोडकर पिशाचिनी

धनपुर गावात रामेश आणि सोमेश यांच्या झोपड्या शेजारी-शेजारी होत्या. ते दोघे जानी दोस्त होते. दोन्ही झोपड्यांमध्ये एक जांभळांचे झाड होते. या झाडाभोवती त्यांनी एक पार बनविला होता. वेळ मिळाला की दोघे जण पारावर गप्पा मारीत बसत.

एक दिवस पारावर बसून दोघांच्या गप्पा-गोष्टी चालू होत्या. रामेश म्हणाला - ''सोमेश, केव्हा तरी आपण लखपती होऊ आणि छान हवेल्या बांधू. पण मधे भिंत नसेल हं. तेव्हा ही हे जांभळांचे झाडच मधे असेल आणि आपण दोघे असेच गप्पा मारीत बसलेले असू.''

''रामेश, नक्की असंच होईल. माझी पण अशीच इच्छा आहे.''

रामेश उत्तरादाखल काही बोलणार एवढ्यात त्याची बायको बाहेर वाळत घातलेले कपडे नेण्यासाठी तिथे आली आणि म्हणाली - ''घरातला आरसा फुटलाय. दहा दिवस झाले शहरात जाऊन आणायला सांगतेय तुम्हाला !''

रामेश हंसत म्हणाला - ''आम्ही काय वायफट बोलतो आहोत?''

त्याच वेळी घरातील कचरा उकिरड्यावर टाकण्यासाठी सोमेशची बायको तिथं आली. ती आपल्या नवऱ्याला म्हणाली - ''कित्ती दिवस सांगतेय उंदीर पकडायचा पिंजरा आणा म्हणून ! इतकी टाळाटाळ कशासाठी?''

दोघांच्या बायका घरात निघून गेल्या. आता दोघे ही शहरात जायला निघाले. शहराची वाट एका छोट्या जंगलातून होती. अंधार पडायच्या आत घरी पोचण्यासाठी दोघे ही झटपट चालू लागले. पण ते जंगलात पोचले आणि अचानक मुसळधार पाऊस पडू लागला.

चान्दोबात पंचवीस वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट



अन्य काही उपाय नसल्यामुळे पावसापासून आपला बचाव करण्यासाठी दोघे ही एका चिंचेच्या झाडाखाली गेले. तेव्हा दूर अंतरावर वीज पडल्याचे ही त्यांनी पाहिले. भीतीमुळे थरकाप झालेला रामेश म्हणाला - "आरसा नि उंदरांचा पिंजरा यांच्या नादी लागून आपण या पावसात अडकलो."

"घाबरतोस का? पाऊस केव्हा तरी थांबणारच. मध्यरात्रीपर्यंत घरी पोंचलो तर बिघडलं कोठे?" सोमेशने धीर दिला.

बऱ्याच वेळाने पाऊस थांबला. दोघे जण घरी यायला निघाले. काही अंतर चालल्यावर वडाच्या पारंब्यांचा झोपाळा करून झोके घेत असलेल्या दोन पिशाचिनी त्यांना दिसल्या. झोके घेता घेता त्या जोरजोरात हसत होत्या. या दोघांना त्यांनी पाहिले.

पिशाचिणींची नजर चुकवून सटकणे या दोघांना ही शक्य नव्हते. एक पिशाचीण ठेंगणी होती आणि दुसरी उंच. टाळी वाजवून ठेंगणी पिशाचीण म्हणाली - "घाबरू नका. इकडे या बरं."

भीत भीत दोघे ही पिशाचिणींच्या समोर जाऊन उभे राहिले. तेव्हा उंच पिशाचिणीने विचारले - "तुमची दोघांची लग्न झाली आहेत का?"

रामेश मनातल्या मनात म्हणाला - 'हा काय प्रश्न आहे!' आपला तोल न जाऊ देता तो म्हणाला - "लग्न झालंय, म्हणून तर या संकटात सापडलोय! बायकांच्या विरुद्ध काही बोलण्याचं साहस आम्ही करु शकलो नाही, म्हणून आम्ही शहरात जायला निघालो." आता त्यांना जंगलच्या वाटेने का जावं लागलं याचं पूर्ण विवरण त्याने दोघींना ऐकवले.

सगळं ऐकून ठेंगणी पिशाचिणी म्हणाली - "तुम्ही दोघे जण आपल्या बायकांवर प्रेम करता की त्यांना भीता हे सांगा."

रामेश आणि सोमेश दोघांनी ही सांगितलं की ते आपल्या बायकोवर प्रेम ही करतात आणि त्यांना वचकून ही आहेत.

"गेले अनेक दिवस आम्ही तुमच्या सारख्यांची वाटच पहात होतो. आता घरी पोचल्यावर आम्ही सांगतो तसं करा." उंच पिशाचीण म्हणाली.

"असं करण्यात आमचा काय फायदा?" रमेशने प्रश्न विचारला.

दोघी पिशाचिणींनी आपापसात थोडा विचार-विनिमय केला आणि म्हणाल्या - "आम्ही सांगतो तसं करा. मग उद्या रात्री याच वेळी इथं या आणि तुमच्या बायकांनी काय केलं ते आम्हाला सांगा. असं केलंत तर तुम्हा दोघांना एक-एक सोन्याची मोहर आम्ही देऊं."

सोन्याच्या मोहरेची गोष्ट ऐकताच रामेश आणि सोमेश खुश होऊन म्हणाले - "सांगा बरं आम्ही काय करायचं ते!"

पिशाचिणींनी काय करायचं ते त्यांना सांगितलं आणि म्हणाल्या - "बस, आता काही विचारू नका. घरी जा आणि उद्या याच वेळी इथं या."

पिशाचिणींनी सांगितलेल्या गोष्टी नीट लक्षात ठेवीत रामेश नि सोमेश मध्यरात्री घरी पोचले. दरवाजा उघडताच रामेशच्या बायकोने प्रश्न केला - "हात हलवीत परत आलात? माझा आरसा कोठे आहे?" काही उत्तर न देता रामेशने बायकोला हटवले आणि आत निघून गेला.

"वेड लागलंय काय?" असे म्हणत तिने धडामदिशी दार बंद केलं.



तिकडे सोमेशच्या बायकोने हात हलवीत घरी आलेल्या आपल्या नवऱ्याकडे पाहून विचारले - "उंदरांचा पिंजरा कोठे आहे?" उत्तर न देता सोमेशने तिचा खांदा जोरात दाबला नि घरात निघून गेला. सोमेशच्या बायकोला मोठं आश्चर्य वाटलं. ती जोरात ओरडून म्हणाली - "एखाद्या भुताने तर नाही ना पछाडलं तुम्हाला?"

दुसऱ्या दिवशी रात्री दोन्ही दोस्त पुन्हा जंगलात आले. दोघांनी घरी जे घडलं ते पिशाचिणींना सांगितलं.

त्यांचं बोलणं ऐकून दोघी ही खूप जोरजोरात हसल्या. वडाच्या ढोलींतून दोन



सोन्याच्या मोहरा त्यांनी काढल्या आणि प्रत्येकाच्या हातावर एक-एक ठेवली.

खुशीत घराकडे निघालेल्या दोघांना थांबवीत पिशाचिणी म्हणाल्या - "थांबा, काही गैरसमज करून घेऊ नका. आम्ही दोघी मोठ्या खोडकर आहोत. आणखी मोहरा मिळवाव्यात असं नाही तुम्हाला वाटत?"

"का नाही? उद्या या वेळेपर्यंत लखपति व्हावं असं वाटतय आम्हाला!" रामेश म्हणाला.

"उद्या रात्री पर्यंत सुद्धा मी नाही थांबू शकत. सूर्योदय होईपर्यंत माझी करोडपति बनायची इच्छा आहे!" खिशात ठेवलेली सोन्याची मोहर चाचपत सोमेश म्हणाला.

दोघांच्या बोलण्यावर सात मजली हसत दोघी पिशाचिणी म्हणाल्या - "माणसाला इच्छा असणं हे स्वाभाविक आहे. आपल्या इच्छा-पूर्तीसाठी या जंगलातल्या चंदनाची चोरी मात्र करू नका. त्यामुळे एकाद्या वेळी तुरुंगात जाण्याचा धोका आहे. उद्या सुद्धा सोन्याची एक-एक मोहर पाहिजे असेल तर आम्ही सांगतो तसं करा. आणि परत येऊन तुमच्या बायकांनी काय केलं ते आम्हाला सांगा." उद्या काय करायचं ते त्यांनी त्यांना सांगितलं.

रात्री घरी पोचल्यावर रामेश आणि सोमेश दोघे ही आपआपल्या बायकांवर आग पाखडीत म्हणाले - "तुझं नशीबच फुटकं! लाख रुपये कमवायची ताकत आमच्यात आहे, पण तुमचं नशीब आड येतंय! पाच रुपये सुद्धा मिळवणं कठिण झालंय. जर काही लाज-लज्जा असली तर जा, आपल्या माहेरी चालत्या व्हा पाहू."

नवऱ्यांना रागावलेल पाहून दोन्ही बायका गप्प बसल्या. आपल्या तोंडातून त्यांनी चकार शब्द काढला नाही.

दुसऱ्या दिवशी रात्री दोघांनी पिशाचिणींना घरी घडलेलं सर्व काही सांगितलं आणि म्हणाले - "आम्ही आमच्या बायकांना माहेरी जाण्याची धमकी तर दिली. दोघी पण काही एक बोलल्या नाहीत. आम्हाला सुद्धा मोठं आश्चर्य वाटलं याचं!"

हे ऐकून पिशाचिणींची जोरात हसायची इच्छा होती, पण त्यांचा उत्साह पार मावळून गेला. मुक्त कंठाने त्या म्हणाल्या - "छीः या तुमच्या बायका पण काय बायका आहेत? आमचे नवरे आमच्याशी असे वागले असते, तर आम्ही परसातल्या विहिरीत उड्या मारून जीव दिला असता आणि पिशाचिणी बनलो असतो. तुमच्या या बायका एक नंबरच्या हट्टी दिसताहेत!"

"हट्टी नाहीत, अन् तुमच्या सारख्या मूर्ख ही नाहीत!" हे ऐकताच चौघे ही आश्चर्य-चकित झाले.

रामेश नि सोमेशच्या बायका बदललेल्या आपल्या पतिराजांबाबत जाणण्यासाठी त्यांच्या मागे मागे आल्या होत्या. आता त्यांना समजलं की या खोडकर पिशाचिणींची ही सारी करामत आहे !

आपल्या बरोबर आणलेल्या निंबुणीच्या फांद्यांनी त्यांनी पिशाचिणींना झोडपायला सुरुवात केली. बिचाऱ्या पिशाचिणी आरडत-ओरडत वडाच्या पारंब्यांना पकडून झाडावर चढल्या आणि तेथून अदृश्य झाल्या.

आश्चर्य करीत बसलेल्या नवऱ्यांना त्या म्हणाल्या - "पुरे झाला आता हा खेळ. आपले घरी चला झालं!"

रामेश नि सोमेशला जेव्हा असं वाटलं की निंबुणीच्या फांद्यांचा मार त्यांना ही खावा लागेल, तेव्हा शांतिपूर्वक ते आपल्या बायकांना म्हणाले - "थोड्या थांबा. वडाच्या ढोलीत पिशाचिणींनी आपल्या करता सोन्याच्या मोहरा ठेवलेल्या असतील!" आणि त्यांनी ढोलीत शोधाशोध केली. त्यांना मोहरा सापडल्या.

घरी येऊन दोघांनी अर्ध्या-अर्ध्या मोहरा वाटून घेतल्या. त्यांनी दोन छोटी-छोटी पक्की घरं बनवली.

आपल्या इच्छेनुसार जांभळाच्या झाडाच्या पारावर संगमरवर चढवला. आता दोघे ही आपापल्या बायको सह प्रेमाने राहू लागले.



विश्व-समाचार

# पॅलेस्टाइनचे अध्यक्ष

अरबस्तानातील एक छोटा देश आहे पॅलेस्टाइन. आसर अराफत यांची अध्यक्ष-पदी निवड झाली. २० जानेवारी रोजी झालेल्या निवडणुकीत ८८ सदस्यांचे एक कौन्सिल निवडण्यात आले. अराफत यांच्या नेतृत्वाखाली स्थापित झालेल्या विजयी गटाला निवडणुकीत बहुसंख्य मते मिळाली.

अराफत यांचे संपूर्ण नाव आहे - अब्दुल रहमान अराफत अलकुद्राय. सन १९४२ मध्ये इस्राइलची स्थापना झाली. पॅलेस्टाइनच्या नागरिकांना आपली मातृभूमि सोडून पळून जावे लागले. तेव्हा ते विशीतले तरूण होते. आपल्या देशवासियांवर होणारे अत्याचार त्यांना सहन झाले नाहीत. अरबस्तानच्या राष्ट्रीयतेचा त्यांच्यावर खूप प्रभाव होता. त्यांनी आपले शिक्षण सोडून दिले.



आपल्या जनतेला त्यांची मातृभूमि मिळवून देण्याचा त्यांनी संकल्प केला. आपल्या या महान् उद्देशाच्या पूर्तीसाठी त्यांनी पॅलेस्टाइन विमोचन संस्था (पी.एल्.ओ.) स्थापन केली. काही काल ते या संघटनेचे अध्यक्ष बनून राहिले.

सर्वप्रथम त्यांनी इस्राइलच्या आक्रमणकाऱ्यां विरुद्ध गोरीला युद्ध आरंभिले. यामुळे हे लोक मोठे उग्रवादी आहेत असे इस्राइलला वाटू लागले. यानंतर त्यांनी इस्राइलच्या सेनेशी प्रत्यक्ष युद्ध सुरु केले, आणि त्यांना यात थोडे यश ही मिळाले. यामुळे पॅलेस्टाइनच्या जनतेला त्यांच्याबद्दल प्रेम वाटू लागले. सन १९७४ मध्ये संयुक्त राष्ट्र-संघाच्या जनरल असेम्ब्ली समोर अराफतने एक भाषण दिले. त्यावेळी शांतीचे चिन्ह म्हणून एक जैतूनची फांदी आपल्या हातात धरून ते म्हणाले - ''ही जैतूनची फांदी माझ्या हातातून कधी खाली पडू नये !''

इस्राइलने पी.एल्.ओ. ला कधी मान्यता दिली नाही. तसे पाहिले तर दोघांनी एकमेकांना मान्यता दिली नाही. म्हणून युद्ध चालूच राहिले. दोन्ही पक्षांनी आपापला विजय घोषित केला. तसेच आपला पराजय ही मानला. दोन्ही देशात तह व्हावा यासाठी अनेक देश प्रयत्न करू लागले. परिणाम असा झाला की सन १९८८ मध्ये अराफत यांनी संयुक्त राष्ट्र-संघात इस्राइलला स्वतंत्र देश म्हणून मान्यता दिली. यामुळे जगातील अनेक देशात अराफत आदरणीय ठरले आणि एक प्रसिद्ध नेता म्हणून गाजले.

सन १९९३ मध्ये 'पॅलेस्टाइन अथॉरिटी' ची स्थापना झाली. पी.एल्.ओ. आणि इस्राइल यांच्यात तहाची बोलणी सुरु झाली. २९ सप्टेंबर १९९५ रोजी अराफत व इस्राइलचे विदेश मंत्री सायमन फेरिज यांनी एका तहावर स्वाक्षऱ्या केल्या पश्चिम किनाऱ्यावरील गाजा पट्टीसारख्या काही स्वतंत्र प्रदेशातून इस्राइली सेना काढून घेण्यात आली. तेथे पॅलेस्टाइनचा अधिकार पुन्हा प्रस्थापित झाला. लोकशाही शासन स्थापित करण्यासाठी सर्व-साधारण निवडणुका झाल्या.

पॅलेस्टाइन तसा फार प्राचीन देश आहे. पश्चिमी किनाऱ्यावरील जेरीको मध्ये सुमारे ९००० वर्षापूर्वी मानव प्रथम येऊन राहिले. याला ऐतिहासिक आधार ही उपलब्ध आहे.

नुकत्याच झालेल्या निवडणुकीत अराफतच्या प्रतिस्पर्धी होत्या ७२ वर्षे वयाच्या श्रीमती समीहा खलील. त्यांना १० टक्केच मते मिळाली. अराफत यांना ८८ टक्के मते मिळाली.

पी.एल्.ओ. आणि इस्राइल यांच्यात तह घडवून आणण्याच्या कामी ईजिप्तने पुढाकार घेतला. झालेली निवडणूक हे स्वतंत्र पॅलेस्टाइनच्या निर्मितीतील पहिले पाऊल आहे असे ईजिप्तचे नेते मानतात.



# माणूस जाऊन जाईल तरी कोठे?

जुगल, यशगावात पोचला. आपल्याबरोबर त्याने काहीच आणले नव्हते. आश्रय मागण्यासाठी तो गावपाटलाकडे गेला. भूषणचं रिकामं असलेलं घर पाटलाने त्याला देववलं अन् गावात काम शोधायला सांगितलं.

जुगल प्रथम भूषणकडेच जाऊन त्याला म्हणाला, "मालक, तुमचं घर फार आवडलं मला. तिथे खूप छान वाटतंय. पण काही भाडं दिल्यावाचून नुसतं रहाणं मला पटत नाहीय. तुमचं काही काम असेल तर जरूर सांगा. मी ते नक्की करीन."

भूषण हसून म्हणाला, "माझ्या भावाचं लग्न झालं, तेंव्हा वाटलं होतं की, त्याला निराळं रहावंसं वाटेल; म्हणून खरीदलं होतं मी ते घर. पण तो तर शहरात निघून गेला अन् तिथेच राहू लागला. घरात माणसं नसतील, तर ते ओसाड पडतं. त्याच्या देखरेखीसाठी बरेच नोकर ही ठेवले मी. खर्च ही होतोय त्यामुळे खूपसा. पण तू राहिलास तर हा खर्च कमी होईल. तेच भाडं समजेन मी ! तेंव्हा अगदी निःसंकोच रहा तिथं."

"तरीही मी स्वतःला तुमचा ऋणकोच मानतो. मला बरे दिवस आले, तर तुमचं हे कर्ज नक्की फेडीन मी."- जुगल म्हणाला. नंतर गावातल्या बऱ्याच लोकांकडे जाऊन तो त्यांना 'आपल्याला नोकरी देण्याबद्दल' विनवत राहिला.

प्रथम तो ज्या घरी गेला, ते होतं सीताकरचं घर. सीताकर एक कवि होता. जुगलला तो म्हणाला, "मी एक कवि आहे. काव्य लिहून मी ती भाग्यवान लोकांना अर्पण करतो. त्यांच्याकडून मिळणाऱ्या पैशात मी आपला उदरनिर्वाह चालवतो. माझ्या बायकोला घरकामात मदतीसाठी एक मोलकरीण नेमलेली आहे. गैरसमज नको

कमलाकर तोरणे

करून घेऊस; पण तुला देण्यासारखं काही कामच नाही माझ्या जवळ !"

"पण महाराज, तुमचं घर तर चांगलं ऐसपैस दिसतंय. परसूही खूप मोठं वाटतंय. मला नोकरी दिलीत तर तुमची बाग चांगली संभाळीन मी. काम न दिलंत, तर मी उगाच रिकामा राहीन नं?" जुगल बोलला.

सीताकर आश्चर्यचकित दृष्टीने जुगलकडे पाहू लागला. त्याला जुगल चांगला सुशिक्षित वाटला. पण तो अंगमेहनत करू शकेल असं मात्र वाटत नव्हतं. अर्थात् गरज माणसाला काहीही करायला लावते हे खरंच. इतका विचार करून तो जुगलला म्हणाला, "अरे, पण बागेचं काम तर मी स्वतःच करतो; तो माझा व्यायाम! इतकीही मेहनत न केली, तर तब्येत खराब होईल न! तू आपल्या उदरंभरणाची इतकी चिंता नको करूस. तुला कुठं काही काम मिळेपर्यन्त जेवायला माझ्याकडेच येत जा. देवकृपेनं माझ्याकडे अन्नाला कमतरता नाही!"

सीताकरला नमस्कार करत जुगल म्हणाला, "आभारी आहे मी तुमचा. पण कुठल्याच घरी फुकट तुकडे तोडणं आवडत नाही मला. माझ्यावर तुमचा विश्वास असेल, तर मी मागेन तेव्हां मला कर्जाऊ पैसे देत जा. मला चांगले दिवस आले, की तुमचं कर्ज फेडून टाकीन." इतकं बोलून तो दुसऱ्या घरी गेला.



हे घर होतं एका व्यापाऱ्याचं. या घरीही त्याला काम मिळालं नाही. सीताकरकडच्या सारखंच बोलणं इथं ही झालं. जुगल सीताकरशी जे बोलला तेच इथेही बोलला.

अशा प्रकारे गावातल्या अनेक घरमालकांना तो जाऊन भेटला. फिरून-फिरून थकून शेवटी तो एका झाडाखाली बसला. तिकडून जाणाऱ्या पाटलाने त्याला पाहून विचारलं, "काय रे बाबा, कुठंच नाही जमलं?"

"वाः महाराज! तुमचं गाव पण काय महान् आहे ! सर्वजण आपापली कामं स्वतःच करत असल्याने मला कुठंच काम मिळत नाहीये." जे जे घडलं ते सर्व जुगलनं



सांगून टाकलं.

"तर मग रोज एकेका घरी जाऊन भोजन करत जा. तुझे दिवस आरामात निघून जातील." पाटलाने सुचवले.

"पण काही काम न करता नुसतं फुकट कुठं खाणं कबूल नाही मला. काही न खाता दिवस काढायची सवय आहे मला." जुगल बोलला.

आता आश्चर्य करीत पाटील जुगलकडे निरखून पाहू लागला. त्याला जुगल कोणी सर्वसामान्य माणूस वाटेना. अशा माणसाला आपल्या गावात चांगला मान मिळवून देण्याचा त्याने निश्चय केला.

ताबडतोब गावातल्या प्रतिष्ठित लोकांना बोलावून घेऊन पाटील म्हणाला, "हा जुगल मोठा स्वाभिमानी माणूस आहे. कुणाकडून दान घेणं पसंत नाही त्याला ! आपल्या गावात त्याला अुपाशी रहावं लागावं हे बरं नाही आपल्या दृष्टीनं ! तेंव्हा सर्व मिळून त्याला मदत करू या. आपण एक एक दिवस त्याला आपल्या घरी काही काम देअू, अन् त्या त्या दिवशी त्याला जेवणही देअू."

त्या सर्वांना ही योजना आवडली; अशा तऱ्हेने जुगलला काम मिळाले, अन् पोटभर खायलाही मिळू लागले. तरीही जुगल एवढयावर खूश नव्हता. तो रोज कुणा ना कुणाकडून कर्ज घेत राहिला. एकाकडून एक रुपया मिळवला, तर दुसऱ्या एकाकडून दोनशे रुपये मिळवले त्याने. सर्वांना तो 'चांगले दिवस आले, की मी तुमचे पैसे फेडून टाकीन.' असे म्हणे पण त्याबरोबरच त्याने कधी कुणाची रक्कम परतही केली नाही. सर्वात विचित्र गोष्ट अशी की, कधी कोणी आपलं कर्ज फेडण्याबद्दल त्याच्याकडे तगादाही केला नाही.

असे एक वर्ष निघून गेले. एक दिवस पाटलाला भेटून जुगल म्हणाला, "मी आता आपल्या गावी जातो. तुम्ही गावच्या लोकांना एकत्र करा, कुणाला काही तिकडून आणून हवं असेल तर त्यांना आणून देईन मी."

गावपाटलाने हसून विचारले, "काय काय आणू शकशील तू?"

"मी ज्या गावी जात आहे, तिथे ललितांबिका नावाची एक देवी आहे. ती कोणाची कोणतीही इच्छा पुरी करते." जुगल विश्वासपूर्ण स्वरात अुत्तरला.

"सांग बरं मग, ते गाव कुठं आहे? मी पण येतो तुझ्या बरोबर तिथे. मला माझी एक इच्छा स्वतःच सांगायचीय तिला." पाटील बोलला.

"पण आत्तापर्यन्त कोणीच बाहेरचा माणूस तिथे आलेला नाहीय. तुमची इच्छा काय आहे, ती मलाच सांगा, तुमच्यातर्फे मी मागीन देवीकडे." जुगल म्हणाला.

"माझं लग्न होअून दहा वर्षे अुलटली, पण माझ्या बायकोला मूल नाही झालं अजून! देवी संतानप्राप्ती करून देते का?" पाटलाने विचारले.

"हो ऽ ! नक्कीच." जुगलने खात्री दिली.

"जुगल गावाला जात आहे, तेंव्हा संध्याकाळी सर्वांनी एकत्र जमावे" अशी दवंडी पाटलाने पिटवली. सर्वांना अुद्देशून जुगल बोलला, "या गावचे सर्वजण फार भले आहेत, तेव्हा देव सगळ्यांचं भलंच करील. तुम्ही आपापल्या इच्छा मला सांगा. देवी ललितांबिकेला मी त्या सांगीन."

गावचे लोक एकापाठोपाठ एक अुभे राहून आपापल्या इच्छा सांगू लागले. 'बरेच दिवसांपासून आजारी असलेली आपली आई बरी व्हावी' अशी एकाची इच्छा होती, तर



'आपला कोपिष्ट नवरा शान्त व्हावा' अशी इच्छा एका बाईने व्यक्त केली.

काही जणांनी अशा व्यक्तिगत इच्छा प्रकट केल्या, तर काहींनी गावासाठी काही अपेक्षा केल्या.

'साऱ्या लोकांना गावाबाहेरच्या झऱ्यावर जावं लागतं. तेव्हा गावात गोड्या पाण्याच्या विहिरी असाव्यात.' अशी अिच्छा कोणी सांगितली, तर 'गावच्या रस्त्यालगतची रोपं नीट वाढून त्यांची सावली मिळण्याइतके वृक्ष तयार व्हावेत'. असे कोणी बोलून दाखवले. 'गावचं मंदिर जीर्ण झालेलं आहे, तेंव्हा कोणा चांगल्या शिल्पकारांनीच ते नीट करावे; नाहीतर ते पार पडून जाअून गावचं नुकसान



होईल' अशी भीती व्यक्त करून 'त्याचा जीर्णोद्धार व्हावा' अशी अपेक्षा केली.

अशा प्रकारे सर्वजण आपापल्या इच्छा सांगत असतानाच एक माणूस तेथे आला. जुगलला त्याने विचारले, ''तू इथे आहेस?''

गावपाटलाने त्याला जवळ बोलावून हकिकत विचारली. त्या माणसाचे नाव होते नील. तो चन्द्रपुरचा रहिवासी होता. त्या गावात जुगल एक वर्षभर राहिला होता. तेथे त्याने लोकांकडून खूप कर्ज घेतले होते. एक दिवस असाच तो गावातून अचानक नाहीसा झाला. जाता जाता त्या गावातल्या लोकांनाही असेच ललिताम्बिका देवीकडून गावच्या लोकांच्या इच्छा पुऱ्या करण्याबद्दल ग्वाही दिली होती. पण लोकांच्या मनात त्याच्या उद्देशाबद्दल संशय असल्याने त्यांनी आपल्या इच्छा सांगण्या अगोदर आपले कर्ज फेडण्याबद्दल लकडा लावला. झाले! जुगल त्याच रात्री तेथून निघून गेला. गावच्या लोकांनी त्याला पकडून आणण्याचे काम नीलवर सोपवले.

पाटलाने जुगलला विचारले, ''खरं आहे का हे बाबा म्हणत आहेत ते?'' जुगलने होकारार्थी मान हलवली.

''असं का केलंस तू?'' पाटलाने विचारले.

जुगल उत्तरला, ''मी देवी ललितांबिकेचा भक्त आहे. लोकांच्या इच्छा देवीकडून पुऱ्या करून घ्याव्या, असं वाटलं मला. त्यासाठीच मी बरकतपुरला गेलो. तिथे मी इथल्यासारखाच वर्षभर राहिलो. त्यांच्याकडून मी एकूण तीन हजार रुपये कर्जाऊ घेतले होते. गावकऱ्यांच्या इच्छापूर्तीसाठी मला ते गाव सोडून जायचं होतं. पण कर्ज फेडल्यावाचून ते मला जाऊ देईनात. मी घेतलेली रक्कम एका जागी पुरून ठेवली होती, ती सारी चोरीला गेली. मी खरी गोष्ट गावकऱ्यांना सांगितली, पण त्यांचा विश्वासही बसेना. मग लपूनछपून तिथून मी पळालो अन् चन्द्रपुरला गेलो. त्या गावात वर्षभर राहून मी पुन्हा तीन हजार रुपये जमवले; पण तिथेही बरकतपुरसारखाच अनुभव आला. तेही गाव सोडून जाऊ देईनात. तिथूनही मी पळून गेलो अन् परत बरकतपुरला जाऊन लोकांचं कर्ज व्याजासुद्धा परत केलं. नंतर मी तुमच्या गावी आलो. आता माझ्याजवळ बारा हजार रुपये आहेत. ते घेऊन मी चन्द्रपुरला जाईन अन् त्यांची कर्जफेड करीन. माझी अशी इच्छा होती की, सरळ आपल्या गावी जाऊन ललिताम्बिका देवीचं दर्शन घ्यावं. तुम्हा सर्वांच्या इच्छा तिला सांगून त्या पुऱ्या करून घ्याव्या. इतक्यात हा नील इथं उपटला. ही आहे माझी कहाणी. खोटं इतकंसंही नाही त्यात.''

नील जोराने म्हणाला, ''खोटारडा आहे हा! बारा हजार घेऊन इथून पळून जायचं होतं याला! पण माझ्या येण्यामुळे त्याचं पितळ उघडं पडलं!''

''असं काहीतरी बोलू नकोस नील. खऱ्याखोट्याचा निर्णय तर त्या भगवंताच्या हाती आहे! तुमच्या गाववाल्यांसाठी मी जे धन जमवलं, ते स्वतः येऊन सर्वांना देईन मी. सर्वांना दुप्पट रक्कम देईन. आता तरी विश्वास ठेव माझ्यावर!'' जुगल नीलला विनवू लागला.

''मग काय आणखी एकाद्या गावी जाऊन बारा हजार रुपये गोळा करशील अन् या गावकऱ्यांना देशील? हा खटाटोप कुठवर चालेल तुझा? मी मुळीच गप्प बसणार नाही.



तुला सरळ पोलिसांच्या हवाली करीन, तेव्हाच माझ्या मनाला शान्ती मिळेल!'' नील धमकावत बोलला.

पण गावपाटील मधेच दखल देत म्हणाला, ''नील, आमचं हे गाव चांगलं समृद्ध, हिरवंगार आहे बघ! भलेपणावर आमचा विश्वास आहे. 'जुगल चांगला माणूस आहे' असं आम्हा सर्वांना वाटतं. आम्ही त्याला जे काही दिलं, त्याचं आम्हा कुणालाच वाईट वाटत नाही. उलट याचीच स्वतःची इच्छा आहे की सर्वांचं कर्ज फेडून कुणाच्या उपकारात राहू नये. आताही याच्या मनात असेल, की तो आमचा ऋणको आहे; पण खरी गोष्ट तशी नाही. तुमच्या गाववाल्यांचं

कर्ज यानं फेडलं की त्याला तुम्ही सोडून द्या. तसं न केलंत, तर तो ललिताम्बिका देवीच्या दर्शनाला जाऊन 'तुमचं नुकसान व्हावं' अशी मागणी करील.''

तरीही नकारात्मक मान हलवत नील म्हणाला, ''तो आणखी एकाद्या गावी जाऊन लोकांना फसवणार नाही, याची काय खात्री? ललिताम्बिकेकडून तो गावावर उपकार करू शकत असेल, तर आपलं कर्ज फेडण्यासाठी याला गावोगावी भटकायची काय गरज? लोकांना लुटायची काय आवश्यकता?''

पाटील हसून म्हणाला, ''हा जेंव्हा बरकतपुर सोडून निघाला, तेंव्हा 'आमचं कर्ज चुकवूत मगच जा' असा त्यांनी लकडा लावला. त्यामुळेच तो तुमच्या चन्द्रपुरला आला. तुम्ही लोकांनीही कर्जफेडीसाठी तगादा लावला; म्हणून तो आमच्या गावी आला. आम्ही तर असं म्हणतोय की, आमचं कर्ज यानं फेडायची काही जरूर नाही. आता तो ललिताम्बिकेच्या दर्शनाला जाईल. आपल्याला जे जमलं नाही, ते मिळवण्यासाठी नक्की तो देवीकडेच जाईल. दुसरा काही मार्गच नाही त्याला ! आमचा हाच विश्वास आहे. पण हां, आमचा विश्वास खरा ठरला नाही, तरी आम्हाला त्याचं जराही दुःख वाटणार नाही.''

हे बोलणे ऐकून जुगलने पाटलाजवळ आपली कृतज्ञता व्यक्त केली अन् तो नीलसह त्याच्या गावाकडे जायला निघाला. चन्द्रपुरला पोचल्यावर त्याने लोकांची पै अन् पै फेडून टाकली.

यानन्तर काही दिवसांनी यशगावच्या पाटलाला मुलगा झाला. सर्वांच्या आपापल्या इच्छा पूर्ण झाल्या. गावचे खारे पाणी गोडे झाले ! यशगावचे लोक जुगलचा उदोउदो करू लागले अन् त्याच्या महत्तेचा प्रसार करू लागले. नंतर त्याचे जंगी स्वागत करावे असे त्यांनी ठरवले, पण त्याचा तर कुठे पत्ताच लागेना ! बरकतपुर व चन्द्रपुरच्या लोकांनाही आता पश्चात्ताप वाटू लागला की, - आपण चांगली चालून आलेली संधी हुकवली !






# १

(रूपधरच्या साथीदारांनी सूर्यदेवाचे पशु मारून मोठेच पाप केले अन् फलस्वरूप त्यांची नाव प्रवाशांसह खोल समुद्रात बुडाली. एकटा रूपधरच काय तो यातून वाचला अन् कसातरी एका किनाऱ्यावर पोचला. तेथे त्याची तिथली राजकुमारी वारुणी हिच्याशी भेट झाली. तिच्या मदतीने तो राजवाड्यात पोचला व तेथे त्याला आश्रय मिळाला. राजा बुद्धिमानने याने त्याला सर्व प्रकारच्या सोयी व मदत मिळवून देण्याचे वचनही दिले. त्या रात्री रूपधर शांतपणे झोपला.) -यानन्तर

दुसऱ्या दिवशी सकाळी राजा बुद्धिमान बरोबरच रूपधरही झोपेतून उठला. दोघे मिळून सभास्थानी पोचले. हे दरबार भवन बंदराजवळच होते. भवनात संगमरवराची आसने तयार करण्यात आलेली होती. स्वतः बुद्धिमान एका आसनावर बसला आणि शेजारच्या आसनावर त्याने रूपधरला बसवून घेतले. या अवधीत रूपधरच्या प्रवासासाठी योग्य ती व्यवस्था करण्यासाठी राजाचा एक दूत रवाना झाला. त्याने प्रथम नगरात जाऊन तेथील प्रत्येक प्रतिष्ठित व्यक्तीला, 'एक अपूर्व माणूस राजाचा अतिथि म्हणून आलेला आहे' असे सांगून दरबारासाठी आमन्त्रण दिले.

सर्व प्रमुख माणसे या नव्या पाहुण्याला पहायला दरबारस्थानी आली व त्यांनी आसने ग्रहण केली. आलेल्या व्यक्तींना उद्देशून राजा म्हणाला, ''महाजनहो !



माझ्या शेजारी बसलेला हा माणूस माझा पाहुणा आहे. तो कोण आहे - हे मला माहीत नाही. तो समुद्रातून येथे आला आहे. पूर्वेकडून आला की पश्चिमेकडून - हे ही माहीत नाही मला ! परन्तु आपल्या देशाकडे परतीच्या प्रवासासाठी याने माझ्याकडे मदत मागितली आहे. त्याची ही व्यवस्था करण्याचा मी त्याला हवाला दिला आहे, कारण माझ्याकडे येणाऱ्या प्रत्येक पाहुण्याला मदत करून त्याला संतुष्ट करणं, हे मी आपलं कर्तव्य मानतो, माझा धर्मच आहे तो ! आजपर्यन्त कोणत्याही पाहुण्याला मी विन्मुख पाठवलं नाही. तेंव्हा आपल्या परंपरेप्रमाणे या माणसालाही मदत करणं, हे आपलं कर्तव्य आहे. आपण एक नवी नौका याच्या हवाली करणार आहोत अन् त्याच्याबरोबर आपल्याकडचे कसलेले ५२ नाविक ही पाठवणार आहोत. वल्ही चालवण्यात चांगले तरबेज असलेल्यांनी जाऊन आवश्यक ती व्यवस्था करावी. नंतर परत येऊन माझ्याबरोबरच आजचे भोजन करावे. इथे असणाऱ्या इतर सर्व प्रमुखांनीही आज माझ्याबरोबर भोजनास यावे. आजची ही मेजवानी खूप जोरदार होईल. या निमित्त सुश्राव्य गायन करण्यासाठी एका गायकाला मी आमन्त्रित केलं आहे.''

राजाने प्रमुखांशी काही बोलणी केली व नन्तर रूपधरला बरोबर घेऊन तो राजवाड्यात पोचला. गायकाला बोलावून आणण्यात आले. ५२ तरबेज असे नावाडी नवीन नावा पाण्यात घेऊन आले व त्यांनी आवश्यक ती व्यवस्था केली. खोल पाण्यात लंगर टाकून ते राजवाड्यात पोचले.

राजभवनाचे अंगण, अन्य खोल्या इत्यादि पाहुण्या लोकांनी भरून गेल्या. मेजवानीसाठी शेळ्या, बकऱ्या, जंगली डुकरे व बैल कापण्यात आले. जेवण चालू असताना गायन ऐकवण्यासाठी एक सुंदरसा तरुणही तेथे अुपस्थित झाला, तो अंध होता.

सर्वजण मोठ्या आनन्दाने खाद्यपदार्थांचा समाचार घेण्यात मग्न असताना गात असलेल्या तरुणाच्या गाण्याचा विषय नेमका रूपधरच्या आयुष्यात घडलेल्या. घटनांवरच आधारित असा होता -

'ट्रॉयचं युद्ध अजून सुरू व्हायचं होतं. त्यापूर्वी सम्राट आपलं भविष्य जाणून घेण्यासाठी, ढगांजवळ असलेल्या सूर्य मन्दिरात गेला. सूर्यदेवाने त्याला सांगितले की, ट्रॉयचं पतन होता होता तुझे स्वतःचे वीरही आपसात लढतील. प्रत्यक्षात झालंही तसंच! एक दिवस जेवणाच्या वेळी रूपधर व वज्रकाय यांच्यात भांडण लागले अन् दोघांनी एकमेकांना खूप शिव्या दिल्या. पण सम्राटाला या घटनेचं जराही वाईट न वाटता, अुलट तो खूशच झाला. कारण ही गोष्ट शुभसूचक असल्याचेच सूर्यदेवानं सांगितलं होतं.'

आंधळ्या तरूण गायकाने याच घटनेवर गीत रचून ते गायले. ऐकत असताना रूपधरचे दुःख अुफाळून आले. अुपस्थित लोकांना आपले अश्रू दिसू नयेत म्हणून त्याने आपला चेहरा कपड्याने झाकून घेतला. मधे मधे गायक जेंव्हा थांबत असे, तेंव्हा तो हळूच आपले डोळे पुसून चेहऱ्यावरचा कपडा दूर करी. पुन्हा गायक गाअू लागल्याबरोबर त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा झरू लागत.

रूपधरच्या या हालचालींकडे अन्य कोणाचे लक्ष गेले नाही तरी जवळ बसलेल्या राजा बुद्धिमानने ते हेरले. वेदनेने निघालेले



रूपधरच्या तोंडचे दुःखोद्गारही त्याने ऐकले.

शेवटी राजा पाहुण्यांना म्हणाला, ''मित्रांनो, तुमची पोटं भरली असतील. आता गाणं बन्द करून आपण काही व्यायाम-क्रीडा पाहू या. आपल्या या खास पाहुण्यासाठी ती व्यवस्थाही केलेली आहे. आपण मल्लयुद्धांत किती प्रवीण आहोत, ते याला पाहू दे. तो आपल्या निपुणतेचं वर्णन स्वतःच्या देशात गेल्यावर आपल्या इष्ट लोकांना सांगेल.''

राजा अुठल्याबरोबर इतर सर्वजणही अुठून मोठ्या आनन्दाने त्याच्या मागोमाग निघाले.

मैदानात हजारो लोक जमले होते. क्रीडा



कसरतीत प्रवीण असणारे अनेक युवक भाग घेण्यासाठी तयार होऊन एकीकडे उभे होते.

प्रथम धावण्याची स्पर्धा झाली; नंतर मल्लयुद्ध झाले. यानन्तर जड चेंडू दूर फेकण्याचा कार्यक्रम झाला. अन् असेच निरनिराळे खेळ झाले. मल्लयुद्धात राजाच्या मुलाचा जय झाला. तो आपल्या दोस्तांना म्हणाला, ''आपल्या या पाहुण्याने या क्रीडांचा आपल्या बालपणी कितपत अभ्यास केलाय, हे पाह्यचं का? माणूस दिसायला तर चांगला मजबूत दिसतोय. त्याच्या मांड्या, पिंड्या अन् गर्दन यांचे स्नायु चांगले कमवलेले दिसत आहेत. हातही बलवान वाटतायत. वयाने तो विशेष जास्त दिसत नाहीय.'' हे सर्व तो मोठ्या अुत्साहाने बोलत होता.

सारे मित्र राजकुमाराला म्हणाले, ''छानच की ! मग तूच त्याला या स्पर्धांमधे भाग घ्यायला सांग नं!'' राजकुमार मग रूपधरजवळ जाऊन म्हणाला, ''महाशय, तुम्ही सुद्धा या क्रीडाकसरती जाणत असाल तर या ना भाग घ्यायला ! यांची सर्वांना माहिती असणं आवश्यक आहे नं? तुम्ही तर निराश अन् निरुत्साही दिसताय. तुम्हाला आपल्या देशी घेअून जाण्यासाठी नौका अन् नावाडी तयार आहेत.''

''असं का बरं बोलताय? माझी तुम्ही चेष्टा चालवली आहे, असं वाटतंय मला. मी एक संकटांनी घेरलेला माणूस आहे. खेळ खेळत बसायची वेळ नव्हे ही. मी आपला पाहुणा म्हणून सर्वकाही फक्त पहातो आहे, पण त्याचा आनंद लुटू शकत नाहीये. माझं केवळ एकच ध्येय आहे; अन् ते म्हणजे घरी पोचणं.''

पण रूपधरला खिजवण्याच्या अुद्देशाने एक तरुण व्यंग्यात्मक शब्दात म्हणाला, ''आम्हाला तरी असंच वाटतंय की तुमचा क्रीडांशी कधीच काही संबंध आलेला नसावा. तुम्हाला पाहून अन् तुमचं बोलणं ऐकून असंच वाटतंय की तुम्ही समुद्री व्यापारी असावेत अन् जमाखर्चाशिवाय तुम्हाला काही येतही नसावं !''



आता मात्र रूपधर खरोखरच नाराज झाला. आपल्या भुवया ताणत तो म्हणाला, "युवका, परमेश्वर काही माणसांना विकृत रूप देतो. पण ते जेंव्हा तोंड अुघडतात, तेंव्हा त्यांच्या तोंडातून मोती झरू लागतात. त्यांचं बोलणं ऐकायला लोक अुत्सुक होतात. अुलट, काहीजण दिसायला चांगले दिसतात; पण ते बोलू लागले, की कान बन्द करून घ्यावेसे वाटतात. परमेश्वरानं तुला सुंदर बनवलंय, पण बुद्धी नाही दिली तुला. अनेक संकटं झेलत मी मनानं शुष्क झालोय; तरीही मी किती पटाईत आहे, माझ्यात किती शक्ती आहे, हे दाखवतोच तुम्हाला !"

ताबडतोब आपल्या आसनावरून अुठून रूपधरने दगडाचा एक वजनदार गोळा अुचलला अन् आपल्या डोक्यावरून गरागरा फिरवून तो दूर भिरकावून दिला.

अंतर मापणारा माणूस धावत त्या जागी गेला अन् ते मोजल्यावर "अरे महाराज! तुम्ही तर गोळा सर्वांपेक्षा दूर फेकलात की ! कोणीही इतक्या दूर फेकू शकला नाही आमच्यापैकी !" असे ओरडूनच म्हणाला.

रूपधर आता खुशीत आला. तो अुत्साह भरल्या आवाजात म्हणाला, "तरुणांनो, या खेळात कोणी माझ्याशी स्पर्धा करायला तयार असेल, तर त्याने पुढे यावे; मी मागे हटणारा नव्हे! मल्लयुद्ध असो, धावण्याची शर्यत असो, धनुर्विद्या असो किंवा इतर कुठलीही स्पर्धा असो; कोणीही पुढे येअून मला हरवून दाखवावं! युद्धकलेतही माझ्यापेक्षा अधिक समर्थ असा धनधव नावाचा एकच माणूस होता. देवांबद्दल तर काही म्हणू शकत नाही मी; पण मानवांपैकी कुणाशीही भिडायची तयारी आहे माझी!"

यावर कोणी काही बोलूही धजले नाही. आता बुद्धिमान रूपधरला म्हणाला, "महाशय, कोणी आपली टर अुडवील, आपल्याबद्दल बेपर्वाई दाखवील, तेंव्हा आपल्या मोठेपणाबद्दल बोलणं गैर नसतं. तुमच्या शक्ती सामर्थ्याबद्दल बोलण्याची योग्यता इथे अुपस्थित असणाऱ्यांपैकी कोणातही नाही. आमची तर इतकीच इच्छा आहे की, तुम्ही जोवर इथे आहात, तोवर खुशीत असावं, आनन्द लुटावा. होय, आम्ही काही विद्यांच्या बाबतीत मागासलेले आहोत. मल्लयुद्ध आणि अन्य काही क्रीडांमधे आम्ही प्रवीण नाही आहोत. आमचं वैशिष्ट्य म्हणजे नौका बनवणं अन् त्या चालवणं. नृत्य-गायन कलेतही आम्ही प्रवीण आहोत. आमची इच्छा आहे की, आपण ते पहावं. घरी परतल्यावर तुम्ही जेंव्हा आपल्या कुटुंबियांसमवेत सुखात राहू लागाल, तेंव्हा इथे घालवलेल्या मधुर क्षणांची तुम्हाला आठवण व्हावी."

यानन्तर नृत्य-गायनाचा कार्यक्रम सादर करण्यात आला. त्या देशच्या नर्तक नर्तकींनी दाखवलेल्या नृत्यांमुळे रूपधर खूश झाला. तो बुद्धिमानला म्हणाला, "महाराज इतकी सुन्दर सांघिक नृत्यं मी पूर्वी कधीच पाहिली नाहीत."

रूपधरने केलेल्या प्रशंसेमुळे राजाला आनन्द वाटला. आपल्या देशातल्या बारा राजकुमारांना बोलावून त्याने त्यांच्या हस्ते रूपधरला अुत्तम वस्त्रे देववली; भेटीदाखल सोनेही दिले. ज्या युवकाने रूपधरला टोमणे मारून अुत्साहित केले, त्यालाही हस्तिदंती म्यान व चांदीच्या मुठीची आपली तलवार भेट दिली.

त्या रात्री आंधळ्या गायकाने 'लाकडी घोडा' ही कथा आपल्या गीताद्वारे सर्वांना ऐकवली. ग्रीक आपली शिबिरे जाळून आपापल्या नौकांतून निघाले, इथपासून कथा सुरू झाली. यानंतर ग्रीकांनी लाकडी घोडा ट्रॉयमधे नेला इत्यादि साऱ्या वर्णनांनी ते गीत भरलेले होते. ते ऐकता ऐकता रूपधर रडू लागला.

हे पाहून बुद्धिमानने गाणे बन्द करवले अन् रूपधरला तो विचारू लागला, "महाशय, खरं सांगा बरं तुम्ही कोण आहात? नाव काय तुमचं? कोणत्या देशचे आहात? कुठून आलात इथे? ट्रोजन युद्धाची कथा ऐकून इतकं दुःख का झालं तुम्हाला? त्या युद्धात तुमचे कोणी सगे सोयरे कामास तर आले नाहीत ना?"

- क्रमशः



# आणखी शिक्षा

मयूरपुर मधे अपराध्यांसाठी शहरा बाहेर एक तुरुंग होता. तेथे गुन्हेगारांना कडक शिक्षा दिली जाई. परंतु मधून मधून कैद्यांसाठी मनोरंजनाचे कार्यक्रम ही होत असत. राजा अरविंदसेनने तुरुंगात कैद्यांसाठी एक ग्रंथालय ही सुरू केले होते. कैदी ग्रंथ वाचून आपले मनोरंजन करीत व तात्पुरती आपली शिक्षा विसरून जात.

त्यात नगरीत वासुदेव नावाचा एक श्रीमंत माणूस रहात असे. त्याच्या मनात कविता रचून सुप्रसिद्ध कवि होण्याची इच्छा एकाएकी जागृत झाली. त्याने नाव धारण केले - कवि वासुदेव. याच नावाने तो काव्य-रचना करु लागला. परंतु लोकांना त्याच्या कविता मुळीच आवडत नसत. ते म्हणत - कवि वासुदेवचे काव्य वाचून डोके दुखू लागते. यामुळे कवि वासुदेवाचे सर्व काव्य ग्रंथ धूळ खात पडले होते.

अशा स्थितीत आता या ग्रंथांचं काय करावं असा वासुदेवला प्रश्न पडला. त्याने त्या ग्रंथांचे एक गाठोडे बांधले आणि तुरुंगात गेला. आपली पुस्तके कैद्यांच्या ग्रंथालयात ठेवण्याबाबत त्याने अधिकाऱ्यांना प्रार्थना केली.

अधिकारी वासुदेवच्या काव्याबाबत जाणून होता. त्याने नम्रपणे निवेदन केले - ''कविवर, राजाच्या परवानगीवाचून कैद्यांना 'आणखी शिक्षा' देण्याचा अधिकार मला नाही. म्हणून मी आपल्या ग्रंथांचा स्वीकार करू शकत नाही. क्षमा करा.''

अधिकाऱ्याचे बोलणे ऐकून वासुदेव आपल्या काव्य-ग्रंथांचे मूल्य समजला. जो घरी परत आला आणि त्याने दवंडी पिटवली - ''येथून पुढे आपले नाव कवि वासुदेव नाही, फक्त वासुदेव आहे!''



# विरूपचे साहस

दृढनिश्चयी राजा विक्रमादित्य पुन्हा झाडापाशी आला. त्याने झाडावरून प्रेत खाली उतरवले नि ते आपल्या खांद्यावर टाकले. वेताळ बोलू लागला - ''राजा, अर्धी रात्र उलटून गेली आहे. या अंधारात काही दिसत नाहीय. वातावरण मोठे भयानक आहे. काही लोक असे असतात की त्यांनी किती ही प्रयत्न केले तरी त्यांना सफलता प्राप्त होत नाही. तुला विरूप नावाच्या तरुणाची गोष्ट सांगतो. ही गोष्ट ऐकत असता तुझा थकवा ही थोडा कमी होईल.'' आणि वेताळ विरूपची कथा सांगू लागला.

पूर्णचन्द्रपुरचा राजा होता धीरसेन. त्याच्या मुलीचे नाव कांचन. कांचन फार सुंदर होती. तिच्याशी ज्याचा विवाह होईल, तो पूर्णचंद्रपुरचा भावी राजा होणार होता.

कांचनचा स्वभाव मोठा साहसी होता.

## वेताळ कथा



ती आपल्या पित्याला म्हणाली - "पिताजी, माझ्या विवाहासाठी आपण एक चढाओढ आयोजित करा. जो विजयी होईल त्याच्याशी मी लग्न करीन."

मग आपल्या मनातील योजना तिने पित्याला सांगितली. ती ऐकून धीरसेनला मोठे आश्चर्य वाटले. तो कांचनला म्हणाला - "बेटा, याचा अर्थ तर असा की या स्पर्धेत भाग घेणाराची आपल्या प्राणाशीच गाठ! या जीवघेण्या स्पर्धेत भाग घेण्यासाठी कोणी पुढे येईल असे मला तरी वाटत नाही."

हसत कांचन म्हणाली - "माझ्यावर ज्याचे प्राणा पलिकडे प्रेम असेल तो स्वत:चे प्राण धोक्यात घालायला कसा कचरेल पिताजी?"

धीरसेनला आपल्या मुलीचा हट्टी स्वभाव चांगला माहीत होता, म्हणून तो अधिक काही बोलला नाही. पण या स्पर्धेचे स्वरूप आगाऊ घोषित केले तर भाग घ्यायला कोणी येईल की नाही याबाबत त्याला शंका वाटली. म्हणून त्याने फक्त एवढेच जाहिर केले की येत्या पंचमीच्या दिवशी एक साहसपूर्ण स्पर्धा आयोजित केलेली आहे. या स्पर्धेत जो विजयी होईल त्याच्याशी माझ्या कांचनचे लग्न होईल व नंतर तोच पूर्णचंद्रपुरचा भावी राजा पण होईल!

पूर्णचंद्रपूरच्या जवळच श्रीरंगपुर नावाचे एक गाव होते. तेथे विरूप नावाचा एक तरूण रहात असे. तो जन्मला तेव्हाच त्याला दोन्ही हात नव्हते. लहानपणीच त्याची आई वारली. नंतर वडिलांनी दुसरे लग्न केले. सावत्र आईला मुलगा झाल्यावर ती विरूपचा अपमान करू लागली. ती म्हणे - 'तू अगदी नालायक आहेस. तुझं जीणं व्यर्थ आहे. तू या पृथ्वीला भार आहेस!' विरूपच्या वडिलांना आपल्या मुलाची ही स्थिति पाहून फार दु:ख होई. परंतु आपल्या बायकोचा विचित्र स्वभाव पाहून बिचारे गप्प बसत. बायको पुढे काही बोलण्याचे साहस त्यांना होत नसे.

अशा परिस्थितीत विरूपने कांचनच्या स्वयंवराची बातमी ऐकली. राजकुमारीचें स्वयंवर पहायला जावे असे त्याला वाटू लागले. शिवाय घोषित झालेली स्पर्धा कशी असेल हे ही पाहण्याची त्याची इच्छा होती. म्हणून पंचमीच्या दिवशी सकाळी तो पूर्णचंद्रपुरला जायला निघाला.

कित्येक राजकुमार व काही साहसी तरूण ही स्वयंवरात भाग घेण्यासाठी आणि राजकुमारीशी विवाह करण्याच्या आशेने राजधानीत पोचले होते.

स्वयंवराच्या मंचावर राजा धीरसेन, राजकुमारी कांचन व मंत्री कुसुमचंद्र विराजमान झालेले होते. स्वयंवराचा मुहूर्त जवळ ठेपल्यावर मंत्री आपल्या आसनावरून उठला व उपस्थितांना संबोधून म्हणाला - राजकुमारीच्या स्वयंवरानिमित्त आज एक स्पर्धा आयोजित केली आहे हे तुम्हाला माहीत आहे. पण या स्पर्धेचं स्वरूप अजून तुम्हाला समजलेलं नाही. आता या स्पर्धेची माहिती मी तुम्हांला थोडक्यात सांगतो - "या स्पर्धेत ज्यांना भाग घ्यायचा असेल त्यांनी किल्ल्याच्या दक्षिणेकडील बुरुजावरून खाली जमिनीवर उडी मारायची आहे. खाली काही तलवारी उभ्या खोचून एक वर्तुळ बनविलेले आहे. हे वर्तुळ सुमारे १० फुट व्यासाचे आहे. उडी बरोबर या वर्तुळात पडली पाहिजे. ही मृत्यूशी झुंज आहे हे तुमच्या लक्षात आलेच असेल. तरी पण



राजकुमारीशी विवाह व्हावा असे वाटत असेल तर हे साहस करून पहा. कांचनसाठी आपल्या प्राणाची पर्वा न करणाऱ्या वीरांनो, पुढे या आणि या स्पर्धेत भाग घेऊन आपल्या शौर्याची परीक्षा करा." मंत्र्याने गंभीरपणे आवाहन केले.

मंत्र्याचे निवेदन संपले आणि स्वयंवर-मंडपात सर्वत्र गंभीर शांतता पसरली. एक राजकुमार दुसऱ्या राजकुमाराला म्हणाला - "ही कसली स्पर्धा? किल्ल्याच्या बुरुजावरून तलवारींच्या वर्तुळात उडी मारायची म्हणजे आत्महत्येचाच प्रयत्न नाही तर काय? जर आमच्या शौर्याची परीक्षा करायची होती तर खड्ग-युद्ध अथवा मल्ल-युद्ध यांचा



स्पर्धेत समावेश करता आला असता. अनेक देशांच्या राजकुमारांना एकदम मारून टाकण्याचा तर राजा धीरसेन यांचा हा कट नाही ना? जगात काय राजकुमारींचा दुष्काळ थोडाच पडलाय ! असल्या घातक स्पर्धेत भाग घेऊन आपल्या मरणाला निमंत्रण देणं म्हणजे शुद्ध मूर्खपणाच नाही तर काय?''

विरूप केवळ कुतुहलपूर्वक येथे आला होता. त्याला स्पर्धा पाहून आपले मनोरंजन करायचे होते. पण आता त्याचा विचार बदलला. आपल्या मनात दृढ निश्चय करून तो सभेत उभा राहिला आणि म्हणाला - ''महाराज, मी या स्पर्धेत भाग घ्यायला तयार आहे.'' राजा धीरसेनने विकलांग विरूपला नखशिखान्त पाहिले आणि त्याला धक्काच बसला. हा विकलांग जर आपल्या प्रयत्नात यशस्वी झाला तर आपल्या मुलीचं भविष्य किती खडतर होईल असा विचार त्याच्या मनात चमकून गेला. क्षण भर तो गप्प बसला आणि नंतर दीर्घ श्वास सोडून म्हणाला - ''ठीक आहे. मग कर स्पर्धेत भाग घेण्याची तयारी !''

एवढे राजकुमार इथे असताना हा विकलांग विरूप मात्र स्पर्धेत भाग घ्यायला तयार व्हावा हा केवढा दैव-दुर्विलास ! आपल्या स्वयंवरात असं काही होईल अशी कांचनने कधी कल्पनाच केली नव्हती. पण स्वयंवराच्या अटीनुसार विजेत्या तरुणाशी विवाह करायलाच हवा होता. परंतु या विकलांगाला हे साहस करणे मुळिच जमणार नाही असा विचार करून ती शांत झाली. अशक्य गोष्ट शक्य करण्याची ताकत याच्या ठिकाणी असणारच नाही.

एका सामान्य विकलांग तरुणाने या स्पर्धेत भाग घ्यायला तयार व्हावे याचे सर्व राजकुमारांना ही आश्चर्य वाटले. त्यांना यात आपला अपमान झाल्यासारखे वाटले. त्यांच्यापैकी एक राजकुमार जोरात ओरडला - ''अरे वेड्या, तू कुठल्या आई-बापाचा दुर्दैवी मुलगा आहेस हे मला समजत नाही. काही मागचा-पुढचा विचार न करता हे काय करायला तयार झालास रे तू? आपल्या मृत्यूला स्वतःच हे आमंत्रण देऊन बसलास ! तुला तर कुठला ही खेळ खेळता येत नाही, किल्ल्याच्या बुरुजावरून तलवारींच्या वर्तुळात उडी मारण्याचं दुस्साहस करणार? जाणून-बुजून मरणाला आव्हान देण्याची बुद्धि तुला कशी झाली?'' विरूपला सावधगिरीचा इशाराच होता तो.

विरूपने हे सर्व बोलणे स्पष्टपणे ऐकले. पण त्याने त्याची जरा ही पर्वा केली नाही. आता या सूचनेकडे लक्ष देण्याच्या मनस्थितीत तो नव्हता. तो हळू हळू किल्ल्याच्या दक्षिणेकडे गेला. बुरुजाच्या भिंतीला लावलेल्या शिडीकडे तो पहात राहिला.

मंत्र्याने विरूपची अडचण जाणली आणि ताबडतोब दोन सैनिकांना त्याला मदत करण्यासाठी पाठविले. त्यांनी काळजीपूर्वक विरूपला शिडीवरून किल्ल्याच्या बुरुजावर पोचविले. विरूपने वरून खाली तलवारींचे वर्तुळ पाहिले, त्याला तो मृत्यु-गोल वाटला. त्याच्या पायात थोडा कंप भरला. भीतीने त्याला दरदरून घाम फुटला. हृदय धडधडू लागले. त्याला वाटले स्पर्धेतून माघार घ्यावी नि आपले प्राण वाचवावे. पण लगेच त्याला आपल्या या क्षणिक दुर्बलतेची लाज वाटली.

जमलेल्या सर्व लोकांची नजर त्याच्याकडे आहे हे त्याने जाणले. क्षण भर त्याने आपल्या इष्ट देवतेचे स्मरण केले आणि बुरुजावरून खाली तलवारींच्या वर्तुळात उडी





मारली. हे दृश्य पाहून सर्वांनी आश्चर्याने तोंडात बोट घातले. आणि दुसऱ्याच क्षणी टाळ्यांचा कडकडाट झाला. सुदैवाने विरूप तलवारींच्या वर्तुळात सुरक्षित पोचला होता.

राजकुमारी कांचनच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही. विरूप सारखा विकलांग स्पर्धेत विजयी होऊन आपला पति बनेल अशी तिने स्वप्नात ही कल्पना केली नव्हती. स्वयंवरातील विजेत्याशी विवाह करणे ही तर क्षत्रियांची परंपरागत रीत आहे. क्षत्रिय-धर्माचे अतिक्रमण करणे तिला इष्ट वाटत नव्हते.

इकडे कांचनची अवस्था मोठी विचित्र झाली होती, तर तिकडे धीरसेन आपल्या मुलीच्या भविष्याची चिंता करू लागला.

दोघांची मनस्थिति विरूपच्या चांगली लक्षात आली. पुढे येऊन राजाला नम्रपणे प्रणाम करीत तो म्हणाला - ''महाराज, मला क्षमा करा. मी राजकुमारीशी विवाह करू शकणार नाही. स्पर्धेत भाग घेताना राजकुमारीशी विवाह करण्याचा उद्देश माझ्या मनात मुळिच नव्हता. या स्पर्धेत यशस्वी होऊन मला एक अनमोल पारितोषिक मिळाले आहे !'' असं म्हणून विरूप निघाला व आपल्या गावी परत आला.

वेताळाने राजाला एवढी गोष्ट ऐकवली आणि मग म्हणाला - ''राजा, विरूपने तर अगदी वेड्यासारखी व्यवहार केला नाही? जर राजकुमारीशी लग्न करायचे नव्हते, तर या जिवघेण्या स्पर्धेत त्याने भागच कशाला घेतला हे माझ्या लक्षात येत नाही. उलट तो म्हणतो की स्पर्धेत विजयी झाल्याबद्दल त्याला अमूल्य बक्षिस मिळाले ! हा तर त्याच्या वेडेपणाचा कळस होय. अन्यथा हाती आलेली सुवर्ण-संधि अशी कोणी गमावली नसती. विरूपने कांचनशी लग्न केले असते तर तो पूर्णचन्द्रपूरचा राजा झाला असता. पण अभाग्याच्या ते नशिबात नव्हतं ! माहीत असून ही माझ्या या शंकांचे समाधान केले नाहीस तर त्याचा परिणाम काय होईल हे तू जाणतोसच !''

वेताळाचे संदेह दूर करीत राजा विक्रमादित्य म्हणाला - ''अभागी विरूप जन्मतःच विकलांग होता. लहानपणीच त्याची आई त्याला सोडून गेली होती. सावत्र आई त्याला नित्य शिव्या देत असे. ती नेहमी त्याचा अपमान करी. 'मी पण कोणी आहे, माझ्यात योग्यता नि सामर्थ्य आहे!' हे सिद्ध करण्यासाठी विरूप योग्य संधीची वाटच पहात होता. याशिवाय त्याला असे ही वाटे की लोकांनी ही आपली प्रशंसा करावी. राजकुमारीच्या स्वयंवराच्या घोषणेमुळे विरूपला जीवनात एक सुवर्ण-संधि लाभली. अशा संधीची त्याने कधी कल्पना सुद्धा केली नव्हती. राजकुमारीशी लग्न करण्याची इच्छा त्याच्या मनात मुळिच नव्हती. आपण राजकुमारीच्या योग्य नव्हे हे त्याच्या लक्षात आलेले होते. शासनभार सांभाळणे आपले काम नाही हे ही त्याने जाणले होते. निर्भयपणे स्पर्धेत भाग घेऊन यशस्वी होण्याचा अर्थ असा नव्हे की राज्य-कारभार करायला तो योग्य आहे. तलवार पकडण्यासाठी ज्याच्या जवळ हातच नाही तो युद्ध करू शकणार नाही हे ही त्याने जाणले होते. विरूपला हे कठोर सत्य माहीत होते, म्हणूनच त्याने राजकुमारीशी विवाहाला संमति दिली नाही. हे त्याचे दुर्भाग्य असे म्हणता येणार नाही. आपण कोणी तरी 'सुप्रसिद्ध माणूस' व्हावं एवढ्याच उद्देशाने त्याने स्पर्धेत भाग घेतला होता. आता राहिले त्याला मिळालेले अमूल्य बक्षिस ! 'आपल्या साहसाची लोक चर्चा करीत राहिले !' हेच ते बक्षिस ! आपला उद्देश सफल झाला हे जेव्हा त्याने जाणले तेव्हा राजकुमारीशी विवाह न करण्याचा निश्चय करून तो आपल्या गावी परतला. म्हणून विरूपला वेडा अथवा मूर्ख म्हणणे कधी ही योग्य होणार नाही.''

अशा रीतीने राजाचे निवेदन संपल्यावर वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडावर जाऊन बसला.

**आधार : प्रफुल्ल चौधरी यांची एक कथा**



# परस्पर विश्वास

दामोदरचा विश्वसनीय नोकर होता गंगाराम. दहा वर्षे नोकरी केल्यानंतर ही त्याला काही पगारवाढ मिळाली नाही, म्हणून त्याने नोकरी सोडून दिली आणि कमलाकांतकडे नोकरी करू लागला. कमलाकांतने त्याला दामोदरच्या दुप्पट पगार दिला.

दामोदरने सीताराम नावाचा एक नवीन नोकर ठेवला. त्याने सीतारामला सांगितले - ''बघ, गंगारामने माझ्याकडे दहा वर्षे नोकरी केली, पण तो माझा विश्वासपात्र बनला नाही. नोकर विश्वासू असला पाहिजे. तू माझा विश्वास संपादन कर.''

सीताराम एक दिवशी गंगारामला भेटला, तेव्हा त्याने त्याला विचारले - ''तू दामोदरकडे दहा वर्षे नोकरी केलीस. मी त्याच्याशी कसं वागावं याबाबत काही मंत्र असेल तर मला सांग ना !''

गंगारामने उत्तर दिले - ''मंत्र जाणण्याची काय आवश्यकता आहे? दामोदर चांगला माणूस आहे. तुला त्याच्या कडे काही त्रास होणार नाही !''

सीताराम म्हणाला - ''जर तो चांगला माणूस आहे, तर तू त्याच्याकडील नोकरी का सोडलीस? तुझा त्यांच्यावर विश्वासच नाही. अधिक पगाराच्या आशेने तू नोकरी सोडून सर्व नोकरांना बदनाम केलेस, तू आपल्या व्यवसायाला कलंक फासलास!''

गंगारामने उत्तर दिले - ''मला नाही असं वाटत. दामोदर तसा चांगला माणूस आहे. पण त्याच्या ठिकाणी विश्वासाची भावनाच नाही. मालकाचा मुख्य गुण म्हणजे विश्वास ! ज्या मालकाचा नोकरावर विश्वास नाही त्याच्याकडे कोण किती दिवस नोकरी करणार?''



# मुंबईच्या दक्षिणेला



मूळ पाठ : मीरा नायर
चित्रकारी : गौतम सेन

**आगगाडीचा पहिला प्रवास**

आपल्या देशातले आगगाडीचे युग मुंबईपासूनच सुरू झाले, १६ एप्रिल १८५३ रोजी दुपारी साडेतीन वाजता पहिली आगगाडी इथल्या बोरीबंदर स्टेशनवरून ३४ कि.मी. अंतरावरच्या ठाण्याकडे रवाना झाली. तिच्यात ४०० प्रवासी होते. हा आधुनिक 'चमत्कार' पहाण्यासाठी हजारो माणसे रुळांच्या दोन्ही बाजूंना जमली होती. ही गाडी द ग्रेट इंडियन पेनिन्सुला (जी.आय.पी.) रेल्वे नावाच्या एका व्यक्तिगत कंपनीने चालवली होती.

त्यावेळी बोरीबंदर स्टेशनची लाकडी इमारत होती. आजवर व्हिक्टोरिया टर्मिनस व अगदी नव्याने 'छत्रपती शिवाजी टर्मिनस' असे नामकरण झालेली आजची दिमाखदार इमारत नंतर बनवण्यात आली. या जागी मुंबादेवीचे देऊळ होते. स्टेशन बांधण्याअगोदर ते देऊळ तीन कि.मी. दूर नव्याने बांधण्यात आले.

मुंबईच्या दक्षिण टोकावरून मोटर- लाँचने छोटासा प्रवास करून आपण एलिफंटा बेटावर पोचू शकतो. वाटेत बुचर आयलंड असे विचित्र नाव असणारे एक छोटेसे बेट दिसते. एका काळी रॉबिन नावाचा एक कसाई तेथे रहात असे व मुंबईच्या ब्रिटिश लोकांसाठी सर्व प्रकारचे प्राणी पाळत असे. त्याच्याच नावाने या बेटाला हे किंवा 'कसाई बेट' असे नाव प्राप्त झाले. हल्ली कच्चे तेल आणणारी जहाजे तेथे थांबतात.



व्हिक्टोरिया टर्मिनस

एलिफंटा बेटावर हत्ती रहातात असे समजू नका. तिथे तर माकडेच मोठ्या संख्येने रहातात. १६ व्या शतकात पोर्तुगीज लोक जेंव्हा प्रथम या बेटावर पोचले, तेंव्हा त्यांना समुद्रकिनाऱ्यावर हत्तीचे एक विशाल दगडी शिल्प आढळले. बास ! त्यांनी बेटाला 'एलिफंटा' नाव देऊन टाकले. नंतर ब्रिटिशांनी ते शिल्प 'राणीच्या बागे' तील पशुसंग्रहालयात नेऊन ठेवले. तो हत्ती आजही तिथे अुभा आहे; परंतु व्हिक्टोरिया गार्डन किंवा 'राणीचा बाग' चे नामकरण आता 'वीरमाता जिजाबाई अुद्यान' असे झाले आहे. एलिफंटा बेट आपल्या कोरीव लेण्यांसाठी प्रसिद्ध आहे. सर्व लेणी तेथील खडक खोदून बनवलेली आहेत. त्यातील सर्वात मोठ्या व आकर्षक अशा मुख्य लेण्यात सुप्रसिद्ध 'त्रिमूर्ति' आहे. जगाची अुत्पत्ति, स्थिति व लय निदर्शक सृष्टिकर्ता, संरक्षक व संहारक अशी भगवान शिवाची रूपे ही मूर्ती निर्देशित करते.



मन्दिरातील एक भग्न शिल्प



भगवान शिवाची तीन रूपे दर्शवणारी एलिफंटातील विशाल त्रिमूर्ती



शिवपार्वती विवाह

लेण्याच्या भिंतींवर रोचक पौराणिक प्रसंग खोदलेले आहेत. सर्वांत मनोरंजक आहे रावणाच्या गर्वहरणाची गोष्ट. गर्वाने चूर झालेला रावण कैलास पर्वत हलवण्यासाठी पराकाष्ठा करत आहे. पण भगवान शंकर मात्र त्याची जराही पर्वा न करता आरामात पट मांडून पार्वतीबरोबर खेळत बसलेले आहेत. मात्र पायाचा अंगठा दाबून त्यांनी संपूर्ण पर्वत अचल करून ठेवलेला आहे. शिव-पार्वती विवाह व गंगावतरण यांच्या कथाही सुंदर प्रकारे कोरलेल्या आहेत. सद्भाग्याने त्यांची विशेष तोडफोड झालेली नाही. भगवान शिवाचे अर्धनारीश्वर रूपही खूप सुन्दर आहे.

शिवरात्र व अन्य शैव पर्वांचे वेळी एलिफंटा लेण्यांवर लोकांची भरपूर गर्दी असते. दिवसा जत्रा असते आणि रात्री नृत्य, गाणे-बजावणे यांसारखे सांस्कृतिक कार्यक्रम असतात.

मुख्य लेण्यापासून जरा दूरवरच आणखी दोन लेणी आहेत. पण त्यांची बरीच तोडफोड केली गेली आहे. 'सीतामाईचे लेणे' नावाचे आणखीही एक लेणे आहे. याच्या बाहेर कोणे एके काळी एक सुन्दर द्वार व संगमरवराचे एक दालन होते. हे लेणे अपेक्षाकृत बऱ्या अवस्थेत आहे.

एलिफंटा बेटाच्या दक्षिणेला मुख्य भूमीवर अलिबाग आहे. कोकण क्षेत्राचे हे तटवर्ती शहर मुंबईच्या हौशी लोकांचे आवडीचे सहलकेन्द्र आहे.



लेण्यातील खडक कापून बनवलेला एक सुन्दर स्तम्भ



कैलास पर्वतावर बसलेले भगवान शिव



अलिबाग शहराचे नाव एका धनवान मुसलमान व्यापाऱ्याच्या नावावरून पडले आहे. त्याने सत्राव्या शतकात इथे अनेक विहिरी खोदल्या आणि बाग बगीचे लावले. ते आजही अस्तित्वात आहेत. इथले नारळ व कलमी आंबे कोकणात खूप प्रसिद्ध आहेत.

अलिबाग तालुक्यातच चौल कसबाही आहे. चौदाव्या शतकापर्यन्त हे एक महत्त्वाचे व गजबजलेले बन्दर होते. याचे प्राचीन नाव चंपावती व रेवती क्षेत्र असे होते. रोमशी येथून व्यापार चाले. सोळाव्या शतकात जेंव्हा पोर्तुगीज इथे आले, तोपर्यंत याला चौल म्हटले जाऊ लागले होते. इथला समुद्रकिनारा जहाजे येऊन थांबण्यासाठी सोयीस्कर आहे; म्हणूनच हे महत्त्वाचे व्यापारी बंदर बनले.

अलिबागचा समुद्रकिनारा

चौलपासून कित्येक कि.मी. दक्षिणेला एका खडकाळ बेटावर जंजिरा हा मजबूत किल्ला बनलेला आहे. किल्ल्याच्या १५ मीटर उंचीच्या भिंती जणू पाण्यातूनच उगवल्यासारख्या वाटतात. सध्याच्या या किल्ल्याची निर्मिति मलिक अंबर नावाच्या अॅबिसीनियन सरदाराने १७०७ मधे केली. आफ्रिकी देश अॅबिसीनियाला हल्ली इथियोपिया असे म्हणतात. इतक्या दूर देशचा माणूस महाराष्ट्रातल्या एका जलदुर्गाचा मालक कसा बनू शकला? याच्यामागे एक मनोरंजक कथा आहे.

असे म्हटले जाते की, अॅबिसीनियातला एक लुटारू या बेटावर येऊन पोचला, अन् त्याने येथील राजाकडे आपल्या जहाजावरच्या ३० पेट्या उतरवायची परवानगी मागितली. राजाने त्याला व्यापारी समजून तशी परवानगी दिली. पहातापहाता ३०० पेट्यातून लढवय्ये बाहेर पडले अन् किल्ल्यावर अॅबिसीनियन सरदाराने ताबा मिळवला. तेंव्हापासून १९४७ पर्यन्त किल्ला त्याच्याच वंशजांच्या ताब्यात राहिला. ते स्वतःला 'सय्यद' म्हणवत असत. पुढे तो शब्द 'सिद्दी' असा बनला. 'जंजिरा' ही 'जज़ीरा' (द्वीप) या अरबी शब्दाचे विकृत रूप आहे.



जंजिरा किल्ला





# माहेरची देवी

**सो**ना एका सामान्य कुटुंबात जन्माला आली होती. लहानपणापासून तिला दागिन्यांचा फार सोस! ती उपवर झाली आणि बहादुरशी तिचे लग्न झाले.

सोना सासरी आली तेव्हापासून नेहमी आपल्या नवऱ्याकडे दागिन्यांची मागणी करीत असे. बायकोला म्हणाला - ''आपल्या परिस्थितीनुसार जे दागिने असायला पाहिजेत, ते तर तुझ्याकडे आहेत. मी जमीनदाराकडे काम करणारा एक साधारण सेवक आहे.''

सोना बिचारी काय करणार? चुप बसली. पण दागिन्यांचा मोह मात्र तिला आवरेना.

अशा रीतीने दिवस जात राहिले. सोनाला एक मुलगा झाला. त्याचं नाव ठेवलं गोविंद. गोविंद मोठा झाला, चांगला शिकला. त्याला एक चांगली नोकरी मिळाली. पण नोकरी मिळाली नि बहादुर आजारी पडला. त्याची प्रकृति एकदम बिघडली. बिचाऱ्या बहादुरला नोकरी सोडावी लागली.

गोविंदला नोकरी मिळाली तशी सोनाच्या मनांतील दागिन्यांची इच्छा पुन्हा एकदा उफाळून आली. ती विचार करू लागली माझ्या गोविंदच्या लग्नाच्या वेळी खूप हुंडा मागेन, अन् मग त्या रकमेतून निरनिराळे दागिने खरेदी करीन.

गोविंद एकदा आपल्या एका मित्राच्या लग्नासाठी बाहेर गावी गेला होता. त्या लग्न-सोहळ्यात जमलेल्या मुलीतील कमला नावाच्या एका मुलीचे त्याला फार आकर्षण वाटले. त्याने त्याच मुहूर्तावर कमलाशी लग्न केले आणि तो तिला आपल्या घरी घेऊन आला.

गोविंद सोनाला म्हणाला - ''आई,

श्रुति तांबे



ही कमला. तुझी सून! आम्हाला आशीर्वाद दे.'' आणि नवरा-बायको नमस्कार करण्यासाठी पुढे सरसावले.

नाराज होत सीता मागे सरकली. ती म्हणाली - ''बाबा रे, ही तुझी बायको असेल, पण माझी सून नाही !''

कमलाचे वडील जवळच उभे होते. ते म्हणाले - ''रागावू नका. गोविंदरावना माझी मुलगी पसंत पडली. मी त्यांना म्हटलं - आम्ही सामान्य माणसं आहोत. हुंडा-बिंडा द्यायचं आम्हाला नाही जमणार. तरी पण त्यांनी आमच्या मुलीशी लग्न केलं.''

कमलाची आई बोलली - ''तुमच्या अनुपस्थितीत हे लग्न घडवून आणले ही आमची चूकच आहे. पुढील दोन महिन्यात नंतर मुहूर्त नव्हता . विहीणबाई, माफ करा आम्हाला.'' असे म्हणत तिने सोनाचे हात पकडले.

आपले हात सोडवीत सोना रागाने म्हणाली - ''जाऊ दे त्या लग्नाचं! मोठी आलीय मला विहीण म्हणणारी ! द्या तुमच्या लाडकीला इथं सोडून अन् व्हा चालत्या.'' हे कटु शब्द ऐकून बिचाऱ्या कमलाच्या आई-वडिलांचे डोळे भरून आले. त्यांनी एकदा आपल्या मुलीकडे पाहिले नि आपल्या गावी निघून आले.

यावेळी सोनाचा नवरा घरात नव्हता. १० मैलांवर असलेल्या एका गावी एक बैरागी आला होता. बहादुरने ऐकलं होतं की कोणत्याही असाध्य रोगावर बैरागी औषध देतो आणि एकदा औषध घेतलं की रोग बरा होतो. या बैराग्याचं औषध घेऊन आपला रोग ही दूर होईल अशा आशेने तो त्या गावी गेला होता.

दुसऱ्या दिवशी बहादुर परत आला तेव्हा गोविंदकडून त्याला सर्व वार्ता कळली. निराश होऊन तो मुलाला म्हणाला - ''गोविंद, मी मोठा अभागी आहे. आदल्या दिवशीच तो बैरागी गाव सोडून गेला होता. तुझी आई कशी आहे हे तुला माहीतच आहे. तिच्या अनुमती वाचून तू लग्न करायला नको होतंस.''



एक आठवड्या भरातच सोनाने सुनेचा छळ सुरू केला. घरातील मोलकरीण काढून टाकली. भांडी घासणं, कपडे धुणं, स्वयंपाक वगैरे सगळी कामं ती कमलाकडून करून घेऊ लागली.

पण एवढं करून तिला संतोष वाटला नाही. एक दिवशी तिने कमलाला धमकावलं - ''एक पैसा सुद्धा हुंडा न देता महाराणी सारखं राज्य करायला या घरात आलीस हं? आजपासून तुला एकदाच जेवण मिळेल. आणि ते ही रात्री ! जर आपल्या नवऱ्याला यातलं काही सांगितलस तर याद राख, तुझ्यावर चोरीचा आळ घालीन आणि तुझी कायमची माहेरी रवानगी करीन. समजलं?''

एकच वेळेला जेवण मिळाल्यामुळे बिचारी कमला दुबळी होत चालली. एक दिवशी रात्री भोजन करीत असताना गोविंदने कमलाला विचारले - ''तू आजारी आहेस का? अशी खंगत का चालली आहेस?''

जवळच असलेल्या सोनाने मधे तोंड घातलं - ''आईची आठवण होत असेल बिचारीला! उद्या तिला माहेरी पोचवून ये झालं.''

गोविंद म्हणाला - ''ठीक आहे.''

रात्री कमलाला झोप आली नाही. ती मध्यरात्री परसात गेली आणि मुसमुसून रडू



लागली. सासूची धमकावणी तिला आठवली, तसं तिचं दुःख अधिकच वाढलं. एकाएकी झाडावरील पानं सळसळू लागली, म्हणून तिने वर नजर टाकली. झाडाच्या फांद्यांतून एका पिशाचिनीने धडामदिशी खाली उडी मारली आणि ती कमलाच्या पुढ्यात येऊन उभी राहिली. ती कमलाला म्हणाली - ''घाबरू नकोस. तुझं काही भलं करावं म्हणूनच मी इथे आलेय. तुझं दुःख तरी मला सांग.''

हे ऐकून आता कमलाच्या जिवात जीव आला. सासूच्या सगळ्या कारवाया तिने पिशाच्चिणीला ऐकवल्या. सगळं ऐकून पिशाचिनी म्हणाली - ''ठीक आहे,



आजपासून तू जे अन्न खाशील, त्यांतील हजार शितांपैकी एक शीत सोन्याचं होईल. रात्री जेवण झाल्यावर तू जेव्हा आपलं ताट उचलशील, तेव्हा ताटाखाली तुला सोन्याची शितं चिकटलेली सापडतील. तुझ्या सासूला काय सोनंच पाहिजे ना? आता ती तुला पोटभर जेवण देऊ लागेल.''

दुसऱ्या दिवशी कमला माहेरी जायला निघणार होती, ती सासूला म्हणाली - ''काल रात्री मला एक स्वप्न पडलं. स्वप्नात माझ्या माहेरच्या देवीने येऊन सांगितले की माझ्या भोजनाच्या ताटाखाली मला रोज काही सोन्याची शितं सापडतील.'' पिशाचिनीशी झालेल्या बोलण्याचे सार तिने माहेरच्या देवीच्या नावावर सासूला ऐकवले.

थोडा वेळ सोनाच्या तोंडून शब्द फुटेना. मग सोना सुनेला म्हणाली - ''खरंच?'' एकाएकी तिच्या मनात एक शंका चमकून गेली. तिने कमलाला विचारले - ''ज्या माहेरच्या देवीबद्दल तू म्हणत आहेस, ती इतके दिवस कुठ लपून बसली होती? सून बनून तू या घरात पाऊल ठेवलंस, त्याच दिवशी मला हे सांगितलं असतंस, तर आतापर्यंत घरात सोन्याचा ढीग लागला असता. मी अनेक दागिने बनवले असते. बिचाऱ्या तुझ्या देवीला आपलं घर शोधून काढायला बराच त्रास झाला असेल. म्हणूनच तिला यायला एवढा उशीर झालेला असावा. ठीक आहे, आज आता तू माहेरी जाऊ नकोस!''

रात्री जेव्हा सर्व जण झोपले तेव्हा सोनाने सुनेचे ताट उलटून पाहिले, तेव्हा तिला खरोखरीच काही सोन्याची शितं सापडली. सोनाला खूप आनंद झाला. आता ती सुनेला दिवसातून तिनदा जेवण देऊ लागली. महिनाभर गोळा केलेल्या सोन्यांतून तिने सुरेख बांगड्या बनविल्या. सोना कमलाला म्हणाली - ''आता तू माहेरी जायचं नाव काढू नकोस.'' दिवसें दिवस सोनाचा सोन्याचा मोह वाढत चालला. सून म्हणाली - माझं पोट भरलंय, तरी ती तिला आग्रह कर करून आणखी खायला भाग पाडू लागली.

एक दिवशी रात्री पोटात दुखू लागले, म्हणून कमला परसात जाऊन बसली. एकदा आपल्या आई-वडिलांना भेटून यावं असं ही तिला फार वाटू लागलं.

इतक्यात पिशाचिनी तिच्या समोर येऊन उभी ठाकली. आणि तिने विचारले - ''बोल, आता कुठल्या नव्या संकटात सापडली आहेस?''

कमलाने जेव्हा तिची अडचण सांगितली, तेव्हा एक चुटकी वाजवून पिशाचिनी म्हणाली - ''आजपासून तुझ्या ताटाखाली सोन्याची शितं सापडणार नाहीत. तुझ्या सासूने जर एक वेळी भोजन केले नाही तर तिला आपल्या ताटाखाली एक सोन्याची मोहर मिळेल !'' आणि पिशाचिनी तेथून अदृश्य झाली.

सकाळी उठल्यावर कमलाने सासूला ही वार्ता सांगितली. सोना झटकन म्हणाली - ''मग आता या घरात तुझी काय जरूर आहे? तू आपली आजच माहेरी जा पाहू.'' आणि तिने कमलाची माहेरी रवानगी केली.

सोना दुपारी जेवलीच नाही. तिने उपास केला. रात्री तिला आपल्या ताटाखाली सोन्याची मोहर सापडली. दुसऱ्या दिवशी तिने दोन्ही वेळेला उपास केला. तेव्हा तिला दोन मोहरा सापडल्या.

हे सगळं पाहून सोनाला एक अजब युक्ति सुचली. तिने विचार केला - जेवणाचं काय मोठं? आतापर्यंत खातच आले आहे.



दहा दिवस उपास केला तर काय बिघडणार आहे? दहा दिवसात सोन्याच्या वीस मोहरा मिळतील. मग चंद्रहार बनवता येईल. काही दिवसांनी एका नातेवाइकाच्या लग्नाला जायचंय. माझ्या गळ्यातील चन्द्रहार पाहून सगळे थक्क होऊन जातील.

आणि सोनाने उपास करायला सुरुवात केली. तीन दिवसात तिला खूपच अशक्तपणा आला. ताटाखालची मोहर काढून घेण्याइतकी ताकत ही तिच्यात उरली नाही. आता तिला आणखी एक युक्ति सुचली.

गोविंदला बोलावून ती म्हणाली - ''बेटा, ताबडतोब वैद्य गुरुनाथकडे जाऊन विचारून ये की साबुदाणा अथवा भाताची पेज घेतली तर उपास मोडत नाही ना?''

आईला अशी विचित्र शंका का आली हे गोविंदच्या लक्षात येईना. तो धावत-पळत वैद्यांकडे गेला आणि आईच्या शंकेबाबत त्यांना विचारले. वैद्य हंसत म्हणाले - ''पाणी घ्यायला हरकत नाही. दुसरं काही खाल्लं प्यायलं की उपास मोडलाच !''

गोविंद परत आला तोपर्यंत आई बेशुद्ध झालेली होती. त्याने आईला वडिलांच्या सुपुर्द केले, वैद्यांना बोलवून आणले आणि कमलाला घेऊन येण्यासाठी सासुरवाडीला पोचला.

कमला सासरी आली आणि सासूकडे पाहून जोर-जोरात रडू लागली. तिने विचारले - ''सासूबाई,काय झालं तुम्हाला?'' सोनाने कमलाला प्रेमाने जवळ बसवून घेतले आणि झालेली सर्व घटना सांगितली. ती म्हणाली - ''कमला, तुझ्या सारखी सुरेख सून घरात असताना मी दागिन्यांचा हव्यास केला आणि आपली अशी अवस्था करून घेतली. मी पण किती मूर्ख आहे. आता या वयात मला दागिन्यांचं काय करायचय? सगळं सोनं तू घे आणि तुझ्यासाठी दागिने बनव. ही गोष्ट आपल्या सासऱ्याला सांगू नकोस हं.''

कमलाने सासूची खूप सेवा-सुश्रूषा केली. एक महिन्या भरात तिची प्रकृति पूर्ववत् झाली.





# फरक

एक होता राजा. आपल्या राजधर्माचे पालन तो मोठ्या श्रद्धेने व निष्ठेने करी. या राजाची कीर्ति देशाच्या काना-कोपऱ्यात दुमदुमत होती.

एके दिवशी राजा शिकारीसाठी जंगलात गेला. शिकारीच्या नादात तो एकटाच जंगलात खूप दूरवर गेला. आता त्याला परत येण्याची वाट सापडेना. तहान नि भुकेने ही तो व्याकुळ झाला. शेवटी तो एका मुनीच्या आश्रमात पोचला.

मुनी त्यावेळी डोळे मिटून तपस्येत मग्न होता. त्याला अभिवादन करून राजा म्हणाला -''महात्मन्, मी जंगलात वाट चुकलोय. खूप दमलो आहे आणि तहान व भुकेने व्याकुळ झालो आहे. आपल्या आश्रमात थोडा वेळ विश्रांति घेऊ का?'' डोळे न उघडता मुनि म्हणाला - ''विश्रांति घ्यायला हरकत नाही. या देशाचा राजा धर्मप्रभु आहे. म्हणून तहान व भुकेची तुला चिंता नको. आश्रमातील कुठलं ही फळ वा पान खा, गोडच लागेल, स्वादिष्ट वाटेल! खाऊन तुला शक्ति मिळेल. तेव्हा ती खाऊन आपली भूक भागव.''

मुनीच्या बोलण्याचं राजाला मोठं आश्चर्य वाटलं. त्याने एका झाडाचं फळ तोडलं नि तोंडात घातलं. खरोखरीच फार गोड आणि रुचकर होतं. ज्या झाडाची फळं आंबट वा कडु असायला हवीत, ती ही मधुर होती. काही फळं खाऊन राजाने आपली भूक तर भागवली. त्याचं मन संतुष्ट झालं, शरीरात उत्साह संचारला. थोडा वेळ आश्रमात आराम करून राजा आपल्या राजधानीला परत आला.

आता राजाने असा विचार केला की आपल्या धर्म-शासनाची चुणूक सर्व

पंचवीस वर्षांपूर्वी 'चांदोबा'त प्रकाशित झालेली गोष्ट

दरबारी-जनांना एकदा दाखवावी. त्याने ताबडतोब सर्व मंत्री, सामंत व राजधानी-तील प्रमुख मंडळींना मेजवानीचे आमंत्रण दिले. कडू लिंब आणि कारली यांचा रस घालून खीर करायची आज्ञा त्याने स्वयं-पाक्यांना दिली.

स्वयंपाक्यांनी राजाच्या आज्ञेचे तंतोतंत पालन केले. त्यांना वाटलं राजाच्या या आज्ञेचा काही तरी विशेष उद्देश असला पाहिजे.

सर्वांबरोबर राजा ही भोजनासाठी बसला. पण त्याची निराशा झाली. खीर तोंडात घालताच त्याला ओकारी आली.

राजाने मेजवानी थांबवली. पुन्हा नवा स्वयंपाक करून सर्वांना भोजन वाढण्यात आले. त्या दिवशी मुनीच्या आश्रमात सर्व फळे गोड व स्वादिष्ट का होती हे राजाच्या लक्षात येईना. त्याला वाटले कदाचित् स्वयंपाक्यांनी खीर बिघडवली असेल. त्याने स्वतः एक कारले खाऊन पाहिले. ते कडूच होते. अर्थात् स्वयंपाक्यांची काही चूक नव्हती हे सिद्ध झाले.

यातील रहस्य जाणण्यासाठी राजा लगेच मुनीला भेटायला निघाला. मुनीला अभिवादन करून राजाने प्रश्न केला - ''त्या दिवशी तर मी जे फळ खाल्लं, ते मधुर नि स्वादिष्ट होतं. राजधानीत मात्र मला तसं आढळून आलं नाही. याचं कारण काय बरं?''

मुनीने राजाला समजाऊन सांगितले - ''तू राजा आहेस हे त्या दिवशी मला माहीत नव्हतं. नकळत मी तुला धर्म-प्रभु म्हणून तुझी प्रशंसा केली. त्यामुळे तुझ्यातील अहंकार वाढला. तू स्वतःच आपल्या मोठेपणाची परीक्षा घेतलीस. तू धर्म-शासन करीत असलास तरी अजून तुला खूपच प्रगति केली पाहिजे. परीक्षेच्या कसोटी वर तुला यश मिळाले नाही.''

राजाने मुनीची क्षमा मागितली आणि तो आपल्या राजधानीकडे परत आला. यानंतर राजाचा अहंकार दिवसें दिवस कमी होऊ लागला आणि तो विनयपूर्वक राज्य-शासन करू लागला.





# महाभारत

मध्य-रात्र झाली. जरासंधाला पाहुण्यांना दिलेल्या वचनाची आठवण झाली. यज्ञशाळेत येऊन तो कृष्णार्जुनांना म्हणाला, ''महोदय, तुम्ही स्नातक आहात. स्नातक तर गळ्यात माळा घालत नाहीत, चन्दन लेपत नाहीत. तुम्ही हे दोन्हीही केलंय. तुमच्या दंडांवर धनुष्याची खूण दिसतेय. तुमचा नगरप्रवेश प्रवेशद्वारातून झालेला नाहीय. तुम्ही तर भिंत ओलांडून घुसले आहात. ब्राह्मणवेषात आलेले क्षत्रिय वाटताय तुम्ही. तुम्ही कोण आहात, खरं सांगा पाहू. काय कारणानं आला आहात इथं?''

कृष्ण उत्तरला, ''ब्राह्मण, क्षत्रिय अन् वैश्यही स्नातक असू शकतात. आम्ही क्षत्रिय-स्नातक आहोत. आपल्या खास शक्तीमुळे ब्राह्मणांसारखे दिसत आहोत. वडीलधारी माणसं असं सांगतात की मित्राच्या घरात दरवाजातून प्रवेश करावा, पण शत्रूच्या घरात मात्र दार नसलेल्या जागेतून प्रवेश करावा. तू आमचा शत्रु आहेस, म्हणून आम्ही भिंत ओलांडून आलो. तुझं-आमचं नीट जमत नाही, म्हणून आम्ही तुझी पूजा नाकारली. आम्ही आपला शौर्य पराक्रम दाखवायला इथे आलो आहोत.''

जरासन्ध कृष्णाला म्हणाला, ''कितीही आठवून पाहिलं, तरी मी तुमच्यावर का रागवावं, हे मला कळत नाहीय; तुमचा द्वेष का करावा मी? बोला, मी तुमचा शत्रु कसा? निरपराध्याला शत्रू मानणं धर्मसंमत



नव्हे नं?''

कृष्ण उत्तरादाखल म्हणाला, ''एका महान् व्यक्तीनं आपला कुलधर्म पाळण्यासाठी तुझ्याशी युद्ध करायला आम्हाला पाठवलं आहे. तू कित्येक राजांना अकारणच कैद करून ठेवलं आहेस. दररोज एकेकाला भैरवीसमोर बळी देत आहेस. अशा स्थितीत स्वतःला निरपराधी म्हणवायचा अधिकार नाही तुला. याहून मोठा अधर्म आणखी कसला असू शकतो? तुझ्या हातून पिडलेल्यांना सोडवायला आलोत आम्ही. तुझ्यासारख्या घमेंडखोर कार्तवीर्याची अशीच दुर्गत झाली होती. तू कैद केलेल्यांना मुक्त तरी कर, किंवा आमच्याशी लढून मर. मी कृष्ण आहे, अन् हे दोघं भीम अन् अर्जुन !''

कृष्णाचे बोलणे ऐकून जरासंध रागाने म्हणाला, ''आपल्या बळावर जिंकलेल्या राजांना काय तुझ्या भयानं सोडून देऊ? माझ्याशी युद्ध करायची फार खुमखुम असेल, तर जाऊन आपलं सैन्य घेऊन ये ना ! तुमच्यापैकी कोणाही एकाशी, किंवा तिघांशीही युद्धाला तयार आहे मी.'' त्याने लगेच आपला पुत्र सहदेव याला राज्याभिषेक करवला अन् तो युद्धाला तयार होऊन परत आला.

कृष्ण त्याला म्हणाला, ''आमच्यापैकी पाहिजे त्याच्याशी युद्ध करू शकतोस तू.''

आपल्या शक्तीचा जरासंधाला गर्व होता व विश्वासही होता. त्याने सरळ भीमालाच आव्हान दिले. आपला मुकुट उतरवून त्याने आपले केस बांधले अन् लगेच तो भीमावर तुटून पडला. दोघेही दोन हत्तींसारखे मल्लयुद्ध करू लागले. नगरातून असंख्य लोक हे युद्ध पहायला तेथे जमले. हे भयंकर युद्ध कार्तिक शुद्ध पंचमीला सुरू होऊन त्रयोदशीपर्यन्त चालू राहिले. चतुर्दशीच्या दिवशी जरासंधात युद्धाची शक्ती उरली नाही असे पाहून कृष्ण भीमाला म्हणाला, ''भीमा, जरासंधाची शक्ती आता क्षीण झालीय. मारून टाक त्याला.''

कृष्णाच्या या बोलण्याने भीमात उत्साह संचारला. त्या दिवशी भीमाने जरासंधाला अगदी सहजपणे आपल्या पकडीत धरले अन् त्याला फाडून मारून टाकले. भयंकर सिंहनाद करत त्याचे प्रेत फरपटत ओढून नेऊन भीमाने ते राजद्वारी फेकून दिले.

यानन्तर कृष्ण, भीम व अर्जुन कारागारात गेले व त्यांनी तेथील कैदेत असणाऱ्या राजांना मुक्त केले. गिरिव्रजच्या ब्राह्मणांनी तिघांना आशिर्वाद दिले. कारागृहातून सुटलेल्या राजांनीही कृष्णाची प्रशंसा केली. कृष्ण त्यांना म्हणाला, ''धर्मराज राजसूय यज्ञ करणार आहे. तुम्ही सर्वांनी त्याला सहकार्य दिलं पाहिजे.'' सर्वांनी मोठ्या खुशीने यासाठी संमती दिली.



जरासंधाचा पुत्र सहदेव आपल्या पुरोहितासह बरोबर भेटी घेऊन आला. कृष्णाने भेटींचा स्वीकार करून त्याला 'मगधचा राजा' म्हणून घोषित केले.

नंतर भीमार्जुनांना जरासंधाच्या रथावर बसवून कृष्ण तेथून निघाला. मुक्त झालेले सर्व राजे ही त्यांच्याबरोबर आले. लवकरच सर्वजण इन्द्रप्रस्थाला पोचले. कृष्णाने ''तुझे दोन्ही भाऊ सकुशल इन्द्रप्रस्थाला परत आले आहेत. अन् युद्धात भीमाने जरासंधाचा वध केला असून आमच्या बरोबर आलेले हे सर्व जरासंधाने कैद केलेले राजे आहेत.'' असे धर्मराजाला सांगितले. धर्मराजाने त्या सर्व राजांचा उचित असा आदर-सत्कार केला अन् त्यांना आपापल्या देशाकडे पाठवून दिले. नंतर कृष्णही जरासंधाच्या रथावर बसून द्वारकेला परत गेला.

काही दिवसांनंतर अर्जुन धर्मराजाला म्हणाला, ''माझ्याजवळ दिव्य असं गांडीव धनुष्य आहे; अग्नीनं दिलेला रथ आणि अजोड अशी युद्धसाधनं आहेत. मी दिग्विजयासाठी बाहेर पडून आपला खजिना भरून टाकतो.''

आपल्या भावाच्या या बोलण्याने धर्मराजाला फार आनन्द झाला. दिग्विजय यात्रेसाठी एक शुभमुहूर्त पाहून त्याने अर्जुनाला उत्तरेकडे, भीमाला पूर्वेकडे, सहदेवाला दक्षिणेकडे व नकुलला पश्चिमेकडे



रवाना केले. स्वतः धर्मराज राज्यभार संभाळत राहिला.

सैन्यासह अुत्तरेकडे गेलेल्या अर्जुनाने प्रथम पुलिन्द राज्यावर आक्रमण केले. त्या राजाला त्याने अगदी सहजपणे दूर केले. नंतर अनर्त, कालकूट, कुलिंद, सुमंडल इ. राज्ये हस्तगत केली. शाकल द्वीपाच्या महापराक्रमी राजा प्रतिविन्ध्य याला हरवले. प्राग्ज्योतिषचा राजा भगदत्त याच्या परिवारात किरात व चिनी रहात असत. भगदत्तने अर्जुनाशी आठ दिवस युद्ध केले, अन् शेवटी आपला पराजय कबूल केला.

अर्जुन भगदत्तला म्हणाला, ''माझा अग्रज धर्मराज राजसूय यज्ञ करून साम्राज्य स्थापन करणार आहे. त्यासाठी विपुल धनराशीची गरज आहे. आम्हाला धन देअून रवाना करा. बाकी आम्हाला काहीही नको.'' भगदत्तने त्याला खूप धन देअून प्रणाम केला. अर्जुनाने खूपशा राजांना पराभूत करून त्यांच्याकडून धन वसूल केले. भेटवस्तु स्वीकारल्या. गन्धर्वांना जिंकल्यानन्तर अुत्तर कुरुदेशांमधील हरिवर्ष नावाच्या देशात प्रवेश केला. तो देश जिंकायची अर्जुनाची इच्छा होती, परन्तु तेथील द्वारपालक त्याला म्हणाले, ''हा देश जिंकणं तुम्हाला शक्य होणार नाही. तुम्ही परत जाणंच बरं होईल.''

भरदार शरीरयष्टी असलेल्या त्या महावीर वाटणाऱ्या द्वारपालकांनी अर्जुनाला आपल्या देशाबद्दल असे सांगितले :- ''या नगरात प्रवेश करणारांना इथे नजरेला काहीही दिसणार नाही. या नगरात मनुष्यरूपात प्रवेश करणं अशक्य आहे. तुला काय हवंय ते सांग. आम्ही देअू तुला ते.''

अर्जुनाने धर्मराजाच्या राजसूय यज्ञाची माहिती देअून त्यांच्याकडे धनाची मागणी केली. द्वारपालांनी ताबडतोब अगणित धन, रत्नं, हिरे, रंगीबेरंगी कांबळ्या, हरिणाजिने इत्यादि आणून अर्जुनाच्या स्वाधीन केले.

अशाप्रकारे अुत्तरविजय करून अर्जुनाने आणलेली सारी संपत्ती खजिन्यात जमा केली.

सैन्य घेअून पूर्वेला गेलेल्या भीमाला पांचालराजाचे सहाय्य व प्रशंसा प्राप्त झाली. मिथिलाधिपतीला त्याने युद्धात हरवले. दशार्ण राजा सुधन्व याच्याशी युद्ध करून त्याची प्रशंसा केली, व त्याला सेनापती नेमला. नंतर भीमाने रोचमान व त्याच्या बंधूंवर विजय मिळवला. पुलिन्द, सुकुमार व समित्र यांना हरवून तो चेदि देशात पोचला.

शिशुपाल हा चेदीचा राजा होता. धर्मराज साम्राज्य स्थापन करण्यासाठी यज्ञ करणार आहे, हे कळल्यावर तो फारच प्रसन्न झाला. त्याने भीमाला काही दिवस आपल्याकडेच राहवून घेतले अन् परत जाताना अनंत धनराशि त्याच्या स्वाधीन केली.

तेथून निघून भीम अनेक राजांना हरवत हरवत मगध देशात पोचला. तिथला राजा सहदेव याच्याकडून खूपसे धन घेअून त्याच्याच साह्याने पोंड्रकवासुदेव व इतर अनेकांवर विजय मिळवला. समुद्रतटावरील संपन्न माणसांशी युद्ध करून, त्यांच्याकडून सोने, चांदी, मोती, रत्ने, चन्दन, सुगंधी द्रव्ये, हिरेजवाहीर इ. घेअून भीम इन्द्रप्रस्थला परत आला.

दक्षिणेकडे गेलेल्या सहदेवने शूरसेन, मत्स्यदेश, निषाद इत्यादींवर विजय मिळवला. आपला मामा कुन्तिभोज याला



भेटून त्याच्याकडूनही अपार धन मिळवले. त्याने इतरही अनेक देशांवर विजय मिळवला. तो जेंव्हा महिष्मतीचा राजा नील याच्याशी युद्ध करू लागला, तेंव्हा त्याचे सैन्य जळून जाअू लागले.

याचे कारण असे की - महिष्मतीचा राजा नील याने अग्निकार्यासाठी एकदा आपल्या कन्येचा अुपयोग केला. अग्निदेव तिच्या सौन्दर्यावर मुग्ध होअून ब्राह्मणरूपाने तेथे आला. हे लक्षात आल्यावर नीलने त्याला शिक्षा दिली. नंतर अग्निदेव स्वतःच्या रूपात प्रकट झाला. नीलने अग्नीला साष्टांग नमस्कार केला व क्षमायाचना केली. नंतर त्याने आपल्या

कन्येचा शास्त्रोक्त पद्धतीने विवाह करून दिला. अग्निदेवाकडून नीलला असे वरदान मिळाले की त्याला किंवा त्याच्या नगराला शत्रूकडून कसलेही भय रहाणार नाही. तेंव्हापासून केंव्हा ही एखाद्या शत्रूने महिष्मतीवर आक्रमण केले, तर तो दग्ध होऊन जातो.

सहदेवाने कुशासनावर बसून होम केला व अग्नीची स्तुती केली. अग्नीने प्रसन्न होऊन नीलशी त्याचा परिचय करून दिला. नीलने सहदेवाला खूपसे धन दिले.

सहदेव नंतर दक्षिणेत गेला. कलिंग, ओंद्र, केरळ व आन्ध्रमधे आपले दूत पाठवून त्यांना त्याने आपल्या कब्जात घेतले. समुद्र तटावर असलेल्या बिभीषणाकडूनही त्याने खूपसे धन वसूल केले.

इन्द्रप्रस्थहून पश्चिमेकडे गेलेल्या नकुलने रोहितक देशचा राजा मयूर याच्यावर विजय मिळवला. तेथून निघून त्याने शैरीषक, महेन्ध हे देश ताब्यात घेतले. दशार्ण, शिबी, त्रिगर्त, अंबष्ठ, मालव येथील राजेही त्याच्याशी युद्धात हारले. इतरही अनेक राजांना जिंकत तो पुढे गेला व त्याने कृष्णाला आपल्या आगमनाची खबर कळवली. यानन्तर त्याने मद्रदेशात प्रवेश केला. शाकलपुरला पोचून त्याने आपला मामा शल्य याला आपला अग्रज धर्मराज़ करत असलेल्या यज्ञाची माहिती दिली. शल्य खूपच आनंदित झाला व त्याने नकुलला विस्तृत धनराशी व वाहने दिली.

समुद्रातल्या कित्येक राजांनाही नकुलने जिंकले. कृष्णाने ज्यांना अगोदर जिंकले होते, त्यांच्यावरही त्याने पुन्हा विजय मिळवला. मिळवलेल्या धनासह तोही इन्द्रप्रस्थला परतला.

चारही भावांनी गोळा केलेल्या धनामुळे धर्मराज वरूण व कुबेरापेक्षाही अधिक संपन्न बनला. या संपदेच्या आधारावरच त्याने राजसूय यज्ञ करायचा निर्णय घेतला. 'यज्ञ करायला हीच उत्तम वेळ आहे' असे म्हणून मंत्रीगणांनीही त्याला प्रोत्साहन दिले.



## झाडाचे लग्न झाडाशी !

हे शीर्षक मोठे विचित्र वाटेल तुम्हाला. झाडाचं कसलं लग्न? पण ही एक खरंचच घडलेली घटना आहे - केरळातील पालघाट जिल्ह्यातील मलक्कुलम येथे. ही घटना पूर्णतः जाणून घ्यायची असेल तर तेरा वर्षे मागे गेले पाहिजे. केलन नावाचा एक शेतकरी आणि वेलप्पन नावाचे एक शाळा-प्रमुख एकमेकांचे मित्र होते. दोघांनी गावाच्या सरहद्दीवर एक वडाचे व एक कडू लिंबाचे झाड लावले. दोघांनी या झाडांना आपला मुलगा-मुलगी मानलं. दोघे जण म्हणायचे - ही झाडे जेव्हा मोठी होतील तेव्हा आपण त्यांचे लग्न करू या. दोघे मिळून झाडांना पाणी घालत, त्यांना खत देत. तेरा वर्षे गेली. दुर्भाग्याने वेलप्पन स्वर्गवासी झाला. पण केलनने मोठ्या प्रेमाने दोन्ही झाडांचे पालन-पोषण केले. वडामधे शिवाचा अंश असतो नि कडू लिंबात परशुरामाची आई रेणुकादेवी हिचा अंश असतो, असा या भागातील लोकांचा विश्वास आहे. म्हणून या दोन झाडांबद्दल लोकांच्या मनात भक्ति-भावना असते. काही लोकांनी ही झाडे रस्त्यात अडथळा आणतात म्हणून कापून टाकण्याचा विचार केला, पण तसं घडलं नाही. या दोन झाडांचं लग्न लावायची योजना पक्की झाली. लग्नाच्या दिवशी दोन्ही झाडांना पुष्पमालांनी अलंकृत करण्यात आले. गावच्या पुजाऱ्याने त्यांची पूजा केली. वाजंत्री वाजवली गेली. आणि सोहळापूर्वक लिंबाच्या झाडाला सोन्याचे मंगळसूत्र बांधले गेले. लग्नातील भोजनात ४०० हून अधिक लोकांनी भाग घेतला. केलनने आपल्या मित्राला दिलेले वचन पूर्ण केले. हे दृश्य पाहून त्याच्या डोळ्यात आनंदाश्रू तरळले.

## सामान्य लोकांचे वाहन: सायकल

३०-४० वर्षापूर्वी सायकल गरीब लोकांचे वाहन मानली जात असे. मोटार वा मोटर-सायकलचा उपयोग श्रीमंत लोकच करू शकत असत. मध्यम वर्गातील काही लोक नंतर स्कूटर वापरू लागले. स्कूटर इटलीतून आली. नंतर छोट्या मोटर-गाड्या आल्या. त्यांचा उपयोग काही थोडे लोकच करू शकत. काही झालं तरी १९७० पासून सायकलींचा उपयोग वाढतच आहे. सन १९९४ मध्ये जगात ११०,०००,००० सायकलींची निर्मिती झाली. यापैकी ४९,००,०० सायकली चीन मध्ये तयार झाल्या. सायकलींच्या उत्पादनात आपल्या देशाचा नंबर दुसरा लागतो. अधिक संख्येने सायकलींचे उत्पादन होते, याचे एक कारण ही आहे. या वाहनाचा कोणाला ही सहज उपयोग करता येतो. सायकल चालविण्यासाठी कुठल्या ही इंधनाची जरूर नाही. यामुळे वातावरण दूषित होत नाही. पेट्रोलवर चालणारी वाहने काही विशेष ठिकाणी चालविता येत नाहीत. विश्वविद्यालयांच्या परिसरात व काही औद्योगिक क्षेत्रात मोटारी चालविण्यास बंदी आहे. ४०० शहरात पोलिस व पोस्ट-मन यांना सायकली देण्यात आल्या आहेत. आता राहिली आपल्या देशाची गोष्ट. पुणे, हैद्राबाद, दिल्ली इ. शहरात सायकलींचा खूपच मोठ्या प्रमाणावर उपयोग केला जातो.



# कदंब

विष्णूचं वाहन गरुड स्वर्गातून अमृताचा कलश आपल्या चोचीत धरून आणीत होता. रस्त्यात तो विश्रांतीसाठी एका कदंब वृक्षाखाली बसला. असे म्हणतात की गरुड जेव्हा आपली चोच कदंबाच्या बुंध्यावर घासवीत होता, तेव्हा थोडं अमृत त्या बुंध्याला लागलं. म्हणून कदंब वृक्ष ३०० वर्षे पर्यंत जगतो. आपल्या पुराणात कदंबाच्या दीर्घायुष्याचे हेच कारण सांगितले आहे.

सुगंध पसरवणारी कदंबाची फुलं बालकृष्णाला फार आवडत असत. श्रीकृष्ण वृंदावनात कदंब वृक्षाखालीच मुरली वाजवीत गोपिकांसह विहार करीत.

वसंत ऋतु सुरू होण्यापूर्वीच कदंबाला मोहर येतो. मजबूत देठावर एकदम चार-पाच फुले विकसित होतात. कदंबाची पाने गर्द हिरव्या रंगाची असतात.

कदंब वृक्ष विशेषतः समुद्र किनाऱ्यावर व हिमालयाच्या उतरणीवरील मैदानात आढळतात. संस्कृत, हिंदी, बंगाली, गुजराती, तेलगू व मराठीत या वृक्षाला कदंबच म्हणतात, कानडीत 'कदंबाला' मल्याळीत 'अन्तुटेक' आणि तमिळ मध्ये 'वेल्लै' म्हणतात.



कदंब वृक्षाबाबत आणखी एक कथा प्रचलित आहे. एका व्यापाऱ्याच्या घराच्या अंगणात कदंब वृक्ष होता. त्याला सात मुलगे होते. सर्वात धाकटा मुलगा नेहमी कदंबाखाली बसून बासरी वाजवीत असे. वडील व्यापारासाठी दूरच्या राज्यात गेले असता मोठ्या भावांनी या धाकट्यावर नाराज होऊन त्याला घराबाहेर काढले. बिचारा छोटा भाऊ आपली बासरी वाजवीत जंगलात गेला. वडील परत आल्यावर त्यांना जेव्हा ही वार्ता समजली तेव्हा त्यांना फार वाईट वाटले. हळू हळू त्यांची आर्थिक स्थिति ही खालावत चालली. व्यापाऱ्याच्या इष्टदेवाने स्वप्नात येऊन सांगितले - 'तुझा धाकटा मुलगा जेव्हा घरी परत येईल, तेव्हा तुझा भाग्योदय होईल!' वडिलांनी अनेक प्रयत्न करून आपल्या मुलाला शोधून परत घरी आणले. मग व्यापाऱ्याचा परिवार पुन्हा संपन्न झाला.

# सत्यकाम जाबाल

जंगलात एक नदी वहात होती. त्या नदीच्या पश्चिमेला गौतम ऋषींचा आश्रम होता. गौतम आपल्या आश्रमात राहून काही शिष्यांना निरनिराळ्या विद्या शिकवीत. दूर दूरच्या प्रदेशातून आलेले शिष्य गुरुकुलातच रहात.

शिष्य सूर्योदयापूर्वी उठत. स्नानादि उरकून सूर्याला नमस्कार करीत. नंतर गुरू बरोबर बसून एकाग्र चित्ताने वेद-मंत्रांचे पठण करीत.

नदीच्या पूर्व दिशेकडून एक छोटा मुलगा हे दृश्य पहात असे. त्याचं नाव सत्यकाम. तो आपली आई जाबाली बरोबर झोपडीत रहात असे. आई जंगलात जाऊन लाकडे तोडून आणी नि शहरात जाऊन ती विकून आपला उदर निर्वाह करी.

एकदा सकाळी सत्यकाम नदीत स्नान करीत असताना त्याने समोरच्या आश्रमातील अध्ययनात मग्न असलेल्या शिष्यांना पाहिले. घरी परत आल्यावर त्याने आईला विचारले - ''आई, या मुलांच्या बरोबर मी ही शिकावं अशी माझी इच्छा आहे. जाऊ मी आश्रमात शिकायला?''

जाबाली म्हणाली - ''जा आणि त्या ऋषींना विचार.'' सत्यकाम नदीतून पोहत दुसऱ्या किनाऱ्यावर पोचला. आश्रमात जाऊन त्याने मुनींना नमस्कार केला आणि



नम्रतापूर्वक म्हणाला - ''महाराज, मला आपला शिष्य बनवून काही विद्या शिकवाल?''

मुनीने प्रश्न केला - ''पुत्र, तुझं कुल-गोत्र सांगशील?''

सत्यकाम म्हणाला - ''मला आपलं गोत्र माहीत नाही मुनिवर!''

मुनीने पुन्हा प्रश्न विचारला - ''तुझ्या पित्याचं नाव काय?''

सत्यकामने उत्तर दिले - ''मला आपल्या पित्याचं नाव ही माहीत नाही. मी आपल्या आई बरोबर राहतो. वडिलांना मी कधी पाहिलंच नाही.''

''मग जा, आपल्या आईला विचारून ये कि तुझ्या पित्याचं नाव काय?'' मुनींनी सुचवलं.

सत्यकामने घरी येऊन आपल्या आईला विचारलं. थोडा वेळ चुप राहून जाबाली म्हणाली - ''बेटा, तुझा जन्म होण्यापूर्वी मी एका घरी काम करीत असे. मी जेव्हा काम करीत होते, तेव्हा माझ्याच सारखं काम करणाऱ्या एका पुरुषाशी मी लग्न केलं. लग्न झाल्यानंतर थोड्याच दिवसात एका अपघातात तुझे वडील मरण पावले. मग मी ते गाव सोडून इथे आले. तुझा जन्म इथेच झाला. मला तर आपल्या नवऱ्याचे नाव ही माहीत नाही.''

सत्यकाम पुन्हा मुनींच्या आश्रमात परत



आला आणि आईने सांगितलेले सर्व वृत्त त्याने मुनींना कथन केले. संपूर्ण कथा ऐकून मुनि गौतम हसत म्हणाले - ''जो नेहमी सत्य बोलतो तोच खरा ब्राह्मण होय. तू सगळं खरं खरं सांगितलंस, तू ब्राह्मणच आहेस!'' आणि त्यांनी सत्यकामला आशीर्वाद दिला.

सत्यकाम जाबालने मुनींच्या आश्रमात राहून सर्व विद्यांचे अध्ययन केले. तो गुरूचा पट्ट शिष्य बनला. नंतर तो स्वतः गुरु बनला आणि खूप कीर्ति संपादन केली.

वैदिक काळात ही कुलाचे निर्धारण जन्मावर नाही, गुणांवर ठरविले जात असे हे या सत्यकामच्या कथेवरून आपल्या लक्षात येते.

# तुम्हाला माहीत आहे का?

१. सोमालियाचं नाव प्रथम काय होतं?
२. इ.स.५० मध्ये आपल्या देशात ख्रिश्चन धर्माचा प्रचार कोणी केला?
३. इजिप्तची सुप्रसिद्ध राणी क्लिओपाट्रा इजिप्त देशाची नव्हती, तर कोणत्या देशाची होती?
४. आपल्या देशात प्रथम बॅडमिंटन खेळ खेळला जाई तेव्हा त्याचं एक दुसरं नाव होतं. ते कोणतं?
५. यहुद्यांच्या पवित्र ग्रंथाचं नाव कोणतं?
६. आपल्या देशात सर्वप्रथम स्थापित झालेल्या पोलो-क्लबचं नाव काय?
७. दुसऱ्या विश्व-युद्धाच्या प्रारंभी इटलीचा हुकुमशहा कोण होता?
८. खेळण्यात नैपुण्य मिळविणाऱ्या व्यक्तींना आपल्या देशात पुरस्कार दिला जातो. त्याचं नाव कोणतं?
९. पहिले ऑलिंपिक सामने केव्हा झाले? आधुनिक ऑलिंपिक स्पर्धा सर्वप्रथम कोठे झाल्या?
१०. आपल्या देशात विनाशाच्या मार्गावर असलेले सस्तन प्राणी कोणत्या भागात आहेत?
११. सर्व रंगांचे आधारभूत मूळ तीन रंग आहेत-ते कोणते?
१२. ज्यांना जनतेने मानव-संरक्षक म्हणून गौरविले तो प्रसिद्ध मोंगल सम्राट कोणता?
१३. पृथ्वीवरून गेलेल्या मनुष्याचा अंतरिक्षात सर्वप्रथम प्रवेश केव्हा झाला?
१४. सुप्रसिद्ध रशियन लेखक काउंट लिओ टॉल्स्टॉयच्या जन्म-स्थळाचे नाव काय?
१५. ४ जुलै १८२६ रोजी दोन अमेरिकी अध्यक्ष एकाच दिवशी मरण पावले ते कोणते?
१६. आपल्या देशात राज्यांचे पुनर्विभाजन केव्हा झाले?
१७. युरोपमधील सर्वात अधिक लांबीची नदी कोणती?
१८. रेल्वेचे डबे तयार करणारी 'इंटीग्रल कोच फॅक्टरी' कुठे आहे?

## उत्तरे

१. नैऋत्य आफ्रिका.
२. सेंट थॉमस.
३. मॅसिडोनिया (ग्रीस).
४. पुणे.
५. टोरा.
६. आसामचा काचर क्लब.
७. बेनिटो मुसोलिनी.
८. अर्जुन ॲवॉर्ड.
९. पहिले ऑलिंपिक सामने ७७६ मधे, आधुनिक ऑलिंपिक खेळ ॲथेन्स मधे सन १८९६ मधे.
१०. हिमालयीन प्रदेशात.
११. तांबडा, निळा, पिवळा.
१२. अकबर.
१३. १५ डिसेंबर, १९६५.
१४. यास्नाया पालियाना.
१५. जॉन ॲडॅम्स व थामस जाफर्सन.
१६. १९५६.
१७. वोल्गा नदी.
१८. मद्रास येथील पेरंबूर मधे.



# महावीरचा हट्ट

उत्पल देशाचा राजा होता कीर्तिचन्द. त्याची मुलगी पद्मावती दिसायला फार सुंदर होती. ती जेव्हा उपवर झाली, तेव्हां एक दिवशी अचानकपणे ती राजवाड्यातून अदृश्य झाली.

तेव्हा राजपुरोहिताने आपल्या दिव्य दृष्टीने सांगितले की, ''एक राक्षस तिला उचलून घेऊन गेला आहे. तो एका भयंकर जंगलात राहतो. आजपासून तीन महिन्यांनी तो तिच्याशी लग्न करणार आहे.''

हे सर्व ऐकून राजा निराश झाला. काय करावं हे त्याला समजेना.

तेव्हा मंत्री राजाला म्हणाला - ''प्रभू मला वाटतं आपण एक अशी घोषणा करूं या की जो कोणी राजकुमारीला राक्षसाच्या ताबडीतून सोडवील त्याचा विवाह राजकुमारीशी लावून दिला जाईल. पुढे जशी भगवंताची इच्छा!''

कीर्तिचंद्राला हा सल्ला पटला. त्याने ताबडतोब राज्यभर घोषणा केली - ''भयंकर अरण्यात राहणाऱ्या एका राक्षसाने राजकुमारी पद्मावतीचे अपहरण केले आहे. तीन महिन्यात राक्षसाच्या तावडीतून तिला जो सोडवून आणील, त्याच्याशी राजकुमारीचे लग्न करून देण्यात येईल.'' ही घोषणा ऐकून राज्यातील अनेक वीर युवक मोठ्या उत्साहाने अरण्याकडे निघाले.

तेथे उत्पल देशातील महावीर नावाचा एक युवक सर्वांआगोदर पोचला होता. जो कोणी तेथे जाईल त्याला तो आव्हान देई - ''असल्या बलाढ्य राक्षसाशी सामना करणं तुझ्यासारख्या सामान्य माणसाला थोडंच जमणार आहे? प्रथम माझा पराभव कर अन् मग जंगलात पाऊल ठेव.''

महावीरशी लढायला कोणी ही पुढे सरसावला नाही.

शशिकान्त सावळे



कीर्तिचंद्रला आपल्या गुप्तचरांकडून ही वार्ता समजली. महावीर बद्दल अधिक माहिती मिळविण्याचा त्याने प्रयत्न केला, तेव्हा त्याला कळले की महावीरचे वडील सैन्यात काम करीत असत व लढता लढता त्यांना मृत्यु आला. पित्याच्या मृत्यूनंतर महावीरने आपला देश सोडून दिला व तो अन्यत्र निघून गेला. तेथे त्याने अनेक विद्यांचे अध्ययन केले व महान् शक्तिशाली बनून परत आला. कीर्तिचन्द्र स्वत: महावीरच्या आईला भेटायला गेला. राजा आपल्या घरी आलेला पाहून ती घाबरली.

कीर्तिचन्द्र गंभीर स्वरात महावीरच्या आईला म्हणाला - ''तुझा मुलगा राजद्रोही आहे ! याचं कारण जाणून घेण्यासाठी मी तुझ्याकडे आलो आहे.''

''महाराज, आमचा वंश राजभक्तांचा वंश आहे. आम्ही राजद्रोहाची कल्पना सुद्धा करू शकत नाही. राजवंशासाठी आम्ही कधी प्राणांची ही पर्वा करीत नाही. आपण असा आरोप का करीत आहात हे माझ्या लक्षात येत नाही.'' महावीरच्या आईने आपल्या मनातील भाव स्पष्ट केला.

या उत्तराने राजाचे समाधान झाले नाही. तो म्हणाला - ''अरण्यात प्रवेश करणाऱ्या शूर-वीरांना तुझा मुलगा का अडवतो आहे बरं? माझ्या मुलीला राक्षसाच्या तडाक्यांतून सोडविण्यासाठी जे वीर जाताहेत, त्यांचे प्रयत्न हा का सफल होऊ देत नाही?''

आश्चर्य व्यक्त करीत महावीरची आई म्हणाली - ''महाराज, माझा मुलगा मोठा पराक्रमी आहे. त्याच्याशी सामना करणारा वीर या पृथ्वीतलावर दुसरा कोणी नाही. अनेक गुरूंकडून तो निरनिराळ्या विद्या शिकला आहे. राक्षसाला मारण्यासाठी तो माझा आशीर्वाद मागायला आला होता. आणि मी त्याला आशीर्वाद दिला ही. आपण जे काही म्हणत आहात ते ऐकून मला मोठं आश्चर्य वाटतंय!''

राजाला वाटलं - महावीरची आई खरंच बोलत आहे. तो राजधानीत परत आला आणि त्याने मंत्र्याशी सल्ला-मसलत केली.

अमळ विचार करून मंत्री म्हणाला - ''आजपर्यंत महावीरला कोणी जिंकू शकलेला नाही. आपल्या नावाप्रमाणे तो महावीर आहे. आपण एकदा त्याला प्रत्यक्ष भेटलो तर बरे होईल. आपण त्याला भेटू वेषांतर करून!''

राजा आणि मंत्री गरीब शेतकऱ्याच्या वेषात त्या अरण्याच्या प्रवेश-मार्गावर जाऊन बसले. महावीर खरोखरीच महावीर आहे हे त्यांनी आपल्या डोळ्यांनी पाहिले.

राजाने त्याला विचारले - ''तू इथे काय करतोस?''

''मी इथे राहून उत्पल देशाच्या वीरांची परीक्षा घेतो आहे!'' महावीरने उत्तर दिले.

राजाने पुन्हा प्रश्न केला - ''हे काम तर देशाच्या राजाचं आहे. राज्याच्या सेनापतीचं ते काम. उत्पलच्या शूर-वीरांची परीक्षा तू कशासाठी घेत बसला आहेस?''

महावीरने स्पष्ट करून सांगितले - ''या जंगलात एक राक्षस राहतो. तो मोठा बलाढ्य आहे. सामान्य वीर त्याला मारू शकणार नाहीत. त्याच्याशी सामना करायला जे गेले, त्यांना त्याने खाऊन टाकले. उत्पल देशच्या वीरांचे मी संरक्षण करतो आहे.''

''त्या राक्षसाला मारण्याची शक्ति एकाद्या वीरात असू ही शकेल ! प्रत्येक



वीराला राक्षसच खाऊन टाकील असं कसं म्हणता येईल?'' राजाने आणखी एक प्रश्न विचारला.

यावर हसत महावीर म्हणाला - ''यासाठी थोडं व्यवहार-ज्ञान पुरेसं आहे. जो माझा पराभव करू शकत नाही, तो त्या शक्तिशाली राक्षसाला काय मारणार?''

''ठीक आहे!'' राजा म्हणाला - ''मग त्या राक्षसाला मारू शकणारा कोणी वीर उत्पल राज्यात नाहीच?''

''का नाही? मी त्याला अवश्य ठार करू शकतो!'' महावीरने अभिमानाने सांगितले.

''तर मग उशीर कशाला? तूच जा नि त्या राक्षसाला मारून टाक. अन्य वीरांना



इथेंच अडवून ठेवण्याने तुला काय मिळणार आहे?'' राजाने विचारले.

''हे काम तर मी केव्हाच करून टाकलं असतं. पण आपल्या राज्याच्या राजामुळे मी हे काम करू शकत नाही.'' असं म्हणून महावीर आपली गोष्ट सांगू लागला.

महावीरचे वडील चंद्रसेन जेव्हा युद्धात मारले गेले, तेव्हा तो पाच वर्षांचा होता. त्याची आई रोज आपल्या नवऱ्याच्या पराक्रमाची प्रशंसा करीत म्हणे - ''युद्धात असा शक्तिशाली वीर एकाद्या अनाथासारखा मारला गेला - तू असा महाशक्तिशाली हो की तुला युद्धात मरण येऊ नये!''

आईच्या या बोलण्याचा महावीरवर फार परिणाम झाला. लहानपणीच त्याने युद्ध-विद्या शिकायला सुरुवात केली. सतराव्या वर्षी तो आपल्या आईला म्हणाला - ''आई, मी हिमालयात जाईन. तेथे काही ऋषि-मुनींची सेवा करून मंत्र-तंत्र शिकेन. मला तुझा आशीर्वाद हवाय.'' आईचा आशीर्वाद घेऊन तो घराबाहेर पडला.

हिमालयात महावीरची इच्छा पूर्ण झाली. तेथे एका मुनीने त्याला मंत्र-विद्या शिकवली. शेवटी मुनि त्याला म्हणाला - ''बेटा, या पृथ्वी-तलावरील कोणी ही शूर-वीर तुझा पराभव करू शकणार नाही. पण एकाद्या मानवातीत शक्तीशी पहिल्यांदा जेव्हा सामना करशील, तेव्हा आपल्या आईचा आशिर्वाद घेऊन जा. मग तुला कोणी ही जिंकू शकणार नाही.''

परत येताना महावीरला चोर-डाकूंच्या एका टोळीशी सामना करावा लागला. शेजारच्याच गावात चन्द्रिका नावाची एक सुंदर युवती रहात असे. डाकूंचा सरदार तिच्यावर फिदा झाला. चंद्रिका नि तिचे आई-वडील यांना चोर जबरदस्तीने घेऊन चालले होते. बरोबर एक ब्राह्मण ही होता. तो डाकूंच्या सरदाराशी चंद्रिकेचं लग्न लावून देणार होता. सगळे मिळून वीस डाकू होते. एकटा महावीर त्यांच्यावर तुटून पडला आणि त्यांना पळवून लावले.

तेव्हा चंद्रिकेचे वडील महावीरला म्हणाले - ''बेटा, लग्न करण्यासाठी जेव्हा आम्ही घराबाहेर पडलो, तेव्हांच आमची मुलगी परक्याची झाली. तिच लग्न केल्यावाचून आम्ही घरी जाऊ शकणार नाही. तसेच गेलो तर आम्ही कोणाला तोंड दाखवू शकणार नाही. आम्ही कन्या-दान करायला तयार आहोत. लग्न लावण्यासाठी ब्राह्मण तयार आहे. तू माझ्या चंद्रिकेचा स्वीकार करशील?''

चंद्रिकेचं ही आपल्यावर प्रेम आहे हे महावीरच्या लक्षात आले. त्याने तेथेच चंद्रिकेशी विवाह केला. दोघे ही उत्पल राज्याकडे निघाले. वाटेत त्यांना एक राक्षस दिसला. तो म्हणाला - ''वा! काय छान मुलगी आहे! मला ही खूप आवडली आहे. मी हिला जंगलातील आपल्या वाड्यात घेऊन जाणार. तुला शक्य असेल तर आडव मला.''

तेव्हा महावीरला मुनीचा इशारा आठवला. त्याने सांगितलं होतं - आईचा आशीर्वाद घेतल्याशिवाय मानवातीत शक्तीशी लढू नकोस. महावीर राक्षसाला म्हणाला - ''मी तुझ्याशी सामना करीन. पण त्यासाठी मला थोडा वेळ पाहिजे.''

विकट हास्य करीत राक्षस म्हणाला - ''एक दिवसात तुला परत आले पाहिजे. मी उद्याच नऊ मानव-कन्यकांशी विवाह करणार आहे. तोपर्यंत परत ये.'' असं म्हणून राक्षस जबरदस्तीने चंद्रिकेला उचलून घेऊन गेला.



महावीर उत्पल देशात पोचला. त्याला वाटलं - आईला लग्नाची गोष्ट सांगितली तर ती घाबरून जाईल. म्हणून त्याने आईला लग्नाबद्दल काहीच सांगितले नाही. राक्षसाशी सामना करण्यासाठी त्याने आईचा आशीर्वाद मागितला. याच वेळी त्याने राजाची घोषणा ऐकली नि अमळ संकटात पडला.

मंत्र्याने विचारले - ''यात संकट कसलं? राजकुमारीशी लग्न करायला तुला काय हरकत आहे?''

''राजाच्या घोषणेनुसार जो वीर राजकुमारीला मुक्त करील त्याचं राजकुमारीशी लग्न होईल. माझं तर लग्न झालेलं आहे. शिवाय मी एकपत्नीव्रती आहे.'' महावीरने खुलासा केला.

महावीरच्या निष्कपटतेचे राजाला मोठे आश्चर्य वाटले. तो म्हणाला - ''एवढ्याशा गोष्टीसाठी इतका हट्ट कशाला? तुझी अडचण तू राजाला का नाही सांगितलीस?''

''मी तसं केलं असतं तर काय झालं असतं कोणास ठाऊक? शिवाय हे ही जाणण्याची माझी इच्छा होती की राजकुमारीला मुक्त करणारा एकादा वीर या देशात आहे की नाही?'' महावीरने आपली शंका प्रकट केली.

राजा महावीरच्या नम्रतेवर खुश झाला आणि त्याने सांगून टाकले - मीच राजा आहे. नंतर राजाने आपली घोषणा बदलली. त्याने जाहिर केले की राजकुमारीला मुक्त करणाराने तिच्याशी लग्न केलेच पाहिजे असे नाही. हे काम करणाराने तिच्याशी लग्न केलेच पाहिजे असे नाही. हे काम करणारा जो मागेल तो पुरस्कार त्याला दिला जाईल.

काही दिवसातच महावीरने राक्षसाला सहज सहज मारून टाकले. आपल्या पत्नीला आणि राजकुमारीला मुक्त केले. त्याने राजकुमारी पद्मावतीला राजाच्या स्वाधीन केले. राजा कीर्तिचन्द्र महावीरच्या शौर्यावर खुश झाला आणि त्याने त्याची आपल्या सैन्यात अधिकारी म्हणून नेमणूक केली.





# रमानाथची अक्कलहुशारी

चंचलपुरजवळ हिऱ्यांची खाण आहे, असे जाहीर झाले आणि लांब लांब अंतरावरून रत्नपारखी तेथे येऊन पोचले. खाणीत काम करण्यासाठी बरेचसे मजूर आणि हिऱ्यांना पैलू पाडण्यात तरबेज अशी माणसंही येऊन सर्वांनी गावात एकच गर्दी केली. रहाण्यासाठी गावात घरे मिळणे मुश्किल झाले.

अशातच रमानाथ तेथे पोचला. घर शोधता शोधता त्याचे जोडे झिजले. शेवटी कुठेसे एक घर असल्याचा त्याला पत्ता लागला. घरमालकाची अट अशी होती की महिना भाडं पाचशे रुपये द्यावे अन् वर्षअखेर घर खाली करावे.

रमानाथ मालकाला म्हणाला, ''गावातल्या माझ्या दोन घरांपैकी एक मीही भाड्यानं देतो, पण तुमच्यासारख्या माझ्या काही अटी वगैरे नसतात. इथे तर हा सरळसरळ अन्याय आहे. आता असं सांगा की, वर्षअखेर मी घर रिकामं केलं नाही, तर तुम्ही काय कराल?''

''यात कसला अन्याय? मला आपल्या घराची कधी गरज पडेल हे काही सांगता येत नाही. मी मोठ्या परिवारातला माणूस आहे. शहरात लहानसा व्यापार करणारा माझा जावई सहकुटुंब इथे येऊन राहू इच्छितोय, अशी बातमी कळलीय मला. म्हणून मी जर आधीपासून सावध न राहिलो, तर नंतर त्रास नाही का होणार? आता आपण एक कागद करू या. करारानुसार घर खाली केलं नाहीत, तर तुम्हाला दरमहा दोन हजार रुपये द्यावे लागतील असं लिहिणार आहे मी त्यात.'' घरमालक गुरुनाथ उत्तरादाखल बोलला.

रमानाथ काहीसा नाराज होत म्हणाला, ''तुमच्या बोलण्यावरून असं वाटतंय, की तुमचा जावई एका वर्षाच्या आत इथे येण्याची शक्यता नाही; कारण तशी असती, तर मला

सुदाम पवार



हे घर भाड्यानं द्यायला तयार झालाच नसता तुम्ही. बरोबर नं? वर्ष संपल्या नंतर ही तो न आला, तर पुन्हा घर मलाच देणार तुम्ही. हेही बरोबर नं?''

''हो तर ! अगदी आनन्दानं देईन. तुम्हाला सोडून दुसऱ्या कोणाला का देऊ? तेंव्हा पुन्हा दुसरा करारनामा करू. कबूल?'' गुरुनाथने विचारले. नंतर दोघांनी त्याप्रमाणे करारनामा लिहिला.

रमानाथ सहकुटुंब त्या घरात राहू लागला. अकरा महिने आनंदात निघून गेले.

गुरुनाथ एक दिवशी रमानाथला म्हणाला, ''तुम्ही दर महिन्याच्या एका ठराविक तारखेला न चुकता भाडं देता. मी खूश आहे तुमच्यावर!''

''इतकं चांगलं घर रहायला मिळाल्याचा मलाही संतोष आहे. आता तर असं वाटतंय की आपलं गाव विसरून इथंच कायम रहावं.'' रमानाथही खुशीने बोलला.

त्याचे हे बोलणे ऐकून गुरुनाथ सावध झाला. अन् घाबरून म्हणाला, ''काय म्हणालात? आपला करार विसरलात की काय?''

''नाही नाही. तुमच्या अटी अगदी चांगल्या लक्षात आहेत माझ्या. का? तुम्हाला घराची गरज पडली की काय? जावयाचं यायचं ठरलं इकडे?'' रमानाथने विचारले.

''तसं नव्हे. पण पुढल्या महिन्यापासून घरभाडं सहाशे होईल. कबूल असेल तर करूया कागद. नाहीतर घर खाली करावं लागणार तुम्हाला.'' गुरुनाथ स्पष्ट म्हणाला.

गुरुनाथचे हे बोलणे ऐकून रमानाथवर जणू वज्रपात झाला ! जरा वेळ तो स्तब्ध राहिला अन् स्वतःला सावरत म्हणाला ''हा तर मोठाच अन्याय झाला की ! एका वर्षात शंभरची वाढ? पंचवीस वाढवा हवे तर! म्हणजे जगात थोडातरी न्याय जिवन्त आहे असं जाणवेल. तुम्ही माझं ऐकलं नाही, तर भाडं कमी करण्यासाठी मलाही काय करायचंय ते करीन मी.''

त्याच्या बोलण्यावर रागावून गुरुनाथ म्हणाला, ''मला सांगायचं, ते सांगितलं मी. पुढे तुमची मर्जी.'' अन् ताबडतोब तो तेथून निघून गेला.

रमानाथची बायको इतका वेळ दोघांचे बोलणे ऐकत होती. ती नवऱ्याला म्हणाली, ''उगाच तक्रार कशाला? तशी तर गावात भाड्याची घरं कमीच आहेत. भाडं कमी करणं जमणार नाही तुम्हाला. मुकाट्यानं कागद करून टाका ना!''

आता काय करावं याबाबत रमानाथ विचार करू लागला. आपण लिहून दिलेले करारपत्र त्याने पुन्हा एकदा नीट वाचले. त्याला वाटले आपण एकाद्या चांगल्या वकीलाचा सल्ला घ्यावा. म्हणून तो एका वकीलाकडे गेला. वकीलाने करारपत्र वाचून सल्ला दिला - ''जर करारपत्रातल्या अटींचे पालन तुम्हाला करता येणे शक्य नसेल, तर तुम्ही दुसरे एकादे घर पहा नि हे सोडून द्या.''

रमानाथ ने घर तर रिकामं केलं नाहीच. पण उलट एक महिना अधिकच राहिला तेथे. त्या ज्यादा एक महिन्याचे दोन हजार रुपये दिले त्याने; अन् नंतरच करारपत्र लिहून दरमहिना सहाशे रुपये भाडे देऊ लागला.

''हे करारपत्र महिनाभर अगोदर लिहून दिलं असतंत तर दोन हजार द्यावे लागले नसते ना? अनावश्यकच चौदाशे रुपये जास्त गेले आपले.'' रमानाथची बायको हळहळत म्हणाली.

यावर जोरजोरात हसत रमानाथ म्हणाला, ''वेडी रे वेडी! अग माझी चलाखी नाही लक्षात आली तुझ्या. अगोदर लिहिलं असतं तर असा अर्थ झाला असता की दरमहिना भाड्यात शंभर रुपये वाढ! मी तर त्याची अट एक महिन्यानंतर मानली. म्हणजेच गुरुनाथच्या प्राप्तीत चौदाशेचा तोटा झाला ! त्यालाच याचं आता वाईट वाटत राहील. आतल्या आत जळत राहील तो! मी समजून-उमजूनच तसं केलंय!''

नवऱ्याच्या या अक्कलहुशारीवर हसावं की रडावं हेच कळेना त्याच्या बायकोला !





# अुतावळेपण आणि सावकाशी

गंधार आपले प्रत्येक काम सफलतापूर्वक करी. परन्तु त्याचा शेजारी रमानाथ याच्या कामात मात्र काही ना काही चूक होईच; त्यामुळे तो बिचारा नेहमी निराश असे.

एकदा एक साधू त्या गावात आला. लोकांना काही चमत्कार दाखवून त्याने बऱ्यापैकी नाव मिळवले. किस्येक गावकऱ्यांनी साधूला काही अुपहार देअून त्याच्याकडून आपल्या अडचणी सोडवून घेतल्या.

गंधार म्हणाला, ''हा साधु आपल्या गावकऱ्यांना फसवत आहे. हा जर खराखुरा साधु असेल, तर त्याला या अुपहारांची काय गरज?''

यावर त्याचे मित्र विचारू लागले, ''साधु फसवतो आहे, असं तू सिद्ध करून दाखवू शकशील?''

गंधार अुत्तरला, ''होऽ ! दाखवीन की!''

पण त्याच दिवशी रात्री रमानाथ साधूकडे गेला. गावाच्या शेवटच्या कोपऱ्याशी असलेल्या एका टेकडीच्या गुहेत साधु रहात असे. रमानाथ तिथे पोचला, तेंव्हा साधू झोपलेला होता. त्याच्या असे लक्षात आले की, या साधूची दाढ़ी तर नकली आहे! त्याने ती दाढ़ी ओढली, तर ती पटकन् त्याच्या हातात आली. साधु यामुळे जागा होता होता रमानाथ पळून गेला.

दुसऱ्या दिवशी साधु गावकऱ्यांशी काही बोलत असताना रमानाथ तिथे जाअून ओरडू लागला, ''अरे, या साधूवर कोणी विश्वास नका ठेवू. याची दाढी नकली आहे. काल रात्री मी ती अुपटून आणली.''

''नीट बघ निरखून साधूमहाराजांकडे. यांची दाढी अन् मिशासुद्धा शाबूत आहेत !'' गावकरी रमानाथला म्हणाले.

रमानाथने साधूकडे नीट पाहिले, तर खरोखरच त्याच्या दाढीमिशा जागच्याजागी होत्या ! तो साधूला म्हणाला, ''काल रात्री मी ओळखलं की तुझ्या दाढीमिश्या नकली आहेत. तू झोपेत असतानाच मी एकदम तुझी दाढी ओढली. मी नीट ठेवलीय ती ! तू पुन्हा नवी खोटी दाढी लावून आलायस.'' अन् त्याने आपला हात पुढे केला.

पण साधूने त्याला पटकन मागे ढकलून म्हटले, ''अरे जारे! अज्ञानी आहेस तू; म्हणून तुझी ही चूक मी माफ करीन. पण परमेश्वर तुला मुळीच क्षमा करणार नाही. तुझ्या हातून काही चूक घडू नये, म्हणून मागं ढकललं. काही वाईट विचारानं प्रेरित होअून कोणी माझ्या दाढीला हात घातला, तर परमेश्वर त्याला शाप देईल; सर्वनाश होईल त्याचा! तू ज्या दाढीबद्दल बोलतो आहेस, ती दाखव बरं काढून तुझ्या पिशवीतून !''

रमानाथने पिशवीत हात घातला, तर काहीच हाती लागले नाही त्याच्या! तो एकदम ओरडला, ''धोका! दगा ! या ढोंग्यानं जादूटोणा करून नाहीशी केली ती !''

त्याच्या बोलण्यावर कोणाचाच विश्वास बसेना. रमानाथ बिचारा मान खाली घालून तेथून निघून गेला. वाटेत त्याला गंधार भेटला. रमानाथचा अुदास चेहरा पाहून त्याने विचारले, ''अरे झालं तरी काय? अुदास का तू असा?'' रमानाथने घडलेली



सारी हकिकत त्याला सविस्तर सांगितली.

''हं! साधु धोकेबाज आहे, यात तर काही शंकाच नाही! तो जादुगार असल्यामुळे वाचला. पण आता माझ्या तावडीतून सुटणं अशक्य होईल त्याला !'' गंधार बोलला.

रमानाथने कुतुहलाने विचारले, ''तू काय करणार आहेस आता?''

''मला त्याच्याबद्दल बरंच काही समजलेलं आहे.त्याचं खरं नाव आहे पद्माकर अन् तो इन्द्रपुरचा आहे. तो कधी साधु बनतो, तर कधी आणखी काही. त्याला आत्ता इन्द्रपुरला नेलं, तर सगळं खरं अुघडकीस येईल. तिथं त्याची बायको अन् तीन मुलं आहेत. लोकांना फसवून कमाई

कमलाकर कुलकर्णी



करतो हा; अन् त्यातून त्याच्या कुटुंबाचा तिथं आरामात अुदरनिर्वाह चालतो.''

रमानाथने मोठ्या आश्चर्याने विचारले, ''तुला कसं कळलं हे सगळं?''

गंधार अुत्तरला, ''कोणत्याही कामात अुतावळेपणा करू नये बघ! शान्तपणे नीट विचार करून सावकाशीनं नीट सगळं समजून घ्यावं; म्हणजे मग एकादी अडचण सोडवायला त्रास होत नाही.''

अुत्साहाने रमानाथ म्हणाला, ''तर मग चल असाच! आत्ताच भोपळा फोडू त्याचा?''

पण गंधार थंडपणे म्हणाला, ''रमानाथ, अुतावळेपणानं असं काही करणं बरं नव्हे. गावकरी त्याला खूप पिटून काढतील अन् तो आपला कट्टर शत्रु बनेल. आपला सूड अुगवायचा प्रयत्न करील पुढे तो. त्याचं काय? तो आपलं गाव सोडून दुसरीकडे कुठेतरी जाईल अन् तिथंही हाच धंदा करील. कुणालाच त्यानं फसवू शकू नये अन् त्याबरोबर त्यालाच सुधारून चांगला माणूस बनवायचा आपल्याला प्रयत्न करायला हवा. त्याचं स्वभावपरिवर्तन घडवायला हवं! तेंव्हाच आपलं ध्येय साध्य होईल.''

दुसऱ्या दिवशी गंधारने साधूची एकान्तात भेट घेतली अन् त्याच्याबद्दल स्वत:ला कळलेली सारी हकिकत सांगितली. साधु आता मात्र चांगलाच घाबरला ! गंधार म्हणाला, ''हे पहा, भिऊ नकोस असा! मी तुझ्या बाबतीत कुणालाच काही सांगणार नाही. तू या गावकऱ्यांकडून ज्या भेटी वसूल केल्या आहेस, त्या सगळ्या त्यांना परत करून म्हण की, मी फक्त तुमची परीक्षा घेतली, मला काय करायचंय या सगळ्याचं?'' - अन् मग इन्द्रपुरला परत जा. यापुढे सन्मार्गानं चालून आपलं जीवन सुखानं जग.''

साधूने गंधारचे म्हणणे मान्य केले. गावकऱ्यांच्या भेटी त्याने परत केल्या. त्यांनी साधूला मोठ्या आदराने निरोप दिला अन् तो आपल्या गावी परत गेला.

हे सर्व पाहून रमानाथला फार वाईट वाटले. त्याने तर खरे तेच सांगितले होते, पण त्याचा काय अुपयोग झाला? त्याचे बोलणे कोणी ऐकून न घेता अुलट त्याची चेष्टाच केली. गंधारने खरी गोष्ट लपवून गावाचे हित साधले; साधुचे स्वभावपरिवर्तन घडवण्यात तो सफल झाला. त्याच्या या कर्तृत्वामागे होती त्याची समजून-अुमजून काम करण्याची शैली. आता रमानाथनेही हीच पद्धत अवलंबायचे ठरवले. ती योग्य असल्याचे शाबीत करायची संधीही लवकरच त्याच्याकडे चालून आली.





रमानाथची आई गौरी ही दररोज नदीवर जाअून घडाभर प्यायचे पाणी आणत असे. त्या दिवशी पाणी आणताना तिचा पाय घसरला अन् सारे पाणी सांडून गेले. शेजारच्या गंगारामला सांगून त्याच्याकडून घडाभर पाणी आणवायचं काम तिने रमानाथला सांगितले. रमानाथ त्यासाठी गंगारामकडे जायला निघाला; इतक्यात समोरून रिकामे घडे घेऊन येत असलेला गंगाराम त्याला दिसला. तो खूप खुशीत दिसत होता. रमानाथ त्याच्याशी काही बोलण्यापूर्वीच तो तेथून पुढे निघून गेला.

रमानाथ त्याच्या मागेमागे जाअू लागला. थोडे पुढे गेल्यावर गंगाराम एका झोंपडीत घुसला. रमानाथला आत जायचे होते, पण तोवर दरवाजा बन्द झालेला होता. मग तो फटीतून आत पाहू लागला.

काय आश्चर्य! जे घडे रमानाथला रिकामे वाटले होते, ते रिकामे नव्हते! ते अर्धेअर्धे तेलाने भरलेले होते. गंगारामने एका डब्यातला कसलासा द्रव पदार्थ ओतून ते घडे पूर्ण भरले. अन् पुन्हा ते अुचलून तो बाहेर आला. रमानाथ पुन्हा लपून छपून त्याच्या मागे चालू लागला. त्याला असे दिसले की तो पूर्णचन्द्र सावकाराच्या घरात घुसत आहे. आता रमानाथला कळून चुकले की सावकार गंगाराम करवी तेलात भेसळ करायचे काम करतो आहे.

रमानाथ लगेच गंधारला भेटायला गेला अन् पाहिलेले सर्व त्याने गंधारला सांगितले. तो पुढे म्हणाला, ''आता मी सावध राहीन. नीट बुद्धीचा अुपयोग करून तेलात काय



मिसळलं जात आहे, त्याचा शोध घेईन. त्याची खरेदी कुठे केली जाते, ते पाहीन. सर्व माहिती व्यवस्थित गोळा झाली की सावकाराचं कारस्थान उघड करीन.''

हे ऐकताच गंधार तेथून पळत सुटला. गावच्या लोकांना एकत्र आणून त्याने सावकार करत असलेल्या भेसळ-तेलाची वार्ता त्यांना सांगितली. सावकाराने आपणावरचा आरोप नाकारला, पण गंधार जेंव्हा झोपडीतून भेसळ केल्या जाणाऱ्या पदार्थाचा डबाच बाहेर घेऊन आला, तेंव्हा खरी गोष्ट काय व ती का घडली हे सावकारालाही कळेना ! त्याने सर्वांसमक्ष गंगारामला जाब विचारला.

आता गोष्ट सरळ स्पष्ट झाली की सावकाराच्या बायकोला सणासुदीसाठी चांगली साडी हवी होती. सावकाराने तिला नकार दिल्यामुळे तिने गंगारामला लालूच दाखवून तेलात भेसळ करून साडीसाठी परस्परच पैसे जमवायचे ठरवले. पण दुर्भाग्याने तेलविक्री सुरू होण्यापूर्वीच ते कारस्थान उघडे पडले.

गावकऱ्यांनी गंधारच्या अक्कलहुशारीची तारीफ केली अन् सावकाराला टोमणे मारले.

रमानाथ आता पुन्हा एकदा नाराज झाला. गंधारच्या घरी जाऊन त्याने त्याला कटु स्वरात विचारले, ''तू तर म्हणत होतास की शांतपणे, सावकाशीनं कामं करावीत. पण मला कळलेली माहिती तूच माझ्या आधी जाऊन सर्वांना सांगितलीस. अन् लोकांकडून स्तुति करून घेतलीस. शोभतं का तुला हे ?''

''यात स्तुति करून घेण्याचा अन् शोभण्याचा काय प्रश्न? गंगारामचं रहस्य तू उघडून दाखवलं, हे मी लोकांना सांगितलंच ना?'' गंधार म्हणाला.

''पण सर्व गावकऱ्यांना एकत्र करून तूच त्यांना सावध केलंस ना? यात तारीफ तुझीच झाली, नाव तुझंच झालं! मी ते केलं असतं तर माझी प्रशंसा नसती झाली?'' रमानाथने आपले दुःख प्रकट केले.

गंधार हळूच म्हणाला, ''मग तूच का नाही गावकऱ्यांना सावध केलंस?''

''शहाणाच आहेस की? तूच तर म्हणत होतास नं, की मी शांत रहावं, नीट समजून - उमजून सावकाशीनं काम करावं?'' रमानाथने जाब विचारला.

आता गंधार हसत म्हणाला, ''होय, ही गोष्ट खरीच; पण ही शांत रहायची वेळ नव्हती. भेसळ तेल वापरून किती लोकांचे प्राण धोक्यात आले असते कोणास ठाऊक? या दुर्घटनेपासून लोकांना वाचवणं, हे कर्तव्य नव्हे का माझं? म्हणूनच तुझ्याकडून गोष्ट कळल्याबरोबर धावलो मी, अन् धोका टळला. बरोबर आहे की नाही बोल!''

रमानाथ म्हणाला, ''पण साधूच्या विषयात तर तू मला संयमपूर्वक वागण्याचा सल्ला दिला होतास.''

''होय, तेंव्हा आपल्याला शान्त अन् संयमानं रहाणं आवश्यक होतं. साधूला शिक्षा करणं आवश्यक नव्हतं. पण आत्ताची गोष्ट वेगळी आहे. ताबडतोब सगळं उघड करणं जरूरीचं होतं. सावकाराच्या कारस्थानाचा भोपळा ताबडतोब फोडणंच जरूरीचं आहे, असं वाटलं मला!''

रमानाथने आता दीन स्वरात विचारलं की, ''केंव्हा शांत रहाणं आवश्यक आहे, अन् केंव्हा धावपळ करणं गरजेचं आहे, हे कसं ओळखायचं?''

''म्हणजे विवेक कसा बाळगायचा हेच विचारायचंय नं तुला? तू स्वतःच्या बाबतीत विचार करायचं सोडून इतरांच्या बाबत विचार करायला लाग. जे काम करशील, त्यात इतरांचं हित होतंय की नाही याचा विचार कर. स्वतःचा विचार करणं हा स्वार्थ होतो. पवित्र मनानं जो दुसऱ्याच्या हिताचा विचार करतो, त्याला विवेक आपसुकच येतो. कोणत्याही गोष्टीचं विचक्षण तो आपोआप करू लागतो.''

रमानाथला आता कुठे स्वतःची चूक समजून चुकली. शरमेने त्याने मान खाली घातली. यानंतर प्रत्येक काम तो गंधारचा सल्ला नजरेसमोर ठेवून करू लागला अन् त्यात सफल होऊ लागला.



# मकररास

एका मोठ्या जमीनदाराच्या दरबारात नागभद्र नावाचा एक दिवाण होता. त्याला संपत्तीचा फार लोभ असे. जमीनदाराचा त्याच्यावर अत्यंत विश्वास होता. या विश्वासाच्या आधारवरच तो केवळ शेतकऱ्यांकडूनच नव्हे, तर कचेरीतील कारकून मंडळींकडूनही भेटी-दाखल निरनिराळ्या वस्तु मिळवीत असे. कधी कधी तर त्याला सोन्याचे दागिने सुद्धा भेट म्हणून मिळत.

नागभद्रचा जन्म झाला होता कर्क राशीत. म्हणून त्याच्या वाढदिवशी कर्मचाऱ्यांनी त्याला एक सोन्याचा खेकडा भेटीदाखल बहाल केला.

नागभद्रने मोठ्या खुशीने खेकडा सर्व बाजूंनी पाहिला आणि येणारांची प्रशंसा करीत म्हणाला - ''माझी जन्म-रास कर्क ! या राशीत जन्माला येणारांना सर्वांचे प्रेम मिळते. याचे प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे मी स्वत:! या राशीचं हेच महत्त्व आहे. बरं झालं, आता मला आठवण झाली तुम्हा सर्वांना आताच सांगून ठेवतो पुढच्या महिन्यात माझ्या बायकोचा वाढदिवस आहे. आणि तिची रास आहे मकर ! मकर म्हणजे मगर हे तुम्हा सर्वांना माहीतच असेल.''

जमीनदाराने नागभद्राचे सर्व बोलणे ऐकले. तो त्याला म्हणाला - ''दिवाणजी, येत्या पौर्णिमेला माझा जन्म-दिन आहे. लक्षात ठेवा हं. माझी रास आहे सिंह ! मला भेट-वस्तु देताना हे चांगलं लक्षात ठेवायचं बरं का !''






## १०

(एकूण साऱ्या समुद्रप्रवासात रूपधरला अनेक संकटांना तोंड द्यावे लागले. नावा व आपल्या साथीदारांनाही तो मुकला. पण पैयासियाच्या तटावर पोचल्यानन्तर मात्र त्याला महाराजा बुद्धिमानकडून आश्रय व अभय प्राप्त झाले. त्याच्या सन्मानार्थ राजाने निरनिराळ्या क्रीडांच्या स्पर्धा आयोजित केल्या. नंतर जी मेजवानी दिली गेली, त्यावेळी आंधळ्या गायकाने 'लाकडी घोड्या'ची कथा मोठ्या रोचक पद्धतीने प्रस्तुत केली. ती ऐकता ऐकता रूपधरच्या डोळ्यातून आपोआपच अश्रुधारा झरू लागल्या. त्याची ही विचित्र अवस्था पाहून महाराजाने ''तू कोण आहेस? कोठल्या देशचा रहिवासी आहेस?'' इ. चौकशा सुरू केल्या.)- यानंतर

रूपधरने महाराजा बुद्धिमान याला आपली सर्व हकिकत सांगितली. त्याची कहाणी ऐकून स्वत: महाराज व अन्य सर्व श्रोतेही आश्चर्यचकित झाले.

महाराजा सर्व अुपस्थितांना अुद्देशून म्हणाला, ''आपण सर्वजण मिळून याला काही भेटी देऊ या.''

दुसऱ्या दिवशी सकाळीच साऱ्या भेटवस्तु बंदरावर पोचत्या झाल्या. बुद्धिमानने स्वत: लक्ष घालून त्या सर्व वस्तु नौकेत व्यवस्थित लावून ठेवल्या. त्या दिवशीही राजभवनात रूपधरच्या सन्मानार्थ मोठी मेजवानी झडली.

भोजन संपल्यावर सर्व अुपस्थितांना अुद्देशून रूपधर म्हणाला, ''महाजनहो ! इतक्या मोठ्या कालावधीनन्तर माझी तीव्र इच्छा आता पूर्ण होणार आहे. मी मायदेशी परत जातो आहे. आपण सर्वांनी माझा खूप आदरसत्कार केलात, मला सर्व प्रकारची

ग्रीक पौराणिक कथा



मदत देऊ केलीत, मी हे सर्व आपल्या आयुष्यभर कधी विसरू शकणार नाही.'' त्याच्या या बोलण्याने सर्वजण फार हर्षित झाले. रूपधरने राणीचा निरोप घेतला. आपल्या दासीकरवी तिने त्याच्यासाठी भरपूर रोट्या व लाल द्राक्षांचा रस बोटीवर पाठवला.

नाव चालवणाऱ्या नावाड्यांनी रूपधरसाठी नावेत बिछान्याची व्यवस्था केली. रूपधर त्यावर आडवा झाला. त्याला लगेच झोप लागली. आता लवकरच आपण आपल्या देशात पोचणार व आपले कष्टमय दिवस संपले आहेत या विचाराने त्याचे मन आनन्दाने भरून गेले होते. नाव वायुवेगाने जात राहिली.

इथाकाच्या किनाऱ्यावर एक गुहा होती. या गुहेत मधमाशांची पोळी होती. गुहेबाहेर अुंच अुंच दगडी खांब होते. असे मानले जाई की, देवकन्यांचा तेथे संचार असतो. माणसेही गुहेत जाअू येअू शकत.

नौका किनाऱ्यावर पोचताच नावाड्यांनी किनाऱ्यावर अुड्या मारल्या. गाढ झोपेत असलेल्या रूपधरची झोप मोडणे त्यांना योग्य वाटले नाही. त्यामुळे त्यांनी रूपधरला बिछान्यासकट अुचलून आणून किनाऱ्यावरील रेतीवर ठेवले. नंतर बाकी सर्व सामग्री अुतरवून त्याच्याजवळच व्यवस्थित रचून ठेवून ते आपल्या देशाकडे निघून गेले.

झोपेतून जागा झाल्यावर रूपधरने चहूकडे आपली नजर फिरवली. दाट धुक्यामुळे आपण कोठे आहोत, हेच त्याला कळेना. समोरील बंदर व डोंगर तो ओळखू शकला नाही. दु:खाचा स्वर काढत तो बोलला, ''बापरे ! पुन्हा कुठे येअून पडलो मी? इथे कसले लोक रहातात कुणास ठाअूक! बुद्धिमान महाराजांनी मला पूर्ण मदत नाही केली. दुसरीकडेच कुठेतरी आणून सोडलं !''

रूपधरने सर्व वस्तु मोजून पाहिल्या. सर्वच्या सर्व तिथे होत्या. आपल्या देशाबद्दल विचार करत तो इकडे तिकडे फिरू लागला. इतक्यात तेथे एक गुराखी आला. त्याच्या जवळ जाअून रूपधर विचारू लागला, ''अगदी देवासारखा भेटलास बघ! हा कोणता देश आहे, सांग बरं! इथे कोणत्या प्रकारचे लोक रहातात? हे एकादे बेट आहे की एकाद्या देशाचा किनारा?''

तरूण गुराखी अुत्तरला, ''महाशय, मला वाटतंय की आपलं ज्ञान अगदी तुटपुंजं आहे. तुम्ही एकाद्या दूरच्या देशचे नागरिक तर नव्हेत? कारण आमचा हा देश चांगलाच प्रख्यात आहे. इथाका देशाबद्दल तर ट्रोजन लोकही खूप जाणतात.''

रूपधर तसा मोठा चतुर होता. 'आपण इथाका देशात पोचलो आहोत' हे ओळखून मनातून तो खूपच खूश झाला. पण आनन्द चेहऱ्यावर न दाखवता तो म्हणाला, ''हां, हां! क्रीट बेटांवर ही मी या देशाबद्दल बरंच काही ऐकलं होतं. मी तिथे एका दुष्ट माणसाला मारलं; म्हणून मला तिथून पळून यावं लागलं.''

तो हे बोलत असतानाच गुराखी अदृश्य झाला अन् त्याच्या जागी देवी बुद्धिमती प्रकट झाली. ती हसत म्हणाली, ''तुझ्या सारखा चतुर माणूस मी कुठेच पाहिला नाही. स्वरचित गोष्टी सांगणं, म्हणजे तुला हातचा मळच. स्वदेशी परतलास; पण तुझी ही सवय काही सुटली नाही. मीही थोडीफार हुशार आहे हं ! माझ्याजवळ



तुझ्या गमजा नाही चालायच्या ! बरं, सोडून देअू या गोष्टी. खरी गोष्ट अशी की, कसं का होईना, पण मीच तुला तुझ्या देशात आणून पोचवलंय, पण तुझ्या सर्व अडचणी आता दूर झाल्या आहेत, अशा भ्रमात राहू नकोस. नीट सावध रहा. तू इथाकाला येअून पोचला आहेस, हे कुणाला कळू देअू नकोस.''

''खरंच हा माझा इथाका देश आहे? माझा तर विश्वासच बसत नाहीय! तू माझी चेष्टा तर करत नाहीस ना?'' रूपधरने विचारले.

''तू मुळी कुणावर विश्वासच ठेवत नाहीस. दुसरा कोणी असता, तर लगेच



इतक्या दिवसांनी, इतके कष्ट साहून मायेदशी परतल्यावर त्याने अगोदर आपल्या बायको-मुलांची खुशाली विचारली असती. तू तर माझ्यावरही विश्वास ठेवायला तयार नाहीयेस. तेही एका प्रकारे बरंच म्हणा ! तुझी बायको रात्रंदिवस तुझीच आठवण करत असते. तुझ्यासाठी तडफडत असते बिचारी. आता प्रथम मी तुला आपला देश दाखवते, ओळख बरं!'' असे म्हणत बुद्धिमती देवीने आपल्या सामर्थ्याने धुके हटवले. किनाऱ्यावरील विविध परिचित स्थाने पाहून रूपधरने आपला देश ताबडतोब ओळखला. त्याच्या आठवणी ताज्या झाल्या. नंतर बुद्धिमतीने गुहेत प्रवेश केला व रूपधरच्या साऱ्या वस्तु तेथे व्यवस्थित लावून ठेवल्या. गुहेचे द्वार एका मोठ्या शिळेने झाकून ठेवून नंतर ती रूपधरसह एका झाडाखाली त्याला काही सुचवण्यासाठी बसली.

''रूपधर, गेली तीन वर्ष काही दुष्ट माणसं तुझ्या घरात तळ देऊन बसलेली आहेत. तुझंच अन्न खाऊन तुझ्या बायकोला आपलीशी करायचं कारस्थान चालू आहे त्यांचं. त्रास देत आहेत ती बिचारीला! त्यांना चांगला धडा शिकवायची जबाबदारी आता तुझीच आहे! त्या पाहुण्यांचं मन राखत, त्यांना फुसलावत ती मोठ्या आतुरतेनं तुझीच वाट पहात आहे.''

बुद्धिमतीने ही वस्तुस्थिती समजावून सांगताच रूपधर अुतावीळपणे म्हणाला, ''माते बुद्धिमती, माझ्यावर तुझी कृपादृष्टि असेल, तर मी नक्कीच त्या दुष्टांचा संहार करीन. बोल, आता काय करू मी?''

''प्रथम मी तुझं रूप बदलून टाकते, म्हणजे तुला कोणी ओळखणार नाही. इतकं बदलीन तुला, की प्रत्यक्ष तुझी बायको अन् मुलगाही तुला ओळखू शकणार नाही. तू इथून आपली डुकरं संभाळणाऱ्या रखवाल-दाराकडे जाऊन त्याच्याबरोबर राहू लाग. तो सध्या तुझी डुकरं चारण्यासाठी कावळ्यांच्या पहाडाजवळ रहात आहे. मधल्या अवधीत मी तुझा पुत्र धीरमती याला घरी पोचवते. तुझी माहिती काढण्यासाठी तो सम्राटाकडे गेलेला आहे.'' बुद्धिमती देवी म्हणाली.

याननंतर तिने रूपधरला एका वृद्धाचे रूप दिले. त्याचे सारे शरीर सुरकुत्यांनी भरून गेले. त्याच्या हातात एक काठी अन् झोळी देऊन तिने त्याला कावळ्यांच्या पहाडाची वाट समजाऊन सांगितली आणि ती स्वतः अंतर्धान पावली.

रूपधर काही जंगले व पहाड पार करून आपली डुकरे संभाळणाऱ्या रखवालदाराकडे पोचला. त्याच्या सर्व नोकरात हा रखवालदारच चांगला विश्वासपात्र नोकर होता. त्याने एका विशाल मैदानात एक घर बनवले, मैदानाला घेरून दगडांची एक भिंत अुभी करून त्यावर त्याने नागफणी निवडुंग लावून टाकला. त्यामुळे भिंतीच्या आत कोणालाही सहजपणे प्रवेश करणे अशक्य होते. या रक्षकाच्या रक्षणाखाली एक हजार डुकरे होती. पण आतापर्यन्त रूपधरच्या घरी रहाणाऱ्या दुष्टांनी त्यापैकी बरीच डुकरे घरी मागवून शिजवून खाऊन टाकली होती. डुकरांच्या रक्षणासाठी चार शिकारी कुत्रीही तेथे पाळण्यात आलेली होती.

रूपधर तेथे पोचला, तेंव्हा रखवालदार स्वतःसाठी चपला शिवत होता. त्याला पाहिल्याबरोबर तिथली कुत्री भुंकत त्याच्या रोखाने येअू लागली. त्याबरोबर हातातली



काठी खाली टाकून रूपधर पटकन जमिनीवर बसला. इतक्यात डुकरांचा रखवालदार तिथे येऊन पोचला. रूपधरला न ओळखून तो एकदम म्हणाला, ''म्हातारबाबा, बरं झालं, वाचलात तुम्ही कुत्र्यांच्या तडाख्यातून ! नाही तर फाडून काढलं असतं त्यांनी तुम्हाला ! तशी तर अलिकडे माझी स्थितीही काही फारशी चांगली नाहीय. माझा भल्या मनाचा मालक बिचारा आपला देश सोडून दुसऱ्या देशांमधे भटकत फिरतो आहे. कोण जाणे, त्याच्यावर कसली संकटं कोसळत असतील ! अन् इथे मात्र रिकामटेड्या, नालायक माणसांची गर्दी त्याच्या घरात असून आरामात डुकरांच्या



मेजवान्या झोडत असते. ये बाबा आत घरात. जे काही थोडं अन्न आहे, ते खाऊन घे, अन् मग आपली हकिकत सांग मला.''

रूपधर जोपर्यंत खात होता, तोपर्यन्त तो रक्षक आपल्या मालकाची स्तुतीच करत राहिला. आपले दुःख प्रकट करत त्याने सांगितले की, आपला मालक सम्राटाबरोबर ट्रोजन युद्धात भाग घ्यायला निघून गेला अन् नंतर कुठे निघून गेला हेच कळले नाहीय कुणाला ! त्याचे सगळे बोलणे ऐकून घेतल्यानन्तर रूपधर म्हणाला, ''अरे तू आपल्या मालकाबद्दल इतकं तोंड फाटेपर्यन्त सांगत राहिला आहेस; पण तो आहे तरी कोण? मी तर अनेक देश फिरून आलोय. पण असल्या माणसाबद्दल कधीच कुठे काही ऐकलं नाही! पण तू नीट त्याचं वर्णन करून सांगितलंस, तर कदाचित् ओळखून मी त्याच्याबद्दल काही सांगू शकेन !''

रखवालदार म्हणाला, ''बाबा, तू काहीही सांगितलंस, तरी आईसाहेब अन् धाकटे मालक त्यावर विश्वास नाही ठेवणार. कारण आतापर्यन्त अनेकांनी खोट्या गोष्टी सांगून त्यांना फसवलंय. काही लभ्यांश मिळवण्यासाठीच त्यांनी कायकाय सोंगं केली! तूही तसल्या माणसांसारखा नसशील कशावरून?''

''हं! काही मिळवण्यासाठी खोटं बोलणं हा खरोखरच मोठा नीचपणा आहे ! पण मी शपथपूर्वक सांगतो आहे, ते नीट लक्षपूर्वक ऐकून घे. तुझा मालक या अमावस्येपूर्वीच परत येणार बघ ! त्याच्या शत्रूंचा संहार त्याच्याच हातून होईल. आत्ता मला कसलंच बक्षिस वगैरे नकोय. माझं सांगणं खरं निघालं की घेईन मागून मी तुझ्याकडून ते.'' रूपधर विश्वासपूर्वक बोलला.

''पण अरे वेड्या! आता येणार कोठून तो? तो तर केंव्हाच मरून गेलाय. तुझं बोलणं खरं निघालं, तर त्यापरतं त्याच्या बायकोला अन् मुलाला दुसरं काय हवं? त्याचा मुलगाही आता त्याच्यासारखाच मोठा अन् दृढकाय झाला आहे. त्याच्या रुबाबदारपणाचं जितकं वर्णन करीन, तितकं थोडंच वाटेल.'' रखवालदार बोलला.

दोघेजण बराच वेळ गप्पा मारत राहिले. रूपधर स्वतःबद्दल बोलताना म्हणाला, ''मी क्रीट देशचा आहे. ट्रॉयच्या युद्धात मीही भाग घेतला होता. रूपधरला ओळखतो मी. इतरत्र भ्रमण करत असताना दुसऱ्या एका देशात मी त्यालाही पाहिलं होतं.'' तरीही रखवालदार यावर विश्वास ठेवायला तयार होईना.

अंधार होता होता रखवालदाराचे नोकर डुकरांसह परत आले. त्याने त्या रात्री आपल्या पाहुण्यासाठी स्वादिष्ट जेवण बनवले.

बाहेर पाऊस पडू लागला, जोराचे वारे वाहू लागले. रूपधर रखवालदाराला म्हणाला, ''ट्रॉय युद्धात एकदा काय झालं सांगू? एक दिवस आम्ही ट्रॉयच्या तटामागल्या झाडीत पडून राहिलो होतो. त्या दिवशीही आजच्यासारखीच कडक थंडी पडली होती. बर्फ पडत होतं. माझ्याजवळ पांघरायला चादर नव्हती. मध्यरात्री मी रूपधरला उठवलं अन् आपली अडचण सांगितली. तेंव्हा त्याला एक उपाय सुचला. तो साथीदारांना म्हणाला, ''मला आत्ताच एक वाईट स्वप्न पडलं. कोणीतरी सम्राटाकडे जाऊन काही शिपायांना बोलावून आणावं.'' लगेच एक माणूस उठून आपली चादर खाली टाकून सम्राटाकडे निरोप सांगायला गेला. तीच चादर घेऊन, ती पांघरून मी रात्र घालवली.''

''चांगली गोष्ट सांगितलीस म्हातारबाबा! आज रात्री तुला पांघरायला मीही एक चादर देईन. घाबरू नकोस.'' रखवालदार हसत म्हणाला.

त्याने कातड्यांचा एक बिछाना अंथरला अन् रूपधरला त्यावर झोपवले, अन् त्याच्या अंगावर एक कांबळेही पांघरूण म्हणून घातले. रूपधर आरामात झोपून गेला.

**क्रमशः**



## 'चांदोबा'च्या बातम्या

**वाचू नका, ऐका !**

सध्या तांत्रिक-विज्ञानाच्या जमान्यात विविध क्षेत्रात खूप जलद गतीने विकास होत आहे. इलेक्ट्रॉनिक युगात मुद्रण-क्षेत्रात तर अद्भुत प्रगति झालेली आहे. अभिजात ग्रंथ मायक्रो फिल्मच्या स्वरूपात सुरक्षित ठेवले जात आहेत. या पुस्तकांची पाने आपण कॉम्प्यूटरच्या पडद्यावर वाचू शकतो. पुस्तके वाचण्याचा जमाना आता मागे पडला. आपण गाणी ऐकतो त्याप्रमाणे कॅसेटवर पुस्तके ऐकण्याचा जमाना आला आहे. आकाशवाणीची काही केन्द्रे तर लेखकाने लिहिलेले पुस्तक त्याच्या आवाजात ऐकवण्याचा प्रयत्न करीत आहेत. सुप्रसिद्ध मल्याळी लेखक श्री.सी. राधाकृष्णन यांच्या काही कादंबऱ्या कॅसेटच्या रूपात प्रसिद्ध झाल्या आहेत. आकाशवाणीच्या एका कलाकाराने आपल्या आवाजात काही पुस्तके ऐकवली आहेत.

**पुस्तक-चोर लिलावात हजर!**

इंग्लंडच्या सफोक प्रांतातील एक युवक डंकन जेवान्स याला धार्मिक ग्रंथांची फार आवड आहे. धर्म-विषयक पुस्तकांचा संग्रह करण्याचा त्याला छंद आहे. सर्वच पुस्तके खरेदी करण्याची ताकत नसल्यामुळे त्याने पुस्तके चोरण्याचा एक सोपा मार्ग शोधून काढला. एकोणिसाव्या वर्षापासून तीस वर्षात त्याने ५२०० पुस्तके जमविली. एक दिवशी करालैल नावाच्या शहरात चोरी करताना तो पकडला गेला. चोरीचा आरोप सिद्ध झाल्यावर पोलिसांनी त्याच्याकडील १२,००० पुस्तके जप्त केली आणि लिलाव करून ती विकली. बिचारा डंकन जेवान्स लिलावात हजर होता, पण त्यात बोली मात्र बोलू शकला नाही.

ही अद्भुत गोष्ट ऐकली म्हणजे अमेरिकेचे प्रसिद्ध विनोदी लेखक मार्क ट्वेन यांची एक व्यंग-कथा आठवते. एकदा त्याच्याकडे एक पाहुणा आला तेव्हा अनेक पुस्तके इकडे-तिकडे अस्ताव्यस्त पडलेली त्याने पाहिली. पाहुणा म्हणाला - "ही सर्व पुस्तके कपाटात नीट लावून ठेवता येणार नाहीत का?" मार्क ट्वेन विनोदाने म्हणाला - "ते तर ठीक, पण कपाट खरेदी करायला कोणी कर्ज देईल का?"

### वाढदिवसाची भेट

अमेरिकेचे अध्यक्ष बिल क्लिंटन व त्यांच्या पत्नी हिलरी क्लिंटन यांची मुलगी चेल्सी सोळा वर्षांची आहे तिच्या वाढदिवशी अमेरिकेच्या तीन खाजगी रेडिओ-संस्थांनी तीन वेगवेगळ्या प्रकारच्या मोटर-गाड्या भेट म्हणून पाठविल्या. त्यावेळी चेल्सी घरी नव्हती. ती शाळेत गेलेली होती. ती शाळेतून परत आल्यावर आई-वडिलांनी या मोटारी परत पाठविल्या. सुप्रसिद्ध नॅशनल थिएटर मध्ये फ्रेंच लेखक व्हिक्टर ह्यूगोच्या 'ले मिझरेबल्स' चा प्रयोग पाहण्यासाठी संध्याकाळी आई-वडील चेल्सीला घेऊन गेले. चेल्सीने जरी सोळा मेणबत्त्या पेटवून आपला वाढदिवस साजरा केला नाही, तरी नाटक पाहून ती फार खूश झाली.



## विकृतघ्न

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ गेला. त्याने झाडावरून प्रेत खाली उतरवलं आणि स्मशानाची चालू लागला. तेव्हा प्रेतातील वेताळ बोलू लागला - "हे राजा, काही पंडित अनेक नवीन अर्थहीन शब्दांचा उपयोग करून रसिकांना बुचकळ्यात पाडतात. एखाद्या पंडिताने अशीच काही शब्द-रचना करून तुला खोड्यात टाकलं नाही ना? तू जर अशाच प्रयत्नात असशील, तर हंसं करून घेशील. उदाहरणादाखल कृष्णशास्त्री आणि त्याची मुलगी अनुपमा यांची एक गोष्ट मी तुला सांगतो. ती ऐकून तुझा थकवा ही अमळ दूर होईल." आणि वेताळाने आपली गोष्ट सांगायला सुरुवात केली.

पांडित्याच्या क्षेत्रात आपला हात धरणारा कोणी नसावा अशी रामशास्त्रींची इच्छा होती. त्याच्या वडिलांचे एक पंडित मित्र होते.

## वेताळ कथा



त्यांनी रामशास्त्रीला काही प्रश्न विचारले अन् त्याची उत्तरे ऐकून ते म्हणाले महापंडित बनण्यासाठी नव-नवे शब्द निर्माण करून त्यांचा प्रचार ही केला पाहिजे.

"असं करणारा कोणी पंडित आहे?" रामशास्त्रीने प्रश्न केला.

"माझ्याच गावात कृष्णशास्त्री नावाचे एक पंडित आहेत. कोणत्याही नव्या शब्दाचा अर्थ ते सहजपणे सांगतात. पण त्यांनी स्वत: रचलेल्या नवीन शब्दांचा अर्थ दुसरे कोणी सांगू शकत नाहीत."

रामशास्त्री उतावळेपणाने म्हणाला - "मग तर मी कृष्णाशास्त्रींना अवश्य भेटेन आणि आपल्या पांडित्याची परीक्षा घेईन !"

"मग उशीर कशाला? माझ्याच बरोबर चल. पण एक गोष्ट लक्षात ठेव. त्यांच्याशी बोलताना. काही नवीन शब्दांचा उपयोग कर. मग ते तुला आपला शिष्य बनवतील." पाहुणे म्हणाले.

दोघे ही निघाले. वाटेत रामशास्त्री एकाच गोष्टीचा विचार करीत राहिला की कृष्णशास्त्रीशी नाविन्यपूर्ण काय व कसे बोलावे?

कृष्णशास्त्र्यांना अनुपमा नावाची एक सुंदर मुलगी होती. ते शिष्य म्हणून काही जिज्ञासू होतकरू युवकांना नेहमी आपल्या घरात ठेवीत. अनुपमाच्या जवळ पास अशी काही तरूण मंडळी असली तर एकमेकांच्या सहवासात सर्वांचा विकास होईल असे त्यांना वाटे. कदाचित् अनुपमा एकाद्यावर प्रेम करू लागेल आणि मग तिच्या विवाहाचा प्रश्न ही सुटेल. म्हणून त्यांनी रामशास्त्रीला आपल्या घरातच ठेवून घेतले.

रामशास्त्री आपल्या विद्याध्ययनातच मग्न राहू लागला.अनुपमेकडे त्याचे जरा ही लक्ष नसे. आपल्याला काही पाहिजे असलं तर तो अनुपमेला आज्ञा करी.

रात्रभर विश्रांति घेतल्यानंतर दुसऱ्या दिवशी सकाळीं कृष्णशास्त्र्यांना भेटण्याची त्याची इच्छा होती. अनुपमा म्हणाली - "पिताजी बाहेर गावी गेलेले आहेत, नि त्यांना परत यायला दोन दिवस लागतील."

अमळ नाराजीने तो अनुपमेला म्हणाला - "दोन दिवस मी इथं बसून काय करूं? माझा तर एकेक क्षण युगासारखा चाललाय!"

"इतकं चिडायला काय झालं? या दोन दिवसात पुष्कळ काही महत्वाचं शिकता येईल. माझ्या वडिलांनी बनवलेले काही नवीन शब्द जाणून घे!" अनुपमेने शिफारस केली.

रामशास्त्री अभिमानपूर्वक सांगू लागला - "मला कुठल्या ही शब्दाचा अर्थ सहज समजतो. आतापर्यंत मी खूप शिकलो आहे. कृष्णशास्त्र्यांनी आजपर्यंत कधी जे शब्द वापरले नाहीत, ते मी जाणतो!"

"तुझ्यासारख्या माणसासाठी 'विकृतघ्न' शब्दाची निर्मिति झालेली आहे!" असे म्हणत ती तेथून निघून गेली.

विकृतघ्न हा शब्द रामशास्त्रीला अगदीच नवीन वाटला. तो विचार करू लागला की या शब्दाचा अर्थ काय असावा. जेव्हा त्याच्या काही लक्षात येईना तेव्हा त्याने अनुपमाला बोलावून विचारलं - "आता तू मला कृतघ्न ऐवजी विकृतघ्न म्हणालीस. अडाणी माणसंच असल्या विचित्र शब्दांचा वापर करतात. प्रथम तू मला हे सांग की मी तुझ्या दृष्टीने कृतघ्न कसा झालो?"

अमळ थांबून अनुपमा म्हणाली - "तू जसा माझ्या घरी आलास, तशी मी तुझी सेवा केली. तू काही दिसायला मोठा सुंदर



आहेस असं नाही, तरी ही मी तुझ्या सौंदर्याची तोंड भरून प्रशंसा केली. याबद्दल कृतज्ञते दाखल तू मला काय दिलंस? माझ्याकडून सेवा करून घेतलीस, पण माझ्या सौंदर्याबाबत एक शब्द बोलला नाहीस. खरं म्हणजे माझ्याबद्दल तू काही जाणत नाहीस. मी किती शिकलेली आहे हे तुला माहीत नाही. माझ्या ज्ञानाची तू कधी परीक्षा घेतली नाहीस. मी केवळ तुझी सेवा करण्याच्या योग्यतेची आहे असं तूच आपल्या तोंडाने म्हणालास. तू माझा अपमान केलास. मी तुझी जी सेवा केली, तिच्याकडे तू संपूर्ण दुर्लक्ष केलंस. तू विकृतघ्न आहेस!"



"अग, परवा तू मला विकृतघ्न म्हणालीस! माझ्या शब्दकोषात हा शब्द नाही. केलेले उपकार जो विसरतो, त्याला कृतघ्न म्हटले पाहिजे." रामशास्त्री म्हणाला.

"तुला नुसतं कृतघ्न म्हणणं पुरेसं नाही. चित्राला विचित्र म्हणतात, जयाला विजय म्हणतात. त्याप्रमाणे कृष्णशास्त्रींनी तुझ्या सारख्या माणसांकरता 'विकृतघ्न' शब्द निर्माण केला आहे!" अनुपमा म्हणाली.

आता रामशास्त्री या शब्दाचा अर्थ जाणण्यासाठी गंभीरपणे विचार करु लागला. कारण या शब्दाची निर्मिती कृष्णशास्त्रींनी केलेली होती. खूप विचार करून ही या शब्दाचा अर्थ त्याच्या लक्षात येईना. शेवटी निरुपायाने त्याने अनुपमेलाच या शब्दाचा अर्थ विचारला.

"आपल्याला महापंडित म्हणवतोस. आणि या शब्दाचा उपयोग मी तुझ्याच साठी केला हे तुला समजलं नाही हं? उपनिषदात सांगितलंय की महापंडित सुद्धा स्वत:बद्दल जाणत नाही. म्हणून मला तुला विरूप बद्दल सांगितलंच पाहिजे. त्यालाच आपल्या डोळ्यांपुढे ठेवून माझ्या वडिलांनी या शब्दाचा उपयोग केला." आणि अनुपमेने विरूपची गोष्ट सांगायला सुरुवात केली.

विरूप एका गावातला गरीब शेतकरी होता. एकदा गावातलं एक शेत स्वस्तात विकलं जात होतं, म्हणून ते खरेदी करायची त्याला इच्छा झाली. पण जवळ पैसे कुठे होते? शेजारच्या रामने त्याला पैसे दिले. काही दिवसांनी विरूपला शेतात एक डबोलं सापडलं. त्याने लगेच रामचं कर्ज परत फेडलं. त्याच वेळी रामच्या मुलीचं लग्न ठरलं. रामने विरूपला थोडं कर्ज मागितलं.

विरूपने नकारार्थी उत्तर दिलं - "गरीबांना कर्ज देऊं नये. गरीबांनी आपलं अंथरूण पाहून पाय पसरावेत. यातच त्यांचं कल्याण असतं !"

एक दिवशी विरुप शेतात काम करीत असताना त्याला साप चावला. शेजारच्या शेतात काम करणाऱ्या श्यामने तावडतोब त्याला आपल्या खांद्यावर टाकलं आणि मांत्रिकाकडे घेऊन गेला. मांत्रिक म्हणाला - 'थोडा उशीर झाला असता तर हा मेलाच असता.' दुसऱ्याच दिवशी घराच्या परसात श्यामला साप चावला. त्यावेळी विरूप तिकडून चालला होता. त्याला ही वार्ता समजली. तो म्हणाला - 'श्यामला उचलून घेऊन जाण्याइतकी ताकत माझ्यात नाही.' कोणी त्याला म्हणाले - 'निदान मांत्रिकाला बोलावून आणण्याचे काम तरी कर.' यावर विरूप म्हणाला - मी तर काही महत्त्वाच्या कामासाठी दक्षिणेकडे निघालो आहे. आणि मांत्रिकाचे घर आहे उत्तरेकडे ! मला मांत्रिकाकडे जाता येणार नाही." श्यामची बायको विरूपला म्हणाली - 'तुम्ही माझ्या नवऱ्यापाशी थांबा, मी जाऊन मांत्रिकाला घेऊन येते.' पण विरूपने याला ही नकार दिला आणि तो तिथून निघून गेला. मांत्रिकाला कोणाकडून तरी ही बातमी मिळताच तो धावत-पळत श्यामकडे आला आणि त्याने त्याचे प्राण वाचवले.

विरूप बद्दलच्या या दोन्ही घटना ऐकून रामशास्त्री म्हणाला - "खरोखरीच विरूप सारख्या माणसासाठीच 'कृतघ्न' शब्द जन्मला आहे!"

अनुपमा म्हणाली - "कृतघ्न नाही, विकृतघ्न !"

"विकृतघ्नला काही अर्थच नाही. केलेली मदत जो विसरून जातो, तो



कृतघ्न. त्यात आपला-परका असा काही भेदभाव नाही. सगळे कृतघ्न एकाच माळेचे मणी !" रामशास्त्रीने आपला तर्क मांडला.

"मी सांगून गोष्ट तुझ्या लक्षात यायची नाही. तू स्वतःच जा नि विरूपला भेटून ये." अनुपमाने सल्ला दिला.

रामशास्त्री गावात गेला. तो लोकांना विचारु लागला की विरूपचं घर कुठे आहे. एवढ्यात त्याला आपसात भांडणारी दोन माणसं दिसली. एक पुरा सहा फुट उंचीचा होता. दिसायला पैलवानासारखा दिसत होता. दुसरा ठेंगणा आणि दुबळा होता. पैलवान ठेंगण्याला मारायच्या बेतात होता, पण रस्त्यावरील कोणी ही त्याला आडवीत नव्हते.



तेव्हा रामशास्त्री मधे पडला नि त्याने पैलवानाला विचारले - ''अरे, तुम्ही कशासाठी भांडत आहात?''

पैलवान रामशास्त्रीला म्हणाला - ''महाराज, हा काल नदीत बुडत होता, तेव्हा याला वाचवायला गावातला कोणी पुढे सरसावला नाही. आपल्या प्राणांची पर्वा न करता मी याला वाचवलं! आज हा रस्त्यात दिसला, तेव्हा मी त्याला विचारलं - ''तुझी तब्येत कशी काय आहे?'' गुरगुरत हा मला विचारतो आहे - ''असं काही घडलंच नाही. आणि घडलं असेल तर मला आठवत नाही!'' मी काय याला पैसे थोडेच मागितले? माझी एवढीच अपेक्षा होती की हा प्रेमाने दोन शब्द बोलेल. उलट माझी थट्टा करीत हा लेकाचा म्हणतोय - ''शक्तीमुळे पैलवानांची बुद्धि भ्रष्ट होते. तू याचं अगदी जिवंत उदाहरण आहेस. तू केवळ मूर्ख माणूस आहेस!'' ठीक आहे, मी महा बुद्धिहीन आहे. नाहीतर याला मदत करायला कशाला धावलो असतो? याला यथेच्छ पिटून चांगला धडा मी शिकवणार आहे!''

रामशास्त्र्याला परिस्थितीचा उलगडा झाला. हा ठेंगणा माणूसच विरूप असावा असा ही त्याने अंदाज केला. तो पैलवानाला म्हणाला - ''हे पहा, तुमच्यात बुद्धिमत्ता आहे नि शारीरिक बळ ही आहे. या सामर्थ्याचा उपयोग असल्या माणसावर करणं व्यर्थ आहे. या जगात काही ही शाश्वत नाही हे तुम्ही जाणतांच. अशा परिस्थितीत आपण त्याच्यावर उपकार केलेत म्हणून त्याच्याशी अधिक संबंध कशासाठी वाढवीत आहात? मला तर वाटतं हा मोठा वेदांती माणूस आहे. त्याच्या प्रत्येक कृतीत काही तरी रहस्य दिसतंय! मी याच्याशी बोलून त्याची सर्व माहिती मिळवतो. आणि मग आपण सविस्तर बोलू.''

रामशास्त्रीच्या चेहऱ्यावरील तेज आणि त्याची बोलण्याची पद्धत पाहून पैलवानाने विरूपला सोडून दिले. तेव्हा रामशास्त्रीने विचारले - ''तुझेच नाव विरूप का?''



विरूप म्हणाला - ''तुझं माझ्याशी काय काम हे मला माहीत नाहीय. मला वाटतं मी कोण हे तुला समजलंय. तू कोण हे मला माहीत नाही आणि ते जाणण्याची माझी इच्छा पण नाही.'' आणि तो तेथून निघून गेला. एक दीर्घ निःश्वास सोडून रामशास्त्री घरी परत आला.

अनुपमाने विचारले - ''भेटला का विरूप?''

''भेटला आणि मी त्याच्याशी बोललो सुद्धा.'' शास्त्री म्हणाला. नंतर त्याने अनुपमाला सगळं सविस्तर सांगितलं - ''विरूपला शिवी देण्यासाठी नुसता कृतघ्न शब्द पुरेसा नाही. म्हणूनच कृष्णशास्त्रींनी विकृतघ्न या शब्दाची रचना केलेली असावी. या शब्दामुळे त्याच्या बद्दलची कुत्सित भावना चांगली व्यक्त होते. या शब्दात जी गरिमा आहे ती मोठी सार्थक आहे!''

''शब्दाचे अवडंबर आणि भारीपणा जरी तुला समजला असला तरी अजून त्याचा संपूर्ण अर्थ तुला समजला असं मला नाही वाटत!'' अनुपमा हसत म्हणाली.

तेव्हा बाहेरून आलेले अनुपमाचे वडील रामशास्त्रीला म्हणाले - ''पांडित्याच्या बाबतीत अनुपमेची सर तुला येणार नाही हे आता तुझ्या लक्षात आले असेल. कारण कृष्णशास्त्री नावाचा कोणी माणूस इथे नाहीच. तुला नि अनुपमेला जवळ आणण्या



साठी मी कृष्णशास्त्री निर्मिला.

हे बोलणं ऐकून रामशास्त्री त्यांच्याकडे पहातच राहिला. जरा वेळाने तो अनुपमाला म्हणाला - ''हा विकृतघ्न शब्द मला सहन होत नाहीये. क्षमा कर मला !''

वेताळाने आपली गोष्ट संपवली. आता आपल्या शंका व्यक्त करीत वेताळाने राजा विक्रमादित्याला विचारले - ''राजा, कोणत्याही भाषेला व्याकरणाचे नियम असतात, त्यांचे अतिक्रमण करणे इष्ट नसते. स्वतः पंडित नसताना आपल्या पांडित्या-बद्दल कोणी गर्व केला तर त्याला विपंडित म्हणायचं का? रामशास्त्री लहानपणापासून पंडित होता. अशा पंडिताला विकृतघ्न हे

अर्थहीन विशेषण वापरून अनुपमेने त्याला त्रास नाही का दिला? यात तुला काही आश्चर्य नाही वाटत? आणि पाहून आश्चर्याची गोष्ट ही नाही का कि रामशास्त्र्याने अनुपमेला म्हणावं - "हा विकृतघ्न शब्द मला सहन होत नाही. क्षमा कर." अनुपमा पांडित्याच्या बाबतीत काय रामशास्त्र्याहून सरस होती? माहीत असून ही जर माझ्या या शंकांचे समाधान तू केले नाहीस, तर त्याचा काय परिणाम होईल ते तुला ठाऊकच आहे."

राजाने उत्तर दिले - "रामशास्त्री व अनुपमा यांच्या पैकी कोण मोठा पंडित हा प्रश्नच उद्भवत नाही. रामशास्त्री महान् पंडित आहे, सुंदर आहे, म्हणून अनुपमाने त्याची सेवा केली. पण रामशास्त्र्याने तिची सतत उपेक्षा केली. कृष्णशास्त्री आणि आपण यांच्यात महापंडित कोण हे जाणण्याच्या प्रयत्नात तो मग्न राहिला. रामशास्त्री अनुपमेवर नेहमी चिडून असे. रामशास्त्री शास्त्रात पंडित आहे, पण त्याचे लोकज्ञान शून्य हे अनुपमाने सहज जाणले. म्हणून एक सुनिश्चित योजना बनवून तिने त्याला विरूपला भेटायला पाठविले. विरूपची कृतघ्नता पाहून ही रामशास्त्री आपल्यातील दोष समजू शकला नाही. आपल्यावर केलेले उपकार जो काही काळ विसरतो त्याला कृतघ्न म्हणावे अशी अनुपमाची धारणा आहे. जो दुसऱ्याच क्षणी केलेले उपकार विसरतो तो विकृतघ्न! म्हणून रामशास्त्रीसाठी तिने या नवीन शब्दाचा उपयोग केला. जेव्हा तिने हे स्पष्ट केले की कृष्णशास्त्री नावाचा कोणी पंडित नाहीच आणि रामशास्त्री इथे आलाच मुळि कशासाठी हे तिला समजले नाही, तेव्हा रामशास्त्रींच्या लक्षात आले की अनुपमेशी त्याने केलेला व्यवहार कृतज्ञताहीन आहे. आणि म्हणून त्याने तिची क्षमा मागितली."

राजाचे हे समर्पक उत्तर ऐकून वेतालाच्या मनांतील शंका दूर झाल्या आणि प्रेतासह अदृश्य होऊन तो झाडावर जाऊन बसला.

**आधार : रमा कुमारीची एक कथा**



समुद्र किनाऱ्यावर सहल - ६

# जंजीरा ते गोवा

**आलेख : मीरा नायर ◆ चित्रे : गौतम सेन**




जंजिऱ्याच्या दक्षिणेला सावित्री नदीच्या मुखावर हरिहरेश्वर तीर्थ वसलेले आहे. याला देवगड ही म्हणतात. समुद्रकिनाऱ्यावर असलेल्या अनेक मंदिरात एक प्रसिद्ध मंदिर आहे कालभैरवाचे. मूर्ति पालखीत घालून जवळच्या डोंगरावर नेण्यात येते. डोंगरांची नावे आहेत ब्रह्मा, विष्णु, महेश आणि पार्वती.

हरिहरेश्वराच्या दक्षिणेला बाणकोटचा किल्ला आहे. अठराव्या शतकात मराठा नौसेनापति कान्होजी आंग्रे येथून समुद्री यात्रेवर अथवा युद्धासाठी प्रस्थान करीत. सन १७५६ मध्ये मराठा शासकांनी बाणकोट किल्ला इंग्रजांना दिला, आणि त्याच्या मोबदल्यात रत्नागिरीच्या दक्षिणेकडील घेरिया किल्ला आपल्या ताब्यात घेतला. अशा रीतीने इंग्रजांनी पश्चिम भारताच्या भूमीवर बाणकोट येथे आपला पहिला पाय रोवला. शिवाजीने घेरिया किल्ल्याचे नवे नाव ठेवले - विजयदुर्ग !




सुप्रसिद्ध मराठा राजनीतिज्ञ नाना फडणवीस यांचा जन्म बाणकोटच्या दक्षिणेकडील वेला या ठिकाणी झाला.



प्राचीन काळी या भागात एक महत्वाचे बंदर होते परिपाटना अथवा पालैपाट्मे. हे अनेक शतके समुद्री व्यापाराचे प्रमुख केन्द्र होते. हे बाणकोटच्या दक्षिणेला होते आणि चौदाव्या शतकापर्यंत दक्षिण कोकणातील एक प्रमुख बंदर होते. येथून इराकची खाडी आणि भूमध्य-समुद्री देशांशी खूप व्यापार चाले. नंतरच्या काळात दाभिया नावाच्या देवतेवरून याचे नाव दाभोळ ठेवण्यात आले. दाभिया देव हा वनात संचार करणारा देव आहे असे म्हणतात. दाभोळ येथे दोन प्राचीन स्मारके आहेत - अनेक शतकांपूर्वीची एक मशीद आणि दुसरे समुद्र-सपाटीखाली बांधलेले चंद्रिकाबू मंदिर. दक्षिण कोकणात या शैलीने बांधलेले अन्य मंदिर नाही. चंद्रिकाबू मंदिर ई.सन ५५० ते ५७८च्या दरम्यान बांधले गेले.

अलीकडे अमेरिकेच्या एन्रॉन कंपनीबाबत आपण बरेच ऐकतो. ही कंपनी दाभोळ मध्ये एक वीज-निर्मिती केन्द्र स्थापित करीत आहे. यातून महाराष्ट्राला वीज उपलब्ध होईल.



आंब्यांचा राजा आपूस

दक्षिणेकडे आणखी काही अंतरावर आहे गणपतिपुळे. कोकण-किनाऱ्यावरील हे गाव फार रमणीय आहे. इथे काजू, नारळ आणि आंब्यांची खूप झाडे आहेत. येथील गणपति मंदिरावरून गावाचे नाव पडले गणपति पुळे ! या मंदिरातील गणेश-मूर्ति ४०० वर्षांपूर्वी जवळच्या एका डोंगरात प्रकट झाली असे येथील लोक सांगतात.



बाळ गंगाधर टिळक

विशेष करून अंगारकी चतुर्थीच्या दिवशी लांब-लांबून लोक गणपतीच्या दर्शनासाठी येतात. त्या दिवशी उपास करतात आणि रात्री चन्द्र-दर्शन करून मोदक खाऊन उपास सोडतात. तांदुळाचे पीठ, नारळ व गूळ यांचा उपयोग करून मोदक हे पक्वान्न बनते.

कोकणात सर्वत्र जांभळट रंगाची फळे देणारे कोकम वृक्ष आढळतात. या फळांपासून एक आकर्षक रंगाचे आंबट-गोड सरबत बनवतात. सरबत बनवून झाल्यावर फळांच्या सालींना मीठ लावून दहा दिवस उन्हात सुकवितात आणि अमसुले बनवतात. आमटी व भाजीत चिंचेप्रमाणे अमसुले ही उपयोगात आणली जातात.

तशी आपल्या देशात आंब्यांची झाडे सर्वत्र आहेत. पण रत्नागिरीच्या आपूस आंब्यांची गोष्ट काही वेगळीच ! रत्नागिरी एक छोटं बंदर आहे, पण इथले आपूस आंबे आणि लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांची जन्मभूमि म्हणून याला खूप प्रसिद्धि मिळाली आहे. २३ जुलई १८५६ रोजी लोकमान्यांचा जन्म ज्या घरात झाला तेथे त्यांचे एक स्मारक बनविण्यात आले आहे.

रत्नागिरीपासून दक्षिणेकडे काही अंतरावर विजयदुर्ग नावाचा समुद्री किल्ला आहे. सिंधुदुर्ग आणि विजयदुर्ग मराठा नौसेनेची दोन प्रमुख केन्द्रे होती. विजयदुर्गचे पहिले नाव घेरिया होते हे तुम्ही पूर्वीच वाचलेलं आहे. या किल्ल्याची पश्चिमेकडील भिंत सतत आदळणाऱ्या समुद्री लाटांमुळे कमकुवत बनली आहे. किल्ल्याचा बाकीचा भाग सुरक्षित आहे.

दक्षिणेच्या बाजूला आणखी काही किलोमीटर अंतरावर येते मालवण. कोणे एके काळी हे एक प्रसिद्ध



विजयदुर्ग



वडे-सागुती

बंदर होते. पण आता हे मीठ आणि खास पाक-कृतीसाठी प्रसिद्ध आहे. नारळाच्या दुधात शिजवलेली मासळी आणि कोकमाची कढी याशिवाय मालवणी भोजन पूर्ण होत नाही. याशिवाय येथील लोकप्रिय खाद्य-पदार्थ म्हणजे वडे-सागुती. सागुती म्हणजे मसालेदार मांसाचा रस्सा!

मालवणच्या समुद्र किनाऱ्यापासून थोड्या अंतरावर शिवाजीचा एक समुद्री किल्ला आहे. शिवाजीने आपल्या व्यक्तिगत देखरेखीखाली तो बांधला असे म्हणतात. याचं नाव सिंधुदुर्ग ! येथे एक शिवाजीचे मंदिर पण आहे. संपूर्ण देशात हे शिवाजीचे एकमात्र मंदिर आहे. या मंदिरात काळ्या दगडात कोरलेली शिवाजीची मूर्ति आहे. या मूर्तीच्या शीर्षावर चांदीचा पत्रा चढविलेला आहे. काही विशेष प्रसंगी हा चांदीचा पत्रा काढून त्याच्या ऐवजी सोन्याचा पत्रा चढवतात. मंदिराजवळच्या एक छत्रीत चुनखडी दगडाच्या एका शिळेवर शिवाजीच्या हात व पायांचे ठसे अजून सुरक्षित आहेत.

महाराष्ट्राच्या समुद्र-किनाऱ्यावर दक्षिणतम टोकावर आहे वेंगुर्ला. ते गोव्यापासून जवळ आहे. पूर्वी हे फार मोठे व्यापारी केन्द्र होते. येथून नारळ, गोणपाट, गुळाची काकवी आणि काजू यांची खूप निर्यात होत असे. कोकण किनाऱ्यावर समुद्री डाकू खूप लूटमार करीत असत. सन १६६४ ते १८१२ च्या दरम्यान समुद्री डाकूंनी वेंगुर्ल्यात अनेक वेळी लूटमार केली. मराठा आणि मोगल सेनेने दोनदा शहराला आग लावून ते बेचिराख करून टाकले.

वेंगुर्ल्यात छोट्या छोट्या टेकड्या नि लांबच लांब वालुकामय समुद्र-किनारा आहे. येथील मुख्य उत्पन्न आहे - काजू, नारळ, फणस व आंबा. श्री देवी सातेरी व रामेश्वर यांची येथील मंदिरे खूप प्रसिद्ध आहेत.



शिवाजीची मूर्ति

सिंधुदुर्ग



# वृत्ति आणि प्रवृत्ति

राजा प्रतापवर्माच्या दरबारात विविध क्षेत्रांतील निष्णात पंडित होते. त्यांच्यापैकी एक वैद्य धन्वंतरी होता. धन्वंतरी कुठल्याही रोगाची चिकित्सा अगदी सहज सहज करीत असे. राजपरिवारातील सर्व मंडळी त्याला नेहमी आदर देत. अनेक वेळी त्यांनी त्याला भारी किंमतीच्या वस्तु भेटीदाखल दिल्या. प्रतापवर्माच्या दरबारात रामशर्मा नावाचा एक आशु कवि पण होता. तो आपल्या कवितांचे वाचन करून दरबाऱ्यांचे मनोरंजन करी. त्याच्या काव्यात त्याच्या पांडित्याचे ही दर्शन होत असे.

एकदा शेजारच्या राज्यातील काही कवि-मंडळी प्रतापवर्माकडे आली. राजाने सर्वांचे यथोचित स्वागत केले. प्राकृतिक अस्वास्थ्यामुळे रामशर्मा त्यावेळी तिथे नव्हता. राजा प्रतापवर्माने एक कवि-संमेलन आयोजित केले.

या संमेलनात रामशर्मा नसल्यामुळे राजा प्रतापवर्मा अमळ निराश झाला. आलेल्या कवींनी आपापल्या सर्वोत्तम कविता राजाला सुनवल्या आणि नंतर त्यांनी राजाला प्रार्थना केली - ''महाराज, आपल्या दरबारातील कवि रामशर्मा यांच्या प्रतिभेबाबत आम्ही खूप ऐकले आहे. त्यांचे स्वास्थ्य ठीक नसल्यामुळे ते आज या संमेलनात भाग घेऊ शकलेले नाहीत. त्यांचे काही शिष्य येथे असतीलच. त्यांच्या कविता ऐकण्याचे भाग्य आम्हाला लाभेल का?''

राजाच्या आज्ञेवरून दोन-तीन कवींनी आपल्या कविता ऐकवल्या. पण प्रतापवर्माच्या दृष्टीने कोणाच्या ही कविता विशेष उल्लेखनीय नव्हत्या. उदास प्रतापवर्माकडे पहात धन्वंतरी म्हणाला - ''राजन्, मला ही काव्याची अभिरुचि आहे. आपली संमति असेल तर या संमेलनात मी

मनोहर जोशी



कधी समजलंच नव्हतं!"

धन्वंतरी नम्रतापूर्वक म्हणाला - "क्षमा करा महाराज. मी वैद्य-वृत्ति करीत असलो, तरी माझ्या प्रवृत्तीनुसार मी काव्य-रचना करीत असतो. माझ्या फुरसतीच्या वेळात मी काव्याबाबत चिंतन करतो. आणि जमेल तेवढी काव्य-रचना करतो. कृपा करून आपण मला कोणी मोठा कवि समजूं नये!"

प्रतापवर्माला हे पटलं नाही. आणि तो म्हणाला - "आपल्या प्रवृत्तीनुसार जो वृत्ति पसंत करतो तोच आपल्या कामाशी न्यायसंगत राहू शकतो. आपण वैद्यकीय पेशातून निवृत्त व्हावे आणि काव्य-रचनाच करावी - यातच आपलं हित आहे."

आपल्या काही कविता सादर करू का?"

प्रतापवर्माने क्षणभर आश्चर्याने धन्वंतरीकडे नजर टाकली आणि म्हणाला - "हो, हो, जरूर!"

धन्वंतरीने आपल्या काही छंदबद्ध कविता संमेलनात गायल्या. त्या विविध विषयांवर होत्या. त्याच्या कविता ऐकून पाहुण्या कवींनी जोर-जोरात टाळ्या वाजवल्या.

प्रताप वर्माने शेजारच्या राज्यातील कवींच्या बरोबर धन्वंतरीचाही सन्मान केला. ते सर्व निघून गेल्यावर राजाने धन्वंतरीला विचारले - "तुम्ही एवढे प्रतिभासंपन्न कवि असाल हे आजपर्यंत मला

धन्वंतरीला नाइलाजाने राजाचा सल्ला मानावा लागला. काही दिवसांनी राजाच्या पाठीला एक फोड आला. धन्वंतरी शेजारच्या राज्यात भरलेल्या कवि-संमेलनात भाग घेण्यासाठी गेला होता. त्याच्या काही शिष्यांनी राजाच्या फोडावर इलाज करण्याचा प्रयत्न केला, पण कोणी ही वेदना दूर करू शकला नाही.

रामशर्माला राजाच्या वेदना पाहवेनात. तो राजाला म्हणाला - "मला वैद्यक-शास्त्रात थोडी गति आहे. आपल्या फोडावर मी काही इलाज करू का?"

पीडित अवस्थेत राजाने आश्चर्याने रामशर्माकडे पाहिले आणि अमळ अविश्वासाने होकार दिला.

रामशर्मा धावत घरी गेला आणि आपल्या परसातून एक वनस्पति मुळासकट उपटून आणली. तिचे तुकडे-तुकडे करून ते पाट्यावर वाटून घेतले. हा लेप राजाच्या फोडावर लावून त्याने पट्टी बांधली.

आणि आश्चर्याची गोष्ट अशी की दुसऱ्याच दिवशी फोडांतून निचरा झाला व तो बसून गेला. राजाच्या वेदना थांबल्या व तो खडखडीत बरा झाला. रामशर्माला आलिंगन देऊन राजा म्हणाला - "वैद्यक-शास्त्राचे आपले ज्ञान प्रशंसनीय आहे. इथून पुढे कविता रचत बसून आपल्या वेळेचा दुरुपयोग करू नका."

तेव्हा रामशर्मा म्हणाला - "जशी आपली इच्छा, महाराज ! आपल्या घराच्या परसात सर्व औषधी वनस्पतीच मी लावलेल्या आहेत. मी जेव्हा राजवाड्याच्या परिसरात असतो, तेव्हा सतत काव्य-विषयक चिंतन करीत असतो. पण घरी गेलो की माझं सर्व लक्ष त्या वनस्पतींकडे केन्द्रित झालेलं असतं."

"मग आतापर्यंत तुम्ही मला हे सांगितलं का नाहीत? आता तुमची काव्य गुंडाळून ठेवा आणि वैद्य-वृत्तीच चालू ठेवा." प्रतापवर्माने सल्ला दिला.

काही दिवसांनी तरुण कवींचा एक गट प्रतापवर्माच्या राज्यात आला. राजाने कवि-संमेलनाची व्यवस्था केली. धन्वंतरी अजून शिकाऊ कवि होता, म्हणून राजाने त्याला



या संमेलनात भाग घेऊ दिला नाही.

या वेळीं रामशर्माने कवींच्या प्रश्नांची उत्तरे सहज सहज दिली आणि त्यांनी विचारलेल्या कूट-प्रश्नांची ही समर्पक उत्तरे दिली आणि आपल्या पांडित्याने त्यांना थक्क करून टाकले. राजाला ही याचे मोठे आश्चर्य वाटले.

एक आठवड्या भरात प्रतापवर्माचा चार वर्षांचा मुलगा आजारी पडला. राजाने रामशर्माला बोलवलं. त्याने निरनिराळ्या जडी-बूटी देऊन तीन दिवस उपचार केला, पण मुलाचा ताप काही उतरला नाही.

धन्वंतरीला ही वार्ता समजताच तो राजाकडे आला. आपल्या थैलीतून त्याने एक गोळी काढली आणि ती राजकुमाराला दिली. तासाभरात त्याचा ताप उतरला. नंतर आणखी दोन गोळ्या देऊन त्याने मुलाला पूर्णपणे बरें केले.

प्रतापवर्मा आश्चर्यचकित झाला. त्याने मंत्र्यापुढे आपली शंका व्यक्त केली. मंत्री राजाला म्हणाला - ''महाराज, धन्वंतरीने अभ्यास केला वैद्यकीचा, पण त्याची प्रवृत्ति काव्याकडे झुकते! त्याचप्रमाणे रामशर्मा प्रतिभासंपन्न कवि आहे, पण त्याचे वैद्यकावरही प्रेम आहे. पण याचा अर्थ असा नाही की प्रवृत्तीनुसार आपण जे करतो त्यात निष्णात असले पाहिजे. कारण वृत्तीचा संबंध बुद्धीशी आहे आणि प्रवृत्तीचा संबंध मनाशी ! बुद्धि आणि मन यांचा योग्य समन्वय करून सफलतापूर्वक आपल्या क्षेत्रात प्रवीण बनणे फारच थोड्यांना जमते. हे सामर्थ्य ज्यांच्यात नसतं, त्यांची उदाहरणे आहेत - धन्वंतरी आणि रामशर्मा !''

आता आपली चूक राजाच्या लक्षात आली. त्याने दोघांना बोलवून घेतले आणि म्हणाला - ''आपल्या प्रवृत्तीला अनुसरून जी वृत्ति आहे ती निवडा आणि त्यात प्रवीण व्हा असा सल्ला मी तुम्हा दोघांना दिला होता. पण आता मला आपली चूक समजली. तुम्ही आपापल्या वृत्तीनुसारच काम करावं. फुरसतीच्या वेळात आपल्या प्रवृत्तीनुसार काम करायला हरकत नाही.''





# तलाठी चंदन

रंगापूरचा तलाठी आता म्हातारा झाला. म्हणून त्याने आपले तलाठ्याचे काम आपला भोळा मुलगा चंदनकडे सोपवले. तो चंदनला म्हणाला - ''गावच्या नदीला पूर आला, तरी तलाठ्याच्या घरात पैशांचा पाऊस पडतो असं म्हणतात. आणि ते खरं ही आहे. परंतु सरकारच्या तिजोरीत हात घालणं बरं नव्हे. स्वयंपाकघरात वावरणाऱ्या छोट्या छोट्या उंदरांप्रमाणे गरीब शेतकऱ्यांच्या जिवावर आपल्याला जगायचंय ! श्रीमंत शेतकऱ्यांशी वैर पत्करणं आपल्या हिताचं नाही. गरीब शेतकऱ्यांना मदत करायची, आणि त्यांच्याकडून मदत पण घ्यायची. ही तारेवरची कसरत आहे बघ. सरकारी अधिकाऱ्यांचा रोष आपल्यावर होणार नाही याची पण खबरदारी आपण घ्यायची. हा सगळा विचार करून जेवढा पैसा कमवता येईल तेवढा कमवायचा. अशा रीतीने सावध राहून काम केलंस तर उत्तम तलाठी होशील !''

चंदनने मुकाट्याने वडिलांचे सर्व बोलणे ऐकून घेतले. काही दिवसांनी शत्रुघ्न नावाचा एक शेतकरी चंदनला भेटायला आला. त्याला आपली एक एकर जमीन विकायची होती. म्हणून तलाठ्याने एकदा आपल्या जमिनीची मोजणी करावी व काही बाकी नसल्याबाबत लिहून द्यावे अशी त्याची इच्छा होती. यामुळे खरेदी करणारा निश्चिंतपणे जमिनीचा सौदा करील व आपल्या व्यवहारात काही अडचण येणार नाही असा शत्रुघ्नचा विचार होता.

चंदनने या जमिनी संबंधित हिशोबाची वही पाहिली. शत्रुघ्नने सगळी रक्कम दिल्याची नोंद तर त्याला सापडेना. पण पावत्या मात्र सगळ्या केलेल्या होत्या.

सुषमा जगताप



चंदनने खूप डोके खाजवले, पण असं कसं झालं असावं हे काही त्याच्या लक्षात येईना.गेली चार वर्षे शत्रुघ्न सतत कर देत आला आहे आणि थक-बाकीच्या यादीत मात्र त्याचं नाव आहे !

चंदनने आपल्या वडिलांना ही गोष्ट सांगितली. म्हातारे वडील जोरजोरात हंसत म्हणाले - ''अरे, हीच तर तलाठ्याची कला ! केवळ शत्रुघ्नचीच गोष्ट काय घेऊन बसलास? अन्य अनेक छोट्या छोट्या शेतकऱ्यांची नांवे तुला थक-बाकीच्या यादीत सापडतील. पण भूषण नि रंगा सारख्या श्रीमंत शेतकऱ्यांनी अनेक वर्षे कराची रक्कम दिली नसली, तरी त्यांची नावे तुला थक-बाकीच्या यादीत मिळायची नाहीत. थक-बाकीच्या यादीत ज्यांची नावे आहेत, आणि त्यांनी ज्या रकमा दिलेल्या आहेत त्यांची बेरीज करून होणारी रक्कम श्रीमंत शेतकऱ्यांकडून वसूल करावयाची आहे. शत्रुघ्नासारखे गरीब शेतकरी नियमितपणे आपला कर भरणा करतात, ते मोठे प्रामाणिक आहेत. त्यांना आपल्याला पावती तर द्यावीच लागते. जे श्रीमंत शेतकरी आपला कर देत नाहीत, त्यांची आपल्यावर सरकारतर्फे दबाव पडू नये अशी इच्छा असते. म्हणून ते तलाठ्याला लाच देत राहतात. आपल्याला पैसे मिळतात, म्हणून तलाठी आपल्या हिशोबाच्या वह्यात असं दाखवतो की त्यांनी कराची रक्कम भरलेली आहे, आणि त्यांच्या कडून काही थक-बाकी येणे नाही. शत्रुघ्न सारख्या गरीब शेतकऱ्यांजवळ पावत्या आहेत, पण थक-बाकीच्या यादीत आपण त्यांची नावे दाखवतो. सरकारी अधिकाऱ्यांनी विचारले म्हणजे आपण त्यांना सांगतो - 'बिचारे गरीब शेतकरी हलाखीमुळे वेळेवर कर देऊ शकत नाहीत, त्यांच्यावर फॉर जबरदस्ती करणे बरें नाही.' खोटेच सांगून अधिकाऱ्यांना ही थोडी चिरी-मिरी द्यायची. तलाठ्याच्या कामाचे हेच तर रहस्य !''

चंदनला हे सगळं बरोबर वाटलं नाही. हे तर धोका देणं झालं. त्याने शत्रुघ्नच्या शेताची मोजणी केली आणि काही बाकी नसल्याचे लिहून दिले. व्यवहार पूर्ण झाल्यावर चंदन म्हणाला - ''आमचे आजोबा-पणजोबा यांना कशाची ददात नव्हती. आता जमाना बदलला आहे. श्रीमंत शेतकरी आणि जमीनदार व्यसनाधीन होत आहेत. हळू हळू दिवाळखोर बनत चालले आहेत. आम्हाला सुद्धा जर भरपूर वेतन मिळालं असतं, तर तुझ्या सारख्या गरीब शेतकऱ्यांकडून कशाची अपेक्षा केली नसती !'' शत्रुघ्नने खरीददाराला नमस्कार केला व तो निघून गेला. त्या दिवसापासून थक-बाकीच्या यादीत चंदनने शत्रुघ्नच्या ऐवजी भैरवचे नाव लिहायला सुरुवात केली.

अशा रीतीने दोन-तीन वर्षे गेली. वडिलांच्या मार्गदर्शनानुसार चंदन तलाठ्याचे काम करीत राहिला. दिवस चांगले गेले. अकस्मात् चंदनचे वडील वारले. दहन-संस्कार झाल्यावर अस्थि गंगेत विसर्जित करण्यासाठी त्याला काशीला जावं लागलं. काशीला जाण्यापूर्वी त्याने आपले तलाठ्याचे काम आपल्या जावयाकडे सोपवले.

चंदनच्या जावयाच नाव होतं बच्चन. तो मोठा दुष्ट होता. त्याला वाटलं काही दिवसांपुरतं आपल्याकडे आलेलं काम पक्कं व्हावं. गावातल्या श्रीमंत शेतकऱ्यांना तो भेटला आणि हिशोबातील रहस्ये त्यांना



सांगत म्हणाला - "आमच्या हिशोबा प्रमाणे तुमच्यापैकी कोणी आता कर देण्याची आवश्यकता नाही. गरीब शेतकऱ्यांनी जो कर दिला आहे, त्याच्या पावत्या त्यांच्याकडे आहेत, पण हिशोबात मात्र त्यांची नोंद नाही. अर्थात् हा दोष चंदनचा ! आपण मला सहकार्य दिलेत तर तुमचं भलं होईल !"

बऱ्याच शेतकऱ्यांनी याला मान्यता दिली.

महिन्याभराने चंदन परत आला तेव्हा गावात हाहाकार माजलेला त्याला दिसला. बच्चनने दवंडी पिटवली होती - "ज्या ज्या लोकांनी कर भरलेला आहे, त्यांनी आपापल्या पावत्या घेऊन यावे. जर कोणी कर न भरल्याचे सिद्ध झाले, तर त्याचे शेत जप्त केले जाईल."

आपल्या नावावर थक-बाकी आहे हे ज्या शेतकऱ्यांना समजले, त्यांना फार वाईट वाटले. त्यांनी चंदनकडे जाऊन विचारणा केली. सर्वांना शांत करीत चंदन लपून-छपून श्रीमंत शेतकऱ्यांना भेटला आणि म्हणाला - "बच्चनच्या दुष्ट कारस्थानामुळे तुम्ही आज खुश दिसताहात ! काही महिन्यांपूर्वी पूर आला होता तेव्हा तुम्ही ऊस लावला होतात. माझ्याकडून लिहून घेतलं होतत की केळी लावलेल्या आहेत. सरकारी अधिकाऱ्यांकडून तुम्ही आर्थिक सवलती पण मिळवल्यात. मी वस्तुस्थिति सांगितली तर सर्व जण संकटात सापडाल याची कल्पना आहे का तुम्हाला ? माझी नोकरी गेली तर जाऊ द्या. मला त्याची परवा नाही. पण तुमचं नुकसान आणि मानहानि होईल हे लक्षात ठेवा नीट !"

श्रीमंत शेतकरी या धमकीला भ्यायले. त्यांनी सर्व गावकऱ्यांची एक बैठक घेतली आणि तलाठ्याची तोंड भरून प्रशंसा केली. त्याच्या प्रामाणिकपणाची तारीफ केली.

अशा रीतीने चंदन संकटातून वाचला. पण आता तो अधिक सावध झाला. श्रीमंत नि गरीब शेतकऱ्यांचा हिशोब तो व्यवस्थित ठेवू लागला आणि एक चांगला तलाठी म्हणून प्रसिद्ध झाला.





# महाभारत

द्वारकेत श्रीकृष्णाने राज्यकारभाराची सगळी जबाबदारी वसुदेवावर सोपवली आणि धर्मराज करत असलेल्या राजसूय यज्ञात भाग घेण्यासाठी तो विविध रत्ने, धन-धान्य इत्यादींसह राजधानी इन्द्रप्रस्थ येथे पोचला.

धर्मराज कृष्णाला म्हणाला, "राजसूय यज्ञ पूर्ण करण्यासाठी आम्हाला तुझ्या मदतीची फार गरज आहे. यज्ञाचं काम सुरू करायची मला परवानगी दे किंवा तू स्वतःच तो पूर्ण कर."

कृष्ण म्हणाला, "धर्मराज, तूच यज्ञ कर. माझ्यावर सोपवशील ती कामं मी पूर्ण करीन."

कृष्णाच्या या बोलण्याने धर्मराज फार प्रसन्न झाला. सहदेवाला बोलावून त्याने यज्ञाची सर्व व्यवस्था करवली आणि त्यात भाग घेण्यासाठी चारही वर्णांच्या लोकांना आव्हान केले. नकुलला बोलावून तो त्याला म्हणाला, "हस्तिनापुरला जाऊन तू भीष्म, धृतराष्ट्र, विदुर, द्रोण, कृपाचार्य, अश्वत्थामा, दुर्योधन इत्यादींना आमन्त्रण देऊन बरोबर घेऊन ये."

सहदेवने मोठ्या दक्षतेने सारी व्यवस्था पूर्ण केली. नकुल हस्तिनापुरहून सर्व कौरव प्रमुखांना बरोबर घेऊन आला. सर्व पाहुण्यांना धर्मराजाने राजसूय यज्ञाची माहिती देऊन तो पूर्ण करण्यासाठी त्यांचा सहयोग व आशिर्वाद मिळवले. दानधर्माची जबाबदारी कृपाचार्यांवर सोपवण्यात आली, तर भोजन व्यवस्था दुःशासनाला करायला सांगितली.

**शिशुपाल-वध**



अश्वत्थामाने ब्राह्मणांच्या आदरसत्काराचा भार अुचलला, अन् संजय राजे लोकांच्या सत्कारामागे लागला. अुपस्थित पाहुण्यांकडून येणाऱ्या भेटी स्वीकारून त्या नीट ठेवण्याचे काम दुर्योधनाकडे आले. एकूण सर्व कामे जो तो ठीक करत आहे किंवा नाही, कुठे काही कमतरता तर नाही ना, हे पहाण्याचे काम वडीलधाऱ्या भीष्म-द्रोणांवर सोपवले गेले. अशा प्रकारे कामे सर्वांना वाटून दिल्यावर धर्मराजाने यज्ञदीक्षा ग्रहण केली.

जितके लोक तिथे जमा झाले होते त्या सर्वांची राजसूय यज्ञाबरोबरच मयसभा पहाण्याचीही इच्छा होती. राजेलोक अपार भेटी घेअून आले होते. याग जोपर्यन्त चालू राहिला, तोपर्यन्त ब्राह्मण-भोजनही न थांबता चालू राहिले. यज्ञाचे समापन मोठ्या थाटाने साजरे झाले. शेवटी भीष्म धर्मराजाला म्हणाला, "स्नातक, ऋत्विज, सद्गुरू, इष्टजन, राजे व इन्द्रियांचे समन्वयक पूजनीय मानले जातात. यांच्यात सर्वश्रेष्ठ व्यक्तीची अग्र-पूजा तुला करायला हवी."

यावर धर्मराज भीष्माला म्हणाला, "पितामह, यांच्यात श्रेष्ठ कोण याचा निर्णय आपणच करायला हवा. मी त्या महान् व्यक्तीला अग्रपूजेचे अर्घ्य देईन."

जरा विचार करून भीष्म अुत्तरला, "या सभेत अग्रपूजेयोग्य एकच व्यक्ती, म्हणजे कृष्ण हाच आहे. तेंव्हा अगोदर त्यालाच अर्घ्य दे."

पितामहांच्या आज्ञेचे पालन करत धर्माने सहदेवाला कृष्णाला अर्घ्य द्यायला सांगितले. कृष्णाने सहर्ष ही गोष्ट मान्य केली.

परंतु शिशुपालाने या निर्णयाला विरोध दर्शवत धर्मराजाला म्हटले "धर्मराज, इथे अनेक राजे व अन्य सन्माननीय व्यक्ती अुपस्थित आहेत. असे असताना तू या यादव कृष्णाला अग्रपूजेचा अर्घ्य कसा काय देत आहेस? हा कोणी वडीलधारा थोडाच आहे? हा काय तुम्हा लोकांचा आचार्य आहे का? कि कोणी महान् ऋत्विज? त्याच्यात असे कोणते गुण आहेत, कि यालाच 'योग्य' म्हणून निवडलंय? तुला सल्ला देणाऱ्या भीष्मांना अुचित व अनुचित यांच्यातला फरक कळत नसावासं वाटतंय. कृष्णाचीच अग्रपूजा करायची होती, तर इतक्या साऱ्या राजांना बोलवायची गरजच काय होती? त्या सर्वांचा हा अपमानच नव्हे का? तू मोठा प्रतापी किंवा पराक्रमी आहेस असे समजून काही आम्ही तुला कर दिलेला नाही. तू धर्मपरायण, सत्यव्रती अन् साम्राज्यभार संभाळायला लायक आहेस - या विचारानंच तो दिलाय. पण आत्ताचं हे कुकर्म करून तू केलेलं सगळं खड्ड्यात घालवलंयस, आपल्या धवल कीर्तीला काळं फासलंस बघ!" अन् क्रोधाने लाल झालेला शिशुपाल आपल्या परिवारासह मंडप सोडून जायला निघाला.

त्याच्या मागे धावत धर्मराज म्हणाला, "थांब शिशुपाल! असा मंडप सोडून जाअू नकोस. तुझं हे असलं बोलणं अुचित नव्हे. अन्यायपूर्ण बोललास तू! पितामह भीष्मांसारख्या वृद्धाचा असा अपमान करणं अुचित नव्हे. कृष्णाच्या बाबत त्यांना तुझ्यापेक्षा अधिक माहिती आहे. तुझ्यापेक्षाही मोठे लोक इथे अुपस्थित आहेत, पण त्यांच्यापैकी कोणीही आपला विरोध दर्शवला नाहीय. मग तूच एकट्याने असले आरोप कसे काय केलेस?" समजावणीच्या आवाजात असे बोलून धर्मराजाने शिशुपालला शांत करायचा प्रयत्न केला.

आता भीष्म धर्मराजाला म्हणाले, "कशाला त्या दुष्ट शिशुपालासमोर गयावया करतोस? जाअू दे त्याला बाहेर." नंतर तेथील इतर सभासदांना अुद्देशून ते म्हणाले, "हा





शिशुपाल अतिमूर्ख आहे. त्यामुळेच कृष्णाचं महत्त्व तो ओळखत नाही. आपण जे करत आहोत, ते त्याला आवडत नसेल, तर त्याला काय हवं ते करु दे. आपण मुळीच त्याची पर्वा करायचं कारण नाही.''

तेंव्हा शिशुपालाचा सेनापती सुनिदृ उठून म्हणाला, ''राजेलोकहो उठा! यादव अन् पांडवांनी आपला घोर अपमान केलाय. आपली सैन्यं सज्ज करुन आपल्या या अपमानाचा सूड घेऊ.'' अन् त्याने आपल्या पक्षाच्या सर्व राजांना एका बाजूला उभे केले, शिशुपालाची अर्थात् याला संमती होतीच.

यावर भीष्म म्हणाले, ''कृष्ण स्वत: इथे यज्ञरक्षणार्थ हजर असताना त्यात कोणीही विघ्न आणू शकणार नाही. तितकी शक्तीच कुणाच्यात नाही. शिशुपालाची वेळ भरली आहे, म्हणूनच त्याला असली दुर्बुद्धि सुचलीय.''

आता तर शिशुपालाचा स्वत:वरील ताबा अजिबातच सुटला! भीष्मांना संबोधून तो अद्वातद्वा बोलू लागला. कृष्णालाही तो खूप अपशब्द बोलत राहिला, त्याची निन्दा केली. शिशुपालाचे बोलणे ऐकून भीम एकदम चवताळला.

रौद्ररूप धारण करुन, दातओठ खात तो शिशुपालाच्या दिशेने सरकू लागताच भीष्मांनी त्याला अडवले.

नंतर भीष्मांनी भीमाला शिशुपालाचा जन्मवृत्तान्त सांगितला. - शिशुपाल जन्मला तेंव्हा त्याला तीन डोळे व चार हात होते. गाढवासारखा रेकतच तो जन्मला. त्याचे अष्टावक्र रूप पाहून त्याची माता सात्वती व पिता दमघोष घाबरुन त्याला फेकूनच देणार होते. पण इतक्यात आकाशवाणी झाली की, ''आपण हे मूल फेकून देऊ नका. हा महापराक्रमी निपजेल. आत्ता याची मृत्युवेळ नाहीय. त्याला मारुन टाकणारा अगोदरच जन्माला आलेला आहे व आपल्या घरी तो वाढत आहे.''

आता सात्वतीच्या मनात पुत्रमोह जागा होऊन आकाशवाणीला तिने विचारले, ''कोण मारणार आहे याला?''

आकाशवाणीकडून उत्तर मिळाले, ''ज्याच्या मांडीवर ठेवल्या नन्तर या बाळाचे जास्तीचे अवयव गळून पडतील, त्याच्याच हातून याचा मृत्यु घडेल.''

तेंव्हा पासून सात्वती भेटायला येणाऱ्या प्रत्येकाच्या मांडीवर आपल्या बाळाला ठेवून पाहू लागली.

अशातच एकदा बलराम व कृष्ण चेदिपुरला आले व थोडा वेळ राजा दमघोषशी गोष्टी करत राहिले. नंतर ते अंत:पुरात जाऊन सात्वतीलाही भेटले.

खुशालीची बोलणी झाल्यावर तिने आपले बाळ बलरामाच्या मांडीवर ठेवले अन् नन्तर उचलून कृष्णाच्याही हाती दिले.

कृष्णाने ते बालक आपल्या मांडीवर ठेवल्याबरोबर त्याचा अनावश्यक डोळा व दोन हात नाहीसे झाले ! सात्वतीला कळून चुकले की आपल्या पुत्राचा मृत्युही कृष्णाच्याच हातून होणार आहे. तिने कृष्णाला विनवले की, त्याने या बाळाच्या हातून पुढे घडणाऱ्या चुकांना क्षमा करावी.

कृष्णाने तिला वचन दिले की, ''मी याचे शंभर अपराध पोटात घालीन.''

भीष्मांनी सांगितलेली ही गोष्ट ऐकूनही शिशुपाल त्यांना शिव्याशाप देतच राहिला. नंतर कृष्णाला उद्देशून तो म्हणाला, ''अरे, युद्ध कर ना माझ्याशी ! मी तुला मारुन टाकत नाही, तोवर हा म्हातारा भीष्म असाच काहीतरी बकबक करत राहील. तुला मारुन टाकून मी याची घमेंड जिरवतो बघ! नंतर या पांडवांनाही पाहून घेईन. यांनी अपमान केलाय आम्हा सर्वांचा ! तुझी पूजा केल्याच्या अपराधाची चांगली शिक्षा करणार आहे मी त्यांना !'' अशा प्रकारे बराच वेळ शिशुपाल तोंडाला येईल ते बडबडत राहिला.



कृष्ण इतका वेळ शान्तपणे सर्व काही पहात व ऐकत होता. त्याची सहनशक्ती जेंव्हा संपली, तेंव्हा तो उपस्थित लोकांना म्हणाला, ''आपण सर्वांनी याचं गरळ ओकणं ऐकलं आहेच. हा माझा मामेभाऊ असूनही याने आम्हा यादवांशी खूप गैरवर्तणूक केली; आमचं खूपसं नुकसान केलंय. आम्ही जेंव्हा



प्रागज्योतिषपुरवर हल्ला केला होता, तेंव्हा याने द्वारकेत प्रवेश केला अन् आग लावून भागूबाईसारखा पळून गेला. आम्ही रैवतक पर्वतावर विश्रान्तीसाठी गेलो असताना हा तिथे उपस्थित झाला. आमच्यातल्या काही जणांना याने ठार केलं अन् काही बायका पळवून घेऊन गेला.

माझे पिता वसुदेव अश्वमेध यज्ञ करत असताना त्याने यज्ञाच्या वारूचं अपहरण केलं. बभ्रुवाहनाच्या पत्नीलाही हा अुचलून घेऊन गेला. याला रुक्मिणीशी विवाह करायचा होता; पण ते जमलं नाही त्याला.

हे सारे अन् असेच आणखी कित्येक अन्याय आणि अनाचार याने केले आहेत. पण मामीला दिलेल्या वचनामुळे आम्ही गप्प राहिलो. तो धर्म होता माझा !''

कृष्णाचे हे बोलणे ऐकून विकटपणे हसत शिशुपाल बोलला, ''कृष्णा! जी वधू मी पसंत केली, तिच्याशी तू लग्न करून मोकळा झालास! अन् तोंड वर करून सांगायला तुला लाजही नाही वाटत? निर्लज्ज कुठचा ! गोष्टी तर अशा करतोयस, की जसा काही तुझ्या दयेनंच मी जगतो आहे! मी मुळीच भीत नाही तुला. कर काय करायचं असेल ते !''

त्याबरोबर कृष्णाने आपले सुदर्शन चक्र हातात घेतले अन् शिशुपालाच्या दिशेने ते सोडून दिले. चक्राने शिशुपालाचे मस्तक धडावेगळे केले अन् तो धराशायी झाला. त्याच्या शरीरातील तेजतत्त्व बाहेर पडून कृष्णाच्या शरीरात जाऊन मिळाले. हे पाहून सर्वजण आश्चर्यात बुडाले !

धर्मराजाने नंतर शिशुपालाची अन्त्यक्रिया करवून त्याच्या मुलाचा राज्याभिषेक घडवला.

राजसूय यज्ञ पूर्ण झाला अन् धर्मराजाने स्नान करून यज्ञदीक्षेची सांगता केली. सर्व राजांनी आता सम्राट बनलेल्या धर्मराजाचे अभिनन्दन करून आपापल्या स्थानी परत जाण्यासाठी आज्ञा मागितली.

धर्मराजाने त्या सर्वांचा अुचित सत्कार करून नंतर सीमेपर्यन्त स्वतः जाऊन त्यांना निरोप देण्याची आपल्या बंधूंना आज्ञा केली. यानन्तर कृष्णही द्वारकेला निघून गेला. पण

मयसभा पाहण्याच्या तीव्र इच्छेने दुर्योधन मात्र शकुनीसह तेथेच राहिला.

एके दिवशी महर्षी व्यास धर्मराजाच्या सभेत आले. आपले शंकानिरसन करून घेण्यासाठी धर्मराजाने त्यांना विचारले, "राजसूय यज्ञाच्या वेळी शिशुपालवध झाला. हा एखाद्या अुत्पाताचा संकेत तर नव्हे?"

"होय, हा अुत्पातच आहे. याचं फळ तेरा वर्षांनी दिसेल. त्यावेळी क्षत्रियांचा खूप संहार होईल." कृष्णद्वैपायन व्यास म्हणाले.

हे ऐकून धर्मराज दुःखाने व्याकुळ झाला. अर्जुनाने त्याला धीर दिला.

मयसभा पहायला अुत्सुक असलेल्या दुर्योधनाची मात्र फार मानहानि झाली. पाणी नसलेला भाग जलमय समजून तो आपली वस्त्रे अुचलून धरून चालत राहिला; अन् अुलट कोरडी जागा समजून चालत असताना त्याची वस्त्रे भिजून चिंब झाली. ते पाहून भीम, अर्जुन, नकुल, सहदेव, द्रौपदी आणि सेवक सेविका हसू लागले. धर्मराजाला जेंव्हा हे समजले, तेंव्हा दुर्योधनाचे मन दुखावू नये म्हणून त्याने दुर्योधनाला दुसरी वस्त्रे दिली.

तरी नंतरही दुर्योधनाचा वेळोवेळी अपमानच होत राहिला. अुघडा दरवाजा समजून तो त्यातून पलिकडे जाअू लागला तेंव्हा त्या जागी असलेल्या भिंतीवर त्याचे डोके आपटून टेंगूळ आले.

एका ठिकाणी जमीन समतल होती, पण तेथे चढ समजून दुर्योधनाने चढायचा प्रयत्न केला, अन् त्याने साष्टांग नमस्कार घातला! मयसभा पाहून आनन्द लुटायच्या विचाराने आलेल्या दुर्योधनाला ती काट्यासारखी सलू लागली!

ईर्ष्येने तो जळू लागला. धर्मराज सम्राट बनला, त्याला लोकोत्तर अशी मयसभा मिळाली. याबद्दल विचार करता करता त्याच्या क्रोधाचा पारा चढतच राहिला. मनातल्या मनात तो स्वतःला बलहीन समजू लागला.

धर्मराजाचा निरोप घेअून तोही हस्तिनापुरला निघून गेला.



**'चांदोबा'**
**पुरवणी - ९०**

**आपल्या देशाची**
**वृक्ष-संपदा**

# खेरटी

परमशिव नंदीवर बसून चालले होते. वाटेत त्यांना वैतरणी नदी दिसली. परमशिव स्नानासाठी नंदीवरून उतरले. बांधावर उभ्या असलेल्या नंदीने जवळच्या एका झाडाजवळ जाऊन त्याच्या पानांना डोक्याने स्पर्श केला. शिवाने नंदीला विचारले - "तू असं का बरे केलंस?" नंदीने उत्तर दिले - "हे खेरटीचे झाड आहे. या झाडाच्या पानांना स्पर्श केला म्हणजे उत्तम भोजन मिळते असं पुराणात सांगितलंय. म्हणून मी त्यांना स्पर्श केला." तेंव्हा शिव म्हणाले - "मला पुराणातल्या गोष्टी सांगत आहेस? आता मी पण पाहतो तुला काय खायला मिळतंय ते!" शिव नंदीवर बसून उगाचच इकडे तिकडे फिरत राहिले. बिचाऱ्या नंदीला काहीच खायला मिळाले नाही.

कैलास पर्वतावर पार्वती आपल्या नवऱ्याची वाट पहात बसली होती. बराच वेळ झाला, तो आला नाही, म्हणून दोघांच्यासाठी बनवलेली पक्वान्ने आपल्या पुढ्यात घेऊन तिने खायला सुरुवात केली. एवढ्यात तिला नंदी येत असल्याची चाहूल लागली. ती घाबरली. तिला वाटलं- आपण मोठी चूक केली. नवऱ्याच्या अगोदर आपण खाणं योग्य नव्हे. तिने लगबगीने सगळी पक्वान्ने उचलली आणि नंदीपुढे ठेवली. आणि ती नवऱ्याला सामोरी आली. तिने पाहिले की शिव खूप रागावलेले आहेत.

नंदीवरून उतरत शिव पार्वतीला म्हणाले - "आज याला काही खायला देऊ नकोस!" आज परमशिव आपल्यावर का नाराज आहेत हे नंदीच्या लक्षात आले नाही. वाईट वाटून तो झोपायचा प्रयत्न करू लागला. पण पक्वान्नांचा सुगंध त्यांच्या नाकात शिरला. जवळच ठेवलेल्या पक्वान्नांवर नंदीने आनंदाने ताव मारला.

खेरटी वृक्षाबाबत पुराणात सांगितलेली गोष्ट व्यर्थ नाही हे या कथेवरून सिद्ध होते. वनस्पती शास्त्रात या वृक्षाला स्ट्रेब्लस यास्पर म्हणतात. इंग्रजीत म्हणतात सिया रशबुश. हिंदी व बंगालीत सेहोरा, मराठीत खेरटं मल्याळीत परुका, तमिळ मध्ये पिरियामरम् आ तेलगूत बारींकि म्हणतात. .

या झाडाची अंडाकृति पाने टोकाला अणकुचीद असतात. पाने दोन्ही बाजूंनी खरखरीत असल्यामुळे लाकूड व हस्तिदंत गुळगुळीत करण्यासाठी वापरता या झाडाची फुले छोटी व हिरव्या रंगाची असता जानेवारी ते मार्च पर्यंत फुलांना बहर असतो. झाडा साल खाकी रंगाची असते. सालीत औषधी गुण असतात.



# उदंक

महाभारतात उल्लेखिलेल्या प्रसिद्ध महाऋषींत एक प्रमुख ऋषि आहेत उदंक.

उदंक पैलमुनींचे शिष्य होते. गुरुगृही आपला विद्याभ्यास संपल्यावर त्यांनी गुरूला विचारले - ''गुरुजी, आपल्या ऋणातून मुक्त होणे तर फार कठिण आहे. पण आपणास गुरु-दक्षिणा देण्याची फार इच्छा आहे. आपणास काय पाहिजे ते सांगाल मला?''

गुरू म्हणाले - ''मला तर काही नको. गुरु-पत्नीला जाऊन विचार तिला काही हवं असेल तर! उदंक गुरू-पत्नीकडे गेला आणि तोच प्रश्न विचारला. ऋषि-पत्नि म्हणाली ''तुला जमलं तर पौष्य राजाच्या राणीच अद्भुत कुंडलं मला आणून दे !''

उदंक पौष्य राजाकडे आला आणि आपल गुरू-पत्नीची इच्छा त्याला सांगितली.

राजा उदंकला म्हणाला - ''राणी अंतःपुरा आहे. तूच तिच्याकडे जा आणि मागणी कर.

उदंक अंतःपुरात गेला, पण राणी ते नव्हती. तो राजाकडे परत आला आ राणीची भेट न झाल्याची वार्ता सांगितल थोडा वेळ गप्प राहून राजाने विचारले ''आज सकाळी तू स्नान केलं होतस का ध्यान केलस का? देवी-देवतांना नैवेद्य समर्पि करून नंतर तू भोजन केलंस का?''



उदंक म्हणाला - ''नाही!''

''मग या नियमांचं पालन करून उद्या अंतःपुरात जा. तुला राणी भेटेल.'' राजाने सुचवले.

दुसऱ्या दिवशी राजाच्या सूचनांचे पालन करून उदंक राणीला भेटण्यासाठी अंतःपुरात गेला. राणी अंतःपुरात होती. उदंकच्या नम्र बोलण्यावर राणी खुश झाली आणि आपली कुंडलं तिने उदंकच्या स्वाधीन केली.

गुरूच्या आश्रमाकडे परत येत असता वाटेत उदंकला एक सरोवर दिसले. त्याला स्नान करावेसे वाटले. एका दगडावर कुंडले ठेवून तो स्नानासाठी सरोवरात उतरला. स्नान करीत असताना त्याने पाहिले की एक संन्यासी ती कुंडले उचलून पळून चालला आहे. उदंकने संन्याशाचा पाठलाग केला. संन्यासी एका गुहेत शिरला आणि साप बनून बिळात घुसला.

उदंकने इंद्राला प्रार्थना केली. दुसऱ्याच क्षणी इंद्राने आपल्या वज्रायुधाने बीळ नष्ट करून टाकले. तेव्हां पाताळाचा मार्ग दिसू लागला. उदंक त्या मार्गाने पाताळात पोंचला. त्याने सर्पराजाची प्रशंसा केली आणि संन्याशाने चोरलेली कुंडले परत मिळवली.

पातळात दोन स्त्रिया काळ्या नि पांढऱ्या धाग्यांनी एक वस्त्र विणत असलेल्या उदंकने पाहिल्या. चाकाला बारा आरे होते आणि सहा मुले चाक फिरवत होती.

उदंकने आश्रमात येऊन गुरु-पत्नीला कुंडले समर्पित केली. नंतर त्याने गुरूला आपल्या



प्रवासाची सर्व हकिगत सांगितली आणि आप पाताळात जे काही पाहिलं त्याचं वर्णन केल तेव्हा गुरूने स्पष्ट करून सांगितलं - ''पांढ नि काळे धागे दिवस व रात्रीचे द्योतक आहे ते चाक म्हणजे काल-चक्र. त्याचे बारा अ म्हणजे वर्षाचे बारा महिने ! आणि चक्रा गति देणारे सहा बालक म्हणजे षड्ऋतु !'

उदंकाच्या या कथेत एक गूढ रहस्य लपले आहे. सृष्टीच्या रहस्यांचा उलगडा करण्यास उदंकाचा पाताळ-प्रवेश आहे. कुंडले गू ज्ञानाकडे संकेत करतात. अविचल आग्रह कठोर परिश्रम आणि सतत सावधानी यांच्या बळावरच दिव्य ज्ञान प्राप्त होऊं शकते उदंकच्या या कथेचे सार होय.

# तुम्हाला माहीत आहे ?

१. जगातील महाकाव्यात कोणते अति-विशाल आहे?
२. कोणता देश सर्वात अधिक भूकंपग्रस्त आहे?
३. पूर्वी संदेश-वहनाचे काम पक्षी करीत असत. यासाठी कोणत्या पक्ष्यांचा उपयोग केला जाई?
४. दगड खाणाऱ्या पक्ष्याचे नाव काय?
५. सूर्यमालेतील सर्वात मोठा ग्रह कोणता?
६. नाईल नदीचा वर प्राप्त झालेला देश कोणता?
७. पाऊस कसा सुरू होतो?
८. जैन धर्माचे संस्थापक कोण?
९. माणसाच्या हृदयाचा आकार केवढा असतो?
१०. थर्मामीटर मध्ये कोणत्या द्रवाचा उपयोग करतात?
११. अमेरिकेचे पहिले अध्यक्ष कोण?
१२. तीन महासमुद्रांची नावे कोणती?
१३. नर्स-व्यवसायाचा आरंभ एका स्त्रीमुळे झाला. ती कोण?
१४. सूर्यकिरणांपासून कोणते व्हिटामिन मिळते?
१५. आपल्या देशात कोणत्या वयात मताधिकार प्राप्त होतो?
१६. १९९६ हे लीप वर्ष आहे. ते किती वर्षातून एकदा येते?
१७. 'बुल-फाइट' साठी प्रसिद्ध देश कोणता?

## उत्तरे

१. महाभारत.
२. जपान.
३. कबुतर.
४. शहामृग.
५. गुरु.
६. ईजिप्त.
७. ढगातील पाण्याचे थेंब जेव्हा आपले वजन सहन करू शकत नाहीत तेव्हा.
८. वर्धमान महावीर.
९. माणसाच्या मुठी एवढा.
१०. पारा.
११. जॉर्ज वॉशिंग्टन.
१२. पॅसिफिक, अॅटलांटिक, हिन्द.
१३. फ्लॉरेन्स नाइटिंगेल.
१४. व्हिटामिन 'डी'.
१५. अठरा वर्षे.
१६. चार वर्षातून एकदा.
१७. स्पेन, मेक्सिको.



# शिल्प-सुंदरी

मानसवर्मा मधुमती नगरीचा शासक होता. तो मोठा कलाप्रेमी होता, आणि होता विष्णुभक्त. आपल्या नगरीत एक अति-सुंदर नि भव्य विष्णु-मंदिर असावं असं त्याला वाटे. त्याने तशी एक योजना बनवली आणि प्रमुख शिल्पी म्हणून रत्नाकरची योजना केली. रत्नाकर २५ वर्षे वयाचा युवक होता आणि एक अद्‌भुत शिल्पकार होता. मंदिरासाठी जी जागा निश्चित करण्यात आली, तिथेच जवळ त्याने एक झोपडी बांधली आणि आपल्या वडिलांसह राहू लागला.

रत्नाकर तल्लीन होऊन एकाग्र चित्ताने आपल्या मूर्तीचे कोरीव काम करीत असे. त्याने घडवलेली शिल्पे मोठी मनमोहक असत. त्याच्या स्पर्शाच्या किमयेने मूर्ति जिवंत वाटत.

एक दिवशी सकाळी मूर्ति घडविण्यासाठी योग्य अशा शिळेच्या शोधात तो डोंगरात खूप दूरवर गेला. त्याच्याबरोबर एक गाडी आणि नऊ सेवक होते. गाडीला हत्ती जुंपलेला होता.

बराच वेळपर्यंत रत्नाकर शिळांचे अवलोकन करीत राहिला. दुपारपर्यंत त्याला चार-पाच शिळा सापडल्या. त्या त्याने गाडीत चढविल्या. पण जे एक भव्य शिल्प त्याला घडवायचे होते, त्यासाठी योग्य अशी शिळा मात्र अजून त्याला सापडली नव्हती. एकादा मोठा दगड दिसला तर तो योग्य मापाचा नसायचा. योग्य मापाचा एकादा दगड दिसला, तर तो गुणवत्तेत कमी असायचा. यामुळे तो अमळ निराश झाला.

शेवटी एका तलावाच्या काठाशी बसून त्याने आपले भोजन उरकले. गाडीत ऊस होता, तो हत्तीपुढे ठेवला.

रत्नाकर पुन्हा शिळेच्या शोधार्थ

शिरीष कांबळे



निघाला. पाहता पाहता संध्याकाळ झाली. पण त्याला पाहिजे तशी शिळा कोठे दिसेना. सेवक रत्नाकरला म्हणाले - ''अंधार पडला की जंगलात हींस्र श्वापदे संचार करू लागतात. म्हणून आता राजधानीकडे परत फिरलेलं बरं !'' ते पुन:पुन्हा रत्नाकरला सूचना देत राहिले.

रत्नाकरला ही आता परत फिरावं असं वाटू लागलं. पण आपल्या संकल्पित भव्य शिल्पासाठी आवश्यक ती शिळा न घेताच परत जायला त्याचं मन तयार नव्हतं. म्हणून सेवकांच्या सूचनेकडे लक्ष न देता तो शिळेचा शोध करीत राहिला.

त्याच वेळी एका वडाच्या झाडाखाली सोन्यासारखी चमचमणारी एक शिळा त्याला दिसली. संध्याकाळचे सोनेरी किरण त्या शिळेवर पडले होते, त्यामुळे ती अगदी सोन्यासारखी चमकत होती. रत्नाकरला ती शिळा पाहून मोठं आश्चर्य वाटलं. तिची रुंदी चांगली सहा फुट होती. सोनेरी रंगाच्या अशा शिळा फारशा आढळत नाहीत. त्याला वाटले आज परमेश्वराने आपल्यावर कृपा केली. सेवकांकडून त्याने ती शिळा गाडीवर चढवली आणि राजधानीकडे निघाला. त्याच्या झोपडीत तेव्हा सर्वत्र अंधार पसरलेला होता.

का कुणास ठाऊक पण रत्नाकरला त्या रात्री झोप लागली नाही. मध्यरात्रीनंतर त्याला थोडी डुलकी लागली. त्याने एक आवाज ऐकला. ''रत्नाकर, मी एक गंधर्व-कन्या आहे! कुणी तरी मला शाप दिला आणि मी शिळा बनले. तू डोंगरावरून जी सोनेरी शिळा आणलीस ती मी आहे. तू एक उत्तम शिल्पकार आहेत हे मी जाणते. आपल्या कलापूर्ण हातांनी या शिळेत माझीच प्रतिमा कोर. माझ्या भाग्यात असेल तर माझा उद्धार होईल !'' गंधर्व-कन्या म्हणाली. रत्नाकर आपल्या बिछान्यावर उठून बसला.

रत्नाकरला या स्वप्नाचं मोठं आश्चर्य वाटलं. डोंगरावर ही शिळा त्याला जेव्हां दिसली, तेव्हाच त्याला शंका आली होती. या स्वप्नामुळे त्याचा संदेह अधिक दृढ झाला.

सकाळी रत्नाकरने आपल्या वडिलांना रात्रीचे स्वप्न सांगितले. लक्षपूर्वक सर्व ऐकल्यावर वडील त्याला म्हणाले - ''बेटा, मला वाटतंय तू आणलेली शिळा मोठी अद्भुत आणि विचित्र आहे! तू स्वप्नात जे काही पाहिलंस ते एक सत्य आहे. सगळं महाराजांना जाऊन तू सांगावस हे बरं!''

वडिलांच्या इच्छेनुसार रत्नाकर राजाकडे गेला. त्याने राजाला सर्व काही सांगून टाकलं. थोडा वेळ शांतपणे विचार करून राजा, आपल्या गुप्त कक्षात गेला.

रत्नाकरचं डोंगरात जाणं, त्याला तेथे एक सुवर्ण-शिळा दिसणं आणि रात्री स्वप्नात येऊन गंधर्व-कन्येने रत्नाकरला संदेश देणं - हे सर्व राजाने दैवज्ञाला सविस्तर सांगितलं अन् विचारलं - ''आता आम्ही काय बरं करावं?''

दैवज्ञाने काही वेळ डोळे मिटून ध्यान केले. आणि मग डोळे उघडून तो राजाला म्हणाला - ''महाराज, रत्नाकरला मिळालेली शिळा खरोखरीच शापित गंधर्व-कन्याच आहे. मय नावाचा एक राक्षस शिल्पकार होता. त्याच्या शिष्यांमध्ये एक होता परांकुश. त्याने मानसी नावाच्या एक गंधर्व-कन्येला पाहिले आणि तो तिच्यावर मोहित झाला. तो तिला म्हणाला - ''तू फार सुंदर आहेस. मी तुझ्यासारखी सुंदर एक तुझी प्रतिमा शिळेत कोरीन !'' मानसीने हे मान्य केले आणि मोठ्या दिमाखाने त्याच्यासमोर जाऊन उभी





राहिली. परांकुशने सुरेख मूर्ति तर घडवली, पण मानसी,त्याची थट्टा करीत म्हणाली - ''माझी ही प्रतिमा माझ्यासारखी सुंदर मुळिच नाही!'' परांकुश तिच्यावर खूप रागावला आणि तिला सुवर्ण-शिळेत बदलून टाकून त्याने भूलोकी फेकून दिले. मला वाटतं या शिळेतून भगवान विष्णूची मूर्ति बनवणं इष्ट नाही, कारण या शिळेत गंधर्व-कन्येचा आत्मा निवास करीत आहे. म्हणूनच तिने रत्नाकरला स्वप्नात येऊन सूचना दिली. या शिळेची आणखी एक विशेषता आहे. हिच्यातून जी मूर्ति घडवली जाईल ती नित्य सजीव व चिरनूतन वाटेल.''

वार्धक्याच्या उंबरठ्यावर असलेल्या राजाला दैवज्ञाच्या साऱ्या गोष्टी ऐकून एक अजब कल्पना सुचली. गुप्त कक्षातून बाहेर आल्यावर राजा रत्नाकरला म्हणाला - ''शिल्पी, या सुवर्ण-शिळेतून तू माझी प्रतिमा बनव. दहा दिवसात हे काम झालं पाहिजे.''

रत्नाकरने होकारार्थी मान हलवली. घरी परत आल्यावर त्याने वडिलांना राजाची आज्ञा सांगितली. वडील म्हणाले - ''बेटा, तुला जे न्यायोचित वाटेल तेच कर. कुणाला भिऊन काही करू नकोस.''

त्या रात्री गंधर्व-कन्या पुन्हा रत्नाकरच्या स्वप्नात आली. आणि तिने रत्नाकरला सुचवले - ''राजाची आज्ञा स्वार्थपूर्ण आहे. ती शिळा माझी आहे आणि तिच्यातून माझी प्रतिमा घडविणेच न्यायसंगत आहे हे विसरू नकोस.''

काही ही असो, या शिळेतून गंधर्व-कन्याच साकारायची असा रत्नाकरने निश्चय केला.

दुसऱ्या दिवशी सकाळी रत्नाकर उठला आणि शिळेसमोर बसून त्याने गंधर्व-कन्येच्या रूपाचे चिंतन केले. नंतर एकाग्र होऊन आपली छिन्नी तो शिळेवर चालवू लागला. शिळेवर कोरीव काम करीत असता रत्नाकरला एक अनिर्वचनीय आनंद होत होता. तयार होत असलेले शिल्प मंदस्मित करीत असल्याचा त्याला भास होई. ते शिल्प मधून मधून सुस्कारे टाकीत त्याच्याशी कानगोष्टी करीत आहे असे त्याला वाटे.

दहा दिवसात गंधर्व-कन्येची मूर्ति तयार झाली. रत्नाकरने एकदा मूर्तीकडे नखशिखान्त पाहिले आणि तो आपल्यावरच खुश झाला.

राजा आपल्या राणीसह आपली मूर्ति पाहण्यासाठी आला. त्या सुवर्ण-शिळेतून अवतरलेली गंधर्व-कन्या पाहून राजाला मोठं आश्चर्य वाटलं. त्याने रत्नाकरला प्रश्न केला - ''ही शिल्प-सुंदरी कोण? तू तर अद्‌भुत शिल्पकार आहेस! जणू ब्रह्माचा वंशज!'' रत्नाकरची प्रशंसा करीत असताना राजाला आपल्या मूर्तीची आठवण झाली. अमळ संशयाने राजाने विचारले - ''ही मूर्ति तर जणु सोन्याचीच आहे. तू माझी प्रतिमा बनविणार होतास, ती कुठे आहे?''

रत्नाकर नम्रतापूर्वक म्हणाला - ''महाराज, क्षमा करा. अत्यंत अनिवार्य परिस्थितीत मला या शिळेतून ही गंधर्व-कन्या साकार करावी लागली. आपण आताच तिची प्रशंसा करीत होता!''

त्याचे हे बोलणे ऐकून राजाचे डोळे रागाने लाल झाले. तो अधिकार-वाणीने म्हणाला - ''मी तुला त्या सुवर्ण-शिळेतून माझी प्रतिमा घडवायला सांगितलं होतं, आणि तू धूर्तपणे गंधर्व-कन्या बनवलीस हं? राजाची अवज्ञा करण्याची काय शिक्षा असते तुला ठाऊक आहे न? फाशीची शिक्षा ! चल हो तयार.''

रत्नाकर मान खाली घालून उभा राहिला. दुसऱ्याच क्षणी आकाशात गर्जना झाली. पहाता पहाता काळे-कुट्ट ढग जमा झाले. मुसळधार पाऊस सुरू झाला. आकाशांतून एक विजेचा लोळ जोरात खाली येऊन गंधर्व-कन्येच्या मूर्तीवर आदळला आणि मूर्तीचे तुकडे-तुकडे होऊन गेले.

राजाला दैवज्ञाने सांगितलेल्या गोष्टी आठवल्या. जर गंधर्व-कन्येऐवजी शिल्पकाराने राजाची प्रतिमा घडवली असती तर राजाचा असाच अंत झाला असता. केवळ त्या कल्पनेनेच राजा भयभीत झाला.






# पैशांचा-फासा

एका कुग्रामात एक शेतकरी रहात होता. दुर्दैवाने तो आणि त्याची बायको एका पाठोपाठ एक मरण पावले. त्याला तीन मुलगे होते.

मोठा मुलगा म्हणाला - ''हे घर माझं आहे!''

मधला म्हणाला - ''हे ओसाड शेत माझं!''

धाकट्याने दोन्ही भावांना विचारले - ''मग माझ्या वाट्याला काय रे?''

घर भर शोधा-शोध केली. खुंटीवर एक दोरखंड लटकत होतं. मोठा नि मधला भाऊ म्हणाला - ''हा दोर तुझा ! याच्या मदतीने तुला काय हवं ते कर.''

धाकटा मोठा हिंमती होता. त्याचा उत्साह ओसंडत होता. तो म्हणाला - ''ठीक आहे, या दोरखंडाच्या जिवावरच मी जिवंत राहीन!'' त्याने दोरखंड आपल्या खांद्यावर लटकवलं नि घराबाहेर पडला.

जंगलातील वाटेने चालत असताना त्याने काही जंगली पशु पाहिले. आपल्या दोरखंडाचा एक फास बनवून त्याने एक खार व ससा यांना पकडले. त्याने एक लाकडी पिंजरा बनविला आणि खार व सशाला त्यात ठेवून दिले. पिंजरा घेऊन तो एका तलावाच्या जवळ पोचला.

जवळच एक अस्वल जंगलात घुसताना त्याने पाहिले. तो एका झाडाखाली उभा राहिला नि आणखी काही पशु पकडण्यासाठी लहान मोठे फासे तयार करीत राहिला.

त्या तलावात एक जलराक्षस रहात होता. त्याने पाण्यातून आपलं डोकं वर काढलं आणि झाडाखाली उभ्या असलेल्या मुलाला पाहिलं. हा मुलगा काय करतोय हे मात्र राक्षसाच्या लक्षात आले नाही. राक्षस खोल पाण्यात शिरला आणि आपल्या मुलाकडे जाऊन म्हणाला - ''तलावाच्या काठावर एक मुलगा उभा आहे. तो काय करतोय जरा नीट पाहून ये बरं.''

जलराक्षसाचा मुलगा पाण्यातून बाहेर पडला आणि धाकट्या मुलाकडे जाऊन त्याने विचारले - ''तू काय करतोयस इथे?''

हा मुलगा जलराक्षस आहे हे धाकट्याने ताडले. जल-राक्षसांबाबत तो काही ऐकून होता. ते बुद्धिहीन असतात आणि जे ज्यांना वश होतात, त्यांना मुक्ति मिळत नाही असं त्याने ऐकले होते. जरा ही भय न बाळगता तो जलराक्षसाच्या मुलाला म्हणाला - ''दिसत नाही का तुला?-मी या दोराचा फास बनवितो आहे. या तलावावर फास टाकून मी त्याला पकडणार आहे. तुम्हा सर्व जलराक्षसांना आता आपल्यासाठी एकादी नवी जागा पहायला हवी.''

जलराक्षसाचा मुलगा तलावाच्या तळाशी जाऊन आपल्या वडिलांना म्हणाला - ''फास टाकून हा मुलगा आपला तलाव पकडणार आहे. आपल्याला दुसरी एकादी जागा पहावी लागेल असं तो म्हणतोय!''

''हे तर आपल्यावर मोठं संकटच कोसळलंय. तू ताबडतोब त्याच्याकडे जा आणि झाडावर चढण्याच्या स्पर्धेत त्याला भाग घ्यायला सांग. या स्पर्धेत त्याचा पराजय होईल तेव्हा त्याला पाण्यात ढकलून दे.'' जलराक्षसाने मुलाला उपाय सुचवला.



त्याचा मुलगा लगेच धाकट्याकडे आला नि म्हणाला - ''झाडावर चढण्याच्या शर्यतीत भाग घेशील?''

''तुला दिसत नाही. मी तर कामात गुंतलोय? पण माझा हा छोटा भाऊ शर्यतीत भाग घेईल.'' असे म्हणत त्याने लाकडी पिंजऱ्यातून खारीला बाहेर काढले.

डोळ्याची पापणी लवते न लवते एवढ्यात खार झाडावर चढून गेली अन् दिसेनाशी झाली. जलराक्षसाचा मुलगा बापाकडे आला आणि खबर दिली - ''झाडावर चढण्याच्या स्पर्धेत मी हारलो.''

जलराक्षस मुलाला म्हणाला - ''झालं गेलं विसरून जा. आता परत त्याच्याकडे

पंचवीस वर्षांपूर्वी 'चांदोबा'त प्रकाशित झालेली गोष्ट



जा आणि धावण्याच्या स्पर्धेत त्याचा पराभव कर. या वेळी त्याला हरवून ये.''

जलराक्षसाचा मुलगा धाकट्यापाशी आला आणि म्हणाला - ''धावण्याच्या शर्यतीत माझ्या बरोबर भाग घेशील?''

''अरे, मी काय तुझ्यासारखा रिकामटेकडा का आहे? तुझी इच्छा असेल तर माझ्या या दुसऱ्या भावाला पाठवतो. तू त्याच्या बरोबर पळून दाखव.'' धाकटा म्हणाला. त्याने सशाला पिंजऱ्यातून बाहेर काढले. लांब लांब उड्या मारीत क्षणार्धात ससा दिसेनासा झाला.

जलराक्षसाच्या मुलाने परत आपल्या बापाकडे येऊन आपल्या पराभवाची वार्ता दिली.

''अरे, आलाय कुठून हा पोरगा? तुझ्याहून अधिक शक्तिशाली तो नाहीच नाही. त्याला मल्ल-युद्धात भाग घ्यायला लाव. तो हारला की त्याला तलावात ढकलून दे.'' जलराक्षसाने मुलाला सांगितले.

''तुझ्या बरोबर खेळ खेळायला मला फुरसत नाही. माझा म्हातारा आजोबा तिकडे झाडीत झोपला आहे. त्याच्याशी जाऊन मल्ल-युद्ध कर.'' आणि धाकट्याने जंगलाकडे बोट दाखवले.

जलराक्षसाचा मुलगा झाडीत गेला आणि अस्वलाशी भिडला. बिचारा घायाळ होऊन झाडीतून बाहेर पडला.

पुन्हा आपल्या मुलाचा पराभव झालेला पाहून आता मात्र जलराक्षस घाबरला. तो आपल्या मुलाला म्हणाला, त्याला विचार- ''तुला किती पैसे दिले, तर हा तलाव आपल्या फासात अडकवणार नाहीस?''

जलराक्षसाचा मुलगा पुन्हा परत आलेला पाहून धाकट्याने विचारले - ''अजून ही काही नवा खेळ खेळायचा विचार आहे काय तुझा? झालं एवढं पुरेसं नाही वाटत तुला?''

''नाही नाही, तसं काही नाही! आपण कशाला आपापसात भांडायचं? किती पैसे तुला दिले तर बऱ्या बोलाने हा तलाव सोडून जाशील?'' जलराक्षसाच्या मुलाने विचारले.



थोडा वेळ विचार करून आपल्या डोक्यावरील टोपी पुढे करीत धाकटा म्हणाला - ''एवढी टोपी भर सोन्याच्या मोहरा दे. अन् मी आपला चालू लागतो.''

जलराक्षसाच्या मुलाने वडिलांना हा संदेश सांगितला नि त्यांनी मुलाकडे टोपलीभर सोन्याच्या मोहरा दिल्या.

एवढ्यात धाकट्या भावाने आपल्या टोपीच्या वरच्या भागात एक भोक पाडले नि खाली जमिनीत एक खड्डा खणला. आणि त्या खड्ड्यावर टोपी उलटी ठेवली. जलराक्षसाच्या मुलाने टोपली भर मोहरा टोपीत ओतल्या, पण टोपी काही भरली नाही.

''अजून मोहरा घेऊन ये. टोपी भरली नाही हे तुला दिसत नाही का?'' धाकट्या भावाने विचारले.

दुसऱ्या टोपलीतील मोहरा ही कमीच पडल्या. तिसऱ्यांदा टोपलीभर मोहरा आणल्या तेव्हा खड्डा मोहरांनी भरला नि टोपी पण भरली.

''ठीक आहे, आता मी चाललो. तू काळजी करू नकोस. जा.'' धाकटा मुलगा म्हणाला. त्याने सगळ्या मोहरा पिशवीत भरून घेतल्या आणि आपल्या गावाकडे परत आला. त्याने एक मोठं घर खरेदी केलं आणि एकाद्या जमीनदारासारखा राहू लागला.

मोठा अन् मधला भाऊ त्याच्याकडे आले नि विचारू लागले- ''एवढा सारा पैसा कुठून आणलास रे तू?''

धाकटा भाऊ म्हणाला - ''तुम्ही लोकांनी माझ्या वाट्याला फक्त दोरखंड दिलंत. मी त्याच्यातून फासे बनवले, जंगलातील प्राणी पकडले नि खूप पैसे मिळवले.''

''मग ते दोरखंड आम्हाला उसनं दे. आम्ही ते तुला परत करू सुरक्षित!'' दोघे भाऊ म्हणाले.

''ते घेऊन जा!'' म्हणत धाकट्याने दोरखंड आपल्या भावांना देऊन टाकले.

पण दोरखंड काही त्याला परत मिळालं नाही. कुणास ठाऊक दोघे भाऊ ते कुठे घेऊन गेले आणि त्यांना कोणकोणत्या संकटांना तोंड द्यावे लागले! --



विश्व समाचार

# दक्षिण कोरियातील निवडणुका

१९ एप्रिल रोजी दक्षिण कोरियात पंधराव्या राष्ट्रीय विधानसभेच्या निवडणुका झाल्या. या निवडणुकीत तीन किम मध्ये स्पर्धा झाली. या विधान-सभेत एकूण २९९ जागा आहेत. 'न्यू कोरिया पार्टी' या शासन पक्षाने १३९ जागा जिंकल्या. अध्यक्ष किम यंग सॅम या पार्टीचे नेते आहेत. 'नॅशनल कॉंग्रेस फॉर न्यू पॉलिटिक्स' या प्रमुख विपक्षी-दलाचे नेते आहेत किम डे जंग. या पक्षाला ७९ जागा मिळाल्या. किम जांग यांच्या 'युनायटेड लिबरल डेमोक्रॅटिक पार्टी'ला फक्त ५० जागा मिळाल्या.

२९९ जागांपैकी ४६ जागा प्रमाणबद्ध प्रतिनिधित्व पद्धतीनुसार भरल्या गेल्या. १२१ जागा जिंकणाऱ्या शासन-पक्षाला प्रमाणबद्ध प्रतिनिधित्वानुसार १८ अतिरिक्त जागा मिळाल्या. या पक्षाला एकूण १३१ जागा मिळाल्या. १९९१ मधे झालेल्या निवडणुकीत या पक्षाला १४१ जागा मिळाल्या होत्या. या निवडणुकीत आपणास कमीत कमी १०० जागा मिळतील अशी नॅशनल कॉंग्रेसला आशा होती. परंतु प्रमाणबद्ध प्रतिनिधित्वानुसार प्राप्त झालेल्या १३ जागांसह या पक्षाला एकूण ७९ जागाच मिळाल्या.

अध्यक्ष किम यंग सॅम यांना १६ स्वतंत्र सदस्यांपैकी कमीत कमी ११ सदस्यांचे सहकार्य निश्चित मिळेल. म्हणून त्यांना पूर्ण मताधिक्य मिळेल व ते शासन करू शकतील. निवडणुकां-पूर्वी दोन आठवडे त्यांना जिंकण्याची आशा कमीच होती. उत्तर कोरियाने दक्षिण कोरियावर आक्रमण केले. जगातील अनेक देशांनी याचे खंडन केले. हे आक्रमण शासन पक्षाला अनुकूल सिद्ध झाले. आपल्या अपेक्षेनुसार नॅशनल कॉंग्रेसला १०० जागा मिळाल्या असत्या तर शासन-पक्षावर संकटच आले असते. यामुळे घटनेत जे बदल करण्याची त्यांची इच्छा आहे, ते ते करू शकले नसते.

अध्यक्ष किम यांना या निवडणुकीत अपेक्षित विजय मिळाला नाही असे राजनैतिक पंडितांना वाटते. किम यांची स्थिति अधिकच नाजुक बनली. कोरियाच्या घटनेनुसार एकच व्यक्ति दुसऱ्यांदा अध्यक्ष बनू शकत नाही. म्हणून १९९६ च्या सार्वत्रिक निवडणुकीत किम यंग सॅम यांना अध्यक्षपदासाठी कोणी तरी अन्य उमेदवार उभा करावा लागेल. तरी पण १९९८ पर्यंत किम यंग सॅम हेच अध्यक्ष राहतील.

राष्ट्रीय विधान सभेच्या निवडणुका पूर्ण होण्यापूर्वी एक आठवडा, ता.१६ एप्रिल रोजी अमेरिकेचे अध्यक्ष श्री बिल क्लिंटन दक्षिण कोरियात आले. त्यांनी किम यंग सॅम यांच्याशी चेजू बेटाबाबत चर्चा केली. दोघांनी घोषणा केली की कोरिया मध्ये शांति स्थापित करण्यासाठी दक्षिण कोरिया, उत्तर कोरिया, चीन व अमेरिका यांनी आपापसात चर्चा करून काही मार्ग काढावा. कोरियाच्या जनतेला स्थिर व शाश्वत शांतीची अपेक्षा आहे. यासाठी दोन्ही कोरिया देश प्रयत्नशील आहेत.

पूर्वी कोरिया एकच देश होता. पुन्हा तो तसाच एक देश व्हावा असे जगातील देशांना वाटते.



# प्रशंसा

वामन काही ही काम करीत नसे. आई-वडील, भाऊ नि त्यांच्या बायका त्याला 'आळशांचा राजा' म्हणत. गावातील ओळखीचे सर्व लोक म्हणत - वामन अगदी कुचकामी माणूस आहे. सगळे अगदी साफ त्याच्या तोंडावर बोलून दाखवीत, पण वामनला कुणाची पर्वा नव्हती. तो कसलीच काळजी करीत नसे. काही काम करणं त्याला मुळिच आवडत नसे. व्यापार-धंदा करायची तर गोष्टच वेगळी. वाचनाचा त्याला जरा ही नाद नव्हता. सकाळ पासून संध्याकाळ पर्यंत तो आळशीपणात आपला वेळ घालवी.

एक दिवशी त्याचा मामा सुकीर्ति त्याच्या घरी आला. घरातील सर्व लोकांनी मामाकडे वामन बद्दल तक्रार केली. त्याच्या आळशीपणा बद्दल सर्वांनी त्याची निंदा केली. सुकीर्तिने आपल्या भाच्याला काही समजावण्याचा प्रयत्न केला.

''मी अशी काय मोठी चूक केलीय बरं? घरातील लोकांच्या सांगण्यावरून आपण मला काही उपदेश करीत आहात?'' वामनने विचारले.

''माणसाने निरुद्योगी असणं बरं नव्हे. काही तरी काम करावं आणि थोडी कमाई करावी. जर एवढं ही जमलं नाही, तर त्याचं जीवन व्यर्थ आहे. तुला एवढी साधी गोष्ट कशी कळत नाही रे?'' मामाने प्रश्न केला.

वामन म्हणाला - ''मी कशासाठी काही कमवायचं? पोटभर जेवण, अंगावर कपडे नि रहायला घर एवढ्यासाठीच तर कमाई करायची न? काही ही न करता सगळं मिळतंय, मग कशाला बरं चिंता करायची?''

भाच्याच्या या उत्तरावर अमळ नाराज होत मामा म्हणाला - ''अरे, आई-बाप जन्मभर का पुरणार आहेत? केव्हा ना

स्वाती तांबे

केव्हा त्यांचा मृत्यु अटळ आहे. भाऊ नि त्यांच्या बायका किती दिवस तुला जेवू-खाऊ घालतील? त्यांनी नाकारलं म्हणजे मग काय करशील? मग उपाशी का बसशील? आज सगळं ठीक आहे, पण प्रसंग आला तर आपल्याला आपलं पोट भरता आलं पाहिजे.''

''ठीक आहे, तुम्ही म्हणताहात त्या प्रमाणे मी काम करून काही पैसा मिळवला, अन् माझी कमाई चोरांनी चोरली तर? म्हणून ज्ञानी लोक कधी ही उद्याची चिंता करीत नाहीत. मी पण एक चांगला ज्ञानी आहे!'' वामनने आपला विचार बोलून दाखवला.

यावर आश्चर्य प्रकट करीत मामा सुकीर्ति म्हणाला - ''जन्माला आल्यावर माणसाने काही तरी कर्म केले पाहिजे. जो काहीच काम करीत नाही, त्याचे जिणे व्यर्थ आहे. अशा जीवनाला काही अर्थच नाही.''

''मामा, तुम्हाला काय म्हणायचंय हेच खरं म्हणजे माझ्या लक्षात येत नाही!'' वामन म्हणाला.

सुकीर्ति वामनला समजावीत म्हणाला - ''माणसाचा जन्म मोठ्या भाग्याने मिळतो. म्हणून तू असं काही काम कर, की ज्यामुळे लोक तुझा आदर करतील, तुला नित्य स्मरतील. तुझ्या आळशीपणाची निंदा करणार नाहीत. तुझ्या उद्योगशीलतेचे गोडवे गातील. तुझी प्रशंसा करतील. तेव्हाच तुझ्या जन्माचे सार्थक होईल.''



''असं म्हणताय? आमचे आजोबा मेले, त्याला दहा वर्षे झाली. आम्ही सगळे जण त्यांना विसरलो. आमच्या पणजोबांचं तर नाव ही कुणाला ठाऊक नाही. इतरांची गोष्ट सोडून द्या, पण घरातल्या ही कोणाला त्यांची काही माहिती नाही. मामा, तुम्हाला तरी तुमचे आजोबा-पणजोबा यांच्या बाबत काही माहिती आहे का? तुम्ही कधी त्यांचे स्मरण करता? या जगात शरीरा प्रमाणेच काही ही शाश्वत नाही. अशाश्वत वस्तूंकरिता परिश्रम करणं व्यर्थ नाही का?'' वामनने आपले विचार मामांपुढे मांडले.

भाच्याच्या बोलण्यावर दीर्घ निःश्वास सोडीत सुकीर्ति म्हणाला - ''वादविवाद करण्यात तर तू मोठा चतुर आहेस. पण त्याचा काय फायदा? तुझ्या आयुष्यात

एकदा तरी कुणी तुझी प्रशंसा केली आहे का? केली असली, तरच तुझं जीवन सफल झालं असं म्हणता येईल.''

''मामा, तुम्ही 'सफल' शब्दाचा उपयोग करताहात, ती सफलता मी केव्हाच मिळवून बसलोय. या आमच्या गावात प्रल्हाद नावाचा एक मोठा माणूस आहे. तो केव्हा ही भेटला की माझी तारीफ करतो.'' आपण काही विशेष गोष्ट सांगत आहोत अशा थाटात वामन म्हणाला.

''माझा यावर मुळिच विश्वास नाही!'' सुकीर्ति ठामपणे बोलला.

''तर मग आजच संध्याकाळी ओढ्यावर चला माझ्या बरोबर. डोळ्यांनी माणूस पहा अन् कानांनी त्याची वाणी ऐका.'' वामनने मामांना विनवले.

त्या दिवशी संध्याकाळी सुकीर्ति ओढ्यावर पोचला. वामन एका झाडाखाली बसून काही तरी गुणगुणत होता. एवढ्यात प्रह्लाद तेथे आला.

वामन उठून उभा राहिला आणि त्याने नम्रतापूर्वक प्रह्लादला नमस्कार केला. प्रह्लाद म्हणाला - ''बस.''

जरा गळा साफ करीत प्रह्लाद म्हणाला - ''तुझ्याहून मोठा माणूस निदान मला तरी कोणी दिसत नाही. तू महान् ज्ञानी आहेस. तुझ्यासारखं ज्ञान मिळवायला एकाद्या महान् योग्याला सुद्धा सहज दहा वर्षे लागतील. तू आमच्या सारख्या सामान्य माणसात राहतोस म्हणून लोकांना तुझं मूल्य समजत नाही. तू ज्ञानी लोकांच्या सान्निध्यात असतास तर त्यांनी तुझी पूजा केली असती. वेदांताचं अध्ययन करणं एक गोष्ट आहे आणि तो समजून त्याप्रमाणे आचरण करणं ही अगदी वेगळी गोष्ट! तू वेदांत आत्मसात् केला आहेस. वेदांत तुझ्यात भिनला आहे.''

''यात माझा खरोखर काही मोठेपणा नाही. आपले माझ्यावर प्रेम आहे, म्हणून आपण माझ्याबद्दल असे गौरवोद्गार काढीत आहात.'' वामन नम्रतापूर्वक म्हणाला.

''मला सवड मिळाली तर तुझ्याशी वेदांतावर चर्चा करण्याची माझी फार इच्छा आहे. परमेश्वराची कृपा झाली तर लवकरच मला तशी संधी मिळेल!'' असं म्हणत प्रह्लाद तेथून निघून गेला. झाडामागे लपून सुकीर्ति हे बोलणे लक्षपूर्वक ऐकत होता. आता पुढे येऊन तो म्हणाला - ''तू तर फारच हुशार आहेस. आपली खूप प्रशंसा करून घेतलीस हं? याला कसं काय अडकवलंस तुझ्या जाळ्यात?''

''ही तर देवाण-घेवाण आहे. मी त्याची तारीफ करतो नि तो माझी!'' वामनने प्रश्नाचे उत्तर दिले.

थट्टेच्या सुरात सुकीर्ति म्हणाला - ''तुझी प्रशंसा केली म्हणून तो मोठा झाला काय? तुझी प्रशंसा केली यावरूनच हे स्पष्ट होतंय की तो मोठा नाही!''

यावर अमळ नाराज होत वामन म्हणाला - ''माझी प्रशंसा केवळ प्रह्लादच करतो, पण त्याला गावातील सगळे लोक मानतात. त्याची प्रशंसा न करणारा माणूस गावात शोधून सापडायचा नाही! तुम्हाला शंका असेल तर गावातल्या कोणालाही विचारा.

भाच्याच्या बोलण्यावर सुकीर्तीचा विश्वास बसेना. त्याने गावातल्या एकेकाला विचारायला सुरुवात केली. एका व्यापाऱ्याने प्रह्लादच्या अर्थशास्त्राच्या ज्ञानाची खूप तारीफ केली. तर एका पंडिताने त्याच्या पांडित्याची प्रशंसा केली. एका चित्रकाराने त्याच्या







चित्रकलेतील निपुणतेबद्दल सांगितले, तर एका संगीतकाराने त्याच्या सुरेल संगीताची वाहवा केली. आता सुकीर्तीच्या लक्षात आले की प्रह्लाद एक असामान्य माणूस आहे आणि त्याला अनेक कलांची जाण आहे. पण आपल्या भाच्यात अशी काय विशेष गोष्ट आहे की ज्यावर प्रह्लादने खुश व्हावे हे काही सुकीर्तीच्या लक्षात येईना.

त्याने जेव्हा वामनच्या वडिलांच्या कानांवर सर्व गोष्टी घातल्या तेव्हा ते हसून म्हणाले - "दुसऱ्याची प्रशंसा करण्यात मोठ्यांचा मोठेपणा असतो. वामनची प्रशंसा करून त्यांचा मोठेपणा वाढला, पण त्यामुळे वामन थोडाच मोठा झाला?"

वामनची आई आपल्या भावाला म्हणाली - "प्रह्लादला वामन मध्ये काही विशेषता आढळली असेल. ती जाणण्याचा मी अनेकांकडून प्रयत्न केला. पण माझ्याकडे कुणी लक्षच द्यायला तयार नाही. तू प्रह्लादला जाऊन विचार बरं."

सुकीर्तीला हे रहस्य जाणण्याची तीव्र इच्छा झाली. दुसऱ्याच दिवशी तो प्रह्लादला भेटला. त्याची प्रशंसा करीत त्याने आपला परिचय करून दिला.

प्रसन्न होऊन प्रह्लाद म्हणाला - "मी आपल्याला काय मदत करू बरं? मला जमेल तेवढे आपणासाठी मी अवश्य करीन."

सुकीर्तीने लगेच वामनबाबत प्रश्न केला - "त्याच्यात आपल्याला काय विशेषता आढळली?"

आश्चर्य प्रकट करीत प्रह्लादने सांगितले - "मला तर वामनची काहीच माहिती नाही. प्रशंसा करण्याची मला सवय आहे."

"प्रशंसा करण्याची तुम्हाला सवय आहे काय? योग्यता नसताना कुणाची प्रशंसा करणं चुकीचं नाही का? तुमच्या सारख्या मोठ्या माणसाला हे शोभतं का?" आवेशात येऊन सुकीर्तीने विचारले.

हसत प्रह्लाद म्हणाला - "कुणाची प्रशंसा करण्यात काय बरं चूक आहे?"

"एखाद्या आळशाला ज्ञानी म्हटल्यामुळे तो बिघडणार नाही का?" सुकीर्तीने विचारले.

"नाही, मी ज्याची प्रशंसा करतो तो खरोखरीच ज्ञानी असेल तर नम्रतापूर्वक लज्जित होईल. तो ज्ञानी नसेल तर माझ्या प्रशंसेला पात्र होण्याचा प्रयत्न करील!" प्रह्लाद म्हणाला.

"महाराज, तरी पण प्रशंसा करताना आपण आपली बुद्धि गहाण टाकणं बरं नव्हे. नाहीतर माझ्या भाच्यासारखा माणूस चुकीच्या मार्गाला लागेल. ज्ञानी नसताना तो स्वतःला ज्ञानी समजू लागेल व आपल्या पायावर कुऱ्हाड मारून घेईल." सुकीर्तीने सल्ला दिला.

यावर प्रह्लाद म्हणाला - "जो खरा ज्ञानी असतो, तो स्वतःच आपल्याला जाणून घेतो. आपण ज्ञानी असल्याचे दुसऱ्यांकडून जाणून घेणे हा शुद्ध मूर्खपणा होय. माझ्या बोलण्याने मी कोणाला ज्ञानी बनवीत नाही, आणि कोणाचा मूर्खपणा नष्ट करू शकत नाही!"

"तरी पण कोणाची प्रशंसा करण्यापूर्वी तो त्या प्रशंसेला पात्र आहे किंवा नाही याचा विचार केला पाहिजे." सुकीर्ति जोरदार शब्दात म्हणाला.

"दुसऱ्यांच्या बद्दल काही जाणण्यात मी आपल्या वेळेचा दुरुपयोग कशासाठी करू? त्याच वेळात मी काही नव्या विषयांचं अध्ययन करू शकतो. आळशी लोकांसाठी मी आपला वेळ कशाला घालवू? अशी आळशी माणसं भेटली तर मी थोडी-फार त्यांची प्रशंसा करतो आणि आपल्या मार्गाने पुढे चालू लागतो." प्रह्लादने आपली विचार-प्रणाली स्पष्ट करून सांगितली.

सुकीर्तीच्या सर्व शंका दूर झाल्या.

घरी येऊन भाच्याला घडलेलं सर्व काही सांगितलं आणि म्हणाला - "प्रह्लादकडून मला बरंच काही शिकायला मिळालं. इथून पुढे मी तुझी प्रशंसा करीत राहीन. दुसरं काही एक बोलणार नाही. खरं म्हणजे तुझ्यासारखा महाज्ञानी जगात विरळाच!" इतकं बोलून मामा आपल्या गावी परत गेला.

आता वामनच्या चांगलं लक्षात आलं की आपण किती पाण्यात आहोत. त्याला आपलीच लाज वाटू लागली. हळू हळू त्याच्यात बदल घडून येऊ लागला. प्रह्लादने आपली प्रशंसा करावी यासाठी त्याने नंतर कधी ही प्रयत्न केला नाही.



# खोटारडा

**लिं**पा नावाच्या गावात शंकर नावाचा एक तरुण रहात असे. खोटे बोलायचे अन् इतरांना त्यावर विश्वास ठेवायला लावायचा - अशी त्याची सवय होती. तसे तर सर्वजण त्याला 'खोटारडा' म्हणायचे, पण त्याच वेळी, तो मोठा हुशार असल्याचेही मनोमन मान्य करत. वरवर जरी ते त्याला शिव्या देत, तरी त्याच्या अकलेची तारीफ करत.

एकदा शंकर एका गल्लीतून जात असताना दुसऱ्या एका गावच्या ईश्वरने त्याला म्हटले, ''मी जरी तुमच्या गावचा नसलो, तरी तुझ्याबद्दल बरंच काही ऐकून आहे. तू खूप खोटं बोलतोस, अन् तरीही लोक त्यावर विश्वास ठेवतात, असंही ऐकलंय मी. आता माझ्याशीही काहीतरी खोटं बोलून माझा त्यावर विश्वास बसेल, असं करून दाखव पाहू!''

शंकरने ईश्वरकडे एकदा आपादमस्तक पाहून घेतले अन् तो म्हणाला, ''खोटं बोलून त्यावर विश्वास ठेवायला लावायची बात सोडून द्या हो! मला तर तुमच्याशी काही बोलायलाही वेळ नाहीय. तिकडे गावच्या तलावाचा बांध फुटलाय. सगळं पाणी शेतात वाहून चाललंय. तेव्हा आत्ता हवे तेवढे मासे पकडून घरी घेऊन जाऊ शकशील पहा.'' असे म्हणत तो स्वतः तलावाकडे धावत सुटला.

'इतक्या सहजपणे मासे मिळत असतील, तर पकडून घरी न्यायला काय हरकत आहे?' असा विचार करून ईश्वरही तिकडेच पळत सुटला. तिथे पोचल्यावर त्याला असे दिसले की, तलाव तर काठोकाठ भरलेला आहे! आता त्याला कळून चुकले की शंकरने आपल्याला खोटे सांगितले अन् त्यावर विश्वास ठेवायलाही भाग पाडले! मनातल्या मनात त्याने शंकरचे कौतुकच केले!






## ११

(ट्रॉय युद्ध संपल्यावर रूपधर इथाकाला पोचण्यासाठी भुतावोळ झाला होता. त्याला फार संकटे झेलावी लागली. या प्रयत्नात त्याचे सर्व साथीदारही मारले गेले. शेवटी तो एकटाच स्वदेशी पोचू शकला. पण अजून त्याचे कष्ट संपले नाहीत. त्याची इष्ट देवी बुद्धिमती हिने त्याला त्याच्याच हितासाठी वृद्ध बनवले अन् त्याचे रूप बदलून टाकले. या अवधीत इथाकामधे-)

**ट्रॉ**य युद्ध संपले, अन् त्यातून जगले वाचलेले वीर हळूहळू आपापल्या गावांकडे परत आले. परन्तु बराच काळ लोटला तरी रूपधर व त्याचे साथीदार परत न आल्यामुळे अशी अफवा पसरली की रूपधर मृत्यु पावला आहे. आणि इथाकाच्या आसपासचे एकशे बारा राजपुत्र रूपधरच्या घरी येऊन राहिले. या सर्वांचीच अशी इच्छा होती की काहीही करून रूपधरची पत्नी पद्ममुखी हिच्याशी विवाह करून आपण राजा बनावे, प्रत्येकाच्या मनात हाच एक आशय होता.

धीरमती आताच कुठे तारुण्यात पदार्पण करत होता. तो लहान बालक असतानाच रूपधर युद्धावर गेलेला होता. त्यामुळे त्याला आपला पिता आठवत नव्हता. परन्तु त्याला भेटायला मात्र तो फार उत्सुक होता. अन् त्याच्या परतण्याची मोठ्या आशेने वाट पहात होता. रूपधरची काहीच खबर मिळत नाही असे पाहून त्याला फार

काळजी वाटू लागली. त्याला तर असेही वाटले की, 'आपला पिता मरून गेल्याची पक्की वार्ता कळली तरी बेहत्तर! आपली आई पुन्हा कोणाशी लग्न करून मोकळी तरी होअू शकेल!' आपल्या घरात तळ देअून राहिलेले अन् आपल्याच इस्टेटीवर मजा मारणारे हे लोक एकदाचे आपापल्या ठिकाणी परत जातील आणि आपली पिळवणूक थांबेल.

इतर सर्व राजपुत्र धीरमतीला असमर्थ समजून त्याच्याच घरात ठाण देअून राहिले व रूपधरचे पशुधन एकएक करून मारून टाकून खात राहिले. दारू पिअून ते सर्व खूप धुमाकूळ घालत. नशेत ओरडत की - पद्ममुखी माझीच बायको आहे. यातून आपली कशी सुटका करून घ्यावी; या सार्‍यांना घरातून कसे हाकलून काढावे, हे धीरमतीला समजेनासे झाले.

'आपला पती नक्की जिवन्त परत येणार' यावर पद्ममुखीचा दृढविश्वास होता. एका ज्योतिष्याला गाठून, 'आपला नवरा जिवन्त असून तो नक्की परत येणार' असे ज्योतिषही तिने माहीत करून घेतले होते. त्यामुळे दुसर्‍या लग्नाला ती स्पष्टपणे नकार देत राहिली. पण तिच्याशी लग्न करायला अुत्सुक असणारे राजकुमार मात्र 'तुझा नवरा नक्कीच मेलाय, आता माझ्याशी लग्न कर' असा तिच्यावर दबाव आणत राहिले. त्यांच्या त्रासातून वाचण्यासाठी तिने एक अुपाय योजला. ती त्यांना म्हणाली, ''माझ्या सासर्‍याचं प्रेत झाकण्यासाठी मी एक वस्त्र विणत आहे. ते पुरं झालं, की लगेच मी लग्न करीन.'' राजपुत्रांनी याला सम्मती दर्शवली आणि ते वस्त्र पुरे होण्याची वाट पहात राहिले.

तेव्हापासून पद्ममुखी दिवसभर



विणकाम करून रात्री ते अुसवून टाकी. तीन वर्षे असेच चालत राहिले. शेवटी एकदा राजपुत्रांना 'आपण ठकवले जात आहोत' हे लक्षात आले व पुन्हा दबाव वाढू लागला. ते व्यंगबाणांनी तिला सतावू लागले.

स्वत:च्या डोळ्यांसमोर चालणारा हा अत्याचार धीरमतीला सहन होईना. खूप विचार करून त्याने एक निश्चय केला अन् पैयासला जाअून नवद्योतला व स्पार्टाला जाअून प्रतापला भेटून आपल्या पित्याची खबर विचारायचे ठरवले. युद्धक्षेत्रावरून सर्वात अगोदर प्रतापच परत आला होता. तेव्हा त्याला रूपधरबद्दल नक्कीच थोडीफार माहिती असेल, असे त्याला वाटले.

धीरमतीने विचार केला, ''आपल्या पित्याच्या मृत्यूच्या वार्तेला पाठिंबा मिळाला तर त्याचे सारे अन्त्य संस्कार करून आपणच आईचा विवाह करून द्यावा. पण आता या दुष्ट लोकांचे अत्याचार सहन करायचे नाहीत. माझ्या वयाचे किती कितीतरी तरुण चांगले बलवान अन् पराक्रमी आहेत, मीच एकटा काय तो असा दुबळ्यासारखा गप्प बसलो आहे. माझा पिता जिवन्त असल्याचं कळलं तर मात्र परत येअून या सर्वांचा संहार करीन; मग त्यात माझा जीव गेला तरी बेहत्तर!'' हा विचार पक्का झाल्यावर त्या दिवशी तो सर्व राजकुमारांना म्हणाला, ''तुम्ही सर्वजण माझ्या आईशी विवाह करायला अुत्सुक आहात, ठीक आहे. पण तुमचं वागणं मात्र मला मुळीच पसंत नाहीय. अुद्या तुम्हा सर्वांना झाडाखाली एकत्र आणून खुल्लमखुल्ला सांगणार आहे की, आता तुम्ही सर्वजण माझ्या घरातून चालते व्हा. आपापल्या घरी जाअून काय ती चैन करा. पण आता माझ्या घरात मी हा प्रकार





चालू देणार नाही. तरीही तुम्ही असेच वागत राहिलात तर तुम्हा सर्वांना मी यमसदनास पाठवीन!''

धीरमतीचं हे अचानक धैर्य पाहून सर्व राजकुमार आश्चर्यात पडले.

दुसऱ्याच दिवशी धीरमतीने दवंडीवाल्याला बोलावून सर्व नागरिकांना चबुतऱ्याजवळ येण्याबद्दल दवंडी पिटायला सांगितले. एका हातात बरछी अन् बरोबर दोन कुत्रे घेऊन तो स्वतः शूर वीरासारखा चालत तेथे हजर झाला. त्याची दमदार चाल खरोखरच एका राजपुत्राला साजेशी होती. त्याच्या डोळ्यात आत्मविश्वासाचे तेज व चेहऱ्यावर निग्रह दिसत होता. तेथे जमलेल्यांपैकी वडीलधाऱ्या माणसांनी त्याला चबुतऱ्या-वरील स्थानावर बसवले. येथेच पूर्वी त्याचा पिता रूपधरही बसत असे. हे अग्रस्थान होते. सर्वजण बसल्यावर वृद्ध ऐगुप्त बोलू लागला. त्याच्या मुलांपैकी एक रूपधरचा साथीदार होता. फाललोचनच्या हातून मारल्या गेलेल्या ग्रीक वीरांपैकी तोही एक होता. दुसरा मुलगा पद्ममुखीशी विवाह करायला इच्छुक राजकुमारांपैकी एक होता. वृद्ध सर्वांना अुद्देशून म्हणाला ''मुलांनो, ही बैठक बोलावून धीरमतीनं चांगलंच केलं. कारण रूपधर गेल्यानन्तर इथाकामधे कधी बैठकच झाली नाही. त्यामुळे नागरिक कधी एकत्र आले नाहीत. आपण सर्व इथे का जमलो आहोत, हे जाणायची माझी इच्छा आहे.''

वृद्धाच्या या बोलण्यामुळे धीरमती अुत्साहित झाला. अुठून अुभा राहून तो म्हणाला, ''आजोबा, या सभेचा प्रबंधक मीच आहे. केवळ आपला त्रास कळवण्यासाठी तुम्हा सर्वांना मी इथं बोलवलंय. माझ्या घराला सध्या दोन संकटांनी ग्रासलंय. माझा सुप्रसिद्ध पिता मला पारखा झालाय. एके काळी तो तुमचा राजा होता. त्यांच्या परत न येण्यामुळेच मी मोठ्या अडचणीत सापडलोय. त्यांच्या अनुपस्थितीचा फायदा घेअून कित्येक राजकुमार आईशी विवाह करण्यासाठी आमच्या घरात तळ देअून बसले आहेत. आमचं घर पोखरत आहेत ते! लवकरच माझा सर्वनाश होणार असं वाटू लागलंय मला. इथे अुपस्थित असणारात काही तथाकथित राजकुमारांचे पिताही आहेत. माझ्या आजोबांकडे जाअून त्यांच्या मुलीला मागणी घालायचं धैर्य त्यांच्यात मुळीच नाहीय. त्यामुळेच आमच्या घरात राहून आमचेच पशु ते मारून खात असतात अन् दारू पिअून धुमाकूळ घालत असतात. मनाला येईल तसं करत असतात ते. माझा पिता नसल्यामुळे आमचं घर आमचं राहिलेलं नाहीय. माझ्या वडलांनी असा कोणता देशद्रोह केलाय, की ज्यामुळे आम्हाला अशी शिक्षा भोगावी लागत आहे, सांगा! अुलट त्यांनी देशासाठी ट्रोजन युद्धात भाग घेअून खूप पराक्रम गाजवलाय. ते खरोखरच युद्धात मारले गेले असतील, तरी त्यांच्याबद्दल सर्वांना अभिमान वाटायला हवा. पण जे काही घडत आहे, ते ऐकून आपणा सर्वांनाही शरम वाटत असेल असं वाटतंय मला.''

दुर्बुद्धी नावाचा एक माणूस ताबडतोब अुठून म्हणाला, ''धीरमती, तुझ्या आरोपांमधे काहीही तथ्य नाही. चूक तर तुझ्या आईचीच आहे. आमच्यावर आरोप करून काय अुपयोग? गेली तीन वर्षं ती सर्वांना फसवत आली आहे. तिनं आमच्या प्रत्येकाच्या मनात आशा अुत्पन्न केली. ती म्हणायची की, कापड विणून झालं की लग्न करीन. आम्हा सर्वांनाच तिनं या भ्रमात ठेवलं. चौथं वर्ष अुजाडलं तरी तिचं विणकाम सपलंच नाही. संपेलच कसं मुळी ते? कारण दिवसा विणलेलं, रात्री ती अुसवून टाकायची. तिच्याशी विवाह करायला इच्छुकांच्या वतीनं मी बोलतो



आहे. ऐक, तिला तू आपल्या घरातून बाहेर पाठव अन् तिला आवडणाराशी लग्न करायला सांग. तसं घडलं नाही, अन् पुन्हा ती तशीच सर्वांना फसवत राहिली, तर आम्ही मुळीच ते घर सोडून जाणार नाही. ही गोष्ट म्हणजे अगदी दगडावरची रेघ समज.''

''आपल्या आईला घरातून काढणं मला केवळ अशक्य आहे. शिवाय आपल्या पित्याकडून तिनं हुंडा म्हणून जे आणलं, ते परत करायच्या परिस्थितीत नाहीये ती.'' धीरमती म्हणाला.

आणखी एक वृद्ध अुभा राहून म्हणाला, ''रूपधर युद्धाला निघण्यापूर्वी मी भविष्य वर्तवलं होतं की, अनेक संकटं झेलत वीस वर्षांनी तो परत येईल. मी जे सांगितलं, ते सर्व खरं होत राहिलंय. तेंव्हा तो नक्कीच

परत येणार आहे. त्याच्या घरात जे जे ठिय्या देऊन राहिले आहेत त्यांचं नष्टचर्य ओढवलंच असं समजा.''

''अं! ज्योतिष आपल्या मुलांना ऐकव. आम्हाला पद्ममुखी हवीच. तुझ्या धमक्यांना भीक नाही घालत आम्ही; रूपधर परत आला, तरी आम्हाला घराबाहेर काढायचं धाडस करू शकणार नाही तो.'' आणखी एकजण बडबडत राहिला.

शेवटी धीरमती म्हणाला, ''मला सांगायचं ते मी सांगितलंय! कृपा करून मला एक नाव अन् वीस नावाडी मिळवून दिलेत, तर मी स्पार्टा अन् पैयासला जाऊन आपल्या पित्याची बातमी काढून आणतो. ते जिवन्त असल्याचं कळलं, तर आणखी एक वर्षभर मी हे हाल सहन करीन. त्यांच्या मृत्यूची खबर मिळाली, तर त्यांची अन्त्यक्रिया करून आईचं लग्न मी स्वतःच लावून देईन. माझ्या या बोलण्यावर सर्वांनी कृपा करून विश्वास ठेवावा.''

भाषण संपवल्यावर घरी न जाता धीरमती तडक समुद्रकिनाऱ्यावर जाऊन बसला. तिथे त्याला सहन भेटला. तो रूपधरचा खास मित्र होता. धीरमतीला पाहून तो म्हणाला, ''बेटा, तुला पाहून मला फार आनन्द झालाय. पित्यायोग्य पुत्र असल्याचं तू सिद्ध करून दाखवलंयस. इथाकात खूप नावा आहेत. तुझ्यासाठी सर्वात अुत्कृष्ट नौकेची सोय मी करून देईन. तू घरी जाऊन इतर आवश्यक सामान जुळवून घेऊन ये.''

धीरमती ताबडतोब घरी गेला. त्याला पाहताच सर्व राजकुमार त्याची टिंगल करू लागले. ते म्हणू लागले, ''बाप रे! हा तर आमचंच रक्त प्यायला अुठला की! आपण इतके दिवस याला नालायक समजत होतो.



पण हा तर छुपा रुस्तुम निघाला!''

दुसरा एकजण म्हणाला, ''तो पैयास अन् स्पार्टाला का निघालाय माहीत आहे? तिथून सैन्य आणायला...!''

तिसरा म्हणाला, ''एक दिवस हा आपल्या पेयात विष मिसळून मारेल आपल्याला!''

चौथा हेटाळणी करू लागला,''अरे हा तर आता आपल्या बापासारखाच समुद्रात बुडून जाईल, अन् मग याची इस्टेट वाटून घ्यायला किती त्रास होईल आपल्याला!''

त्यांच्या या टीकेची काहीही पर्वा न करता धीरमतीने आपल्या म्हाताऱ्या दासीला प्रवासाची तयारी करून द्यायला सांगितले.

''जाऊ नको बाळा तू! तूही समुद्र प्रवासाला गेलास तर तुझ्या आईचं काय होईल? हा अघोरी विचार तुझ्या मनात आलाच कसा?'' म्हातारी दासी रडत म्हणाली. तिला शान्त करत तो म्हणाला, ''अग आजी, हा तर देवाचा निर्णय आहे. आता अडवू नको मला! रात्री आई झोपली, की निघेन मी. ती स्वतः काही विचारी-पर्यन्त माझ्या प्रवासाबद्दल तिला काहीही न सांगायची शपथ घे पाहू. अन् आता सामानाची अन् भोजनाची व्यवस्था करायला लाग कशी !''

या अवधीत गल्ली गल्लीत फिरून सहनने निपुण नावाडी निवडून समुद्रकिनारी पाठवले. एक अुत्तम नौकाही मिळाली. इतक्यात रात्र झाली. इकडे रूपधरच्या घरातील सर्वांनी भरपूर खाणेपिणे अुरकले अन् सर्वजण झोपूनही गेले. इतक्यात सहनने येऊन,''प्रवासाची सर्व जय्यत तयारी झालेली आहे. फक्त तुझ्याच येण्याची वाट पहात आहोत.'' असे सांगितले. अन् तो स्वतः धीरमती बाहेर येण्याची वाट पहात तेथे थांबला.

नंतर दोघे मिळून समुद्रकिनाऱ्यावर पोचले. नावाड्यांनी रूपधरच्या घरून आलेले सामान नौकेत नीट रचले. धीरमती नौकेत चढला, नाविकांनी सुकाणू संभाळले, नांगर अुचलला अन् नाव पुढे सरकली. हवा अनुकूल होती. नाव पैयासकडे निघाली.



# 'चान्दोबाच्या' बातम्या

## सर्वात लहान

आपल्या लोकसभेच्या निवडणुका नुकत्याच संपल्या, त्याचबरोबर विधानसभेच्या निवडणुकाही झाल्या. काही वर्षे राष्ट्रपति शासन चालू असलेल्या जम्मू-काश्मीर मधेही निवडणुका झाल्या. आपल्या देशातील सर्वात लहान मतदान-केन्द्रही इथेच आहे. लडाख जिल्ह्यातील हताफाता येथे फक्त नऊ मतदात्यांसाठी एका मतदान-केन्द्राची व्यवस्था केली गेली. हे गाव समुद्रसपाटीपासून ५,००० फूट अुंचीवर आहे.

जगात सर्वात जास्त लोकसंख्या असलेल्या चीनच्या तिबेटमधेही एका गावात फक्त तीनच माणसे रहातात. तिबेटची राजधानी ल्हासा पासून ५५० कि.मी. दूर अग्नेय दिशेला यूमेन गाव आहे. तेथे ७२ वर्षांचा वृद्ध बाप व त्याच्या दोन मुली रहातात, आतापर्यन्त गावप्रमुख म्हातारा बाप होता, पण आता ती जागा त्याच्या मोठ्या मुलीने घेतली आहे.

## सर्वात अुंच

मलेशियातील कौलालंपुरमधे जगातील सर्वात अुंच इमारतीचे काम पुरे होत आहे. 'पेट्रोनास टॉवर्स' बनता बनता टी.व्ही. अँटीनासह इमारतीची अुंची ४४५ मीटर होईल. अमेरिकेतील शिकागो नगरातील 'सेयर्स टॉवर्स' ची अुंची ४२५ मीटर्स आहे.

## सर्वात मोठे

चीनचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. अशियातील सर्वात मोठे रेल्वे-स्टेशन बीजिंगमधे आहे. येथे एकाच वेळी ६० ते ९० गाड्यांचे आवागमन चालू असते. असे म्हणतात की दररोज ६,००,००० प्रवासी या स्टेशनचा अुपयोग करत असतात. जानेवारीच्या तिसऱ्या आठवड्यात या स्टेशनच्या अुद्घाटन समारंभाचे अध्यक्षस्थान चीनचे प्रधानमन्त्री ली पेंग यांनी भूषवले होते. चीनचे नेता मान त्से तुंग यांचे धातुचे मोठे चित्र असलेल्या मान त्से तुंग नावाच्या गाडीला अध्यक्षांनी हिरवा झेंडा दाखवून स्टेशनचे अुद्घाटन केले. २०,००० मजुरांच्या मदतीने हे स्टेशन बांधायला एकूण तीन वर्षे लागली.

आशियातीलच आणखी एक देश थायलंड याची राजधानी बँकॉकमधे जगातील सर्वात मोठे रेस्टॉरंट आहे. हे रेस्टॉरंट ३.३४ एकर एवढ्या जमिनीवर विस्तारलेले असून त्याचे नाव आहे 'रॉयल ड्रगॉन' या रेस्टॉरंटमधे एकूण ९,२०० माणसे काम करतात. त्यातील ११४० नोकर म्हणजे तेथील स्त्री-पुरुष वेटर्स. हे सर्व रोलर स्केटस् वर फिरत असतात. ३२५ अुत्तम स्वयंपाकी स्वयंपाकाचे काम पहातात. एकाच वेळी ५,००० माणसे येथे बसून खाअू शकतात. पहावे तेंव्हा रेस्टॉरंटमधे गर्दीच गर्दी असते. दर तासाला येथे ३,००० पदार्थ बनवले जात असतात. आपल्याला वाटेल की जेवणाचे दालन खूप मोठे असेल. पण तसे नसून निरनिराळ्या दालनात मिळून ही सोय केलेली आहे.



# रक्षणकर्ता राक्षस

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाकडे गेला. शव अुतरून पुढे निघाल्यावर त्यातील वेताळ म्हणाला, "राजा तुझी सहनशक्ती अन् निश्चय पाहून असं वाटतंय की, आपलं ध्येय पूर्ण करण्यासाठी जरूर तर तू आयुष्यभरही या स्मशानातच राहशील. जीवनाच्या काही कठोर सत्यांशी अजून तुझी ओळख झालेली नसावीसं दिसतंय. हां, कदाचित असंही असेल की, सर्व काही माहीत असून त्या सगळ्याला तोंड द्यायच्या तयारीनं तू कंबर कसलेली असावीस. मग मात्र तुझ्या साहसाला दाद द्यायला हवी. पण आणखी एका विषयाचा परिचय करून घेणं तुला अत्यावश्यक आहे. काही माणसं पराकोटीची स्वार्थी असतात. आपला काही फायदा होणार नसला तरी, केवळ दुसऱ्याचं नुकसान करायला ते टपलेले असतात. त्यांची बुद्धीच वक्र असते. विचारपद्धती कुटील अन् कारस्थानपूर्ण असते. असल्याच एकाद्या माणसाच्या ताब्यात सापडून तू

कथा



चुपचाप हे कष्ट उपसत असावास अशी मला शंका वाटतेय. माझी शंका बरोबर असेल तर, मी तुला असं सुचवतो की, तू हा हट्ट सोडून दे. आपल्या राज्यात जाऊन सुखानं कालक्रमणा कर. यातच तुझं हित आहे. वेंकटेश नावाच्या एका दुष्टाची गोष्ट ऐक माझ्या तोंडून. त्याला बिन कष्टानं भरपूर संपत्ती मिळाली होती. पण या अहंकारी प्राण्यानं त्याच्याकडे सल्ला मागायला येणाऱ्यांना भयंकर अडचणीत टाकलं. तुला सावध करण्यासाठीच मी ही गोष्ट सांगतो आहे. गोष्ट ऐकताना तुझी थोडी करमणूकही होईल अन् चालण्याचे कष्ट विसरायला होतील. गोष्ट नीट लक्षपूर्वक ऐक.'' आणि वेताळ सांगू लागला.

एका गावात वेंकटेश नावाचा एक तरुण रहात असे. त्याचे आईबाप त्याच्या अगदी लहानपणीच अपघाताने नदीत बुडून मेले. स्वतःचे इतरे कोणी जवळचे नातेवाईकही नव्हते बिचाऱ्याला! या लहान लेकराला मग आसपासच्या लोकांनीच वाढवले. कोणी त्याच्यासाठी कपडे शिवी, कोणी दूध पाजी, तर कोणी काही खायला घाली. गावपाटलांनी त्याला गावच्या शाळेत घातले व तिथे जितके शिकणे शक्य होते, व तितके शिकवले. त्याच्यासाठी लागणारी वह्या-पुस्तके व इतर शालेय साहित्य ते स्वतःच त्याला खरेदी करून देत. पण गावची शाळा सातव्या इयत्तेपर्यंतच होती. पुढे स्वतः खर्च सोसून त्याला शहरात शिकवायची व्यवस्था कोण करणार? तो स्वतः समजूतदार होता. परिस्थितीची जाणीव असल्यामुळे बारा-तेराव्या वयापासूनच कुठेकुठे कामं करून तो आपलं पोट भरू लागला. फुरसत मिळाली की गावच्या पंडितांच्या आश्रयाला जाऊन त्यांच्याकडून थोडं-फार ज्ञान मिळवी. त्याची ज्ञानलालसा पाहून हे पंडित लोकही त्याला आवडीने व्यवहारज्ञान शिकवत. त्याच्या शंकांची उत्तरे देत. यामुळे तो बोलण्यात हजरजबाबी व चतुर झाला.

त्याच गावात सौदामिनी नावाची एक तरुणी होती. एके दिवशी तिला मोठं विचित्र स्वप्न पडलं. स्वप्नात तिला एक वैरागी दिसला. तो म्हणाला, ''योग्य माणसाशी विवाह केलास, तर आयुष्य सुखात जाईल तुझं.''

सौदामिनीनं विचारलं, ''तो माणूस योग्य आहे, हे कसं ओळखायचं?'' वैरागी उत्तरला, ''ज्या माणसाला तू - 'आकाशात किती तारे आहेत?' असं विचारल्यावर त्याच्याकडून 'विवाह नंतर मोजू या की!' असं उत्तर येईल, तोच माणूस योग्य पती होऊ शकेल.''

जागी झाल्यावर 'आपल्याला असं स्वप्न कसं काय पडलं?' याचंच सौदामिनीला मोठं आश्चर्य वाटलं. पण ही गोष्ट ती घरात कुणाजवळही बोलली नाही.

त्या दिवशी दुपारी सौदामिनी आपल्या मैत्रिणींबरोबर आमराईत गेली. तिथे लपंडाव खेळताखेळता ती एका झाडामागे लपायला गेली अन् चुकून तिथून जाणाऱ्या एका सापाच्या शेपटीवर तिने पाय ठेवला.

साप ताबडतोब फणा उभारून तिला डसणार, इतक्यात कोणी तरी हात पकडून तिला बाजूला खेचले व सापही घाबरून सळसळत वेगानं तिथून निघून गेला.

वळून पाहिल्यावर सौदामिनीला असे दिसले की आपला हात पकडून आपला जीव वाचवणारा माणूस वेंकटेशच आहे. तिचा हात पकडून बाजूला खेचल्यावर तिच्या सौंदर्यावर मुग्ध झालेला वेंकटेश टक लावून तिच्या तोंडाकडेच पहात होता!

तशी तर वेंकटेशला सौदामिनी ओळखत होतीच; पण इतक्या जवळून तिनं त्याला कधीच पाहिला नव्हता. तिला तर असा भास झाला की वेषांतर करून देशात भ्रमण करणारा हा कुणी राजकुमारच असावा.

''माझा जीव वाचवल्याबद्दल



धन्यवाद!'' ती हळूच पुटपुटली.

''होय, केवळ तुझा जीव वाचवण्यासाठीच मी स्पर्श केला तुला. पण अशी मधुर अनुभूती मी कधीच अनुभवली नव्हती. तेंव्हा, खरं तर मीच आभारी आहे तुझा!'' वेंकटेश मजेनं म्हणाला.

सौदामिनीच्या मनात अचानक विचार चमकला, 'हा वेंकटेशच तर माझ्यासाठी योग्य पती नव्हे?' तिनं ताबडतोब त्याला विचारलं, ''खूपच हुशार वाटतोस की! मग आकाशात किती नक्षत्रं आहेत, हे सांगू शकशील?''

''हं, सांगू शकतो. पण माझ्या उत्तरानं तू नाराज होशील अशी भीती वाटतेय मला.'' वेंकटेश बोलला.

''नाही, नाही. मुळीच नाराज नाही होणार. सांग बरं!'' सौदामिनीनं वायदा



केला.

"पुष्कळ वर्षं खर्चून मोठ्या कष्टानं मी नक्षत्र मोजून काढलीत. पण शेवटी मोजणी पुरी झाल्यावर मनात शंका आली की, बहुधा एक दोन तारे मोजलेच नाहीत मी! पण पुन्हा एकदा तेच काम करण्याइतकी शक्ती नाही माझ्यात. तेंव्हा आता असा विचार आहे की माझ्याप्रमाणेच नक्षत्र मोजू इच्छिणाऱ्या मुलीशी लग्न करावं. दोघांनी मिळून मोजली तर नक्षत्र मोजायचं हे काम यशस्वी होऊ शकेल." वेंकटेश म्हणाला.

त्याचं हे उत्तर ऐकताच सौदामिनीनं 'हाच आपला योग्य पती असल्याचा' निर्णय घेतला. आपल्याच विचारांची लज्जा वाटून ती तिथून एकदम पळून गेली.

घरी पोचल्यावर शशिकान्त नावाचा एक युवक आपल्या आई बाबांशी बोलत असलेला तिला दिसला. 'सौदामिनीवर आपलं फार प्रेम असून, तिच्याशी विवाह करायची इच्छा असल्याबद्दल' तो बोलत होता.

हा विवाह घडला तर तिच्या आईबाबांना हजार मोहरा द्यायला तयार असल्याचंही तो सांगत होता. त्याच्या या प्रस्तावाला आपली संतोषपूर्वक संमती असल्याचं आईबाबाही सांगत होते. थोड्या वेळानं शशिकान्त निघून गेल्यावर सौदामिनीनं आपल्या आईला आपलं स्वप्न व आमराईत घडलेल्या घटनेबद्दल सांगितलं. तिनं स्पष्ट सांगून टाकलं की, 'मी लग्न केलं, तर वेंकटेशशीच करीन.' आईनं ही गोष्ट पतीला सांगितली.

सौदामिनीचे बाबा ते ऐकून रागाने थरथरत म्हणाले, "स्वप्न मुळीच खरी नसतात; काही अर्थ नसतो त्यात. वेंकटेश सुंदर, धट्टाकट्टा आहे, म्हणून आपली सौदामिनी खूश झाली त्याच्यावर. पण ज्याच्याजवळ फुटकी कवडीसुद्धा नाही. अशा माणसाशी तिचं लग्न कसं करून देऊ? काहीही होवो, मी तिचं लग्न शशिकान्तशीच लावून देणार."

आपले बाबा किती हट्टी आहेत, हे सौदामिनी चांगलं ओळखून होती. म्हणून ती त्यांना म्हणाली, "मला एक संधी द्या बाबा! माझं स्वप्न खोटं नसल्याचं सिद्ध करून देईन मी. एक वर्षभर लग्न पुढे ढकला माझं. तेवढ्या अवधीत वेंकटेशने शशिकान्तपेक्षाही जास्त धन कमवून, दाखवलं तर माझं लग्न त्याच्याशी लावून द्या."

यावर सौदामिनीचे बाबा जोरात हसून म्हणाले, "हः! वेंकटेश काय एका वर्षात लाख मोहरा मिळवू शकेल? शशिकान्त लखपती असल्याचं तुला माहीत नसेल कदाचित. म्हणूनच असलं काहीतरी बडबडत आहेस तू."

"तो माझ्यासाठी खरोखरच योग्य असेल, तर नक्कीच कमवू शकेल. माझं स्वप्न खरंच ठरेल." सौदामिनी विश्वासपूर्ण स्वरात म्हणाली.

बाबांनी अट मान्य केली अन् सौदामिनीनं वेंकटेशला निरोप पाठवला.

आता वेंकटेशनंही सौदामिनीशीच लग्न करायचं पक्कं ठरवलं. अन् धन कमवायचा निश्चय करून तो शहरात निघून गेला. तिथं त्यानं हरतऱ्हेची कामं केली. काही महिने निघून गेले; पण तो एक हजार मोहराही जमवू शकला नाही. लाख मोहरा मिळवणं आता त्याला असाध्य वाटू लागलं, अन् तो निराश झाला.

अशातच एक दिवस त्यानं एका बैराग्याला बैलाच्या हल्ल्यातून वाचवलं. त्यानं तसं केलं नसतं, तर बैरागी नक्की मेलाच असता. खूप खूश होऊन बैराग्यानं वेंकटेशची चौकशी केली. मग तो म्हणाला, "अरे बेटा, इतक्या थोड्या काळात इतकी मोठी रक्कम मिळवण्याचा एकच मार्ग आहे. पण तो मोठा धोक्याचा आहे. करशील धाडस?"

वेंकटेश म्हणाला, "आता या प्रयत्नात



प्राण गेला तरी चालेल, पण मी मागे सरणार नाही."

बैराग्यानं सांगितलं की, शहरापासून कोसभर अंतरावर एक जंगल आहे. तिथल्या डोंगरात एक गुहा आहे. या गुहेत करोडो मोहरा असून, त्या धनाचं एक राक्षस रक्षण करत असतो. त्याच्या तावडीतून वाचून धन मिळवणं कठीण आहे.

बैराग्याच्या वर्णनाप्रमाणे शोधत वेंकटेश ताबडतोब जंगलात गेला. खूप शोधल्यावर त्याला ती गुहाही सापडली. गुहेसमोर तो राक्षस एकाद्या खडकासारखा बसून झोपला होता. त्याला पाहिल्याबरोबर वेंकटेशचं धाबंच दणाणलं! पण धीर एकवटून तो गुहेजवळ गेला. तिथं पोचल्याबरोबर एकदम जागा होऊन राक्षसानं त्याचा हात पकडला. कठोर आवाजात तो म्हणाला, "मला



चकवायचा विचार आहे काय? हूं!'' अन् तो जोरानं हुंकारत राहिला.

वेंकटेश त्याला बाबरला तर खराच! पण आपलं अुद्दिष्ट आठवून स्वतःला सावरून त्यानं आपली रामकहाणी राक्षसाला सांगितली.

''ओहो! तुला बैराग्यानं पाठवलं होय?'' असं म्हणत राक्षसानं आनन्दानं आपलं डोकं हलवलं आणि तो वेंकटेशला स्वतःच आपली हकिकत सांगू लागला.

राक्षसानं सांगितल्याप्रमाणं सौदामिनी ही त्याची पूर्वजन्मीची मुलगी होती. त्यानं तिला न आवडणाऱ्या माणसाशी तिचं जबरदस्तीनं लग्न लावून दिलं. सौदामिनीनं आत्महत्या केली. पूर्वजन्मी केलेल्या पापामुळे तो राक्षस बनला. 'सौदामिनीला आपण आवडत नाही' हे माहीत असूनही तिच्याशी लग्न केल्यामुळे तिचा तो पती या जन्मी बैरागी बनला. दोघांनाही आपापल्या पूर्वजन्माची माहिती असल्यामुळे केलेलं पाप धुवून टाकायच्या प्रयत्नात दोघेही होते. सौदामिनीला स्वप्नात हा बैरागीच दिसला होता; अन् त्यानंच तिला वेंकटेशवर प्रेम करायची प्रेरणा दिली. कारण वेंकटेश हाच तिचा पूर्व जन्मीचा प्रियकरही होता.

ही सर्व हकिकत जाणून वेंकटेश खुश झाला. अन् आशेनं त्यानं विचारलं, ''मग नक्की मदत करशील न मला?''

''हो, नक्कीच करीन. पण तूही माझ्यावर एक अुपकार करायला हवास.'' ''का नाही करणार? अुपकार नव्हे, तर काय अपकार करीन मी?'' वेंकटेश बोलला.

''ऐक, मी तुला दोन लाख मोहरा देईन. तुझं अन् सौदामिनीचं लग्नही होईल. पण एक वर्षाच्या आत तू असं एक लग्न करून द्यायचंस की जिथे वर अन् वधु एकमेकांना आवडत नसतील.'' राक्षसाने अट सांगितली.

''पण यामुळं तुला कसला फायदा होणार?'' वेंकटेशनं विचारलं. क्षणभर थांबून राक्षस म्हणाला, ''ऐक नीट. या गुहेतलं धन अक्षय आहे. जितकं धन आपण काढू, तितकं पुन्हा आपोआप जमा होतं. म्हणून रात्रंदिवस त्याचं रक्षणं करणं आवश्यक आहे. या जन्मी सौदामिनीचं शशिकान्तशी लग्न झालं असतं, तर तिचा बाप राक्षस होअून माझ्या जागी आला असता. परस्पर प्रेम नसूनही जबरदस्तीनं झालेल्या विवाहामुळेच मला अन् बैराग्यालाही मुक्ति मिळेल. आमच्या जागी दोन पाप्यांची स्थापना होणं आवश्यक आहे. आता कळली ना माझी गरज तुला?''

संकोचानं वेंकटेशनं विचारलं, ''अन् असं लग्न होअू न शकलं तर?''

या प्रश्नावर खदखदून हसत राक्षस म्हणाला, ''मूर्ख कुठचा! अशी लग्नं थांबवायच्या विचारात आहेस का? हे काम पूर्ण केल्यामुळे तशी तर आम्हा दोघांना मुक्ती मिळेलच. पण तुला माहीतच आहे की या गुहेत अक्षय निधि आहे. तेंव्हा इथे एका पहारेकऱ्याची आवश्यकता आहेच ना? हे तेंव्हाच शक्य होईल की जेंव्हा जबरदस्तीनं असं लग्न होईल.''

वेंकटेश म्हणाला, ''ठीक आहे. मी प्रयत्न चालू ठेवीन.''

''हं, ठीक. या प्रयत्नात रहाच. आता इथून निघून सरळ घरी जा. तुझ्या घरात दोन लाख मोहरा असतील. आपल्या इच्छे प्रमाणे सौदामिनीशी लग्न करून सुखानं रहा. मला दिलेलं वचन विसरू नकोस.'' राक्षस म्हणाला.

यानन्तर राक्षसानं सांगितल्याप्रमाणे घडत गेलं.

सौदामिनी वेंकटेशच्या लग्नानन्तर सहा महिन्यांनी वसुदत्त नावाचा एक माणूस वेंकटेशच्या घरी येअून म्हणाला, ''माझ्या मुलीचा एका नालायक माणसाशी लग्न करायचा विचार आहे, मला ते मुळीच पसन्त नाहीय. तू अगोदर गरीब होतास. मग सांग बरं, असा काही मार्ग आहे का, की ज्यामुळे माझ्या मुलीचा प्रियकर तुझ्याप्रमाणे धनवान बनू शकेल?''



वेंकटेश चिडून म्हणाला, "ही गोष्ट तर मुलीच्या प्रियकरानं विचारायला हवी. तू नव्हे!"

"पण तो तर काहीच ऐकायला तयार नाही. जसा आहे, त्याच परिस्थितीत लग्न करायचंय त्याला." वसुदत्त म्हणाला. वेंकटेशनं विचारलं, "मग तुझ्या मुलीचं काय म्हणणं आहे?"

वसुदत्त अुत्तरला, 'तिलाही धनाची मुळीच अपेक्षा नाही.'

थोडा विचार करून वेंकटेश म्हणाला, "लहान आहे अजून ती! पैशातच परमेश्वर आहे, हे कळलं नाहीय तिला. तू तिच्या बोलण्याची मुळीच पर्वा करू नकोस. त्या दरिद्र्याशी मुळीच तिचं लग्न करून देअू नकोस. मी अन् सौदामिनी सुखात आहोत याचं कारण धनच!"

मोठ्या आनंदानं वसुदेव तिथून निघून गेला.

इतकी गोष्ट सांगून वेताळ विक्रमला म्हणाला, "राजा, वेंकटेशनं वसुदेवला दिलेला सल्ला माझ्या दृष्टीनं द्रोहबुद्धीनं भरलेला आहे. वसुदत्तची मुलगी जर लग्नाला नकार देत आहे, तर जबरदस्ती करणं चूक आहे. ती आत्महत्त्या करायला ही मागेपुढे पहाणार नाही. असल्या सल्ल्यानं कुणाचंच भलं होणार नाहीय. अुलट हानीच होईल. माझी ही शंका तू दूर केली नाहीस, तर तुझं मस्तक धडावेगळं होईल."

विक्रम अुत्तरादाखल म्हणाला, "ज्या रक्षणकर्त्या राक्षसानं त्याच्यावर अुपकार केले, त्याला मदत केली, त्याचं ऋण चुकवणं हे वेंकटेशचं कर्तव्य आहे. ते काम करायचं वचनही दिलंय त्यानं. वचन न पाळणं हे पाप आहे. वसुदत्तला दया दाखवून स्वतः पापी बनायची काहीही आवश्यकता नाही. राक्षसाच्या गुहेत अत्यन्त आकर्षणशक्ती आहे. त्यामुळे प्रभावित होअून कित्येक वधुपिते तिथले पहारेकरी बनायला तयार होतीलच."

राजाचं मौन भंग करण्यात सफल झालेला वेताळ प्रेतासह अदृश्य होअून पुन्हा झाडावर जाअून बसला.





# गोवा

मूळपाठ : मीरा नायर ◆ चित्रकारी : गौतम सेन




गोव्याच्या जन्माबाबत एक दंतकथा आहे. एकदा महर्षि परशुराम ध्यान करण्यासाठी उपयुक्त अशा जागेचा शोध करीत होते. त्यांनी एक बाण सोडला. त्यांचा विचार होता की हा बाण जेथे पडेल, त्या जागेवर तपश्चर्या करायची. बाण अरबी समुद्रावर पडला. बाण पडताच तेथील पाणी हटू लागले नि एक सुंदर हिरवागार भू-प्रदेश वर आला. आज आपण ज्याला गोवा म्हणतो तो हा प्रदेश!

पुरातत्त्व वैज्ञानिकांच्या मतानुसार इसवी सनापूर्वी तिसऱ्या शतकात गोवापुर नावाचे एक महत्त्वाचे बंदर होते. ते अरबी देशांशी समुद्री मार्गाने होणाऱ्या व्यापारासाठी फार सोयीचे होते. पंधराव्या शतकापर्यंत येथे हिंदू राजे राज्य करीत असत. नंतर ते विजापुरच्या आदिलशाही सुलतानांच्या ताब्यात आले. सन् १५१० मधे पोर्तुगीजांनी यावर कब्जा मिळवला. त्यांनी येथे ४५१ वर्षे राज्य केले. डिसेंबर १९६१ मधे भारतीय सेनेने गोव्यात प्रवेश केला आणि मग तो भारताचा एक भाग बनला.



अल्फान्सो-द-अल्बुकर्कने सन १५१० मध्ये गोवा काबीज केला.

गोव्याचा समुद्र-किनारा १०५ किलो मीटर लांब आहे. उत्तरेकडील तेरेखोल पासून दक्षिणेकडील पोलेम पर्यंत काही ठिकाणी सोनेरी-रुपेरी वाळूने भरलेला लांबच लांब समुद्र-किनारा आहे, तर काही ठिकाणी टेकड्या आहेत. कोठे कोठे नद्या समुद्रात विलीन होताना दिसतात. पोर्तुगीजांनी समुद्र-किनाऱ्यावरील जवळ जवळ सर्व टेकड्यांवर किल्ले बांधले. या किल्ल्यात अग्वादचा किल्ला सर्वात सुंदर आहे. किल्ल्यात गोड्या पाण्याचे अनेक झरे होते, म्हणून पोर्तुगीजांनी याचे नाव ठेवले अगुआडा (पोर्तुगीज मधे पाण्याला म्हणतात 'अगुआ'). हिन्दी महासागर व अरबी समुद्र यातील दीर्घ



अगुआडा किल्ल्याची एक भिंत



दोना-पावला वरून जमिनीचे शेवटचे टोक

प्रवास संपवून अगुआडा मधील गोड पाणी पिऊन नाविक संतुष्ट होत असत. पोर्तुगीजांच्या काळात अगुआडा आणि रीस मेगोस या किल्ल्यांचा तुरुंगासारखा उपयोग केला जात असे व आज ही तसाच होतो. गोव्याचे सुप्रसिद्ध समुद्र-किनारे किल्ल्यांच्या उंच प्राचीरांना जोडतात. हारमल, चापोरा, वागाटोर, बागा, कलंगुट, अंजुना, गॅस्पर डियस आणि दोना पावला हे उत्तर गोव्याचे प्रसिद्ध वालुकामय समुद्र-किनारे आहेत. परदेशी प्रवाशांना धनुष्याच्या आकाराचा कलंगुट किनारा फार आवडतो. दोना पावला हे नाव एका व्हाइसरायच्या मुलीच्या नावावरून ठेवण्यात आले आहे. आपल्या मच्छीमार प्रेमिकाशी लग्न करण्याची परवानगी न मिळाल्यामुळे तिने येथील एका टेकडीवरून उडी मारून आत्महत्या केली होती. वेल्हा गोवा म्हणजे जुना गोवा पणजीपासून नऊ किलोमीटर अंतरावर आहे. सोळाव्या शतकात ही गोव्याची राजधानी होती. त्या काळी वेल्हा गोव्याचे वैभव पोर्तुगालची राजधानी लिस्बनहून अधिक होते असे म्हणतात. नदीच्या किनाऱ्यावर गोव्याचे प्रतीक म्हणून व्हाइसरॉयचे प्रवेशद्वार (व्हाइसरॉयज आर्क) बांधलेले आहे. गोव्याचा प्रत्येक व्हाइसराय या द्वारातून गोव्यात प्रवेश करीत असे. प्रसिद्ध दर्यावर्दी संशोधक वास्को-ड-गामाच्या स्मरणार्थ हे द्वार बांधण्यात आले. वास्को-ड-गामाने युरोपहून भारताला येण्याचा समुद्री मार्ग शोधून काढला होता. या द्वारापासून जवळच संत कजेतानचे चर्च आहे. ते रोम येथील सेंट पीटर बॅसिलिका सारखे बनविले आहे.

संत कजेतान चर्च समोरच से कॅथीड्रल आहे. हे आशियातील सर्वात प्राचीन व विशाल चर्चमधील एक चर्च आहे.

'से' कॅथीड्रल





संत फ्रांसिस झेवियर

येथील घंटेला सिनो डो औरो म्हणजेच सोन्याची घंटा म्हणतात. या घंटेचा आवाज मोठा भारदस्त नि गंभीर आहे.

या दोन्ही चर्च जवळच गोव्यातील अत्यंत महत्त्वाचे व प्रसिद्ध चर्च आहे बॉम येशू बॅसिलिका. याला सेंट फ्रांसिस झेवियरचे चर्च ही म्हणतात. गोव्यातील प्रमुख संत फ्रांसिस झेवियरचा मृत देह या चर्च मध्ये ठेवलेला आहे.

फ्रांसिस झेवियर यांचा जन्म एप्रिल १५०६ मध्ये स्पेन मधील नवारे येथे झाला. कॉलेजात शिकत असतानाच आपले एक धर्म-मित्र इग्नेशियस लॉयोला यांच्या प्रेरणेने त्यांनी आमरण प्रभुसेवा करण्याचे व्रत घेतले. ८ मे १५४२ रोजी ते गोव्यात आले. त्यांनी कोंकणी व पोर्तुगालची भाषा पोर्तुगीज मधून ख्रिश्चन धर्माचा प्रचार केला. काही महिनेच गोव्यात राहून त्यांनी येशू ख्रिस्ताच्या उपदेशांचा जनतेत प्रचार केला. येथून पुढे ते तमिळनाडूच्या किनारपट्टी वरील प्रदेश, श्रीलंका इत्यादि ठिकाणी गेले. नंतर ते जपान व चीन मध्ये गेले. ३ डिसेंबर १५५१ रोजी चीन मधील सीधियान बेटावर त्यांना मृत्यु आला. दोन वर्षांनी जेव्हा थडग्यातून त्यांचे शव बाहेर काढले गेले, तेव्हा ते जसेच्या तसे राहिलेले पाहून लोकांना मोठे आश्चर्य वाटले. नंतर त्यांचे शव गोव्यात आणले गेले. अनेक वर्षे लोटल्यावर ही आज संत झेवियरच्या मृत देहात काही ही विकार आलेला नाही. तो थोडा कृश झाल्यासारखा दिसतो. दर दहा वर्षातून एकदा बॉम येशू चर्चपासून 'से' कॅथीड्रल पर्यंत एक मिरवणूक काढण्यात येते. तेव्हा जगातील अनेक देशातून ख्रिश्चन भक्त इथे येतात.

बॉम येशू चर्चच्या समोर एका डोंगरावर संत योनिकाचे चर्च व एक कॉन्वेंट (साध्वी मठ) आहे. पूर्व आशियातील ख्रिश्चन साध्वींचे हे सर्वात



बॉम येशू बॅसिलिका



गोवा शेतीप्रधान राज्य आहे. तांदूळ हे येथील प्रमुख पीक होय.

मोठे निवासस्थान (ननरी) आहे.

गोव्याची राजधानी पणजी मांडवी नदीच्या दक्षिण-किनाऱ्यावर वसलेली आहे. येथील सचिवालय-भवन गोव्याची एक अति-प्राचीन इमारत आहे. कोणे एके काळी येथे आदिलशहाचा महाल होता. याच्या डाव्या बाजूला गोव्याचे संमोहन-तज्ज्ञ आबे फारिआ यांचा काशाचा बनविलेला पुतळा आहे. त्यांचं संपूर्ण नाव जोसे कस्टाडिओ डि फारिआ. त्यांनी तरुणपणीच गोव्याहून पोर्तुगालला शिक्षणासाठी प्रयाण केले. नंतर ते पाद्री, वैज्ञानिक व चिकित्सक बनले. त्यांना संमोहन-विद्येचा जनक मानले जाते. संमोहन हे एक शास्त्र आहे आणि मानसिक रोग्याला योग्य त्या सूचना देऊन त्याच्यावर शारीरिक उपचार ही करता येतो असे प्रतिपादन त्यांनी सर्वप्रथम केले. प्रसिद्ध फ्रेंच कादंबरीकार अलेक्झांडर ड्यूमाने आपल्या द माउंट ऑफ मॉंटे क्रिस्टो नावाच्या कादंबरीत वेड्या साधूचे जे वर्णन केले आहे ते आबे फारिआला पाहून केले असे काही लोक म्हणतात.



आबे फारियाचा पुतळा

पणजीच्या दक्षिण-पूर्वेला काही किलोमीटर अंतरावर शंकराचे प्रसिद्ध मंगेशी मंदिर आहे. या मंदिराच्या नावाची गोष्ट अशी आहे. एकदा कैलास पर्वतावर शिव आणि पार्वती यांचे भांडण झाले. पार्वती रागावून धरतीवर आली. ती जेव्हा येथे जंगलात हिंडत होती, तेव्हा तिला एक वाघ येताना दिसला. तेव्हा पार्वतीच्या मुखातून शब्द बाहेर पडले - ''त्राहि मां गिरीश!'' अशा प्रकारे येथे बनलेल्या मंदिराचे नाव पडले - मां गिरिश. यातूनच मांगीश शब्द झाला आणि शेवटी त्याचे रूप झाले - मंगेशी.



श्री मंगेशी मंदिर





# दृष्टिकोण

वृंदावनात श्रीनाथ नावाचा एक पंडित गुरुकुल चालवीत असे. त्याचे दोन शिष्य होते - गदाधर नि विद्याधर. दोघे जानी दोस्त होते.

अध्ययन संपल्यावर दोघे आपापल्या गावी गेले. गदाधरने आपल्या गावात एक शाळा सुरू केली. गावातील सर्व लोक त्याच्या शिकवण्याच्या पद्धतीची तारीफ करीत. त्याची चांगली मिळकत पाहून त्याच गावातील एकाने आपली मुलगी दमयंती हिचे त्याच्याशी लग्न करून दिले. दमयंतीला सुंदर नावाचा एक मुलगा झाला. आई-बाप मोठ्या प्रेमाने बालकाचे संगोपन करू लागले. त्यांनी त्याचे नाव ठेवले सुंदर.

एकदा विद्याधर आपली पत्नी अनसूया आणि दोन वर्षांचा मुलगा चंद्र यांना घेऊन गदाधरच्या घरी आला. दोन्ही मित्र खूप दिवसांनी एकमेकांना भेटले. दोघांनी आपापल्या व्यवसायाबाबत खूप गप्पा-गोष्टी केल्या. गदाधरने जेव्हां आपल्या शाळेबाबत सर्व माहिती सांगितली तेव्हा विद्याधर म्हणाला - ''मी व्यापारात खूप पैसा कमवला. आता केव्हा तरी तुम्ही दोघे सुंदर सह माझ्याकडे या.''

इकडे दोन्ही मित्र गप्पा मारीत बसले होते, तिकडे त्यांच्या बायका एकमेकींशी बोलण्यात रंगून गेल्या होत्या. मुलांकडे कोणाचेच लक्ष नव्हते, एकदम मुलांच्या भांडणाचा आवाज ऐकू आला. सुंदरने चन्द्रला धपाटा दिला, म्हणून चन्द्र रडू लागला.

विद्याधरने चन्द्रला कडेवर घेतले आणि म्हणाला - ''गदाधर, एवढ्या तेवढ्या गोष्टींवर सारामारी करायची सुंदरला सवय लागलेली दिसतेय. ही सवय चांगली नव्हे.''

गदाधर हसत म्हणाला - ''होय, तुझे म्हणणे बरोबर आहे. मी खूप प्रयत्न करतो, पण त्याची सवय काही जात नाही. मी नेहमी त्याला लहान मुलांपासून दूर ठेवतो. आज

सुलोचना गायकवाड



माझी चूक झाली.''

विद्याधर अमळ रागाने म्हणाला - ''अरे, हंसतोस काय? अगोदर या वाईट सवयींपासून सुंदरला वाचव.''

गदाधर पुन्हा हसत म्हणाला - ''दोन वर्षांचा छोटा मुलगा. त्याला कसं समजून सांगायचं?''

विद्याधर चिडून म्हणाला - ''चंद्रला ही अशीच सवय होती. मी त्याला चांगलं पिटून काढलं. तेव्हांपासून सुधारला तो!''

आता गदाधरच्या लक्षात आलं की आपला मित्र एवढ्या गंभीरपणे काय समजावून सांगतोय. त्याला थोडं वाईट वाटलं. विद्याधरला समजावीत तो म्हणाला - ''माझा सुंदर मोठा बुद्धिमान आहे. गोष्ट सांगितलेली त्याला समजते. गाणं तो मोठ्या आनंदाने ऐकतो. पण तो ज्या खोड्या करतो, त्यांबाबत त्याला किती ही समजावलं तरी काही उपयोग होत नाही. मी त्याला रोज सांगत असतो. मला वाटते, एक-दोन वर्षात तो सुधारेल आपोआप.''

''तुझ्या मुलाच्या स्वभावात बदल होईल असं मला नाही वाटत, त्याच्या सवयी कधी सुटणार नाहीत. तुम्ही लोक त्याला नीट समजाऊन सांगता असं मला नाही वाटत.'' विद्याधरने आपला विचार सांगितला.

दुसऱ्याच दिवशी विद्याधर आणि त्याची बायको आपल्या गावी निघून गेले. पण गदाधरला मात्र आपल्या मुलाबाबत चिंता वाटू लागली. विद्याधर बाबत त्याच्या मनात आदर होता, म्हणून आपल्या मुलात सुधारणा व्हावी यासाठी तो प्रयत्न करू लागला. सुंदरने जराशी खोडी केली की त्याला मारायला गदाधरने सुरुवात केली. अर्थात् यामुळे त्याचा खोडकरपणा कमी झाला नाही. तो बापाजवळ यायला भिऊ लागला. वडिलांना पाहताच त्याला भयाने कापरे भरे.

या घटनेनंतर काही दिवसांनी गुरु श्रीनाथ एकदा गदाधरकडे आला. तो गदाधरला म्हणाला - ''शिष्य आपल्या पुत्रासारखा असतो. मी आपल्या नातवाला बघायला आलो आहे. आण बरं त्याला जरा इकडे.''

गदाधरने बायकोला बोलवलं आणि स्वतः बाहेर निघून गेला. गदाधरला असा बाहेर गेलेला पाहून श्रीनाथला मोठं आश्चर्य वाटलं. गदाधरची बायको सुंदरला घेऊन आली. गुरूने मुलाचा मुका घेतला आणि प्रेमाने त्याच्याशी बोलू लागला. श्रीनाथने बायकोला



गदाधरला बोलवायला सांगितलं. ती म्हणाली - ''ते नाही यायचे. कारण सुंदर त्यांना पाहून घाबरतो.'' आणि दमयंतीने गुरूला घडलेली सर्व घटना सांगितली.

गुरु श्रीनाथने गदाधरला बोलावलं आणि अमळ धमकावीत म्हणाला - ''अरे, तुझी बुद्धि तर भ्रष्ट झाली नाही ना? कुणाच्या सांगण्यावर विश्वास ठेवून आपल्या मुलाशी राक्षसासारखा वागतो आहेस!''

गदाधर नम्रतापूर्वक म्हणाला - ''गुरुजी, विद्याधर कोणी परका का आहे? मी त्याला आपला आदर्श मित्र मानतो. त्याच्या प्रत्येक सांगण्यामागे काही अर्थ असतो हे त्याच्या बरोबर अभ्यास करीत असताना मला चांगलं समजलेलं आहे!''

हंसत श्रीनाथने सांगितले - ''विद्याधरचा दृष्टिकोण तुझ्याहून मी अधिक चांगला जाणतो. पण काही लोक आपल्या मुलावर फाजिल प्रेम करतात हे तुला माहीत नाही असं दिसतंय. या अति प्रेमामुळे जगात अनेक अपराध घडतात. विद्याधरच्या बोलण्याकडे लक्ष देऊ नकोस. मुले मारून सुधारत नाहीत, प्रेमाने गोड गोड बोलून त्यांना वश करायचे असते. सुंदरने खोडी केली की प्रत्येक वेळी त्याला गोडीने समजावीत रहा.'' परंतु एवढ्याने गदाधरची शंका दूर झाली नाही. तेव्हा गुरु म्हणाला - ''चल, आपण दोघे ही विद्याधरला भेटायला जाऊ. तुझ्या समक्षच मी त्याच्याशी बोलेन.''

श्रीनाथ आणि गदाधर दोघे ही निघाले आणि संध्याकाळपर्यंत विद्याधरच्या घरी



पोचले. विद्याधरने गुरु आणि मित्र दोघांचे यथोचित स्वागत केले.

बोलता बोलता श्रीनाथने गदाधरचा मुलगा सुंदर याच्या प्रेमळ खोडकरपणाचे वर्णन केले. विद्याधरला ते सहन होईना. तो आवेशाने म्हणाला - ''सुंदर सारखी खोडकर मुलं मला मुळीच आवडत नाहीत. त्या दिवशी सुंदरने जी खोडी केली, ती मी जन्मभर विसरणार नाही.''

''बेटा, हंस दूध नि पाणी वेगवेगळे करून खुश होतो. लहान मुलांच्या खोड्या आणि त्यांचा प्रेमळ व्यवहार यांना वेगळे करून माणूस पाहू शकणार नाही का?'' यावर विद्याधरने काही उत्तर दिले नाही.

रात्री विद्याधरची बायको अनुसूया हिने ताटं वाढून सर्वांना जेवायला बोलवलं. सर्व जण भोजन करू लागले. त्यावेळी चन्द्र

पाण्याचा लोटा हातात घेऊन इकडे-तिकडे हिंडत होता.

श्रीनाथ अमळ घाबरून म्हणाला - ''हा चंद्र पाणी सांडेल. त्याच्या हातातून लोटा काढून घ्या बरं!''

अनुसूया मुलाच्या हातून लोटा काढून घ्यायला निघाली तेव्हा विद्याधरने तिला थांबवून म्हटले - ''थांब, लोटा त्याच्या हातून घेऊ नकोस. तो रडायला लागेल. त्याचं रडणं मला सहन होत नाही. लोटा तर त्याने हातात घट्ट पकडलेला आहे. घाबरायचं काही कारण नाही.''

एवढ्यात चंद्रने आपल्या बापाच्या ताटात लोट्यातील पाणी ओतून टाकले. विद्याधर उठणार एवढ्यात श्रीनाथने त्याला थांबवीत म्हटले - ''नाही बेटा, तो लहान मुलगा आहे. त्याला काय कळतंय? त्याला मारू नकोस.''

विद्याधर आश्चर्यचकित होत म्हणाला - ''एवढ्याशा गोष्टीवर मी चंद्रवर हात टाकीन असं का बरं आपल्याला वाटलं? ताटातील पाणी काढून टाकण्यासाठी मी उठलो होतो गुरुजी !''

नाराज होऊन गदाधरकडे पाहण्याचे नाटक करीत श्रीनाथ म्हणाला - ''पाहिलंस? तू तर म्हणत होतास मुलाने खोडी केली की विद्याधर त्याला मारतो. तुझं सांगणं बरोबर नव्हतं. आता तरी आपली चूक लक्षात घेशील का?''

हे ऐकून काय करावे हे विद्याधरला कळेना. गदाधरला घेऊन गुरुजी आपल्याकडे कशासाठी आले हे आता त्याच्या लक्षात आले. तो म्हणाला - ''त्या दिवशी गदाधरच्या घरी मी उगाच राईचा पर्वत केला. गुरुजी, मी चुकलो. आपल्या चुकीचे कसे प्रायश्चित्त करू ?''

शिष्याच्या प्रश्नावर खुश होत श्रीनाथने निवेदन केले - ''दुसऱ्यांच्या मुलांकडे ती आपलीच मुले आहेत असं समजून पहावं. आपल्या मुलांना ती दुसऱ्यांची आहेत असं समजावं. म्हणजे तुझ्या दृष्टिकोणात योग्य तो बदल घडून येईल.''

यानंतर गदाधर नि विद्याधर यांच्या मैत्रीत त्यांची मुले कधी बाधक बनली नाहीत.



चांदोबा

# सोनेरी क्षण

## अंतरिक्षातील भयानक राक्षस

भारताचा पहिला अंतरिक्ष-यात्री सूर्य हा चंद्रावर पोचला.

एकाएकी

घर्र्र्र्र्र

अरे! हे काय?

आवाज ऐकून सूर्यने वळून पाहिले.

घर्र्र्र्र्र

आहा !

घर्र्र्र्र्र

सूर्यने तात्काळ लेसर ब्ला-स्टरने त्याला जाळून टाकले.

भयानक राक्षस मरून गेला.

ही गोष्ट सांगताना लेखकाने कोणती चूक केली आहे?

## त्रिमिति मुखवटा तयार करा



१. एक रबरी फुगा घ्या. तो इतका फुगवा की तुमच्या डोक्याहून थोडा मोठा होईल. आतील हवा कमी होऊ नये म्हणून त्याचे तोंड दोऱ्याने बांधून टाका.

२. एक कागद घ्या. कात्रीने त्याचे ३ सें.मी. x २ सें.मी. आकाराचे लहान लहान तुकडे कापा.

३. खालच्या बाजूला थोडी जागा सोडून फुग्यावर हे कागदाचे तुकडे एक एक करून चिकटवा. सुकल्यावर या तुकड्यांवर कागदाच्या तुकड्यांचा आणखी एक थर चिकटवा. हा थर सुकल्यावर आणखी एक तिसरा कागदांच्या तुकड्यांचा थर चिकटवा.

४. हे सर्व कागदाचे थर चांगले सुकल्यावर फुग्यातील हवा सोडून द्या. नंतर चिकटवलेल्या कागदाच्या थरातून हळू हळू फुगा बाहेर खेचून घ्या. आता तुम्हाला एक द्रोण मिळेल. या द्रोणाच्या तळाशी कात्रीने असे भोक कापा की ज्यात तुमचे डोके शिरू शकेल.

५. यानंतर डोळे व नाकासाठी योग्य ठिकाणी भोके कापा. आता निरनिराळ्या रंगांनी मुखवटा तुमच्या आवडीप्रमाणे रंगवा. तुमच्यासाठी येथे काही नमुने दिले आहेत.



## या तीन सोप्या क्रमांनी हत्तीचे चित्र काढा.







# महाभारत

**दु**र्योधनाच्या मनात पांडवांबद्दलचा द्वेष वाढतच होता. त्या अस्वस्थतेमुळे त्याची तब्येतही बिघडत चालली. तो अशक्त, बारीक दिसू लागला. त्यामुळे दुःखी झालेल्या शकुनीने एकदा त्याला विचारले, ''दुर्योधना, तू असा क्षीण कशामुळे होत चालला आहेस? कसली एवढी चिन्ता तुझं शरीर पोखरत आहे?''

दुर्योधन उत्तरला, ''कसं सांगू मामा? अर्जुनाच्या पराक्रमाच्या आधाराने धर्मराज सम्राट बनला. सर्व राजे त्याचे मांडलीक बनले. कृष्णाने भरसभेत शिशुपालवध केला, तेंव्हा कोणी तोंडसुद्धा उघडलं नाही, आपला विरोध दर्शवला नाही. सर्व राजांनी रत्नांच्या राशी आणून धर्मराजाच्या पायावर ओतल्या. पांडवांचे वैभव वर्णनातीत आहे. त्यांच्या वैभवापुढे माझा काय पाड? तुम्ही तर स्वतःच पाहिलंत की मयसभेत त्यांनी माझी कशी चेष्टा केली, माझा अपमान केला! मला आता जगणंच असह्य झालंय. माझं दुःख माझ्या तातांना सांगा ना!''

शकुनी दुर्योधनाला म्हणाला, ''अरे, पांडवांचं वैभव पाहून तू कशाला कुढतोयस? त्यांनी जी संपत्ती मिळवली, ती बरोबरच मिळवली. दैवबल त्यांच्याच बाजूला झुकतं आहे. त्यामुळेच त्यांच्या नाशाचे तुझे सगळे प्रयत्न विफल झाले. द्रौपदी त्यांची धर्मपत्नी बनली. हे म्हणजे त्यांचं भाग्यच म्हणायला हवं. त्यामुळेच द्रुपदाचा त्यांना मोलाचा आधार प्राप्त झाला. कृष्णाबद्दल तर काही बोलायची गरजच नाही. लहानपणापासूनच तो



पांडवांचं रक्षण अन् त्यांना मदत करण्यात गुंतलेला आहे. खांडव वनाच्या दहनाच्या बदल्यात अग्निदेवाकडून अर्जुनाला गांडीव, अक्षयभाता अन् दिव्यास्त्रं प्राप्त झाली. तेंव्हा यात अधर्म किंवा अनीति कसली? ही गोष्ट मात्र खरी, की पांडव वरप्राप्त पुत्र आहेत. पण तू का इतका अधीर होत आहेस? स्वतःला कमी का लेखत आहेस? तुला असं का वाटतंय, की तुझं 'आपलं' असं कोणीच नाही? खरं पाहिलं, तर तुझ्या शक्तीपुढे त्यांची काय किंमत? तुझे ९९ भाऊ आहेत. धनुर्विद्या-प्रवीण द्रोण तुझ्या बाजूला आहेत. सर्व-शास्त्रपारंगत अश्वत्थामा, कर्ण, कृपाचार्य अन् मी स्वतः तुझेच तर आहोत!''

''बाकी सगळ्यांचं सोड. एकटा कर्णही अर्जुनाला हरवायला समर्थ आहे. पांडवांची सारी मदार तर अर्जुनावरच आहे न? तुला तर आठवतच असेल की, तुम्हा सर्व राजकुमारांचं शिक्षण संपल्यावर गुरु द्रोणांनी सर्वांची परीक्षा व्हावी अन् जनतेलाही तुम्हा सर्वांच्या पारंगततेबद्दल कळावं म्हणून काही स्पर्धा आयोजित केल्या; त्यावेळी अर्जुनाने दाखवलेल्या सर्व कौशल्यात कर्णानि बरोबरी करून दाखवली अन् शेवटी त्याला मल्लयुद्धाचे आव्हान दिले. यावेळी अर्जुन निश्चितच हरला असता. पण द्रोण, भीष्म आदींनी ऐनवेळी कर्णाच्या कुळाचा प्रश्न अुपस्थित करून त्याचा सर्वांसमक्ष पाणअुतारा केला. तू त्यावेळी एक गोष्ट मात्र चांगली केलीस, की कर्णाला अंगदेशचं राज्य बहाल करून त्याला कायम आपला ऋणी करून ठेवलास. कर्णानं यानंतर प्रत्यक्ष परशुरामाकडून ब्रह्मास्त्र प्राप्त करून घेतलं आहे, हे ही तुला माहीत आहे. त्याने दिग्विजय सुद्धा करून दाखवला. आज ज्या द्रुपदराजाच्या आधाराने पांडव प्रबल झाले आहेत, ती संधी कर्णालाही मिळाली असती. द्रौपदी स्वयंवराच्या वेळचा पण कर्णानि सहजतेनं जिंकला असता, पण ऐनवेळी द्रौपदीनेही त्याच्या कुलाचा अुल्लेख करून 'त्याच्याशी विवाह करायला आपण तयार नसल्याचं' सांगितलं! त्यावेळी कर्णानं पण जिंकला असता तर द्रुपदाचा आधारही आपल्यालाच मिळाला असता.

हे सर्व आत्ता मी तुला सांगायचा मथितार्थ तुझ्या ध्यानात आला असेलच. कर्णासारखा योद्धा तुझ्या बाजूला आहे, हे तू विसरू नकोस.''

''मग आता कसला अुशीर? आपलं सैन्य घेअून जाअू अन् पांडवांना हरवून त्यांची मयसभा हस्तिनापुरला घेअून येअू,'' दुर्योधन म्हणाला.

''दुर्योधना, पांडवांना जिंकणं इतकं सोपं समजू नकोस. अन् युद्धच कशाला करायला हवं? त्याहीपेक्षा सोपा अुपाय मी सांगेन तुला. धर्मराजाला द्यूत खूप आवडतं बघ. त्याला द्यूतासाठी बोलाव इथे. मीच त्याला हरवून त्याचं राज्य अन् सर्व संपत्ती तुझ्या हाती सोपवीन. पण यासाठी तुला आपल्या पित्याची परवानगी मिळवायला हवी.''

शकुनीला बरोबर घेअून दुर्योधन धृतराष्ट्राजवळ गेला. त्यावेळी धृतराष्ट्र धर्मराजाने केलेल्या राजसूय यज्ञाची माहिती जाणून घेत आपली प्रसन्नता व्यक्त करत होता. तेंव्हा शकुनी त्याला म्हणाला, ''आपला दुर्योधन फारच दुःखी आहे, अगदी बारीक झालाय तो! त्याचं तोंड सुकून गेलंय पार.''

हे ऐकून धृतराष्ट्राला धक्काच बसला. मोठ्या प्रेमाने त्याने आपल्या ज्येष्ठ पुत्राला जवळ बसवून घेतले. त्याच्या पाठीवर हात फिरवून विचारले, ''कारे बाबा, असा क्षीण का झाला आहेस?

दुर्योधन बोलू लागला, ''तात, आपल्या मनची व्यथा कशी सांगू? बोलवत नाही मला! भोजन गोड लागत नाही मला! शत्रूचं वैभव, ऐश्वर्य पाहून दुःखी आहे मी.



धर्मराजासारखा संपन्न राजा आजवर झालाच नाही. सध्या माझं स्वास्थ्य खराब व्हायचं हेच कारण आहे.''

यानन्तर मुद्दामच धृतराष्ट्राच्या अुपस्थितीत शकुनी दुर्योधनाला म्हणाला, ''दुर्योधना, धर्मराजाला द्यूत खेळायचं व्यसन आहे, पण तो त्या खेळात मुळीच प्रवीण नाहीय. मी द्यूतात चांगला पक्का आहे. आपल्या युक्तीनं मी त्याची सर्व संपत्ती तुझ्या ताब्यात देईन. युद्ध किंवा द्यूतासाठी निमन्त्रण मिळालं तर जाणं हा क्षत्रीयधर्म आहे. धर्मराज हा क्षत्रीयधर्म नक्कीच पाळेल. आपण बोलावलं की जरूर येईल तो द्यूत खेळायला.''

दुर्योधनाने आपल्या पित्याच्या पावलांवर लोळण घेतली अन् शकुनीच्या मागणीला परवानगी देण्याबद्दल गयावया करू लागला.



अश्रुपात करू लागला.

धृतराष्ट्र दुर्योधनाला म्हणाला, ''विदुराचा सल्ला घेऊन आपण या संबधात काय करावं याचा निर्णय घेऊ.''

''विदुरकाका तर कोणत्याही परिस्थितीत हा प्रस्ताव मान्य करणार नाहीत. पण तुम्ही जर परवानगी दिली नाहीत, तर मी जिवन्त रहायचा प्रश्नच येत नाही. मी मेल्यावर तुम्ही अन् विदुरकाका हे राज्य आपल्या मस्तकावर धारण करा अन् संभाळा.'' दुर्योधन कर्कश्य आवाजात बोलला. पुत्रमोहामुळे धृतराष्ट्र दुर्योधनाचा प्रस्ताव टाळू शकला नाही. त्याने कारागिरांना बोलावून द्यूतसभा बांधायला सांगितले. त्यांना तो म्हणाला, ''या द्यूतसभेला हजार खांब असावेत, शंभर दरवाजे असावे अन् रंगीबेरंगी शिळांनी भरलेला मंडप असावा.'' नंतर त्याने विदुराला बोलावले. पण आपल्या मनची गोष्ट त्याच्यापासून लपवून इतकेच सांगितले की धर्मराजाला द्यूत खेळण्यासाठी निमन्त्रण द्यायचे आहे. पण विदुराने स्पष्ट शब्दात म्हटले, ''मी मुळीच याला सहमत नाही. द्यूतामुळे भावाभावात शत्रुत्व सुरू होईल. तेव्हा यासाठी पाऊल पुढे न टाकणंच श्रेयस्कर !''

धृतराष्ट्र म्हणाला, ''विदुर, यात बरंही होऊ शकतं अन् वाईटही. पण कोणत्याही परिस्थितीत हे द्यूत स्नेहपूर्वक खेळलं जाईल. त्यात मैत्रीची भावना असावी. मुलांच्या मनात शत्रुत्वाचा प्रश्न अुठलाच, तर मी, तू, भीष्म, द्रोण सर्वजण आहोतच ना. आपण परिस्थिति संभाळून घेऊ. तू इन्द्रप्रस्थला जाऊन धर्मराजाला घेऊन ये.''

पितामह भीष्मांना ही हकिकत सांगून त्यांचा सल्ला विचारायला विदुर निघाला. तो गेल्याबरोबर धृतराष्ट्राने आपल्या मुलाला द्यूताबद्दल विसरून जायला सुचवले. वाटले तर त्यानेही राजसूय यज्ञ करून सम्राट बनावे, असेही सांगितले. पण दुर्योधनावर त्याचा मुळीच परिणाम झाला नाही. शकुनी म्हणाला की द्यूतही युद्धासारखंच आहे. जय-पराजय युक्ती अन् बुद्धीवर अवलंबून आहे.

या अवधीत धृतराष्ट्राने सांगितल्याप्रमाणे हस्तिनापुरातही एक मोठे भवन निर्माण झाले. धृतराष्ट्राने धर्मराजाला स्नेहपूर्वक द्यूत खेळण्याचे आमंत्रण देण्यासाठी विदुराला इन्द्रप्रस्थला जायची आज्ञा दिली.

सर्व काही चुकीचे घडत असल्याचे जाणूनही, आज्ञेचे अुल्लंघन करणे हा राजद्रोह होईल म्हणून विदुर इन्द्रप्रस्थला गेला. धर्मराजाने त्याचे स्वागत करून विचारले, ''विदुरकाका, आपण खुशाल आहात ना? आपला चेहरा कोमेजलेला का दिसतोय? धृतराष्ट्र, दुर्योधन आदि सर्वजण खुशाल आहेत ना?'' विदुर अुत्तरला, ''सर्व जण खुशालच आहेत. तुझ्या मयसभेप्रमाणेच एक सभा हस्तिनापुरलाही बनली आहे. तू काही दिवस तिथे राहून दुर्योधनाशी स्नेहपूर्वक द्यूत खेळावंस अशी धृतराष्ट्राची इच्छा आहे. त्याचं म्हणणं आहे की, तुझ्याशी द्यूत खेळल्यावरच त्याच्या पुत्रांना व त्याला स्वतःला सुख प्राप्त होईल. तू त्या दुष्टांची इच्छा पुरी करावीस.''

धर्मराज म्हणाला, ''नाही नाही, यामुळे तर मित्रही शत्रु होऊन जातील; वैरभावना वाढेल. तुम्ही याबद्दल आपलं स्वतःचं मत सांगा बरं! तुम्ही म्हणाल, तसं करायला मी तयार आहे.''

''मी त्या आंधळं पुत्रप्रेम करणाऱ्याला सांगितलं, की द्यूत हे भांडणाला कारण होईल. पण त्यानं माझं ऐकूनच घेतलं नाही अन् तुला बोलावण्यासाठी मला पाठवलं. आता तूच नीट विचार करून निर्णय घे.'' विदुर धर्मराजाला म्हणाला.

धर्मराजाने विचारले, ''द्यूत खेळण्यासाठी तिथे कोणाची इतकी तडफड चालू आहे?'' विदुर अुत्तरला, ''शकुनी, विवंशती, चित्रसेन, सत्यव्रती, पुरमित्र अन् जय.''

''ओहो, तर सर्व द्यूतवेडे तिथे जमलेले आहेत तर! मला शंका आहे की यात काही काळंबेरं आहे. पण माझा तर कोणी बोलावलं तर द्यूत खेळायला जायचा नियम आहे. मला भीती तर वाटतेय, पण अवश्य जाईन मी हस्तिनापुरला, अुद्याच निघतो.''





निघायची तयारी झाली. धर्मराज द्रौपदी व बंधूंसह हस्तिनापुरला पोचला. धृतराष्ट्र, भीष्म, द्रोण, कृपाचार्य, अश्वत्थामा आदि वडीलधाऱ्यांना त्यांनी नमस्कार केला; गान्धारीकडे जाऊन तिची खुशाली विचारली. द्रौपदीच्या मुखावरचे महाराणीचे तेज पाहून दुर्योधन आदींच्या बायका मनोमन द्वेषाने जळू लागल्या.

दुसऱ्याच दिवशी सकाळी धर्मराज, शकुनी, दुर्योधन, दुःशासन द्यूतकक्षात आले व त्यांनी सर्वांना प्रणाम केला. शकुनी धर्मराजाला म्हणाला, ''केवळ तुला पहाण्यासाठी काहीजण इथे आले आहेत. काहीजण तुझ्याशी द्यूत खेळायला आले आहेत. पण आपण नियमबद्ध होऊन द्यूत खेळू या.''

धर्मराज म्हणाला, ''मामा, द्यूतात फसवणूक करणं हा अक्षम्य अपराध असतो. तसं करणारा क्षत्रिय म्हणवायला योग्य नव्हे. तेंव्हा फसवाफसवी करून आम्हाला जिंकायचा प्रयत्न करू नका. आम्ही जे कमवलंय, ते सारं ब्राह्मणांचं संरक्षण अन् दुष्टांच्या निर्दालनासाठी आहे.''

''वेदाध्ययनात समर्थ क्षत्रिय दुसऱ्या एकाद्या क्षत्रियाला वेदाध्ययनात हरवतो, तेंव्हा फसणाऱ्या जुवेखोराला फसवणं हे चुकीचं ठरत नाही. हां, खेळायची तुझी इच्छाच नसेल, तर नको खेळूस.''

धर्मराज अुसळून म्हणाला, ''द्यूत खेळण्यासाठीच तर बोलावलं आहे मला! तेंव्हा माघारी फिरणं, अनादर केल्यासारखं होईल. म्हणून खेळतो मी, नक्कीच खेळेन. कोण खेळणार आहे माझ्याशी?''

''माझे प्रतिनिधी म्हणून मामाच खेळतील तुझ्याशी. ते जे पणाला लावतील, ते देण्याची जबाबदारी माझी!'' दुर्योधन म्हणाला.

''कोणी कोणाचा प्रतिनिधी म्हणून खेळणार, ही गोष्ट कधी पाहिली नाही, न ऐकलीही नाही. हे तर सारं विलक्षणच वाटतंय. तरीही, तुम्हा लोकांची इच्छा प्रमाण! मी तयार आहे खेळायला.'' धर्मराज बोलला.

धृतराष्ट्राच्या निमन्त्रणावरून वृद्ध कौरव भीष्म, द्रोणाचार्य, कृप, विदुर आदि सर्वजण तेथे येऊन बसले.

पहिल्या डावात धर्मराजाने आपला गळयातला हार पणाला लावला, तर

दुर्योधनाने हिऱ्यांची रास लावली. डावात धर्मराज हरला. यानंतर सर्व डाव धर्मराज हरतच राहिला. द्यूतांत हेरता-हरता धर्मराजाच्या क्रोधाचा अन् सूडाचा पारा चढत राहिला. सोने, रथ, दासी व इतर अनेक मूल्यवान वस्तु धर्मराज हरला.

हे सर्व विदुराला पहावेना. तो धृतराष्ट्राला म्हणाला, "असं म्हणतात की ज्याचा मृत्यु जवळ ठेपला असेल, त्याला दिव्य औषधही आवडत नाहीसं होतं, त्याप्रमाणेच माझं बोलणं तुला आवडणार नाही. तुझ्या पुत्राचा जन्मच मुळी कौरवकुलाच्या विनाशासाठी झालेला आहे. तूही या कपटी द्यूताची योजना करून पांडवांचं धन लुटत आहेस. पण यामुळे तुझं अपार नुकसान होणार आहे. माझ्या बोलण्याकडे लक्ष दे. पांडवांना सतावू नको, आज नाही तर केंव्हा तरी नक्कीच त्यांच्या रागाला बळी पडावं लागेल तुम्हाला. तुम्हा लोकांचं मग निश्चितच निर्मूलन होईल. द्यूत आत्ताच बन्द करावं हे बरं!"

धृतराष्ट्र यावर गप्प राहिला; पण दुर्योधनाने मात्र आवेशात येऊन विदुराला खूप शिव्या दिल्या. या अवधीत युधिष्ठिर आपल्या जवळचे सर्वकाही हरवून बसला. ब्राह्मणांची शेते व ब्राह्मण सोडून बाकी सर्व माणसेही तो द्यूतात हरला. त्यासमोर फासे फेकत शकुनी म्हणाला, "पणाला लावायला आता तुझ्याकडे उरलंय तरी काय?"

धर्मराजाने नकुल-सहदेवांना पणाला लावले अन् तो ही डाव हरून बसला. नंतर भीम-अर्जुनही त्याच्या हातून गेले. स्वतःला पणाला लावूनही हरला तो.

"द्रौपदीही तुझीच तर संपत्ती आहे. लाव न पणाला!" शकुनीने आव्हान दिले. तोही डाव धर्मराज हरला.

या घटनेमुळे सभेत खळबळ माजली. काहींनी टीका केली की, 'कौरवांचा अंत आता निकट आलाय.' भीष्म, द्रोण, कृप मौनच राहिले. आपल्या असहायतेची त्यांना शरम वाटली. विदुरही फक्त फुसफुसत राहिला. कर्ण, दुःशासनाच्या आनन्दाला सीमा उरली नाही.



| 'चांदोबा' पुरवणी - ९१ | भारताची वृक्षसंपदा |
|---|---|

# पेऱ्ज़ी

चकचकीत हिरव्या रंगाची चांगल्या फुटभर लाम्बी व भरपूर रुन्दीच्या पानांनी भरलेला हा निंब सामान्य निंब प्रकारातला वृक्ष नव्हे. हा वृक्ष आकाराने भरपूर मोठा व याची पानेही निंबापेक्षा मोठी असतात. ही पाने लहान लहान आकाराच्या पानांमधे चिरली गेलेली असतात. अंडाकृती असलेली याची कड चरबरीत असते.

हिन्दीत याला 'बाकौस', बंगालीत 'महानीम', तमिळमधे 'मलैवेम्बु', मल्याळीत 'करीनवेम्बु' व गुजराथीत 'बाकान लिम्डो' असे म्हणतात. इंग्रजीत याला 'बीड ट्री' व पर्शियनमधे 'लिलॅक' म्हणतात. हा वृक्ष पर्शिया व बलुचिस्तानातून अन्य प्रदेशात प्रसृत झाला, असे मानले जाते.

याच्या फुलांचा रंग बैंगणी असतो. हलक्या निळसर रंगाच्या पानांनी भरलेला हा वृक्ष मोठा सुन्दर दिसतो. यातून वहात आलेली मधाळ वासाची हवा शरीराला सुखवते. वसन्त ऋतुच्या सुरुवातीला म्हणजे मार्च-एप्रिलमधे नवीन फुटलेल्या डहाळ्यांवर फुले उमलतात. नंतर हळूहळू झाडे पानांनी भरू लागतात. दोन-तीन महिन्यांनी फुले झडू लागतात.

या झाडाची फळे गोल असतात. आत गर असतो. आत चार बीजे असलेल्या या फळाची वरची साल चांगली चिवट असते. ही फळे पक्षी जरी आवडीने खात असले, तरी मानवांसाठी मात्र ती विषारी मानली जातात. बीजांमधे औषधी गुण असतात. विशेषतः सांधेदुखीवर ती गुणकारी असतात. ही बीजे मधून मधून हारात ओवली जातात.

ही झाडे जवळजवळ १२ ते २५ मीटर उंचीपर्यंत वाढतात. ती दाट व छत्रीसारखी असतात. विशेषतः यांची वाढ भरभर होत असल्याने सावलीसाठी ही झाडे लावली जातात.



आपल्या देशातील ऋषि-मुनी

# महीदास - कवश

विशाल नावाच्या ऋषीजवळ अनेक शिष्य विद्याभ्यास करत असत. त्यांच्यातच त्यांचा स्वतःचा मुलगाही होता. शिष्यांना जेंव्हा समजले की, त्या दिवशी गुरुजी यज्ञाच्या विधीचे वर्णन सांगणार आहेत, तेंव्हा यांचा हा मुलगाही मोठ्या अुत्साहाने तेथे हजर राहिला. परन्तु विशाल ऋषींनी त्याला दुसरेच काही काम सांगून तेथून दुसरीकडे पाठवले.

पित्याच्या या वागण्यामुळे चकित झालेला मुलगा आपल्या मातेकडे गेला व आश्चर्य प्रकट करीत म्हणाला, ''बाबा मला यज्ञाचा विधी शिकण्यापासून दूर का ठेवू इच्छित आहेत, कळत नाहीय मला. का बरं ते शिकवायची इच्छा नाही त्यांची?''

आई म्हणाली, ''बाळा, तुझे वडील ब्राह्मण आहेत, पण मी तर एका शेतकरी कुटुम्बातली आहे. तुझे वडील केवळ ब्राह्मणांनाच ते ज्ञान देतात. पण त्यांनी ते न शिकवलं, तरी तुझं काहीच नुकसान होणार नाही. तू आतापासूनच भूमातेची पूजा करत जा. भूमाता हीच मानव-जीवनाचे आधारकेन्द्र आहे. सर्व संपदा आणि विद्यांचं मूळही भूमाताच: ही देवी मोठी प्रेमळ आहे. तिच्या पूजेमुळे तुला ज्ञानप्राप्तीही होईल.''

यानन्तर पुत्र बारा वर्षेपर्यन्त मोठ्या श्रद्धा-भक्तीने भूमातेची पूजा करत राहिला, गंभीरपणे निसर्गाचे परिशीलन करत राहिला. तो शेती करत असे. हाच मुलगा मोठा झाला, तेंव्हा 'महीदास' नावाने श्रेष्ठ ऋषी म्हणून प्रसिद्ध झाला. मातेच्या 'इतरा' या नावावरून लोक त्यांना 'ऐतरेय' असेही म्हणत. त्यांनी 'ऐतरेय ब्राह्मण', 'ऐतरेय अुपनिषद', 'ऐतरेय अरण्यक' नावाचे तीन ग्रन्थ रचले. एकशे पंधरा वर्षांचे आयुष्य त्यांना लाभले. त्यांची माता ब्राह्मण नसली, तरीही सर्वजण त्यांना खूप मान देत.

त्यांनी रचलेल्या 'ऐतरेय ब्राह्मण' या ग्रन्थात कवश नावाच्या ऋषींचा अुल्लेख आहे. कवशांची माताही ब्राह्मण नव्हती. काही मुनि सरस्वतीच्या किनारी तपस्येत मग्न असताना कवश तेथे पोचले. मुनि म्हणाले, ''आम्ही तर तुला बोलवले नव्हते, मग का आलास तू इथे?''

कवश हे ऐकून जेंव्हा तेथून निघून जाअू लागले, तेंव्हा सरस्वतीचा प्रवाह त्यांच्या जवळ जाअून पोचला व आपल्या पाण्याने त्यांचे पादप्रक्षालन केले. हे पाहून मुनि हतप्रभ झाले. कवशांची श्रेष्ठता त्यांनी ओळखली व क्षमायाचना केली.



# तुम्हाला माहीत आहे का?

१. एका देशाचे नागरिक ज्वालामुखीला पवित्र मानतात. त्या ज्वालामुखीचे नाव काय?
२. विम्बल्डन टेनिसमधे भाग घेणाऱ्या पहिल्या खेळाडूचे नाव काय?
३. आपल्या देशातील सर्वात मोठा मानवनिर्मित तलाव कोणता?
४. दागिने बनवताना सोन्यामधे कोणता धातु मिश्रित केला जातो?
५. कोलंबसने अमेरिका केंव्हा शोधून काढली?
६. कोणत्या नदीला 'बंगालची अश्रूंची नदी' म्हटले जाते?
७. अंतरराष्ट्रीय न्यायालयात किती न्यायाधीश असतात?
८. आपल्या देशाचा अंतरिक्ष प्रवासी राकेश शर्मा याने दोन रशियन यात्रींबरोबर आपली यात्रा केंव्हा सुरु केली?
९. फाहियान आपल्या देशात केंव्हा आले होते?
१०. एशियाड क्रीडास्पर्धा सर्वप्रथम केंव्हा व कुठे झाली? त्यात विजेते कोण होते?
११. मानव-शरीरात हाडांचा मुख्य अुपयोग काय?
१२. ताजमहाल कोणी बांधला? त्याच्या बांधकामाला किती वर्षे लागली?
१३. मंगोलियाच्या राजधानीचे नाव काय?
१४. वल्लभभाई पटेल यांना 'सरदार' का म्हणतात?
१५. जगात सर्वात मोठ्या प्रमाणावर धान्यव्यापार कोठे होतो?
१६. आपल्या देशातील सर्वात मोठा धबधबा कोणता?

## अुत्तरे

१. माअुंट फुजियामा, जपानमधे.
२. सरदार निल सिंग, १९०२ मधे.
३. नर्मदा.
४. तांबे.
५. १४९२ मधे.
६. दामोदर.
७. पंधरा.
८. ५ एप्रिल, १९८४.
९. ई.स. ४०५-४११ च्या मधे.
१०. १९५१, नवी दिल्ली, भारत, जपान.
११. शरीराला सांगाडा देवून आकार देतात व हृदय, मेन्दु, फुफ्फुसे यांसारख्या अवयवांचे रक्षण करतात.
१२. मुगल बादशहा शहजहान, २२ वर्षे.
१३. उलान बेटार.
१४. गुजराथेत त्यांनी कर न देण्याच्या आन्दोलनाचे नेतृत्व केले, त्यामुळे लोक त्यांना 'सरदार' म्हणू लागले.
१५. अमेरिकेतील शिकागो येथे.
१६. कर्नाटकातील जोग धबधबा.



# देता किती घेशील?

गौरीधामचा शंकर कोणे एके काळी चांगला श्रीमंत माणूस होता. पण तसाच तो नादान ही होता. यामुळे त्याची संपत्ति संपुष्टात येऊ लागली. जो जे मागेल ते तो देई. कोणावर ही मोकळ्या हाताने जाण्याची पाळी येत नसे. म्हणून आज तो गरीब झाला होता. गरीबीत कसे तरी दिवस काढी. पण जवळ पैसा असला की दान-धर्म करण्याची वृत्ति मात्र गेली नाही. त्याची पत्नी केव्हाच स्वर्गवासी झालेली होती. आता त्याला एकच एक आधार होता - त्याची मुलगी शकुंतला.

शकुंतला दिसायला फार सुंदर होती. तिचा स्वभाव ही फार छान होता. आपल्या एकुलत्या एक मुलीला आपण सुखात ठेवू शकत नाही असा विचार करून शंकर फार दु:खी होई. रात्रंदिवस या विचाराने त्याला झोप येत नसे. त्याचा परिणाम त्याच्या प्रकृतीवर ही होई.

शंकरचा एक जिवलग मित्र होता भूपति. शंकरची दयनीय अवस्था पाहून त्याने शकुंतलेसाठी एक स्थळ आणले. मुलगा सत्यवान कृष्णपुरीतील कचेरीत काम करीत होता. एकाद्या सुंदर मुलीशी लग्न करायची त्याची इच्छा होती. भूपति त्याचा दूरचा नातेवाईक होता. त्याने त्याला शकुंतलेबाबत सांगितले. सत्यवान म्हणाला - ''एकदम कसं सांगू शकेन मी? एकदा मुलगी तरी पाहू या!''

शंकरशी सत्यवानबाबत बोलत भूपति म्हणाला - ''नवरदेवाच्या बापाला पाहिजे आहे पैसा! पण सत्यवानला मुलगी पसंत पडली तर आपण त्याला समजाऊ शकू. आपली शकुंतला तशी मोठी गुणी मुलगी आहे. ती नक्कीच पसंत पडेल कुणाला ही. नक्षत्रासारखी पोर आहे! तो हुंड्याची रक्कम कमी करील. सगळं काही ठीक होईल असं मला वाटतंय.''

आपल्या नाजुक स्थितीचे वर्णन करीत शंकर म्हणाला - ''निदान पाच हजार तरी हुंडा द्यावाच लागेल ना? मला हे शक्य होणार नाही. याशिवाय लग्नात आणखी खर्च करावाच लागेल. एवढी सारी रक्कम मी आणू तरी कोठून? या पोरीला उजवणं म्हणजे मला तरी महासंकटच वाटतंय. तू प्रयत्न करून पहा. याऊपर परमेश्वराची इच्छा!''

थोड्या संकोचाने भूपति म्हणाला - ''जवळ जवळ १५ वर्षांपूर्वी कोदंडरामने दुसऱ्या एकाद्या शहरात जाऊन व्यापार करण्यासाठी तुझ्याकडून पैसे घेतले होते आणि आपल्या कुटुंबासह तो निघून गेला. तुला हे सर्व आठवतंय? तसा कोदंडराम भला माणूस आहे. व्यापार ही चांगलाच केला असेल त्याने. तुझे पैसे बुडवायची त्याची इच्छा खासच नसेल.''

शंकर म्हणाला-''ही तर फार जुनी गोष्ट आहे. मी तर ते सगळं विसरून गेलोय. त्याला पैसे देण्याची इच्छा असती तर यापूर्वीच त्याने देऊन नसते का टाकले? आता त्या पैशांची अपेक्षा करणं मला व्यर्थ वाटतंय. तो हल्ली कुठे आहे हे तरी मला कोठे माहीत आहे?''

''एक आठवड्यापूर्वी मी कृष्णपुरीला गेलो होतो. तेथे मी श्रीविष्णूच्या मंदिरात गेलो होतो. तेथील सर्व पहारेकरी सर्वांना दूर हटवीत होते. काय चाललं आहे हे मी काही अंतरावरून पहात होतो. एवढ्यात चार सेवकांसह कोदंडराम तेथे आला. पंधरा वर्षांपूर्वी जसा होता, तसाच तो दिसला मला. आपली शंका दूर करण्यासाठी मी



आसपासच्या लोकांकडे त्याच्याबाबत चौकशी केली. गर्दीतील एकाने माहिती दिली - ''हे कोदंडराम-शहरातील मोठे व्यापारी आहेत. ते मोठे धर्मात्मा ही आहेत. मंदिराच्या मागे एक मोठी धर्मशाळा आहे, ती त्यांनीच बांधलेली आहे. शहरातील शैक्षणिक संस्थांना उदारपणे हे मदत करीत असतात.'' हा मोठा धर्मात्मा इकडे कधी का आला नाही हे मात्र माझ्या लक्षात आले नाही. त्याने तुला भेटायला जरूर यायला हवं होतं. तुझं कर्ज त्याने अवश्य फेडायला हवं होतं. नाव तर त्याने खूप कमवलंय, मग तुझ्याशी त्याने असा व्यवहार का केला? का कोणास ठाऊक, पण त्याला जाऊन भेटावं असं मला वाटलं नाही. तू म्हणत असलास तर आपण एकदा जाऊ त्याला भेटायला.''

यशवंत पवार



"असं आहे होय? परमेश्वराच्या कृपेने खूप श्रीमंत झालाय तो ! चांगलंच आहे." संतोषाने शंकर म्हणाला.

शंकरची कीव करीत भूपति म्हणाला - "अत्यधिक दान-धर्म करून तू आपली अशी अवस्था करून घेतलीस. या परिस्थितीत ही तू मुकाट्याने बसलास, तर तुझ्या मुलीचं काय होईल कोण जाणे? तिचं सर्व लागी लावून देणं तुझंच कर्तव्य आहे ना? आपण दोघे जाऊन कोदंडरामला भेटू आणि त्याच्याकडून मदत मागू या."

शंकरने नकार दिला नाही. थोड्याच दिवसात सत्यवान, त्याचे वडील रामावतार आपल्या अनेक नातेवाइकांना घेऊन मोठ्या थाटामाटाने शकुंतलेला पाहण्यासाठी आले. नवरी मुलगी शकुंतला सर्वांनाच आवडली.

रामावतारने भूपतीला निवेदन केले - "भूपति, मुलगी तर आम्हा सर्वांना पसंत आहे. माझा मुलगा सरकारी कचेरीत काम करतो हे तुला माहीतच आहे. पंचवीस हजार हुंडा द्यायला तयार आहेत काही लोक. पण मुलगी पसंत नाही म्हणून आम्ही अजून काही पक्के केलेले नाही."

भूपति म्हणाला - "रामावतार, शंकरची हलाखीची स्थिति मी अगोदरच सांगितलीय. आजच्या परिस्थितीत तो पाच हजारांहून अधिक देऊ शकणार नाही."

रामावतारला थोडा रागच आला. पण तो लपवीत तो म्हणाला - "फक्त पाच हजार! कोणी ऐकलं तर हसं होईल माझं. पंधरा हजारांहून एक पैसा कमी घेणार नाही मी!"

इतक्यात एक घोडा-गाडी घरासमोर येऊन थांबली. गाडीतून एक तरूण खाली उतरला. त्याच्या दोन हातात दोन पिशव्या होत्या.

त्याला आत येताना पाहताच रामावतार ताबडतोब उठून उभा राहिला. त्याला नमस्कार करीत आश्चर्याने म्हणाला - "अरे, तुम्ही इकडे कसे काय आलात?"

या प्रश्नावर युवक हसला. आश्चर्याने रामावतारकडे पहात तो शंकर जवळ आला आणि त्याचे पाय धरले. मग त्याने विचारले - "काका, आपण मला ओळखलं नाही? आपले मित्र कोदंडराव यांचा मी थोरला मुलगा. पंधरा वर्षांपूर्वी आपण बालगोपाल म्हणून मला कडेवर घेऊन मिरवीत होतात. मी तोच गोपाळ."



त्याचे बोलणे ऐकून शंकरला फार आनंद झाला. गोपाळकडे पहात प्रेमाने तो उद्गारला - "किती मोठा झालास रे तू! तुम्हा सर्वांना पाहून किती दीर्घ काळ लोटला. तुझे आई-वडील खुशाल आहेत ना?"

"सगळं काही उत्तम आहे!" म्हणत गोपाळ रामावतार जवळ येऊन म्हणाला - "आपण इथे कसे हे मला सांगाल का?"

शकुंतलेकडे बोट दाखवीत रामावतारने सांगितले - "सत्यवानशी हिचं लग्न जमविण्यासाठी मी इथं आलो होतो. मला पाहिजे इतका हुंडा शंकरराव देऊ शकत नाहीत. तेव्हा आता जातो मी." आणि रामावतार जायला निघाला.

गोपालने रामावतारला थांबवलं आणि म्हणाला - "आपल्या मनात प्रश्न आहे, मी इथं का आलो? तर मग ऐका. माझ्या वडिलांची इच्छा आहे की शकुंतला त्यांची सून व्हावी. आपणास पाहून वाटलं की मला यायला उशीर झाला. काही ही असो, माझ्या वडिलांची इच्छा पूर्ण करण्यात आपण मला मदतच केली. मी आपले आभार मानतो."

त्याच्या बोलण्यातील व्यंग जाणून रामावतारला थोडे वाईट वाटले आणि आपल्या सर्व लोकांना घेऊन तो लगबगीने निघाला.

रामावतारचे सर्व लोक गेल्यावर शंकर आणि शकुंतला यांच्याकडे पहात गोपाळ म्हणाला - "आपला विचार न जाणताच



मी झटपट निर्णय घेऊन टाकला. आता मी काय म्हणतो ते सर्व ऐकून घ्या."

"पंधरा वर्षांपूर्वी माझ्या वडिलांनी आपणाकडून काही पैसे घेतले होते. त्यावेळी आपली आर्थिक स्थिति खालावत चाललेली होती. माझ्या वडिलांनी कृष्णपुरला येऊन आपला व्यापार सुरू केला. त्यांनी व्यापारात खूप पैसा मिळवला. एक वर्ष पूर्ण झाल्यावर आपली रक्कम सव्याज आपणास देण्यासाठी वडील निघाले. वाटेत त्यांना एक मित्र भेटला आणि त्याच्याकडून त्यांना समजले की आपल्या स्वभावात काही ही बदल झालेला नाही. अपात्री दान करण्याची आपली प्रवृत्ति आहे तशीच आहे. म्हणून त्यांनी आपली रक्कम परत करण्याचा विचार स्थगित केला. ती रक्कम त्यांनी आपल्याच

नावावर व्यापारात गुंतवली. प्रत्येक वर्षी जो फायदा होई तो त्यांनी आपल्याच नावे सुरक्षित ठेवला. ती आपली सगळी रक्कम मी या दोन पिशव्यात भरून आणली आहे. आता गोष्ट राहिली-'' इतके बोलून तो थांबला.

''का बरं? थांबलास का? जे काही मनात आहे ते निःसंकोचपणे सांग.'' शंकर म्हणाला.

शकुंतलेकडे पहात गोपाळ म्हणाला - ''काका, माझ्या आईवडिलांच्या मनात आपणाबद्दल आदर आहे. तुमच्या मुलीला आपली सून बनवण्याची त्यांची इच्छा आहे. मी म्हटलं - मला जर मुलगी पसंत पडली तर मी तिच्याशी लग्न करीन. म्हणून ते स्वतः आले नाहीत, त्यांनी मला एकट्यालाच पाठवलं. तुमची मुलगी मला एकदम पसंत! आता पुढील निर्णय आपला.''

त्याच्या या बोलण्यावर खुश होऊन शंकर नि भूपति यांनी शकुंतलेकडे पाहिले. शकुंतलेने लाजून मान खाली घातली आणि म्हणाली - ''माझ्या वडिलांच्या मित्राच्या मनात आमच्याबद्दल एवढी आत्मीयता आहे, तेव्हा त्यांची इच्छा मला आज्ञेप्रमाणे आहे. परमेश्वराला समर्पित केलेलं सुगंधित पुष्प आपल्या डोक्यात घालताना जो आनंद होतो, तोच आनंद मला या क्षणी होत आहे. कोदंडकाकांची आज्ञा मला शिरोधार्य आहे.''

शकुंतलेचा विचार ऐकून शंकरला अतिशय आनंद झाला आणि गोपाळला आलिंगन देत तो म्हणाला - ''बेटा, चांगल्या मित्राहून जवळचा नातेवाईक कोणी नाही असे म्हणतात. आज तू ते सिद्ध करून दाखवलस!''

आपला आनंद प्रकट करीत भूपति म्हणाला - ''तुझे वडील आदर्श मित्र आहेत. खरा भाग्यवान तर हा शंकर आहे. संपत्ति, याहून अधिक मूल्यवान मैत्री, तुझ्यासारखा गुणी जावई, सगळं काही त्याला एकदम मिळालं. कवीने किती छान म्हटलंय - 'अनंत हस्ते कमलावराने, देता किती घेशील दो कराने?' असे म्हणत भूपतीने शंकरचे हार्दिक अभिनंदन केले.





# घराचा मुख्य दरवाजा

समर आणि सरल नावाचे दोन तरूण एकाच गावचे रहिवासी होते. लहान-पणापासून अगदी जिवलग मित्र होते ते एकमेकांचे. काही वर्षांनी सरल आपलं पोट भरण्यासाठी दूरच्या प्रान्तात निघून गेला. समर मात्र गावातच राहून शेती करू लागला. खूप कमाई केली त्याने शेतीत. बरीच जनावरे खरीदली, लग्न केलं अन् नवं घरही बनवलं. आरामात राहू लागला तो.

गाव सोडून गेलेला सरल सात वर्षांनी परत आला. आपल्या बालपणच्या दोस्ताला भेटावंसं वाटलं त्याला. त्याच्या लहान घराच्या जागी एक मोठं घर दिसलं अन् घरासमोरचं पिंपळाचं झाडही आता चांगलं मोठं झालं होतं. पिंपळाला चांगला पारही बांधलेला होता.

सरल मनात म्हणाला, ''समरची परिस्थिती खूप चांगली झालेली दिसतेय.'' पण तो जेव्हा घराजवळ गेला, तेंव्हा एक मोठासा कुत्रा धावत येऊन त्याच्यावर भुंकू लागला.

भुंकणं ऐकून समरची बायको दार उघडून बाहेर आली. कुत्र्याला रागावून तिने हाकलून दिलं अन् सरलकडे निरखून पाहू लागली.

सरलनं विचारलं, ''समरचंच घर ना हे?'' तेंव्हा मान हलवून होकार भरला समरच्या बायकोनं.

''घरातच आहे, की कुठे बाहेर गेलाय तो?'' सरलनं विचारलं.

''मला सांगून नाही गेले ते!'' ती फारशी उत्सुकता न दाखवता उत्तरली. सरल म्हणाला, ''आम्ही दोघं लंगोटीयार. सात वर्षांपूर्वी गाव सोडून बाहेर गेलो मी. त्याला भेटायला मुद्दाम आलोय.''

समरची बायको यावर काहीच बोलली नाही. सरलला 'आत या' असंही म्हणाली नाही. सरलनंही घरात येण्याची इच्छा दर्शवली नाही. बाहेर पारावरच बसला तो, अन् पंचानं

मयूर जगदाळे

आपला घाम पुसूं लागला. नंतर त्यानं विचारलं, ''गैरसमज करू नका, पण समरच्या कोण लागता तुम्ही? त्याची बायको का?''

पुन्हा तिनं फक्त मान हलवून होकार दर्शवला.

''ठीक आहे. नुकतंच लग्न झालंयसं वाटतंय. बापरे, काय कडक ऊन्ह हे! जरासं पाणी देणार प्यायला?'' सरलनं विचारल्यावर समरची बायको लोट्यात पाणी घेऊन आली. ते थंड तर नव्हतंच पण शिळा वासही होता पाण्याला. सरलनं पाणी तसंच ओतून दिलं अन् लोटा परत देत तो म्हणाला, ''आता जायला हवं मला. समरला भेटायची फार इच्छा होती. पण नाही भेटला तो. त्याला सांगा की सरल भेटायला आला होता. अन् असंही सांगा की त्याची एकूण परिस्थिति पाहून खूप आनन्द वाटला मला. घर खूप सुंदर अन् मोठं बांधलंय. पण इतकं मात्र नक्की सांगा की, घराचा हा दरवाजा मात्र मुळीच आवडला नाही मला. वाटलं, ते बोललो; वाईट वाटून घ्यायचं नाही. दरवाजा अगदीच चुकीचा आहे. मला सुतारकामाचं चांगलं ज्ञान आहे. समरनं मात्र दरवाज्याकडे दुर्लक्ष केलंय. नक्की सांगा त्याला!'' इतकं बोलून सरल निघून गेला.

अंधार होऊ लागला तरीही समर परतला नव्हता. मध्यरात्री परत आल्यावर सरल येऊन गेल्याचं त्याला कळलं. त्याला वाईट वाटलं फार. बायकोला तो म्हणाला, ''राहून का घेतलं नाहीस त्याला? अगं, लहानपणचे फार जिवश्चकंठश्च मित्र आम्ही.''

समरला लहानपणच्या आठवणी येऊ लागल्या. पुन्हा भूतकाळात शिरल्यासारखा तो बायकोला सांगू लागला, ''सरल इथं मागल्या गल्लीत रहात असे. इथंच गावच्या शाळेत शिकलो आम्ही. दोन्हीं घरची परिस्थिती बेताचीच असल्यानं इथं सातवी-



पर्यन्त शिकल्यावर पुढं शहरात शिकायला नाही जाऊ शकलो. सरलच्या वडलांना-शिवाकाकांना गावापुरती सुतारकी येत होती. तोही मग शाळा शिकताशिकता त्यांच्या हाताखाली काही 'ठाकठोक' करी. मीही नंतर बाबांच्या हाताखाली शेतीत रमू लागलो. शिवाकाका तब्येतीनं यथातथाच. त्यांच्या मरणानंतर काही दिवसांनी काकींनीही 'राम' म्हटला. सरल मग गावाला कंटाळला अन् घर विकून दूर निघून गेला.''

''पण इथलं शिक्षण होईपर्यन्त खूप मजा केली आम्ही. सकाळपासून संध्याकाळपर्यन्त जवळजवळ सारा वेळ एकत्रच असायचो आम्ही. शाळा सुटली की परस्पर आम्ही नदीकडे जायचो अन् दप्तरं झाडाला लटकावून तासभर तरी नदीत डुंबायचो. कधी खेळताना कुणाशी भांडण बिंडण झालं की आम्ही दोघं एकमेकांची बाजू घेऊन त्या तिसऱ्याशी भांडायचो. कधी मारामाऱ्याही चालत आमच्या. पण घरी आईबाबांनी विचारलं तर खुशाल, 'खेळताना पडलो' म्हणून खोटं सांगायचो. बरं, जाताना काही म्हणाला का तो?''

''म्हणाले की आपली परिस्थिति पाहून फार आनन्द वाटला त्यांना. घर खूप आवडलं म्हणे त्यांना. पण असंही म्हणाले की आपला मुख्य दरवाजा बरोबर नाहीय. आपल्या सुतारकीच्या ज्ञानाची ग्वाही देत तीन तीनदा म्हणाले की, दरवाजा अगदीच चुकीचा आहे. तुम्हाला हे सांगावं असंही पुनःपुन्हा बजावून गेले ते.'' समरच्या बायकोनं निरोप सांगितला.

समरला खूप आश्चर्य वाटलं अन् तो मोठ्या लक्षपूर्वक दरवाजा निरखू लागला. त्याला तर त्यात कसलीच चूक आढळली नाही.

एक वर्ष असंच निघून गेलं अन् पुन्हा





अुन्हाळ्याचे दिवस आले. पुन्हा काही कामानिमित्त सरल त्या भागात आला. यावेळी तरी आपल्या मित्राची गाठ घ्यावी, असं वाटलं त्याला. तो समरच्या घरी गेला अन् त्याच्या नावाने हाका मारू लागला.

समरची बायको दार अुघडून बाहेर आली. सरलला पाहून खूश होत ती म्हणाली, "या, या! आत या ना!" सरलनं विचारलं, "घरी आहे समर?" अन् तसं विचारत तो दरवाजासमोर आला.

"नाही, बाहेर गेलेत ते. लवकरच येतील परत. पण तुम्ही आत तर या ना!" मोठ्या प्रेमानं स्वागत करत ती म्हणाली. कडक अुन्ह होतं; तरीही डोकं हलवत सरल म्हणाला "काही हरकत नाही. त्या झाडाच्या सावलीत बसेन आरामात." अन् तो पाराकडे जायला वळला.

"अरे, असं कसं चालेल? तुम्ही झाडाखाली जाअून असे बसणार की जणू आमचं घर हे घर नव्हेच. आत या ना!" समरच्या बायकोनं आग्रह धरल्यावर "ठीक आहे, जशी तुमची इच्छा!" असं म्हणत समर घरात आला.

घरात थंडावा होता. अन् आराम ही वाटत होता आत. समरच्या बायकोनं खाट तयार केली.

"वाटलं होतं की यावेळी तरी समर भेटेल. पण आता वाटतंय की याही वेळी ते भाग्य लाभणार नाही." सुस्कारा सोडत सरल म्हणाला.

समरची बायको आत जाअून थोड्याच वेळात तीन लोटे एका थाळीतून बाहेर घेअून आली. थाळी सरलसमोर ठेवत ती म्हणाली, "यात दाट ताक, या दुसऱ्यात नारळाचं पाणी अन् तिसऱ्यात माठातलं थंड पाणी आहे. घ्या हवं ते ते. जेवायच्या वेळेपर्यंत तुमचे दोस्त घरी येतील, तोवर जरा आराम करा." सरलला वाटलं, "किती बदलली ही वर्षभरात!"

काही वेळानं स्वयंपाकघरातून बाहेर येत समरची बायको सरलला म्हणाली, "फार वेळ झाला. तुम्ही आत येअून जेवून घ्या. वाढते मी तुम्हाला सर्व गरम आहे तोवर."

"अरे पण घाई काय आहे? समरला येअू दे ना!" सरल म्हणाला.

"स्वतःच्या भुकेचाही पत्ता नसतो त्यांना. किती वेळ लागेल परतायला कुणास ठाअूक. तुम्ही कशाला ताटकळता अुगीच? या जेवायला आत." समरच्या बायकोच्या या आग्रहावरून सरल अुठून आत गेला. त्याला खरोखरच जोरदार भूकही लागली होती. जेवणातले पदार्थ खूपच स्वादिष्ट होते. जेवून तो आरामात झोपून गेला. सूर्यास्त झाला तरी समर परत आला नाही.

शेवटी सरल म्हणाला, "मला जायला हवं आता. याही वेळी भेट झाली नाही समरची."

"रहा नं, नका जाअू. याही वेळेला भेट न झाली, तर फार वाईट वाटेल त्यांना. रात्री रहा अन् सकाळी जा पुडे." समरच्या बायकोनं प्रेमानं आग्रह केला.

"नाही जमणार वहिनी, महत्त्वाचं काम आहे फार. माझ्याबरोबर कामासाठी आलेली इतर मंडळीही आहेत. वाट पाहतील माझी सगळेजण. रहावंसं तर वाटतंय, पण शक्य नाही ते. समरला सांगा की, खूप आठवण काढली मी त्याची. सांगा त्याला की हे घर अन् बगीचा खूप आवडला मला. मी सुतार न जातीचा? दरवाजांचं खूप ज्ञान आहे मला. फार चांगला श्रेष्ठ दर्जाचा दरवाजा आहे हा!" इतकं बोलून सरल निघून गेला.

समर अुशीरानेच घरी आला. त्याच्या बायकोनं सरल येअून गेल्याचं सांगितलं अन् तो कायकाय बोलला तेही सर्व सांगितलं. ते ऐकून समर म्हणाला, "सरल मोठा योग्य माणूस आहे. अुत्तम मित्र अन् मोठा बुद्धिमान आहे तो."

"मागल्या वेळेला आले, तेंव्हा आपला दरवाजा मुळीच चांगला नसल्याचं पुन्हापुन्हा म्हणाले; पण या खेपेला तर त्याचं खूपच कौतुक केलं त्यांनी! विचित्रच नाही का?" तिनं संशय व्यक्त केला.

"मागच्या वेळी 'दरवाजा ठीक नाही' म्हणाला, तेंव्हा मला नीटसं काही समजलं नव्हतं, पण यावेळची त्याची तारीफ मात्र बरोबर समजली मला. असं का बोलला तो, हे कळलं तुला? तो मागे आला तेंव्हा तू त्याचं नीट स्वागत केलं नसणार; म्हणूनच 'आपला मुख्य दरवाजा चांगला नसल्याचं' म्हणाला तो. यावेळी तू त्याचं चांगलं स्वागत केलं असशील, म्हणून आता तोच दरवाजा खूप चांगला वाटला त्याला!" असं सांगून समरनं तिचा संशय दूर केला.



विश्व-समाचार :

# स्पेन मधील राजकीय घडामोडी

**स्पे**नच्या जनतेची 'बदल व्हावा' अशी इच्छा होती. सन १९८२ पासून सत्तेवर असलेल्या सोशलिस्ट पार्टीला बरखास्त केले गेले. ३ मार्च रोजी स्पेनच्या संसदेच्या कनिष्ठ सदनाची निवडणूक झाली. एकूण ३५० जागा होत्या. माजी प्रधान मंत्री फिलिप गोन्जालेज त्या पक्षाचे नेते होते. त्या सोशलिस्ट पार्टीला फक्त १४१ जागा मिळाल्या. जोस मारिया अज्नार यांच्या पॉप्युलर पार्टीला १५६ जागा मिळाल्या. अधिकार ग्रहण करण्यासाठी त्यांना अधिक २० जागांची आवश्यकता होती. 'कॅटलॅन नॅशनल पार्टी' ने १६ जागा जिंकल्या. 'बास्क नॅशनलिस्ट पार्टी' ने ५ जागा मिळविलेल्या होत्या. त्यांच्या मदतीने सरकार बनविण्यात आले.

सोशलिस्टांचा विरोध करण्याची अनेक कारणे आहेत. लाचखोरी हे एक प्रमुख कारण आहे. गृह-मंत्र्यांनी 'डेथ स्वार्डस्' च्या मदतीने विपक्षी दलाच्या 'बास्क नॅशनलिस्ट' च्या काही कार्यकर्त्यांना ठार केले. म्हणून त्यांना मंत्री-पदावरून दूर व्हावे लागले. कॅटलॅन नॅशनलिस्ट पार्टीने शासन-पक्षाचे समर्थन करायला नकार दिला. पुन्हा निवडणुका करण्यावर त्यांनी आग्रह धरला. देशाची आर्थिक स्थिति जरी ठीक असली तरी बेकारीची समस्या ४० टक्क्यांनी वाढली. यामुळे देशातील युवक नाराज झाले. या सर्व कारणांमुळे शासन-पक्षाबद्दलचा असंतोष वाढत राहिला.

दुसऱ्या विश्वयुद्धाच्या (१९३९ ते १९४५) वेळी हुकुमशहा जनरल फ्रैंको स्पेनचा शासक होता. स्पेनचा राजा देश सोडून पळून गेला. फ्रैंकोने अशी घोषणा केली की त्याच्या मृत्यु नंतर स्पेन पुन: राजवंशाच्या ताब्यात जाईल, आणि राजकुमार जुवान कार्लोस त्याचा उत्तराधिकारी होईल. ही घोषणा सन् १९४७ मध्ये झाली. २८ वर्षांनी म्हणजे सन १९७५ मध्ये जनरल फ्रैंकोच्या मृत्यु नंतर ही घोषणा अमलात आली.

१९७८ मध्ये स्पेनने आपली नवी घटना तयार केली. तीनुसार 'डेमोक्रटिक पक्षा' चे अॅडोल्फो स्वारेज प्रधान मंत्री बनले.

सन १९८२ मध्ये ज्या निवडणुका झाल्या, त्यात गोन्जालेजच्या नेतृत्वाखाली 'सोशलिस्ट वर्कर्स पार्टी' ला अपूर्व विजय प्राप्त झाला. त्यांनी आपल्या शासनाला सुरुवात केली. यानंतर दोनदा ज्या निवडणुका झाल्या, त्यात या पार्टीची लोकप्रियता कमी होत गेली. चवथ्या वेळी ही आपण प्रधान मंत्री व्हावे अशी गोन्जालेज यांची इच्छा होती. पण जनतेची तशी इच्छा नव्हती.

या विषयावरील चर्चा चालू असताना पक्षाचे उपनेता एकदा म्हणाले - ''इतका कडु जय, आणि इतका नाजुक पराजय मी कधी पाहिला नाही!''



# माथेफिरू गोविंद

सगळे म्हणतात, 'गोविंद मोठा गर्विष्ठ आहे. पण आपल्या वरिष्ठांशी तो नम्रपणे वागतो, म्हणून आजपर्यंत प्रगति करीत आलेला आहे.' थोड्याच दिवसात राज-दरबारात त्याला चांगली नोकरी ही मिळाली.

या देशाचा राजा इंद्रकांत मोठ्या चिडचिड्या स्वभावाचा होता. एवढ्या तेवढ्या गोष्टीसाठी तो सरकारी नोकरांवर नाराज होई आणि त्यांना धमकावत राही. एक दिवशी अशाच काही कारणास्तव तो त्रस्त होता. अशात बिचारा अभागा गोविंद त्याच्या समोर आला. रागाने राजा त्याला म्हणाला - "चालता हो, पुन्हा कधी तोंड दाखवू नकोस मला."

गोविंदने आपल्या नशिबाला दोष दिला. तो विचार करू लागला की आता काय करावं.

मंत्री सुधीरला ही वार्ता समजली. गोविंदला आपल्याकडे बोलावून तो म्हणाला - "तू तर चांगला शिकलेला आहेस, बुद्धिमान आहेस. राजाचं असं अकारण तुझ्यावर रागावणं मला मुळीच आवडलं नाही. माझ्या बरोबर चल, आपण राजाला कारण विचारू या."

गोविंद ताबडतोब म्हणाला - "रागावला तर राजा, मी नाही. शक्य आहे, माझंच काही चुकलं असेल. आपल्या चुकीबाबत क्षमा मीच मागितली पाहिजे. कशी क्षमा मागू याबाबत आपण मला सल्ला द्याल?"

सुधीर राजाकडे आला नि म्हणाला - "महाराज, साध्या भोळ्या लोकांवर एवढ्या तेवढ्यासाठी आपण रागावता हे बरं नव्हे. ही फार वाईट सवय आहे. आपल्या या सवयीमुळे आपण अनेकांना दुःखी बनवलं आहे. गोविंद फार चांगला आणि नम्र सेवक आहे. काही ही कारण नसताना आपण त्याच्यावर रागावलात. बिचाऱ्याला फार वाईट वाटतंय."

राजा इंद्रकांत थोडा वेळ काही बोलला नाही. नंतर म्हणाला - "खरंच, मी उगाच रागावलो गोविंदवर. मीच त्याची समजूत काढली पाहिजे. पण उलट माझीच क्षमा मागण्याच्या विचारात तो आहे, यावरून त्याची नम्रता स्पष्ट दिसून येते. त्याची जेवढी प्रशंसा करावी तेवढी थोडीच आहे. गोविंदला काही तरी बक्षिस दिलं पाहिजे. सीतापुर गावात ग्रामाधिकाऱ्याची नियुक्ति करायची आहे. या जागेवर मी गोविंदची नेमणूक करतो. ठीक आहे?"



अशा रीतीने गोविंद सीतापुरचा ग्रामाधिकारी बनला. अनेक दिवस तो राज-दरबारातील अधिकाऱ्यांची सेवा करीत राहिला. कधी कोणाच्या विरुद्ध त्याने 'ब्र' काढला नाही. मंत्री आणि राजा यांच्यावर तो नेहमी आपली स्तुति-सुमने उधळी. तोच त्याचा एक दिनक्रम बनून गेला. तो गावचा सर्वात वरिष्ठ अधिकारी होता. गावात तो म्हणेल त्याला कोणी विरोध करीत नसे.

गांवाशी संबंधित कामे करण्यात त्याचा सल्लागार होता रमेश. तो मोठा बुद्धिमान आणि निष्कपटी होता. तो कधी ही कोणाच्या भानगडीत पडत नसे. आपलं काम तो बिनचूक व व्यवस्थितपणे करी. निःस्वार्थपणे तो आपलं काम करीत असे.

रमेशच्या सल्ल्यानुसार गोविंदने काही काळ चांगल्या रीतीने गांवकऱ्यांची सेवा केली. गावचा सर्व कारभार उत्तम चालू राहिला.

गोविंद मधून मधून गावातील प्रमुखांना बोलवी आणि आपल्या शासनाबाबत त्यांचे विचार जाणून घेई. एक दिवशी सर्वांनी मुक्तपणे सांगितले - "जोपर्यंत रमेशच्या सल्ल्यानुसार आपण काम कराल, तोपर्यंत आपणास काही ही त्रास होणार नाही. आपण समर्थपणे शासन करीत रहाल." गोविंदला हे बोलणं मुळिच आवडलं नाही. त्याला फार वाईट वाटलं. रमेशला बोलवून त्याने प्रश्न केला - "आपल्या गावची परिस्थिति आता खूप सुधारली आहे. पण त्याचे श्रेय मला की तुझ्या सल्ल्याला?"

रमेश हसून म्हणाला - "पूर्वी जे ग्रामाधिकारी होते, त्यांना ही मी सल्ला देतच असे. सल्ला योग्य आहे की नाही हे जाणण्याचे सामर्थ्य ग्रामाधिकाऱ्यात असायला पाहिजे. मला वाटतं सल्ल्यात काही विशेष नसते. खरं सामर्थ्य तर आपलं!"

लक्ष्मी कामत



गोविंदला यामुळे संतोष वाटला नाही. रमेशचा सल्ला मानण्यातच ग्रामाधिकाऱ्याचे कल्याण आहे असा रमेशचा आशय असावा असं त्याला वाटलं. या परिस्थितीत बदल व्हावा असा त्याने निश्चय केला. थोडी चौकशी केल्यावर त्याला समजले की गावातील शकुनी व रमेश हे एकमेकांचे शत्रु आहेत.

एक दिवशी गोविंद रमेशला म्हणाला - "कोणा ही एकाचा सल्ला योग्य की अयोग्य हे सांगणे कठिण आहे. मला वाटतं इथून पुढे मी शकुनीला पण सल्ला विचारीत जावा."

"जोपर्यंत आपली विवेक-बुद्धि जागृत आहे, तोपर्यंत कोणाचा ही सल्ला योग्यच सिद्ध होईल !" रमेशने आपला विचार सांगितला. त्या दिवसापासून गोविंद रोज शकुनीशीच सल्ला-मसलत करू लागला.

शकुनी तसा बुद्धिमान होता, पण त्याच्यात अहंकार गुण अधिक होता. त्याला वाटू लागले - 'मी ग्रामाधिकाऱ्याचा सल्लागार आहे. तेव्हा लोकांनी मला तसा मान दिला पाहिजे.' त्याने रमेश जवळ आपला विचार बोलून दाखवला - "आपण दोघे ग्रामाधिकाऱ्याचे सल्लागार आहोत. म्हणून ग्रामाधिकाऱ्याच्या कचेरीत आपल्या दोघांना स्वतंत्र खोल्या मिळाल्या पाहिजेत. आपण गोविंदकडे तशी मागणी करू या."

"सल्ला देणं म्हणजे काय मोठं काम थोडंच आहे? त्यासाठी स्वतंत्र खोली काय करायचीय? हा आपला विचार तू सोडून दे झालं." रमेशने आपला विचार सांगितला.

त्या दिवशी संध्याकाळी शकुनी गोविंदला भेटला आणि म्हणाला - "मला वाटतं, आपल्याला सल्ला देण्याचं काम मोठं महत्त्वाचं आहे. म्हणून आपल्या कचेरीत माझ्यासाठी एक खोली असावी. पण रमेशच्या दृष्टीने सल्ला देणं हे काही मोठं महत्त्वाचं काम नाही. तो म्हणतो, सल्ला देणं हे काही काम थोडंच आहे. त्याच्या दृष्टीने सल्ल्याला काही किंमत नाही."

"त्याचं म्हणणं बरोबर आहे. हल्ली मी फक्त तुलाच सल्ला विचारतो. त्याला तर मी काही विचारीतच नाही. म्हणून त्याला तुझा हेवा वाटणे साहजीक आहे. तुम्हा दोघांसाठी माझ्या कचेरीत आजच एकेक खोलीची व्यवस्था करतो. पण सल्ला मात्र मी तुझाच घेत जाईन." गोविंद म्हणाला.

"रमेशला तर स्वतंत्र खोली नकोय. मग त्याला कशाला देतोयस?" शकुनीने विचारले.

"मी पक्षपात करतोय असं कुणाला वाटू नये." गोविंद म्हणाला.

त्या दिवसापासून शकुनीचा भाव वाढला. त्याने गोविंदला सांगायला सुरुवात केली - "ग्रामाधिकारी गावाचा राजा असतो. त्याच्यात अहंकार असलाच पाहिजे. भेटेल त्याच्याशी त्याने बोलू नये. कोणाशी ही हसून बोलू नये. कुणी नमस्कार केला तर त्याच्याकडे पहावं नि गप्प बसावं. नोकरांना नेहमी धमकावीत रहावं. गर्विष्ट असतील त्यांना समजाऊन सांगितलं पाहिजे."

गोविंद स्वतः अहंकारी होता. त्याला शकुनीचा सल्ला आवडला व त्याप्रमाणे अंमल-बजावणी सुरू झाली. तरी पण कोणी त्याला उलट प्रश्न करायला धजेना. त्यामुळे गोविंद अधिकच धाक-दपटशा दाखवू लागला. लोकांशी वागण्याची त्याची पद्धत बदलून गेली. सर्व जण त्याला घाबरत, कारण राजाशी त्याचे संबंध चांगले होते.

परंतु रमेशचा गोविंदशी व्यवहार निराळ्या प्रकारचा होता. गोविंद प्रतिनमस्कार करीत नाही असे जेव्हा त्याने पाहिले, तेव्हा त्याने नमस्कार करायचे सोडून दिले. गोविंदने त्याला सल्ला मागितला नाही, रमेशने सल्ला देण्याचे सोडून दिले. एक दिवशी गोविंद चिडून रमेशशी बोलू लागला, तेव्हां त्याने स्पष्ट सांगून टाकले - "मी चूक काय केली ते मला अगोदर सांगा. तुम्ही



मला अकारण दोष दिला, तर मी गप्प बसणार नाही. राजाकडे जाऊन तक्रार करीन."

हे ऐकून गोविंद घाबरला. रमेशवर नाराज होत म्हणाला - "सांग, काय तक्रार करशील माझ्या विरुद्ध?"

रमेशने काही बोलायला सुरुवात करताच आणखी रागावून गोविंद म्हणाला - "तुझी ही बडबड ऐकून माझा काय फायदा होणार आहे? मला मुळिच तुझ्या गोष्टी ऐकायच्या नाहीत. इथून पुढे माझ्याशी बोलत जाऊ नकोस."

रमेश म्हणाला - "तुम्ही विचारलत म्हणून मी उत्तर दिलं. तुमची इच्छा नसेल तर यापुढे मुळिच बोलणार नाही मी तुमच्याशी." आणि रमेश तेथून निघून गेला.

यानंतर रमेशने गोविंदशी बोलायचंच



सोडून दिलं. आतां गोविंदच्या रागाचा पारा अधिकच चढला. पण काय करावं हे मात्र त्याला सुचेना. त्याने शकुनीला सल्ला विचारला. तो म्हणाला - ''या गावाच्या लोकसंख्येचा संपूर्ण हिशोब रमेशपाशी आहे. आपण त्याला कळवा की आपणास काही शंका आहेत, व त्या दूर करणे हे त्याचे कर्तव्य आहे. मग निरुपाय होऊन त्याला आपल्याशी बोलावेच लागेल.''

गोविंद म्हणाला - ''ते कसं बरं शक्य आहे? प्रथम मी त्याच्याशी कसा बोलू? त्यात माझी मानहानि नाही का?''

यात मानहानीचा प्रश्नच कुठे येतो? आपल्या नोकराला पाठवून तुम्ही त्याला बोलवून घ्या.

आपल्या सेवकाकडून गोविंदने रमेशला निरोप दिला. आपल्या काही शंका दूर करण्यासाठी त्याने स्वतः यावे असे कळवले. रमेशने सेवकातर्फेच शंकांचे समाधान लिहून पाठविले. गोविंद शकुनीला म्हणाला - ''या रमेशचं डोकं फिरलंय!''

''आपण फार चांगुलपणा दाखवताय. एकदा आपल्या अधिकाराची चुणूक त्याला दाखवा..झकत धावत-पळत येईल तो!'' शकुनीने सुचवले.

त्या दिवसापासून रमेशचे भाग्य फिरले. त्याची घरपट्टी व शेत-सारा वाढविण्यात आला. त्याच्या शेताचे पाणी तोडण्यात आले. आपल्या धान्याचे योग्य मूल्य त्याला मिळेनासे झाले. परंतु सर्व अन्याय रमेश मुकाट्याने सहन करीत राहिला.

काही दिवसांनी रमेशच्या मुलीचे लग्न झाले. निमंत्रण देण्यासाठी तो गावात सर्वांकडे गेला. गोविंदला फक्त निमंत्रण-पत्रिका तेवढी पाठवली. गोविंदला वाटलं - जाणून बुजून आपला अपमान केला जातोय. रमेशला एखाद्या लफड्यात गोवायची कल्पना त्याच्या मनात आली.

नोकर आणि गावातील काही लोकांकडून रमेश पर्यंत ही वार्ता पोचली. राजाचा प्रमुख सल्लागार सुधीर त्याचा जवळचा नातेवाईक होता. रमेश राजधानीत गेला आणि गोविंदच्या सर्व अन्याय-कथा त्याने सुधीरला सांगितल्या.

सगळं ऐकून सुधीर म्हणाला - ''गोविंदची इथ पर्यंत मजल गेली? इथं तर कुत्र्यासारखा शेपूट घालून बसायचा. आणि आता असे अत्याचार सुरू केले तर त्याने? तू चिंता करू नकोस. मी अशी तजवीज करतो की त्याची नोकरीच संपुष्टात येईल.''

सुधीरच्या या बोलण्यावर हसून रमेश म्हणाला - ''यामुळे प्रश्न सुटणार नाही. अधिकाराच्या नशेत अपराध करणारांना काही धडा मिळावा अशी आपण काही तरी उपाय-योजना करा.''

होकारार्थी मान हलवीत सुधीर म्हणाला - ''राजा इंद्रकांत पण मोठा घमेंडखोर आहे. हल्ली त्यांची तब्येत बरी नसते. राज्यकारभाराची सर्व कामे राजकुमार चंद्रकांतच पाहतो. चंद्रकांत मोठा समर्थ, बुद्धिमान आणि विनयशील आहे. पित्याच्या चुकांबद्दल त्याला फार वाईट वाटते. तुझा प्रश्न सोडविण्याचा मार्ग त्यालाच सुचेल.'' सुधीर रमेशला राजकुमाराकडे घेऊन गेला. सगळं काही ऐकून चंद्रकांत म्हणाला - ''राजकर्मचारी आणि सर्व ग्रामाधिकारी गोविंदला आपला आदर्श मानतात. अलीकडे सर्वच गर्विष्ठ नि माथेफिरू बनलेले दिसतात. यांना सुधारण्याचा एकच मार्ग मला दिसतोय. मी तुझ्या गावी येतो. फार दिवसांपूर्वीची गोष्ट आहे. एकदा माझे वडील गोविंदवर उगाचच रागावले होते. आपल्या वडिलांतर्फे मी त्याची क्षमा मागेन. यामुळे गोविंद मध्ये आपोआप सुधारणा होईल असे मला वाटते.''

रमेश म्हणाला - ''पण आपण संस्कृत मधे क्षमा मागा, मी त्याचे भाषांतर करून गोविंदला सांगेन. त्याला कुठे संस्कृत येतेय?''



रमेश असं का म्हणतोय हे चंद्रकांतच्या लक्षात आलं. तो मनातल्या मनात हसला. नंतर राजकुमार आणि सुधीर सीतापुरला गेले.

सर्वांना एकत्र पाहून आता गोविंद घाबरला. चंद्रकांतची बोलण्याची पद्धत पाहून त्याचे भय कमी झाले. राजकुमार स्वतः आपली क्षमा मागायला आले आहेत हे जेव्हा त्याला समजले, तेव्हा त्याच्या अहंकाराने डोळे वर काढले. त्याला वाटले की आता रमेश निश्चित हारणार! ग्रामाधिकाऱ्याच्या कचेरीत राजकुमार, सुधीर, रमेश, शकुनी, गोविंद व गावातील काही प्रमुख मंडळी एकत्र आली.

जरा गळा साफ करीत चन्द्रकांत म्हणाला - ''माझ्या वडिलांनी ज्या चुका केल्या त्या सुधारण्याचा मी प्रयत्न करीत आहे. राजा-

तर्फे मी गोविंदची क्षमा मागतो. गुरुकुलात असताना माझे सर्व अध्ययन संस्कृत मधेच झाले. त्यामुळे तुमच्यापुढे लोक-भाषेत बोलायला मला अमळ संकोचच वाटतो. म्हणून जे काही सांगायचंय ते मी संस्कृत मधेच सांगतो. रमेश त्याचे भाषांतर करून गोविंदला सांगेल.''

शकुनि गोविंदच्या कानात कुजबुजला - ''राजकुमार मोठा बुद्धिमान दिसतोय. आता तरी रमेशला निरुपायास्तव तुझ्याशी बोलायलाच लागेल की नाही?''

राजकुमाराची विनयशीलता पाहून गोविंदला मोठा संतोष वाटला. चंद्रकांत संस्कृत मधे जे काही बोलला, रमेशने त्याचे भाषांतर खुणांच्या भाषेत करायला सुरुवात केली. गोविंदला ही भाषा समजणे कठिण झाले आणि तो राजकुमाराला म्हणाला - ''महाराज, याचा गर्व पहा. 'माझ्याशी बोलू नको' असे मी याला सांगितलं, म्हणून हा खुणांची भाषा बोलतो आहे. आपण समोर आहात, तरी ही याच्यात काही सुधारणा होतीय का पहा.''

चंद्रकांत उत्तर देत म्हणाला - ''अहंकार आणि आत्मविश्वास यांच्यात फरक आहे. 'आपणाशी बोलू नको' असे ज्याने सांगितले त्याच्याशी न बोलणे हा आत्मगौरव आहे. राजकुमार असून ही मी तुझी क्षमा मागायला आलो. तू रमेशला म्हणालास - 'माझ्याशी बोलू नकोस' ही एक मोठी चूक आहे. आपल्या चुकीबद्दल तुला मुळीच पश्चात्ताप होत नाही, त्याची क्षमा मागायची तुझी तयारी नाही, हा तुझा गर्वच नाही तर काय? मला वाटतं, तू मोठा गर्विष्ट आहेस.''

राजकुमाराने आपल्याला चाबकाने मारलंय असं गोविंदला वाटलं. तो लज्जित होऊन म्हणाला - ''चूक केली, म्हणून क्षमा मागण्याची गरज नाही. चूक झाल्याचे लक्षात येणे पुरेसे आहे! आपल्या दोघांच्यातील प्रश्न सुटला हे बरं झालं.''

राजकुमाराकडून मिळालेले ज्ञान गोविंदने चांगले पचवले. नंतर कोणत्या ही अहंकारी माणसाशी त्याला सामना करावा लागला नाही.






# रूपधरच्या यात्रा

## १२

(विदेशात रूपधरला अनेक संकटे झेलावी लागली. तो जेंव्हा स्वदेशात पोचला, तेंव्हा त्याच्या मुलाने आपल्या पित्याचा तपास करण्याचा निश्चय केला. रूपधरच्या पत्नीशी विवाह करण्याच्या हेतूने आलेले राजकुमार त्याच्याच घरात तळ देऊन बसले. ते तेथून निघायचे नावच घेईनात. रूपधरचा मुलगा धीरमतीला त्यांचे हे वागणे मुळीच आवडेना. त्याने ही अडचण निवारण्यासाठी एक सभा बोलावली. परंतु यामुळे काहीच फायदा झाला नाही. त्यामुळे आपल्या पित्याची चौकशी करण्यासाठी तो नौकेतून इथाकाहून पैयासकडे जायला निघाला.) - यानन्तर

धीरमतीची नौका दुसऱ्या दिवशी पैयासच्या किनाऱ्याला लागली. वाटेत, 'आपल्याला सफलता मिळेल की नाही' याबद्दलच धीरमती राहून राहून विचार करत होता. जर आपल्याला यश मिळाले नाही, तर पुढे काय करावे याबद्दलही तो चिन्तित होता. आपल्या शत्रूंना घराबाहेर कसे हाकलावे व त्यांच्यापासून आपल्या आईचे कसे रक्षण करावे याचाही तो विचार करत होता. 'वडील जिवन्त असल्याची पक्की वार्ता समजली तर किती बरे होईल? त्यांच्या अुपस्थितीमुळे घरघुसे शत्रु आपोआप पळून जातील अन् आपल्या डोक्यावरचा हा भार अुतरेल' असे त्याला वाटले. आपल्या वडिलांच्या पराक्रमाबद्दल ऐकलेल्या कथा तो आठवत राहिला.

तो पैयासच्या किनाऱ्यावर पोचला, तेंव्हा लोक समुद्रतटावर वरुण देवासाठी काळ्या बैलांचे बळी देत होते. त्या लोकांचे नऊ गट असून प्रत्येक गटात पाचशे माणसे

होती. तटावर नअू चुली पेटलेल्या असून त्यांवर तऱ्हेतऱ्हेची पक्वान्ने शिजत होती. धीरमतीच्या नाविकांनी शीड अुतरवले अन् नाव पाण्याबाहेर ओढून आणली. धीरमतीबरोबर आलेला वृद्ध सहनही किनाऱ्यावर अुतरला. ते दोघे पायी चालू लागले. तेथील लोकांकडे नीट निरखून पहात ते पुढे जात राहिले.

''आता आपण नवद्योतला भेटायला जात आहोत. आपण कोणत्या कामासाठी आलोय, हे तू त्याला निःसंकोचपणे सांगून टाक. आपल्या पित्याची माहिती विचार त्याला. त्यांना रूपधरबद्दल अलिकडे काही कळलं का वगैरे नीट विचार. तो जिवन्त आहे की मेलाय, मेला असेल, तर केंव्हा मेला? त्याला त्याच्याबद्दलची आणखी काही माहिती आहे का? इ. अगदी स्पष्ट पणे विचार. त्याला जे काही माहीत असेल, ते तो अगदी खरंखरं सांगून टाकेल. तो सत्य गोष्टी लपवणाऱ्यांपैकी नव्हे. अगदी सज्जन आहे तो. त्याला तू स्वतः विचारणंच बरोबर होईल.'' सहनने धीरमतीला सांगितले.

''मी तर अजून एक मुलगाच आहे. मोठ्या माणसांशी कसं बोलावं, वागावं हे मला कळत नाही अजून. त्यामुळे भीती वाटतेय मला.'' धीरमतीने आपली असमर्थता प्रकट केली.

पण धीर देत त्याला सहन नवद्योत आपल्या पुत्रांसह बसलेल्या ठिकाणी घेअून गेला. नवख्या लोकांना येताना पाहून नवद्योतच्या मुलांनी पुढे होअून त्यांचे स्वागत केले. नंतर नवद्योत जवळच मअू कातडी पसरून त्यांनी या दोघांना त्यांवर बसवले व काही खाद्य पदार्थ व द्राक्षाचा रसही त्यांच्यासमोर ठेवला.



सहन व धीरमतीने पोटभर भोजन केल्यावर नवद्योतने पाहुण्यांना विचारले, ''हं, आता सांगा बरं तुम्ही कोण आहात? कोणत्या देशचा समुद्र पार करून आलात इथं? की आणखी कुठे पुढे जाता जाता काही काळासाठी इथं थांबले आहात?''

धैर्य एकवटून आता धीरमती अुत्तरला, ''महाराज, आम्ही इथाकाचे रहिवासी. स्वतःच्या वैयक्तिक कामासाठी आलोय मी इथं. युद्धात ट्रोजन लोकांबरोबर लढाई केलेल्या रूपधरबाबत माहिती विचारायला आलोय मी आपणाकडे. ते माझे वडील. युद्धात भाग घेतलेल्या सर्वांबद्दल आतापर्यंत सर्वांना सर्व माहिती मिळाली आहे. पण माझ्या पित्याबद्दल मात्र काहीच वार्ता नाही. ते वारल्याचं आपणाला निश्चित माहीत असेल, तर अगदी सरळ सांगून टाका. आपण सर्वांनी रणक्षेत्रावर कित्ती संकटं झेलली असाल! कृपा करून माझ्या बाबांबद्दल जी काही माहिती असेल, ती सांगा. मी त्यांच्या व आपल्या मैत्रीबद्दल बरंच काही ऐकलेलं आहे. आपण दोघांनी रणक्षेत्रावर केलेल्या वीरोचित कार्याबद्दलची सर्व माहिती मिळाली आहे मला. पण आपण दोघं एकमेकांना केंव्हा दुरावलात, हे मात्र कळलेलं नाही अजून.''

नवद्योत धीरमतीला म्हणाला, ''बघ बेटा, तुझ्या बोलण्यामुळे घडलेल्या साऱ्या घटना पुन्हा डोळ्यासमोर अुभ्या राहू लागल्या. वज्रकायच्या नेतृत्वाखाली आम्ही इथून जहाजातून जाअून ट्रॉय शहर वेढलं. नअू वर्षं पर्यन्त घनघोर युद्ध झालं. आमच्यापैकी कित्येक योद्ध्यांनी धारातीर्थी देह ठेवले. त्या साऱ्या घटना सांगायला लागलो, तर फार वेळ लागेल. त्या नअू





वर्षात आमच्यावर फार संकट आली. आम्ही स्वतःसुद्धा कित्येकदा मरता मरता वाचलो. केवळ भगवन्ताच्या कृपेनंच वाचवलं आम्हाला. आम्हाला विजय मिळाला. मी अगदी आव्हान देऊन सांगू शकतो, की तुझ्या पित्याच्या तोडीचा वीर दुसरा कोणीच नव्हता. आम्हा दोघात कधीच कसला मतभेद अुपस्थित झाला नाही. दोघांचीही विचारपद्धती सारखीच असे. आमची मतं सारखी असत. पण शेवटी व्हायचं ते झालं. परत येताना आमच्यात झगडे सुरू झाले. सम्राट अन् प्रताप यांच्या भिन्न-भिन्न मतप्रणालींनी अगदी टोक गाठलं. दोघांनी एकमेकांना आव्हान दिलं. अुरलेल्या साऱ्या योद्धयांच्यातही दोन गट पडले. सर्वजण आपापल्या इच्छेनं त्या दोघां भावांपैकी आपल्याला हव्या त्या पक्षात सामिल झाले. दुसऱ्या दिवशी अर्ध्याहून अधिक लोक नौकांमधे बसून प्रतापबरोबर निघाले. बाकी सारे सम्राटाबरोबर देवदर्शनासाठी तिथेच थांबले. आम्ही टेनेडोसला पोचल्याबरोबर रूपधर म्हणू लागला की, 'मी आपला स्वतन्त्रपणे निराळा जातो ! त्याच्याबरोबर काही वीरही निघून गेले. मी, देवमय अन् इतर काहीजण सरळ घरी निघून आलो. खरा प्रकार हा असा घडला. तेंव्हा बेटा, बाकी हकिकत मला काहीच माहीत नाही. मी असं मात्र अैकलंय की वज्रकायचा मुलगा नवयोध आपल्या साथीदारांसह सुरक्षित पोचला अन् अुरलेले सारे योद्धेही सकुशल आपापल्या घरी पोचले."

"सम्राटही स्वदेशी पोचला. पण अजबलनं सम्राटाच्या पत्नीला आपल्याकडे वळवून घेतले अन् त्याची निर्घृण हत्त्या केली. तुला हे बहुधा समजलंच असेल की, सम्राटाचा मुलगा मोठा साहसी अन् योग्य असून त्यानं संधी साधून अजबलला मारून टाकलं अन् आपल्या पित्याच्या हत्त्येचा सूड घेतला."

धीरमतीने अुदासपणे नवद्योतला म्हटले, "तो तर मोठाच भाग्यवान म्हणायला हवा. मी कधी तसा बनेन, हे माहीत नाही मला. माझ्या घरात काही बदमाश तळ देऊन राहिले आहेत. अन् आमच्यावर अत्याचार करत आहेत. आमचं घरच पोखरून काढत आहेत ते. त्यांना मी हाकलून देऊ शकेन की नाही, कुणास ठाअूक !"

"होय बेटा, तुझ्या घरात असलेल्या बदमाशांबद्दल मीही ऐकलंय. पण तू का गप्प राहून त्यांचे अत्याचार सहन करत आहेस? शेवटी ते सारे तुझे शत्रूच तर आहेत. त्या बुद्धिमती देवीची तुझ्यावरही कृपा असेल, तर तू त्या सगळ्या अत्याचारींना नेस्तनाबूत करायचा दिवस ही लवकरच येईल." नवद्योत त्याला धीर देत म्हणाला.

बोलता-बोलता संध्याकाळही सरत आली. धीरमती परत जायला निघाला. पण नवद्योतने त्याला जाअू दिले नाही. तो म्हणाला, "अरे रूपधरचा मुलगा आज रात्री नावेत झोपणार? मुळीच नाही. माझं घर ते तुझंही नव्हे का? माझ्याकडे काय अंथरूणपांघरूण कमी का आहे?" अन् तो धीरमतीला आपल्या घरात घेअून गेला.

इतर नाविकांची खुशाली जाणून घेण्यासाठी सहन मात्र नौकेकडे निघून गेला.

दुसऱ्या दिवशी धीरमती लवकरच अुठला अन् स्नान करून त्याने कपडे बदलले. त्याला प्रतापकडे घेअून जाण्यासाठी एका घोडागाडीची व्यवस्था करण्यात आली. खाण्याचीही सामग्री बरोबर घेअून नवद्योतचा एक मुलगा धीरमतीबरोबर गाडीत चढला. दोन दिवसांनी ते सर्वजण प्रतापकडे पोचले.

बरोबर त्याच वेळी प्रताप आपल्या मुलीचा विवाह वज्रकायच्या मुलाशी लावून



द्यायला निघाला होता. या विवाहासाठी आसपासच्या प्रदेशातले खूपसे लोक तेथे आले होते. एका मोठ्याशा मैदानात जेवणावळ चालू होती. काही करमणुकीचे कार्यक्रमही चालू होते. इतक्यात प्रतापचा अंगरक्षक तेथे येअून म्हणाला, "महाराज, आत्ताच दोन तरूण गाडीतून अुतरले आहेत. त्यांना इथे आत बोलावू, का आणखी कुठे जायला सांगू?"

प्रताप रागावून म्हणाला, "तू इतका मूर्ख असशीलसं वाटलं नव्हतं. आम्ही लोक जेंव्हा परक्या देशात गेलो, तेंव्हा तिथल्या अपरिचित माणसांनी आमचं खूप चांगलं स्वागत केलं होतं. तावडतोब जाअून तू त्या दोघांना इकडेच घेअून ये."

थोड्या वेळातच धीरमती व नवद्योतचा मुलगा असे दोघे जण तेथे पोचले. तिथले

सारे वातावरण पाहून त्यांना मोठे आश्चर्य वाटले.

असे वाटत होते की सूर्य अन् चन्द्र दोन्हीही इथे एकाच वेळी प्रकाशत आहेत! नोकर त्यांना स्नानासाठी बोलावून घेऊन गेला व त्यांना नवी वस्त्रेही दिली गेली. भोजनासाठी दोघांना प्रतापजवळच बसवण्यात आले. प्रताप त्यांना म्हणाला, "मुलांनो, तुम्ही दोघेही अगदी राजपुत्रासारखे रुबाबदार दिसत आहात. प्रथम भोजन उरका, अन् मग मी तुम्ही कोण आहात, कुठून आलात वगैरे चौकशी करतो."

भोजनानन्तर धीरमती आपल्या दोस्ताच्या कानात हळूच कुजबुजला, "पाहिलंस, इथे किती सोनं अन् चान्दी आहे!" प्रतापने हे बोलणे ऐकले. तो म्हणाला, "मुलांनो, अरे नाना देशात फिरून ही संपत्ती गोळा केलीय मी. परंतु ट्रोजन युद्धात माझे कित्येक साथीदार मारले गेले. ते जिवन्त असते, तर ही संपदा नसूनही मी अधिक सुखात राहिलो असतो. त्यांच्या आठवणींनं अजूनही कधीकधी मला रडू येतं. विशेषतः रूपधरची आठवण आली, की मला झोपच लागत नाही. माझीच जर अशी अवस्था आहे, तर त्याच्या बिचाऱ्या बायको, मुलावर काय प्रसंग ओढवला असेल! ते किती आतुरतेनं त्यांची वाट पहात असतील! किती जीव तडफडत असेल त्यांचा रूपधरच्या भेटीसाठी!" प्रताप काळजी दर्शवत बोलला.

त्याचे बोलणे ऐकल्याबरोबर धीरमतीचे दुःख उफाळून आले. तो डोळे पुसत असतानाच भुवनसुंदरी तेथे आली.

धीरमतीला पाहिल्याबरोबर ती म्हणाली, "हा कोण आहे, ते माहीत नाही मला. पण



दिसायला हा हुबेहूब रूपधरसारखाच दिसतोय नं?"

धीरमतीकडे निरखून पहात प्रतापही म्हणाला, "हो हो! अगदी बरोबर बोललीस तू."

नवद्योतचा मुलगा प्रतापला म्हणाला, "महाराज, तुमचा अंदाज अगदी खरा आहे. रूपधरचाच मुलगा आहे हा! रूपधर नसल्यानं याचं घर उजाड झाल्यासारखं झालंय. मोठ्या अडचणीत सापडलाय तो. आपण कदाचित योग्य सल्ला देऊ शकाल, म्हणून माझ्या बाबांनी, नवद्योतनी याला आपणाकडे पाठवलंय."

"किती विचित्र आहे हे सारं! रूपधरचा मुलगा आज माझ्या घरी आलाय!" असे म्हणून प्रतापने रूपधरबद्दल किती गोष्टी सांगितल्या.

आपल्या शरीरावर जखमांच्या खोट्याच खुणा करून ग्रीक शिबिरातून पळून आलेल्या गुलामाचं रूप धारण करून ट्रॉय शहरात शिरणं, इ. घडलेल्या गोष्टी सांगून भुवनसुंदरी म्हणाली की, त्याच्या त्या वेषातही मी ओळखलं त्याला! सर्वजण ट्रोजनांवर हल्ला करण्यासाठी लाकडी घोड्यात तयार होऊन बसले असताना, रूपधरचं त्या सर्वांची नावं घेऊन हाका मारणं, अन् ते बाहेर यायला उतावीळ झाले असताना त्यांना रूपधरचं अडवणं वगैरे सर्व हकिकती प्रताप व भुवन सुंदरीने मोठ्या रोचक पद्धतीने सांगितल्या.

सर्व ऐकल्यानन्तर धीरमती म्हणाला, "महाराज, मी आपल्या पित्याच्या चौकशीसाठीच आपणाकडे आलोय. आपणाला जे काही माहीत असेल, ते सारं न लपवता सांगा."

"मला माहीत असलेलं सारं काही जरूर सांगेन. मी इजिप्त देशात अडकलो होतो. समुद्रावर फिरत रहाणारा एक म्हातारा मला भेटला. त्यानं अनेक योद्ध्यांबद्दल सांगता सांगता मला असं सांगितलं की रूपधरचे सारे साथीदार नाहीसे झाले अन् सध्या तो स्वतः कुठल्याशा बेटात कैदी बनून सम्मोहिनीच्या ताब्यात अडकला आहे."

क्रमशः



# ‘चांदोबा’च्या बातम्या

### अति विचित्र हास्य

सुप्रसिद्ध ‘गिनीज बुक ऑफ रेकॉर्ड्स’ च्या धर्तीवर रिप्लेस संस्था जगातील काना-कोपऱ्यातील चित्र-विचित्र घटनांचे संकलन करते आणि त्या ‘रिप्लेस बिलीव्ह इट ऑर नॉट’ नावाच्या पुस्तकात प्रकाशित करते. यात अनेक असे विषय असतात, ज्यांच्यावर आपला विश्वास बसत नाही. रिप्लेस संस्था अमेरिकेतील हास्यप्रिय नगरी टेक्सासच्या नागरिकांसाठी एक हास्य-स्पर्धा आयोजित करीत आहे. जो कोणी अतिशय विचित्र रुपाने हसेल त्याला १५० डॉलर (म्हणजे सुमारे १५ हजार रुपये) चे बक्षिस दिले जाईल. या स्पर्धेत ज्यांना भाग घ्यावयाचा असेल, त्यांनी रिप्लेस संस्थेला फोन करायचा आणि फोनवर हसून दाखवायचं. हे हास्य ध्वनिमुद्रित केले जाईल. त्याचे हास्य अतिविचित्र ठरेल त्याला बक्षिस दिले जाईल.

### कुत्रा कोर्टात

अमेरिकेतील लॉस-एंजेलिस शहरात हेरॉल्ड मार्श नावाचे एक वकील राहतात. गेली तीन वर्षे त्यांनी एक कुत्रा पाळलेला आहे - ‘डेविल मार्श’. ते जेव्हा-जेव्हा हॉटेलात जातात, तेव्हा आपल्या कुत्र्याला बरोबर घेऊन जातात. एक दिवशी हॉटेलच्या मालकाने कुत्र्याला मनाई केली. हॉटेलच्या मालकाचे म्हणणे असे की आरोग्य विभागाच्या अधिकाऱ्यांनी तसा नियम केलेला आहे. बस, वकील हेराल्ड मार्श यांनी कुत्र्याच्या वतीने कोर्टात खटला दाखल केला. वकीलांचे म्हणणे असे - “गेली दहा हजार वर्षे कुत्री माणसांबरोबर रहात आलेली आहेत. ती माणसां बरोबर खाता-पितात, झोपतात. पिसाळलेली कुत्री चावली तर रॅबीज सारखे रोग होतात. चांगल्या कुत्र्यांपासून माणसांना काही ही त्रास होत नाही, त्यांच्यामुळे रोग जडत नाहीत.”

### अद्‌भुत दिनदर्शिका

तीन अद्‌भुत संकलने एकत्र केली म्हणजे होतात दोन हजार पांचशे पृष्ठे! या पुस्तकांसाठी जो कागद वापरला आहे त्याची किंमत आहे पांच हजार रुपये. या तीन पुस्तकांची एक-एक प्रतच अस्तित्वात आहे. या पुस्तकांचा विषय काय आहे माहीत आहे? ते आहे एक कॅलेंडर! इ.सन १ ते १०,००० वर्षापर्यंतचे महिने, तारखा इत्यादींचे यात वर्णन आहे. जून १९९९ च्या पहिल्या तारखेला कोणता वार असेल हे जाणायचे असेल तर या दिनदर्शिकेचे तिसरे पुस्तक आपल्याला पहावे लागेल. मद्रास येथील कुमार नावाच्या एका बालकाने ही अद्‌भुत दिनदर्शिका तयार केली आहे. ती लिहून काढायला त्याला ४७ दिवस लागले. जिल्हा कलेक्टर, रोटरी क्लब, लायन्स क्लब, जूनियर चेंबर चे प्रतिनिधींनी कुमारच्या या महत्कार्याची प्रशंसा केली. त्यांनी दिलेल्या प्रमाण-पत्रांच्या आधारावर आता कुमारला ‘गिनीज बुक ऑफ रेकॉर्ड्स’ मध्ये स्थान मिळाले आहे.



# शाप आणि आशीर्वाद

दृढनिश्चयी राजा विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ आला. झाडावरून त्याने प्रेत खाली उतरवलं आणि ते आपल्या खांद्यावर टाकलं. तो मुकाट्याने स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतात वसत असलेला वेताळ आतून बोलू लागला - “राजा, सर्वत्र दाट अंधकार पसरलेला आहे, वातावरण अति भयानक आहे. या स्मशानात इतके परिश्रम करण्यासाठी तुला कोणी प्रवृत्त केलं असावं हे काही माझ्या लक्षात येत नाही. तुला ज्यांच्याबद्दल अतिशय आदर आहे, अशा कोणी गुरूने तर तुला ही तपश्चर्या करायला सांगितली नाही ना? अथवा ज्या आपल्या पित्यावर तू प्राणांपलिकडे प्रेम करतोस, त्याने तर तुला या कामावर जुंपले नाही ना? कारण कधी कधी गुरु आणि पिता आपल्या शिष्य अथवा पुत्राला अकारणच कठोर परिश्रम करायला भाग पाडतात. त्यांनी स्वतः अशा परिश्रमाचा अनुभव घेतलेला असतो, पण योग्य निर्णय न घेता आल्याने

## वेताळ कथा



ते एकादी अशी घोडचूक करून बसतात. उदाहरणार्थ मी तुला विश्वदत्त नावाच्या एका मोठ्या व्यापाऱ्याची गोष्ट सांगतो. लक्षपूर्वक ऐक. यामुळे तुझा थकवा ही थोडा दूर होईल.'' असं म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला.

सूर्यनगर मध्ये विश्वदत्त नावाचा एक मोठा व्यापारी होता. त्याचा एकुलता एक मुलगा होता - धनदत्त. तो मोठा बुद्धिमान होता, पण स्वभावाने चंचल नि उतावळा. वडील व्यापार करून पैसे मिळवीत, आणि धनदत्त खूप खर्च करून मजेत दिवस घालवी. हळू हळू त्याला काही वाईट सवयी लागल्या.

एक दिवशी विश्वदत्तने मुलाला जवळ बोलवलं आणि समजून सांगितलं - ''बेटा धन, मुलगा वयात आला म्हणजे मित्रासारखा असतो. म्हणून चांगलं काय नि वाईट काय या विषयावर मी तुझ्या पुढे भाषण देऊ इच्छित नाही. मला या गोष्टीचं फार वाईट वाटतं की तू ज्या मार्गाने चालला आहेस, त्यात तुझा खचित नाश आहे. दिवसेंदिवस तुझं पतन होत चाललंय. तू जे मागतोस ते मी तुला देतो. म्हणून तुला पैशांची काही किंमत वाटत नाही. इथून पुढे आपल्या गरजा पूर्ण करण्यासाठी तू स्वतः श्रम करून पैसा मिळव.''

धनदत्तने वडिलांची सूचना मान्य केली. त्याला व्यापाराची आवड होती, पण त्यासाठी आवश्यक ते भांडवल वडिलांकडून घेण्याची त्याची इच्छा नव्हती. आपल्या काही व्यापारी मित्रांजवळ त्याने आपली इच्छा बोलून दाखवली, तेव्हां ते म्हणाले - भागीदार बनण्यासाठी आवश्यक ते भांडवल घेऊन ये प्रथम. शेवटी निरुपायाने निर्लज्ज होऊन धनदत्तला वडिलांकडे पैशांची मागणी करावीच लागली.

विश्वदत्त मुलाला म्हणाला - ''व्यापार करणं प्रत्येकाला जमेलच असं नाही. ज्याला व्यापार करता येतो, त्याचं मुख्य भांडवल म्हणजे त्याची बुद्धि!''

''जरूर पडेल तेव्हा मी व्यापारात आपल्या बुद्धीचा उपयोग करीनच. पण आपण माझे वडील श्रीमंत आहात. आपण मला एक हजार मोहरा द्या. वाटलं तर कागद लिहून घ्या. एक वर्षाच्या आत आपली रक्कम सव्याज परत फेडीन.'' धनदत्तने आश्वासन दिले.

तुला जर माझ्याकडून पैसे पाहिजे असतील, तर प्रथम आपल्या बुद्धिमत्तेची चुणूक दाखव. त्यासाठी तुला परीक्षा द्यावी लागेल.'' विश्वदत्ताने आपला विचार सांगितला. आणि पुढे म्हणाला - ''सूर्यनगर पासून आठ कोसांवर रमणपुर नावाचं एक गाव आहे. तिथं करटक आणि दमनक नावाच्या दोन व्यक्ति राहतात. त्यांच्यापाशी अद्भुत शक्ति आहेत असं लोक म्हणतात. नवा व्यवसाय सुरू करण्यापूर्वी त्या दोघांपैकी कोणाची तरी सेवा-सुश्रुषा केलीस तर तुझं कल्याण होईल. जे मिळवण्याची तुझी इच्छा असेल, ते तुला मिळेल.''

एवढं सांगून विश्वदत्त आपल्या मुलाला म्हणाला - ''तू रमणपुरला जा. सहा महिने करटकची आणि सहा महिने दमनकची सेवा कर. दोघांचे आशीर्वाद घे. परत आल्यावर दोघांच्या पैकी चांगला कोण हे मला सांग. तेव्हा मला कळेल की तू किती बुद्धिमान आहेस. बरेच लोक सांगतात की करटक दुष्ट आहे आणि शाप देतो. त्यांच्या दृष्टीने दमनक फार चांगला माणूस आहे. आणि तो आशीर्वाद देतो. लोक जे काही सांगतात त्यात कितपत तथ्य आहे हे प्रत्यक्ष अनुभव घेऊन तू मला सांग.''

वडिलांच्या इच्छेनुसार धनदत्त रमणपुरला जायला निघाला. वडिलांनी त्याला एक दमडी दिली नाही. पण तो जेथे जाई तेथे वडिलांचे नाव घेतले की त्याला पाहिजे ती मदत मिळे.

धनदत्त प्रथम करकटच्या घरी गेला. धनदत्त आपल्याकडे कशासाठी आला आहे हे जेव्हा करटकच्या लक्ष्यात आले तेव्हा तो



म्हणाला - ''तू माझा सेवक नाहीस, मित्र आहेस. मी तुझ्या सर्व शंका दूर करीन. पण एक गोष्ट लक्षात ठेव. मला कधी नाराज करू नकोस. मी रागावून शिवी दिली तर तुझे नुकसान झाल्याशिवाय राहणार नाही.''

करटकचा मुलगा होता राम. त्याला एक मुलगी होती दमयंती. ही दोन्ही मुलं वयाने धनदत्तपेक्षा खूप लहान होती. दोघे ही धनदत्तला नेहमी प्रश्न विचारीत. धनदत्त सर्व प्रश्नांची उत्तरे मोठ्या कुशलतेने देई. धनदत्तवर त्यांचा पूर्ण विश्वास होता. धनदत्त जे करायला सांगे, ते सर्व दोघेजण श्रद्धापूर्वक करीत. हळू हळू अशी परिस्थिति निर्माण झाली की राम आणि दमयंतीला धनदत्त वाचून राहणं अशक्य वाटू लागलं.

करटकने धनदत्तला व्यापाराची अनेक सूत्रे शिकवली. माल योग्य किंमतीला कसा



खरेदी करावा, कोणत्या वस्तु कोठे विकाव्यात, ग्राहकांचा विश्वास कसा संपादन करावा हे करटक धनदत्तला नित्य शिकवत राही. धनदत्तने आता व्यापार-शास्त्रांतील बरेच बारकावे जाणून घेतले. एक दिवशी त्याने करटकला विचारले - ''आपण मला व्यापाराबाबत बरेच ज्ञान दिले. पण आपल्या सर्व सूचना अमलात आणायच्या म्हटलं तर सत्य, न्याय, प्रामाणिकपणा सगळं सोडूनच दिलं पाहिजे नाही? नित्य अधर्माचरणच करीत राहिलं पाहिजे. याशिवाय काही अन्य मार्ग आपण सुचवू शकाल?''

करटक उपदेश करू लागला - ''व्यापारात यश मिळवायचं असेल तर खोटं बोललंच पाहिजे. आपल्या लोकांना सुद्धा फसवलं पाहिजे. प्रामाणिकपणाचे नुसते नाटक करायचे! न्याय, धर्म, सत्य हे सगळं विसरून जायला हवं. हं, आपण सरकारच्या तावडीत सापडणार नाही, यासाठी सतत सावधान राहिलं पाहिजे.''

धनदत्तला गुरूचा उपदेश पटला. राम आणि दमयंतीला पण याच गोष्टी तो शिकवू लागला. ते दोघे खुश होऊन म्हणाले - ''आपण मोठे झाल्यावर व्यापारच करू या. काका, तुम्ही आम्हाला व्यापारातील सर्व बारकावे छान शिकवा.''

आपल्या मुलात होत असलेला बदल करटकच्या लक्षात आला. एक दिवशी त्याने मुलांना याचं कारण विचारलं. मुलं म्हणाली - ''काका आम्हाला असंच शिकवतात.'' करटकने धनदत्तला बोलवून घेतलं नि तक्रार केली - ''मी तर तुला चांगला सल्ला देत राहिलो. आणि तू माझ्या मुलांना बदसल्ला देऊन बिघडवायला सुरुवात केलीस. असा अन्याय तुला का बरे करावासा वाटला?''

''आपण मला जो सल्ला दिला, तोच मी राम व दमयंतीला दिला. आपण दिलेला सल्ला चुकीचा कसा असेल?'' धनदत्त उत्तरला.

अमळ रागावून करटक म्हणाला - ''व्यापारात दगा, धोका, अन्याय यांशिवाय चालणारच नाही. म्हणूनच आपल्या मुलांनी व्यापार करावा अशी माझी मुळिच इच्छा नाही.''

''जर दगा, धोक्याशिवाय व्यापार करता येत नसेल, तर आपण मला व्यापारापासून का परावृत्त केले नाही?'' चिडून धनदत्तने विचारले.

''तर मग ऐक. या जगात व्यापाऱ्यांची फार आवश्यकता आहे. म्हणून मी दुसऱ्यांना व्यापार करायला प्रोत्साहन देतो. पण माझ्या मुलांनी व्यापार करावा हे मला पसंत नाही. आता हे या मुलांना शिकविणे तुझे कर्तव्य आहे.'' गंभीरपणे करटकने सांगितले.

''आपल्या मुलांना एक न्याय, अन् दुसऱ्यांना दुसरा न्याय हे तुमचं धोरण मला योग्य वाटत नाही. जर जगाला व्यापाऱ्यांची आवश्यकता असेल तर तुमच्या मुलांनी व्यापार का करू नये?'' धनदत्तने विचारले.

धनदत्तच्या या म्हणण्यावर करटक एकदम संतापला आणि म्हणाला - ''मूर्खा, चालता हो. इथून पुढे कधी मला तोंड दाखवू नकोस. तुझा सर्वनाश होईल असा तुला शाप देतो मी!''

धनदत्त हंसत करटकच्या घरातून बाहेर पडला. पण रस्त्यातील केळीच्या सालीवर त्याचा पाय घसरला आणि तो जमिनीवर पडला. त्याला उठणं कठिण झालं. रस्त्यावरच्या एकाला त्याची दया आली. त्याला उचलून तो वैद्याकडे घेऊन गेला. वैद्याने औषधी पानांचा रस जखमेवर लावीत त्याला विचारले - ''पण असा कसा पडलास तू?'' धनदत्तने आपली संपूर्ण कथा वैद्याला ऐकवली.

''अरे बाप रे! करटकने तुला शाप दिला? हे तर फार वाईट झालं. तुझ्यावर रोज काही ना काही संकट येत राहणार आता. त्याच्याकडे जाऊन क्षमा माग.'' वैद्याने सुचविले.



धनदत्त म्हणाला - ''माझा शापावर मुळिच विश्वास नाही. मी मोठा हट्टी आहे. आवश्यक वाटलं तर रोज तुमच्याकडे औषधासाठी येईन. पण त्या करटकाची क्षमा मागायला कधी ही जाणार नाही.''

जरा विचार करून वैद्य म्हणाला - ''तू विश्वदत्तचा मुलगा आहेस. औषधासाठी केव्हां ही आलास तर मी तुला अवश्य मदत करीन. पण उगाच आपली तब्येत कशासाठी बिघडवून घेतोस? माझं ऐक. तू दमनकाच्या आश्रयाला जा. तिथे तुला काही त्रास होणार नाही.''

''ठीक आहे, हा मी चाललो दमतक कडे. पण ते मला आपला शिष्य बनवतील का?'' धनदत्तने आपला संशय व्यक्त केला.

वैद्य म्हणाला - ''रस्त्यावरून तुला उचलून कोणी आणलं? तेच तर दमनक. ते परोपकारी आहेत. सर्वांना मान देतात. सर्वांना आशीर्वाद देतात. शाप देणं जणू काही त्यांना माहीतच नाही!''



धनदत्त दमनकाच्या घरी गेला. आपला परिचय देऊन आपली समग्र रामकहाणी ऐकवली.

दमनक त्याला म्हणाला - ''बेटा व्यापारात लोक-सेवा आहे, परोपकार आहे. पण पदरी अनुभव असेल तरच व्यापारात यश मिळतं. तू इथंच व्यापार सुरू कर. अर्धं भांडवल तुझं, अर्धं माझं. फायदा आपण अर्धा वाटून घ्यायचा. आहे तुला कबूल?''

धनदत्तला मोठं आश्चर्य वाटलं. तो म्हणाला - ''मी तर असं ऐकलंय की आपण फार चांगले गृहस्थ आहात. मला व्यापार करण्यासाठी आपण का प्रोत्साहन देत आहात हे मला कळत नाही.''

''अरे, वैद्य औषध देतो आणि पैसे घेतो. गायक संगीत सुनवतो नि आपली बिदागी घेतो. व्यापारी माल देतो नि आपले पैसे वसूल करतो. खाद्य-पदार्थात भेसळ करून भोळ्या लोकांना फसविणे हे व्यापारात गैर नाही. व्यापारात फायदा असतो, म्हणून व्यापारात तुझ्याशी भागीदारी करायला मी तयार आहे.'' दमनकने समजाऊन सांगितले.

धनदत्तला दमनकचे बोलणे आवडले. त्याने ताबडतोब व्यापार करायला सुरुवात केली. दमनकच्या आशीर्वादामुळे कदाचित् असेल, धनदत्तला व्यापारात चांगले यश मिळाले. चार महिन्यात त्याने खूप पैसा मिळवला.

भांडवल म्हणून दमनकने एक हजार मोहरा धनदत्तला दिल्या होत्या. पहिल्या महिन्यात धनदत्तला पांचशे मोहरा फायदा झाला. निम्म्या मोहरा त्याने दमनकला दिल्या. दुसऱ्या महिन्यात हजार मोहरा फायदा मिळाला. त्यातील ही अर्ध्या त्याने दमनकला दिल्या. दरमहा असाच क्रम चालू राहिला.

चार महिन्यांनंतर धनगुप्तच्या मनात एक विचार आला. एवढ्या थोड्या दिवसात त्याने दमनकला पंधराशे मोहरा दिल्या. दमनकने २० टक्क्याने कर्ज दिले असते तर एका वर्षात त्याला बाराशे मोहराच मिळाल्या असत्या.

एक दिवशी धनगुप्त दमनकला म्हणाला - ''महाराज, आपण जे भांडवल दिले त्याचे व्याज तर आपणास मिळून गेले. आता इथून पुढे माझ्याकडून काही अपेक्षा करू नका.''

नाराज होत दमनक म्हणाला - ''आपण भागीदारीत व्यापार करीत आहोत. माझं भांडवल आणि अर्धा-अर्धा फायदा दोघांचा!





यात काही बदल होऊ शकणार नाही. जोपर्यंत व्यापार चालू आहे, तोपर्यंत फायद्यातील अर्धा वाटा मला मिळायलाच हवा.'' दमनकने आपली भूमिका स्पष्ट केली.

धनदत्त आवेशात येऊन म्हणाला - ''म्हणजे तुमची धोकाबाजी आता माझ्या लक्षात आली. बरं झालं, आपण काही लेखी करार केला नाही. आपले संबंध संपले, इथून पुढे मी आपलं तोंड पाहणार नाही, बस!''

''मग आजपासून तुला जो त्रास होईल, त्याची जबाबदारी माझ्यावर नाही.'' दमनकने सांगून टाकले.

दोघे आपापल्या घराकडे निघाले. धनदत्त रस्त्यावर आला नि केळ्याच्या सालांवरून पाय घसरून पडला. कोणी तरी त्याला वैद्याकडे घेऊन गेलं. वैद्याने पुन्हा एकदा औषधी पानांचा रस काढला आणि तो त्याच्या जखमांवर चोळला. आणि मग वैद्य म्हणाला - ''अरे, करटक नि दमनक दोघांच्या ही वाणीत सामर्थ्य आहे. पण त्याची सत्ता या रमणपूर पर्यंतच सीमित आहे. तू ताबडतोब हे गाव सोडून आपल्या गावी जावंस हे बरं.''

धनदत्त सूर्यनगरला परत आला आणि आपल्या वडिलांना घडलेला सर्व वृत्तांत सांगितला. तो म्हणाला - ''करटक नि दमनक दोघे ही मोठे स्वार्थी आहेत. दोघे ही दुष्ट आहेत. दोघांनी मला शाप दिला!''

विश्वदत्त म्हणाला - ''समजलं मला तू किती बुद्धिमान आहेस ते. शेती-वाडी आणि गुरे-ढोरे संभाळण्याची तुझी लायकी. व्यापार



करणं तुझं काम नाही.''

वेताळाने राजा विक्रमादित्याला एवढी गोष्ट सांगितली आणि मग विचारले - ''राजन्, 'तू व्यापार करण्याच्या लायकीचा नाहीस' हे विश्वदत्ताचे म्हणणे अनुचित व अन्यायाचे नाही वाटत? मला वाटते हा घिसाडघाईत घेतलेला निर्णय असावा. आपल्या स्वतःच्या अनुभवावरून धनदत्तच्या लक्षात आले की करटक व दमनक हे दोघे ही स्वार्थी व दुष्ट आहेत. दोघांनी ही जेव्हा हे जाणलं की धनदत्तपासून आपला काही फायदा नाही, आपल्या दृष्टीने तो कुचकामी आहे, तेव्हा दोघांनी ही त्याचा अपमान केला आणि त्याला शाप दिला. परंतु विश्वदत्तच्या बोलण्यावरून वाटत की दोघांच्या पैकी एक चांगला आहे. दुष्ट हे नेहमी दुष्टच राहणार, कारण ती त्यांची मूलभूत प्रवृत्ति असते. त्यांच्यापैकी

कोणाला चांगला दुष्ट नि कोणाला वाईट दुष्ट म्हणणे याला काही अर्थ नाही. विश्वदत्तासारख्या योग्यतासंपन्न व्यापाऱ्याने आपल्या मुलाच्या बाबतीत अशी चूक का बरे करावी? माहीत असून ही माझ्या या शंकेचं समाधान केलं नाहीस तर त्याचा परिणाम काय होईल ते तू जाणतोसच.''

वेताळाच्या शंकेचे निवारण करीत राजा म्हणाला - ''करटक दुष्ट आहे हे निःसंशय. जी गोष्ट अयोग्य आहे हे त्याला माहीत आहे, ती दुसऱ्यांना शिकवून तो आपला स्वार्थ साधतो. पण दमनकची गोष्ट याहून वेगळी आहे. तो जे सांगतो, ते अमलात आणतो. व्यापाराबाबत धनदत्तची योग्यता माहीत नसताना त्याने त्याला हजार मोहरा दिल्या, हा त्याचा चांगुलपणा होय. त्याच्या आशीर्वादानेच धनदत्तला व्यापारात यश मिळाले व त्याने खूप कमाई केली. खरं पाहिलं तर करटक आणि दमनक यांच्यातील धनदत्तला शाप देणारा करटकच आहे. ज्या क्षणी धनदत्तचा दमनकशी परिचय झाला, त्या क्षणापासूनच त्याला करटकाच्या शापापासून मुक्ति मिळाली. परंतु लोभाला बळी पडून धनदत्तने प्राप्तीचा अर्धा वाटा दमनकला द्यायला नकार दिला आणि वर म्हणाला - 'माझ्याशी बोलू नकोस!' अशा रीतीने त्याने दमनकचा अपमानच केला. म्हणून दमनकने त्याला आशीर्वाद देण्याचे सोडून दिले. त्याचा परिणाम असा झाला की तो रस्त्यात केळ्याच्या सालीवर पाय पडून घसरून खाली पडला. याचे कारण जाणून घेण्याचा ही त्याने प्रयत्न केला नाही. अनुभव नसल्यामुळे व योग्य निर्णय घेण्याच्या क्षमतेच्या अभावी धनदत्तने दोघांना ही दुष्ट ठरवले. यावरून विश्वदत्तच्या लक्षात आले की आपल्या मुलात चांगला व्यापारी बनण्याची लक्षणे नाहीत. त्याच्यात बुद्धि-कुशलता नाही आणि व्यापारासाठी लागणारी दक्षता ही नाही. म्हणून त्याने त्याला शेती-वाडी व पशु-पालनाला योग्य ठरवले.

राजाचे हे संतोषजनक उत्तर ऐकून वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडावर जाऊन बसला.

**आधार : सीमा वाजपेयी यांची एक कथा**





# कर्नाटका कडे

**आलेख : मीरा नायर ◆ चित्र : गौतम सेन**

गोव्याच्या किनाऱ्यावरून आपण दक्षिण दिशेला गेलो की येते मारगाव. ते भारतातील एक उत्कृष्ट नैसर्गिक बंदर आहे. हे बंदर नेहमी गजबजलेले असते. येथून बराच माल परदेशी निर्यात होतो. यात प्रमुख आहे मँगनीज व लोहयुक्त माती.




मारगाव पासून थोड्या अंतरावर आहे कोल्वा. हा गोव्याचा लांबच लांब वालुकामय किनारा आहे. येथून काबो डि रामा पर्यंत शुभ्र वाळू दिसते. रामाने वनवासात आपला काही काळ इथे घालवला असे म्हणतात. २५ कि.मी. लांबीच्या या किनाऱ्याच्या मध्यभागी बेणोली आहे. रामाचा एक बाण इथं पडला होता अशी दंतकथा आहे.

कोल्वा किनाऱ्यावर एक सुप्रसिद्ध चर्च आहे - इग्रेजा डि नोसा सेन्होरा डि प्येडाडे. यात शिशु येशूची मूर्ति आहे. रोग-निवारण करण्याची अद्भुत शक्ति या मूर्तीत आहे असे येथील लोक सांगतात.

गोव्याचा दक्षिणतम वालुकामय किनारा आहे पोलेम. या स्वच्छ व एकांतपूर्ण स्थानापासून गोवा व कर्नाटकाची सीमा जवळच आहे.

'दक्षिण काशी' नावाने प्रसिद्ध गोकर्ण कारवारपासून ६० कि.मी. अंतरावर आहे. हे शैवांचे एक पवित्र तीर्थ आहे. येथील महाबळेश्वर मंदिरातील 'आत्मलिंग' दर्शनासाठी खूप दूरवरून शिवभक्त



कोल्वाचा समुद्रकिनारा

येतात. रावणाने दीर्घ तपस्या करून हे लिंग प्राप्त केल्याचे सांगण्यात येते. गणेशाने चलाखी करून ते जमिनीवर ठेववले. जेव्हा रावणाने ते पुन्हा उचलण्याचा प्रयत्न केला, तेव्हा ते त्याला उचलेना. रावणाला ते तेथेच सोडून जावे लागले. तेव्हा पासून 'महाबल' नावाने या लिंगाची पूजा होऊं लागली. दर बारा वर्षांनी येथे 'अष्टबंध' उत्सव साजरा केला जातो. त्यावेळी आसपासची माती उकरून संपूर्ण लिंगाचे दर्शन भक्तांना घडविण्यात येते.

कारवार

नारळाच्या बागांनी सुशोभित किनाऱ्यावरून आपण पुढे चाललो म्हणजे कुमटा येथे पोचतो. येथील चंदनाची कारागिरी प्रसिद्ध आहे. पिढीजात हे काम करणाऱ्या कलाकारांना 'गुडिगार' म्हणतात.

इथून पुढे गेले म्हणजे येते होनावर. याचं जुनं नाव आहे- 'होन्नुरु' (सोन्याचं शहर!). हे रामायणकालीन स्थान आहे असे येथील लोक सांगतात. इथे 'रामतीर्थ' नावाचे एक कुंड आहे. याची स्थापना रामाने केली असे मानले जाते. हैदर अलीच्या काळात होनावर फार समृद्ध शहर होते आणि तेथील बंदर नेहमी गजबजलेले असे. येथे शरावती नदीवर बनविलेला पूल कर्नाटकातील सर्वात अधिक



रवीन्द्रनाथ ठाकुर



स्वातंत्र्याच्या लढ्यांत अंकोल्याने उत्साहाने भाग घेतला होता

लांबीचा पुल आहे.

कर्नाटकाच्या समुद्र-किनाऱ्याचे क्षेत्र भगवान परशुरामाने अरबी समुद्राकडून प्राप्त केले असे सांगतात. म्हणून या भागाला परशुरामक्षेत्र ही म्हटले जाते.

कर्नाटकाच्या उत्तर टोकावर वसलेले कारवार अरबी समुद्राच्या किनाऱ्यावरील सर्वसुंदर स्थान आहे. उत्तर कन्नड जिल्ह्याच्या या प्रमुख शहराच्या तीन बाजूंना वालुकामय किनारे आहेत.

कारवार हे एक उत्तम नैसर्गिक बंदर पण आहे. दक्षिण-पश्चिम मान्सून पासून सुरक्षित या बंदराचा उपयोग मुंबईहून कोलंबोला जाणारी जहाजे वर्ष भर करतात. अरबी लोक या बंदराला म्हणतात - 'बेट-एल-कोळ'. येथून मिरे, वेलदोडा, तमालपत्र, डुंगारी नावाचे निळ्या रंगाचे जाड सुती कापड आणि मलमल यांची खूप निर्यात होते.

गुरुदेव रवीन्द्रनाथ ठाकुर यांनी आपले पहिले गीति-नाट्य 'प्रकृतीर प्रतिशोध' सन १८८३ मध्ये इथेच लिहिले. त्यावेळी ते बावीस वर्षांचे होते व आपला मोठा भाऊ सत्येन्द्रनाथ ठाकुर यांच्याकडे रहात असत. पहिले भारतीय आय.ए.एस. ऑफिसर श्री. सत्येन्द्रनाथ ठाकुर तेव्हा जिल्हा-न्यायाधीश होते.

कारवारच्या दक्षिणेकडे थोड्या अंतरावर प्राचीन बंदर आहे

महाबळेश्वर मंदिर



चंदनाची मूर्ति

नक्षीकाम करीत असलेला गुडिगार



शरावतीवरील पुल



गारुडी : भटकलच्या
एका जैन-मंदिरातील
कोरीव मूर्ति



चंद्रनाथेश्वर
मंदिरातील
तीर्थंकर चंद्रनाथ
यांची मूर्ति

अंकोला. कदंब, चालुक्य व विजयनगर राज्यांच्या काळात हे व्यापाराचे प्रमुख केन्द्र होते. भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्यातील अंकोला एक महत्त्वपूर्ण स्थान आहे. येथे मिठाचा सत्याग्रह व करबंदीची चळवळ मोठ्या प्रमाणात झाली होती.

होन्नेबिळ येथील प्रसिद्ध जैन गुहा अंकोल्याहून आठ कि.मी. अंतरावर आहेत.

उत्तर कन्नड जिल्ह्याच्या दक्षिणी टोकावर वसले आहे - भटकल. येथील जैन-मंदिरे प्रसिद्ध आहेत. कमीत कमी तेरा जैन-मंदिरे आहेत. सर्वात मोठे जैन-मंदिर चन्द्रनाथेश्वराचे आहे. हे ५०० वर्षांपूर्वी बांधले गेले आहे.



यक्षगान मधील एक सजलेला नट

भटकल पासून सहा मैल अंतरावर घनदाट जंगलाने भरलेले नेत्राणी बेट आहे. इथे खूप कबुतरांची वस्ती असे, म्हणून इंग्रज लोक याला 'पिजन-आयलंड' म्हणू लागले. स्विफ्टलेट नावाचे पक्षी पण इथे खूप दिसतात.

येथून पुढे दक्षिणेकडे कुंदापुर आहे. 'बडगतट्टु' चे हे एक मोठे केन्द्र आहे. यक्षगान लोकनाट्याची उत्तरी शैली आहे - 'बडगतट्टु'.

कन्नड साहित्यकार 'मुद्दण' कुंदापुरचेच. त्यांचे खरे नाव नंदलिके लक्ष्मीनारणप्पा. चालू शतकाच्या प्रारंभी ते येथील सरकारी हायस्कूल मध्ये व्यायाम-शिक्षक होते. मध्ययुगीन कन्नड गद्यात लिहिलेला त्यांचा ग्रंथ 'रामाश्वमेधम्' अति प्रसिद्ध आहे.





# 'आपुली आपण..!'

नरसिंह हा धवलगिरीतल्या संपन्न शेतकऱ्यांपैकी एक होता. त्याचा एकुलता एक मुलगा परमेश शेजारच्या गावातल्या गुरुकुलातले पाच वर्षांचे अध्ययन संपवून नुकताच परत आला होता.

तसा तर परमेश स्वभावाने फार चांगला होता, पण दुसऱ्याशी बोलताना स्वतःबद्दल जरा जास्तच गौरवास्पद बोले. नरसिंहने त्याला अनेकदा असे वागणे 'बरे नसल्याबद्दल' सांगून पाहिले. पण उलट पित्याच्या बोलण्याचे खंडन करत तो म्हणे, ''तसं नाही बाबा, जे गुण माझ्यात नाहीतच, ते असल्याबद्दल मी गौरवून बोललो तर ते अगदी चूक! पण हल्ली मी इतरांशी जे काही बोलतो, ते सारं मी गुरुकुलात शिकून आलोय. त्यात अति-शयोक्ती नावालाही नाही.''

एकदा काही कामानिमित्त नरसिंह आपला मेहुणा शिव याला भेटायला शेजारच्या गावी गेला. बोलता बोलता त्याने परमेशचाही विषय काढला अन् त्याच्या वर्तणुकीबद्दल दुःख व्यक्त केले.

शिव म्हणाला, ''त्याच्या बाबतीत उगीच मनाला लावून घेऊ नका. त्याला एकदा माझ्याकडे पाठवा, खरा मोठेपणा म्हणजे काय हे दाखवून देईन मी त्याला.''

घरी परत आल्यावर नरसिंह परमेशला म्हणाला, ''अरे तुझ्या शिवमामानं बोलवलं आहे तुला. तुझ्याशी काही जरूरी गोष्ट करायची आहे त्याला.'' परमेश लगेच शिवला भेटायला निघाला.

परमेशच्या मनात शिवबद्दल फार आदर होता. भाच्याशी थोडे इकडचे-तिकडचे बोलल्यानन्तर त्याने परमेशला विचारले, ''शहरातले बडे व्यापारी गोविन्द गुप्ता यांना ओळखतोस का रे तू?''

परमेशने त्याच्याबद्दल आपल्याला काही माहिती नसल्याचे सांगितले. शिव म्हणाला,

अशोक पवार



''मलाही तशी काही खास माहिती नाहीय त्यांची. पण आता कामच अुपस्थित झालंय, तेंव्हा वाटलं की तुलाही बरोबर घेअून जाअून त्यांच्याशी ओळख करून द्यावी.''

''काय, हा व्यापारी इतका मोठा आहे, की मी मुद्दाम त्याच्याशी ओळख करून घ्यावी? काहीही असो; आता मामा असं समजा की तुमचं काम झालंच. अनोळखी माणसांशी ओळख करून घेअून आपलं काम करून घेण्यात माझ्या बरोबरचा कोणीच नसेल.'' परमेशने पुन्हा एकदा आपलंच गुणवर्णन करून घेतले.

त्याच्या या बोलण्यावर शिवमामा खूप जोराने हसून ''अरे वा! आपलं काम साधून घ्यायचं एवढाच तर माझा अुद्देश!''

दुसऱ्या दिवशी भल्या सकाळीच भाड्याने बैलगाडी घेअून मामा-भाचे शहराकडे निघाले. शहरात पोचल्यावर परमेशला तो म्हणाला, ''गुप्तांचं घर इथेच कुठेतरी आहे.'' गाडीवाल्याला भाडं देअून त्याने रवाना केले अन् समोरून डोक्यावर भाजीचे टोपले घेअून येणाऱ्या बाईला विचारले, ''गोविन्द गुप्तांचं घर कुठं आहे ते माहीत आहे का बाई तुम्हाला?''

लगेच थांबून ती बाई म्हणाली, ''त्या धर्मराजाचं घर कुणाला माहीत नसेल? गांवच्या एकाद्या शेंबड्या पोरालाही विचारलंत तरी घर दाखवेल तो. त्यांनी ज्याला मदत केली नाही असा माणूस सापडणं विरळाच. माझंच पहा नं! माझा नवरा अपघातात वारला. शेठजींनीच मला हा भाजीचा धंदा करायचा सल्ला देअून सुरुवातीला शंभर रुपये भांडवलही दिलं बघा.'' नंतर बाईने गुप्ताशेठच्या घराचा रस्ताही सांगितला.

तिनं सांगितलेल्या गल्लीत शिरून ते पुढे जाअू लागले अन् समोरून येणाऱ्या एका प्रौढ माणसाला अडवून शिवने पुन्हा घराची चौकशी केली. गोविन्दशेठचं नाव ऐकताच ते घर स्वतःच दाखवण्यासाठी तो माणूस मोठ्या प्रेमाने परत फिरला व या दोघांबरोबर चालता चालता त्याने विचारले, ''काय काम काढलंत गुप्ताशेठकडं? काही हरकत नसेल तरच सांगा हं !''

मोठा दुःखी आवाज काढून शिवमामा म्हणाला, ''आम्ही शेजारच्या गावचे आहोत. काही अडचणीत सापडल्यामुळे त्यांना भेटायला आलो आहोत. ते मोठे दयाळू अन् धर्मात्मा असल्याचं ऐकूनच त्यांची मदत मागायला चाललो आहोत.''

रस्ता दाखवणाऱ्या प्रौढाने आणखीनच आदर प्रगट करत म्हटले, ''असं होय? गोविन्द गुप्ताशेठना भेटलात की सगळ्या अडचणी दूर होतील बघा तुमच्या. आता तुमचं काम झालंय असं समजून निश्चिन्त व्हा! अहो, असा दयाळू माणूस अलम् दुनियेत नाही सापडणार! माझा विस्कटलेला व्यापार त्यांनीच तर दिला न सावरून! मला आर्थिक मदत करून पुन्हा धीरानं अुभं केलं त्यांनी मला.''

इतक्यात तिघे शेठजींच्या घरासमोर पोचले. त्या व्यापाऱ्याला नमस्कार करून शिव परमेशसह घरात शिरला.



मामा भाचे गोविन्दशेठसमोर पोचले, तेंव्हा त्यांच्या अगोदर आलेल्या तीन माणसांशी शेठजी बोलत होते. शिवला पाहिल्याबरोबर स्वतः अुठून अुभे रहात ते म्हणाले, ''अरे या या! बऱ्याच दिवसांनी आलात शिवमहाराज!''

त्यांचे बोलणे ऐकून तर परमेश चाटच पडला! पण शिव मात्र हसतहसत अुत्तरला, ''जरा तब्येत बरी नव्हती; म्हणून नाही आलो. आपण ठीक आहात नं सर्वजण?''

गोविन्द गुप्तानेही हसत हसत त्यांना जवळ बसवून घेतले. तेथे असलेल्या तिघांपैकी एकाने खुणेनेच शिवला परमेशबद्दल विचारले.

''हा? हा माझा भाचा परमेश.'' शिवने सांगितले! ''अच्छा, माझा मुलगा गुरुकुलात शिकत असताना पाहिलाय मी याला तिथं. पण अलिकडे ऐकलंय की तो स्वतःला कोणी 'मोठा माणूस' समजत असतो. आपल्यासारखा मोठा माणूस आसपास कोणी नव्हेच असं समजत असतो म्हणे हा? म्हणजे त्या हिशोबानं पाहिलं, तर तुमचा भाचा आमच्या गोविन्दशेठ पेक्षाही महान् म्हणायला हवा! हो की नाही?'' त्याच्या या व्यंगात्मक बोलण्यात सत्यही होतेच. परमेशचे मन यामुळे चांगलेच दुखावले. नंतर बराच वेळ शिव तेथील सर्वांशी बोलत होता, पण परमेश मात्र मौन साधून बसला होता. सर्वांनी मिळून नंतर गोविन्दशेठकडेच भोजन केले. दुपारी थोडी विश्रान्ती झाल्यावर मामाभाचे परत आपल्या गावाकडे निघाले.

परत जाताना परमेशला अगदी गप्पगप्प

पाहून हसत मामाने विचारले, "ज्या कामासाठी आपण इथं आलो, ते सफल झालं की नाही?"

अुत्तरादाखल मान खाली घालून परमेश म्हणाला, "तुम्ही ज्या कामाचा विडा अुचलला होता, ते सफळच झालंय मामा!"

शिवने मोठ्या नाटकी आवाजात विचारले, "मी कसला विडा अुचलला? सांग बरं काय ते!"

धीम्या आवाजात परमेश म्हणाला, "मी स्वतःला कोणी 'मोठा' समजू नये, हे शिकवायच्या अुद्देशानंच तर तुम्ही शहरात आणलंत न मला?"

"गोविन्द गुप्ता शेठ तर तुमचे मित्रच आहेत. पण तुम्ही असं नाटक केलंत, की जणू तुम्ही ओळखतच नाही त्यांना. मला त्यांची सर्वांकडून स्तुतीच ऐकायला मिळावी, म्हणून रस्त्यानं मुद्दाम त्यांच्या घराचा पत्ता सर्वांना विचारत राहिलात. नंतर आपण त्यांच्याकडे गेल्यावर माझ्या आपोआपच लक्षात आलं, की शेठजी अगदीच साधे, कसलंही अवडंबर न माजवणारे अन् स्वतःबद्दल चुकूनही काही न बोलणारे गृहस्थ आहेत. तिथे हजर असलेल्या माणसाचे टोमणे ऐकून मला सावध केलं. असो, घडलं ते सगळं चांगलंच घडलं. माझे डोळे अुघडले!"

परमेशच्या पाठीवर प्रेमाने थोपटत शिवमामा म्हणाला, "अरे माणसाचं महत्त्व वाढतं, ते त्याच्या कृत्यांमुळे, नुसत्या बोलण्यामुळे नव्हे. तू चांगली कामं केलीस, तर समाज आपोआपच तुला मान देईल. मोठं म्हणवून घेणं हे सर्वांनाच शक्य होत नाही. तसा तर लाखात एकादाच! गोविन्द गुप्तांच्या अुदाहरणावरून 'मोठेपणा म्हणजे काय' अन् 'मोठं कोण' या गोष्टी शिकून घे. समर्थांचं वचन तर तुला माहीतच आहे की, 'आपली आपण करी स्तुती ...!'"

परमेशने मामाचे बोलणे लक्षपूर्वक अैकले. आपल्या घरी पोचल्यावर तो सर्वांशी मोठ्या विनयाने वागू लागला. त्याच्यातल्या या इष्ट बदलामुळे त्याच्या पित्यालाही आनन्द वाटला.



चांदोबा

# सोनेरी क्षण

## मृत्यु-व्यूह

राजकुमार उदयनला भयानक घोरी जातीच्या लोकांनी पकडले.

अरे, हे काय? मला तर दिसतच नाहीये

माझ्या मंत्र-बलाने तुला अंध बनविले आहे. सूर्यास्ता पर्यंत तुला मृत्यू येणार.

या व्यूहाच्या पलीकडे एक जादूचा जल-प्रवाह आहे. तोच तुझे संरक्षण करील. जा!

राजकुमाराने धाडसाने मृत्यू-व्यूहात प्रवेश केला.

गुरूने सांगितलेल्या रहस्य-सूत्राचे त्याने स्मरण केले.

की......

ते रहस्य-सूत्र कोणते?

# ‘पांडा’
## कात्रीने कापा !

हे चित्र मोठे करा (झेरॉक्स पण करता येईल) आणि ते एका जाड व चिवट कागदावर चिकटवा.



विशाल पांडा जागतिक निसर्ग-निधीचे (डब्ल्यु डब्ल्यु एफ) चिन्ह आहे.

कात्रीने चित्र कापून घ्या आणि मधील रेषेवर घडी करा. आता तुमचा पांडा चित्रात दाखविल्याप्रमाणे बसेल.

**सोप्या तीन क्रमाने कुत्र्याच्या पिल्लाचे चित्र काढा.**









# महाभारत

**ध**र्मराज द्यूतात शेवटी द्रौपदीलाही पणाला लावून हरला. आता आणखी हरण्यासारखे त्याच्याजवळ काही उरलेच नाही.

दुर्योधन भरसभेत एकदम गरजला, ‘‘द्रौपदीला बोलावून आणा इथे. तिच्या हातून ही सभा झाडून घ्यायची आहे.’’

असह्य होऊन विदुर दुर्योधनाला म्हणाला, ‘‘मूर्खा, आपली मर्यादा ओलांडत आहेस तू! तोंडाला येईल ते बडबडतो आहेस! पांडवांना डिवचणं म्हणजे विषसर्पांना डिवचण्यासारखं आहे. द्रौपदी तुझी दासी बनेलच कशी? स्वत:चं स्वातन्त्र्य गमावल्यानंतर युधिष्ठिरानं तिला पणाला लावलं आहे.’’ नंतर सभेला उद्देशून तो म्हणाला ‘‘हा दुर्योधन वेडा झालाय. माझं बोलणं तो ऐकणार नाही अन् त्याप्रमाणं वागणारही नाही. निकट भविष्यात कौरवकुळाचा नाश निश्चित आहे.’’ तरीही दुर्योधनाने विदुराचे बोलणे कानाआड केले अन् प्रतिकामीला बोलावून त्याला तो म्हणाला, ‘‘ताबडतोब अंत:पुरात जाऊन तू द्रौपदीला इथे घेऊन ये. या पांडवांना घाबरायचं काहीच कारण नाही तुला!’’

दुर्योधनाच्या आज्ञेने प्रतिकामी अंत:पुरात जाऊन द्रौपदीला म्हणाला, ‘‘देवी पांचाली, आपले पती धर्मराज यांनी द्यूतात आपणाला पणाला लावले अन् ते हरले. दुर्योधनांनी पण जिंकला. आता आपण त्यांची दासी आहात. त्यांची अशी आज्ञा आहे की आपण ताबडतोब धृतराष्ट्रांसमोर हजर व्हावे.’’

‘‘कोणी क्षत्रीय कधी आपल्या पत्नीला पणाला लावतो का? कधीच नाही! धर्म-राजांची बुद्धी तर भ्रष्ट झाली नाही ना? जे



घडलं, ते जरा सविस्तर सांग बरं!'' द्रौपदीने विचारले.

''धर्मराज द्यूतात सर्वकाही हरले. पणाला लावायला काहीच उरलं नाही, तेंव्हा त्यांनी स्वतःला, आपल्या बंधूंना आणि अखेर आपणालाही पणाला लावले अन् ते सर्वांनाच गमावून बसले.'' प्रतिकामीने उत्तरादाखल सांगितले.

द्रौपदी यावर कटु स्वरात त्याला म्हणाली, ''असाच सभेत परत जा अन् नीट माहिती विचारुन ये की - त्यांनी स्वतःला गमावल्यानंतर मला पणाला लावलं, की मला गमावल्यानंतर तसं केलं?''

प्रतिकामी द्यूतमंडपात परत आला व त्याने द्रौपदीचा प्रश्न धर्मराजाला कळवला. हा प्रश्न ऐकून धर्मराज फारच चिंतित झाला. तो काही बोलूच शकेना.

दुर्योधनच प्रतिकामीला म्हणाला की, ''जा, तिला जाऊन सांग की स्वतः सभेत येऊनच काय ते विचार, अन् संशय फेडून घे.''

''प्रतिकामी, मी सभेत येणं उचित नव्हे. यामुळे कौरवांच्या कीर्तीला कलंक लागेल. सभासदांनी माझ्या प्रश्नाचं उत्तर द्यावं. नंतर ते म्हणतील तसं करीन मी.'' द्रौपदीने प्रतिकामीला पुन्हा परत पाठवले.

प्रतिकामीने पुन्हा सभेत येऊन द्रौपदीच्या बोलण्याचा पुनरुच्चार केला. दुर्योधनाला सर्वचजण घाबरत असल्याने कोणीही सभासद काही बोलू धजेना. माना खाली घालून सर्वजण मौन राहिले. धर्मराजाने परिस्थिती ओळखली व तिला आणण्यासाठी स्वतःच प्रतिकामीबरोबर एक दूत पाठवला. त्या दूताने सन्देश सांगताच स्वतः रजस्वला असूनही द्रौपदी प्रतिकामीबरोबर सभेत जाऊन धृतराष्ट्रासमोर उभी राहिली. पाचही पांडव माना खाली घालून, दुःखी मुद्रेने तेथे बसले होते, पण मान वर करून द्रौपदीकडे पाहण्याचे धैर्य त्यांच्यात नव्हते. त्यांना स्वतःचीच शरम वाटत होती.

दुर्योधनाने त्यांची ही मनस्थिती ओळखून गंभीर आवाजात प्रतिकामीला आज्ञा दिली, ''पहातोस काय? तिला इथे आण.''

प्रतिकामी द्रौपदीला स्पर्श करायला भीत होता. सभासदांना संबोधित करून त्याने विचारले, ''पांचालीला मी काय सांगू?''

भीमाला पाहून तो घाबरत आहे, हे ओळखून दुर्योधन दुःशासनाला म्हणाला, ''दुःशासन, तिला इथे खेचून घेऊन ये. हे सर्वजण दास आहेत आता आपले. आपलं काहीही वाकडं करू शकत नाहीत ते.''

यावर दुःशासन मर्यादा विसरुन द्रौपदीला म्हणाला, ''द्रौपदी इकडे ये. तुझ्या पतींनी तुला आमच्या सुपूर्त केलंय. आता लाजतेस कशाला? आमच्या या दुर्योधनावर प्रेम कर-कौरवांना आपलंच समज.'' तरीही कोणी काही बोलू धजला नाही.

दुर्योधनाने 'इथे येऊन बस' असा संकेत करत तिला आपली मांडी उघडी करून दाखवली.

दुर्योधनाचे हे कृत्य पाहून भीमाने उसळून प्रतिज्ञा केली की, ''युद्धात मी दुर्योधनाची हीच मांडी आपल्या गदेनं फोडून मुळातून उखडून टाकीन.'' त्यावेळी तो एखाद्या धगधगत्या ज्वालेसारखा दिसत होता.

भीष्म द्रौपदीला म्हणाला, ''देवी द्रौपदी, धर्मराजाने तुला पणाला लावून मोठी चूक केलीय हे मला मान्य आहे. धर्मराज आपलं सर्वस्व लुटायला तयार होईल, पण तो आपला धर्म कधीही सोडणार नाही. स्वतःला द्यूतात गमाऊनही तो आपला धर्म सोडील का, तुझ्याशी कपट करील का?''

द्रौपदी म्हणाली, ''मुळातच अयोग्य अशा द्यूताच्या खेळात भाग घ्यायला लावून माझ्या पतीला फसवण्यात आलं. त्यांनी सर्व काही गमावलं. आणखी काहीच उरलं नाही, म्हणून त्यांनी मला पणाला लावलं का? पुत्र, कन्या अन् पत्नीची नियमानुसार भरण पोषणाची जबाबदारी जाणणाऱ्या वृद्ध कौरवांनी या मुद्यावर काही प्रकाश टाकावा.'' अन् हे बोलता बोलता ती रडू लागली. दुःशासन तर जास्तच चेव येऊन तिला अचकट विचकट बोलत तिचा अपमान करू लागला.

हे सर्व भीमाला पहावेना, ऐकवेना. तो





धर्मराजाला म्हणाला, ''जुगारी माणसं नीतिहीन बायकोलाही कधी पणाला लावत नाहीत. पवित्र अशा द्रौपदीला पणाला लावून तुम्ही घोर अन्याय केलाय तिच्यावर! सारं ऐश्वर्य अन् आम्हाला ही पणाला लावून हरलात, त्याचं फारसं वाईट नाही वाटलं मला. पण पांचालीला पणाला लावणाऱ्या तुमचे हात जाळून टाकायला हवेत. सहदेव, विस्तव घेऊन ये बघू!''

पण अर्जुन भीमाला म्हणाला, ''आतापर्यंत सर्व सहन केलंस ना! मग आताच अचानक त्यांच्या मनाला क्लेश का देतो आहेस? या जुगाऱ्यांसारखी तुझीही बुद्धी भ्रष्ट झालीय का? अरे, धर्मराजानं जाणून बुजून द्यूत खेळलेलं नाही. त्यांना आव्हान दिलं गेल्यामुळे राजधर्माचं पालन करण्यासाठीच खेळावं लागलं. त्यांत त्यांची काहीही चूक नाही. तू शान्त हो बरं!''

दुःशासन द्रौपदीला खेचून आणण्यासाठी पुढे सरसावला. तेव्हा अवकळा आलेला आपला चेहरा दोन्ही हातांनी झाकून ती गांधारीकडे वळली.

दुःशासनाने तिचा पाठलाग करत म्हटले, ''माझ्या पकडीतून सुटून कुठे जाशील?'' अन् त्याने तिचे केस पकडून तिला खेचले. पाच बलदंड पती असूनही अबला द्रौपदी भयाने थरथर कापू लागली. ती हळू स्वरात म्हणाली, ''अरे बुद्धिहीना, मी रजस्वला आहे. अशा अवस्थेत मला भरसभेत नेणं अनुचित आहे.''

दुःशासन म्हणाला, ''तुझ्या रजस्वला असण्याशी माझं काय देणं-घेणं? तू वस्त्रहीन आहेस की कशी याच्याशीही माझा कसला संबंध नाही. तुझा पती तुला पणाला लावून हरला आहे. आता तू आमची झाली आहेस. आमची दासी आहेस तू!'' असे म्हणत केस धरून खेचत दुःशासन तिला भरसभेत सर्वांसमोर घेऊन गेला.

द्रौपदीचे केस सुटून विस्कळित झाले, अंगावरची साडीही अर्धवट सुटली. क्रोधाने तिचे डोळे लाल झाले. ती दुःशासनाला म्हणाली, ''अरे दुष्टा, पितासदृश असणाऱ्या या वृद्धांसमोर असं उभं रहाणं मला अुचित नव्हे. असल्या अपमानास्पद स्थितीत मला इथे अुभी करण्याच्या पापाबद्दल तुला नक्कीच शिक्षा भोगावी लागेल. या सभेतील सर्वजण धर्मज्ञाते आहेत, पण ते सर्व असे माना लटकावून गप्प का बसून राहिले आहेत? तुला असलं दुष्ट काम करण्यापासून अडवत का नाहीयेत? मला हे काहीच कळत नाहीय. भरतकुलच बहुधा अगदी सडून गेलंय. असं वाटतंय की हा अन्याय थांबवण्याचं सामर्थ्य भीष्म, द्रोण, विदुर अन् धृतराष्ट्र यांच्यातही नाहीय.'' असे बोलून ती पांडवांकडे जळजळत्या नजरेने पाहू लागली.

दुःशासन जोराने ओरडला, ''ए, दासी! काय अुगाच बडबडत आहेस?'' त्याच्या या ओरडण्याने कर्ण, शकुनी, दुर्योधन इ. गडगडून हसू लागले. पण बाकी सर्व मनोमन दुःखी झाले.

भीम अत्यंत क्रोधित होअून आपला खालचा ओठ दातांनी चावून जमिनीवर हात मारून आवेशाने ओरडला, ''सभेत हजर असणाऱ्या लोकांनो, सर्वांनी नीट कान अुघडे ठेवून ऐका! हा दुष्ट दुःशासन द्रौपदीची विटंबना करायला बसला आहे. त्याने तिचे केस ओढून मोकळे केले आहेत. वस्त्रांचीही विटंबना आरंभली आहे. मी तुम्हा सर्वांसमक्ष प्रतिज्ञा करतोय की, युद्धात या दुःशासनाची छाती फोडून त्याचे रक्त पिईन अन् त्या रक्तमाखल्या हातांनीच पांचालीचे हे मोकळे केस पुन्हा बांधीन.''

सभेत द्रौपदीच्या प्रश्नांना कोणीही अुत्तरे देअून न्याय करत नाही, असे पाहून धृतराष्ट्राच्या पुत्रांपैकी एकटा विकर्ण अुठून अुभा राहिला अन् आवेशाने बोलू लागला, ''द्रौपदीच्या प्रश्नाला अुत्तर द्या सभासदहो! कुरुवर पितामह अन् गुरुवर द्रोण मौन साधून का बसले आहेत? रागद्वेष अन् पक्षपात विसरून आपला अभिप्राय सांगा! धर्माचं विशदीकरण करा!''

तरीही कोणीच काही बोलेना, तेंव्हा तो स्वतःच म्हणाला, ''आपण लोक न्याय करू इच्छित नसाल, तर नका करू. पण मी गप्प





बसणार नाही. मी देतो न्याय. स्त्री, शिकार, जुगार अन् मदिरेच्या आहारी जाणारा माणूस धर्मपालन करायला असमर्थ बनतो. धर्मराजाने द्यूताच्या व्यसनापायी स्वतःला, भावांना अन् शेवटी द्रौपदीलाही पणाला लावलं. पण द्रौपदी ही केवळ एक त्या युधिष्ठिराचीच नव्हे, तर बाकीच्या चार पांडवांचीही पत्नी आहे, त्यांचीही संपत्ती आहे. तेव्हा तिला जबरदस्तीनं ओढून आणणं अन्याय्य आहे. माझा हाच धर्म-निर्णय आहे.''

विकर्णाला विरोध दर्शवत कर्ण आवेशाने म्हणाला, ''अरे, या सभेत दिग्गज धर्मवेत्ते बसलेले आहेत. त्यांनाही जो धर्म समजला नाही, तो तुझ्यासारख्या कालच्या पोराला समजला काय? किती हास्यास्पद गोष्ट ही! धर्मराजानं आपलं सर्वकाही घालवलं अन् त्याबरोबर द्रौपदीही घालवली. त्यामुळेच हे पांडव गप्प आहेत. तू म्हणतोस की अशा स्थितीतल्या द्रौपदीला सभेत आणणं अन्याय्य आहे, अशास्त्रीय आहे! अरे, पण ती तर कुलटा आहे कुलटा! कारण ती पांचजणांची पत्नी आहे. असल्या बाईची वस्त्रं अुतरवली, तरी त्यात कसलंही पाप नाही. दुःशासना, या अज्ञानी विकर्णाची मुळीच पर्वा न करता या पांडवांची अन् द्रौपदीची वस्त्रं अुतरव!''

कर्णाचे हे अुद्गार ऐकताच पांडवांनी आपली अुत्तरीये काढून खाली ठेवली. इकडे दुःशासन द्रौपदीची साडी ओढून काढू लागला. द्रौपदीने कृष्णाचे स्मरण करून त्याचा धावा आरम्भला. कृष्ण ताबडतोब अदृश्य रूपाने तिला वस्त्रे पुरवत राहिला.

दुःशासन एकेक साडी ओढून काढू लागला, तरीही द्रौपदीच्या शरीरावर साडी दिसतच राहिली. अशा प्रकारे दुःशासनाने ओढलेल्या साड्यांचा सभेत एक डोंगर जमला! शेवटी दुःशासनच दमून भूमीवर कोसळला.

आता विदुर सभेत अुभा राहून हात अुचलत म्हणाला, ''बास झाला हा अन्याय! सभासदहो, द्रौपदीच्या प्रश्नाला अुत्तर न देणं हा अधर्म आहे. विकर्णाशिवाय कोणीही आपलं मत इथं व्यक्त केलं नाही. दीन-दुबळ्यांवर अन्याय केला, तर ते मोठेच पाप होय. या पापाचे आपण सर्व भागीदार व्हाल. असंच समजलं जाईल की आपण सर्वचजण या पापात सहभागी आहात.''

तरीही कोणीच काही बोलेना. तेव्हा दुर्योधन द्रौपदीला म्हणाला, ''माझ्याकडून

कसलीही चूक घडलेली नाहीय. भीम, अर्जुन, नकुल, सहदेव या सर्वांनी असं म्हटलं की, 'युधिष्ठिर आमचा प्रभु नव्हे, मालक नव्हे'; तर तुम्हाला दास्यातून मुक्ती मिळेल.''

अर्जुन यावर बोलला, ''ही गोष्ट खरीच, की युधिष्ठिर आम्हा सर्वांचा प्रभु आहे. पण आता तोच हरला आहे. तेव्हा आता कौरवांनीच सांगावं की ते कुणाचे प्रभु आहेत.''

याचवेळी तेथे अनेक अुत्पात घडले. धृतराष्ट्र यामुळे घाबरून जाअून दुर्योधनाला म्हणाला, ''अरे पापी, दुष्टा! द्रौपदीला असं जबरदस्तीनं का घेअून आलास? पांडवांच्या बद्दल तुझ्या मनात इतका द्वेष का आहे? ही तर अन्यायाची पराकाष्ठाच झाली!'' पुत्राला अशा प्रकारे दुखावून तो द्रौपदीला म्हणाला, ''मुली, माझ्या सुनांच्यात तूच सर्वश्रेष्ठ आहेस. सांग, तुला काय हवं माझ्याकडून?''

द्रौपदीने इच्छा व्यक्त केली की, 'पांडवांची दास्यातून मुक्तता होअून त्यांना त्यांची शस्त्रे परत मिळावीत?'

यावरही कर्णाने टोमणा मारला, ''अरे वा! आज एका अबलेनं पांडवांचा अुद्धार केलाय!'' भीमाने लगेच रौद्राकार धारण करून शत्रूंना विनाशाची धमकी दिली.

मोठ्या मुश्किलीने अर्जुन व धर्मराजाने त्याला शान्त केले. नंतर धर्मराजाने धृतराष्ट्राला विचारले, ''आमच्यासाठी काही आज्ञा असेल, तर सांगा महाराज!''

''पुत्रा, तू आपले बंधू आणि द्रौपदी यांच्यासह निर्विघ्नपणे इन्द्रप्रस्थाला परत जाअून आपला राज्यकारभार संभाळ. मला वाटलं होतं की द्यूत खेळीमेळीच्या वातावरणात खेळलं जाईल. पण तसं घडलं नाही. मी मधे अडवल नाही, ही माझी चूकच झाली. आम्हा वृद्ध पतिपत्नींवर अुपकार म्हणून माझ्या पुत्रांनी केलेली दुष्कर्मं विसरून जा. तुझं अन् तुझ्या भावांचं कल्याण असो.'' संवेदनशील धृतराष्ट्र गदगदल्या आवाजात बोलला.

सर्वांचा निरोप घेअून पांडव द्रौपदीसह इन्द्रप्रस्थला परत गेले.



'चांदोबा' पुरवणी - ९२

आपल्या देशाची वृक्ष-संपदा

# कवठ

कवठाची फळे हत्तींना फार आवडतात. या वृक्षाची फळे हत्ती सहजपणे तोंडात घालतात आणि गिळून टाकतात. पण पोटात गेल्यावर फळांचा गर मात्र पचवतात आणि साली विसर्जित करून टाकतात. म्हणून याला लॅटिन भाषेत 'फोरोनिया एलिफांटम' म्हणतात. गणेश चतुर्थीच्या दिवशी नैवेद्य म्हणून कवठाची फळे विघ्नेश्वराला अर्पण केली जातात. फळाचे वरील कवच फार कठिण असते आणि आतील गर मात्र गोड असतो. म्हणून याला इंग्रजीत 'वुड अॅपल' म्हणतात.

कवठाचा गर थंड असतो. म्हणून उन्हाळ्याच्या दिवसात याचे सरबत बनवतात. या सरबतात साखरेऐवजी गूळ घालतात. कवठाचा गर, मध व खडीसाखर एकत्र करून स्वादिष्ट बर्फी तयार करतात.

कवठाला संस्कृत मध्ये 'कपित्थ', हिंदीत 'कैथ' अथवा 'कविताही' वा 'कावात', गुजरातीत 'कोथा', मराठीत 'कवठ', बंगालीत 'कथबेल', कन्नड मधे 'बेला', तमिळ मधे 'विलांबलम्' व तेलुगु मध्ये 'वेलग' म्हणतात.

कवठाची झाडे विशेषेकरून जंगलात असतात. पण काही ठिकाणी घराच्या परसात ही आढळतात. मजबूत लांब-लांब फांद्या असलेले हे वृक्ष फार उंच नसतात. फांद्यावर भरगच्च पाने येतात. नाजुक लाल रंगाचे फुलांचे गुच्छ झाडावर दिसतात. फळे शुद्री रंगाची असतात. चेंडूसारख्या गोल फळांचे कवच खरखरीत असते.

* * *



# कश्यप-अस्तिक

कोणे एक काळी पृथ्वीवर सर्प-भय फार असे. शेतात, नद्यात, तलावात सर्वत्र सापच साप दिसत. जंगलात सगळीकडे साप वावरत. यामुळे पृथ्वीवर राहणे माणसांना अशक्य वाटू लागले.

कश्यप ऋषींनी हे संकट जाणले. ते ध्यान-मग्न झाले आणि दैवबलाने त्यांनी काही मंत्रांची रचना केली. या मंत्रांच्या महिम्याने त्यांनी मनुष्य जातीला सर्पापासून वाचविले. सापाची विषबाधा झालेल्या माणसांचे प्राण वाचविण्यासाठी त्यांनी विष-वैद्यक शोधून काढले. आपल्या तपोबलाच्या साह्याने त्यांनी मनसा देवीची निर्मिति केली. ही देवी सापांना वश करू शके.

मनसा देवीने जरत्कार नावाच्या एका ऋषीशी लग्न केले. त्यांना एक मुलगा झाला. त्याचे नाव अस्तिक. लहानपणापासूनच अस्तिक मोठा विष्णुभक्त होता.

परीक्षित राजा एकदा शिकारीसाठी जंगलात गेला. तेथे समीक नावाचा एक मुनि डोळे मिटून तपस्या करीत बसलेला होता. राजाने एक मेलेला साप त्याच्या गळ्यात अडकवला. राजाच्या या खोडीमुळे समीकचा मुलगा फार रागावला. हे दुष्कार्य करणारा राजा सात दिवसात साप चावून मरेल असा त्याने शाप दिला. शापापासून आपला बचाव व्हावा म्हणून राजाने असा पक्का बंदोबस्त केला की साप आपल्यापर्यंत पोचूच शकणार नाही. सातव्या दिवशी सूर्यास्ताच्या वेळी राजाने एक फळ खायला सुरुवात केली. त्या फळात किड्याच्या रूपात एक साप होता. क्षणात किड्याने विराट स्वरूप धारण केले आणि राजा परीक्षिताला डंख मारला. ऋषि-कुमाराचा शाप खरा ठरला. तो साप सर्पराज तक्षक होता.

परीक्षिताचा मुलगा जनमेजय तक्षकावर खूप रागावला आणि सर्पवंशाचा सर्वनाश करण्याची त्याने प्रतिज्ञा केली. त्याने ऋषींशी सल्लामसलत केली. त्यांच्या सल्ल्यानुसारच त्याने सर्पयाग सुरू केला. ऋषींचे तपोबल आणि त्यांच्या मंत्रांची शक्ति यामुळे हजारो सर्पांची यज्ञकुंडात आहुति पडू लागली.

हे पाहून तक्षक घाबरला व इंद्राच्या सिंहासनाखाली लपून बसला. ऋषींच्या मंत्रांच्या सामर्थ्यामुळे देवेन्द्र व त्याचे सिंहासन यज्ञकुंडाकडे आकर्षित होऊ लागले. तक्षक सिंहासनाला चिकटून बसला.

त्यावेळी अस्तिक जनमेजयाला भेटले. आपल्या वाक्-चातुर्याने त्यांनी राजाला प्रसन्न केले आणि सर्पयाग थांबवला. तक्षक पळून गेला आणि बऱ्याच सर्पांना जीवन-दान मिळाले.

अस्तिकने सर्प-जातीला विनाशापासून वाचवले. म्हणून असे म्हणतात की भक्तिपूर्वक त्यांचे नाव घेतले तर मनुष्याला सापाला भिण्याची आवश्यकता नाही.



## तुम्हाला माहीत आहे का?

१. भुताचे द्वीप (डेव्हिल्स आयलंड) कोणते?
२. भारतीय रेल्वे-मार्गाची लांबी किती?
३. नुकतीच केरळ मध्ये निवडणूक झाली. तेथील विधान-सभेत एकूण किती जागा आहेत?
४. इंग्रजीला सरकारी भाषा म्हणून स्वीकार करणारे आपल्या देशातील राज्य कोणते?
५. सलीम अली प्रसिद्ध पक्षी-शास्त्रज्ञ आहेत. त्यांच्या व्यक्तिगत जीवनाशी संबंधित पक्षी कोणता?
६. गणित-शास्त्रातील 'लॉगरिथम्स' ची रचना कोणी केली?
७. ॲनिमेशन चित्रपट बनविण्यासाठी स्टूडियोची स्थापना आपल्या देशात कोणी केली? तो कोठे आहे?
८. संयुक्त राष्ट्र-संघाचा सुवर्ण-महोत्सव गेल्या वर्षी साजरा झाला. त्यावेळी मलयाळम मध्ये भाषण करण्यासाठी कोणाला बोलवले होते?
९. संयुक्त राष्ट्र-संघात प्रवेश मिळवणारा शेवटचा देश कोणता?
१०. संयुक्त राष्ट्र-संघापुढे आपल्या गायनाचा कार्यक्रम सादर करणारी भारतीय गायिका कोणती?
११. संयुक्त राष्ट्र संघाच्या अधिकृत भाषा कोणकोणत्या?
१२. सर्वप्रथम भारताच्या दोन नगरांना जोडणारा भारताचा राष्ट्रीय राजमार्ग कोणता?
१३. विश्व व्यापार संस्थेचे डायरेक्टर जनरल कोण?
१४. वर्ल्ड क्रिकेट कप सामन्यात पाकिस्तानने फारच थोड्या धावा केल्या. त्या किती? हा सामना केव्हा झाला?
१५. येते क्रिकेट वर्ल्ड कप सामने कोठे होणार आहेत?

## उत्तरे

१. दक्षिण अमेरिकेच्या ईशान्येला फ्रेंच गयाना आहे. त्याच्या जवळ असलेल्या एका द्वीपाला 'भुताचे द्वीप' म्हणतात.
२. ६२,००० कि.मी.
३. १४०.
४. नागालँड.
५. गौरेया.
६. जॉन नेपियर.
७. दादासाहेब फाळके अॅवार्ड विजेता डॉ. अकिनेनी नागेश्वरराव.
८. माता अमृतानंदमयी.
९. पालाव रिपब्लिक.
१०. एम.एस. सुब्बलक्ष्मी.
११. अरेबिक, चायनीज, इंग्लिश, फ्रेंच, रशियन व स्पॅनिश.
१२. दिल्ली - चंडीगढ.
१३. रेनेटो रुग्गीरो.
१४. ४०.२ ओवर्स मध्ये ७४ धावा. १९९२ मध्ये.
१५. इंग्लंड.

# सोनेरी क्षण १ ची अुत्तरे

१. स्क्वाड्रन लीडर राकेश शर्मा, याने १९८४ मधे आणखी दोन रशियन प्रवाशांसह अंतरिक्ष-प्रवास केला.



२. जयपूरच्या सवाई राजा जयसिंगने निर्माण केलेल्या जगातल्या सर्वात मोठ्या सूर्यघड्याळाचे नाव 'बृहत सम्राट यंत्र' असे आहे.

३. मंगळ व गुरु या ग्रहांच्या मधे सेरेस नावाचा छोटासा अुपग्रह दिसतो. आतापर्यन्तच्या माहितीप्रमाणे हाच सर्वात मोठा अुपग्रह होय. १ जानेवारी १८०१ रोजी याचा शोध लागला.

४. जगन्नाथपुरी येथील हे जगन्नाथ मंदिर. श्रीकृष्ण गोकुळ सोडून मथुरेला आल्याच्या आठवणीनिमित्त मोठा अुत्सव साजरा केला जातो. या वेळी या तीन मूर्ती मोठमोठ्या रथांवर बसवून मिरवणूक काढली जाते.

५. २८ फेब्रुवारी रोजी बेडूक विहिरीबाहेर आला असणार. रोज १ मीटर प्रमाणे २७ दिवसात तो २७ मीटर चढला. २८ व्या दिवशी तो ३ मीटर चढून बाहेर आला. पुन्हा २ मीटर घसरण्याचा प्रश्नच नाही.

३4+4।=।

↓

३4=4।-।

**चंद्रावरील रहस्य**

अंतरिक्ष प्रवाशाला भयंकर प्राण्याचा आवाज ऐकू येणे शक्य नाही. कारण तेथे वातावरणच नाही.



७. अे. महाराष्ट्र
बी. गोण्डवन (म.प्र.)
सी. कूर्ग (कर्नाटक)
डी. नागालॅण्ड



# पिशाचिनी स्वयंपाकीण

**रा**णीगंजच्या रावतच्या मुलीचं नाव सुनंदा. सुनंदाच्या लग्नासाठी रावतने आपले दोन एकरांचे शेत पन्नास हजार रुपयांना विकले.

वडिलांनी केलेला हा सौदा सुनंदाला मुळिच आवडला नाही. ती वडिलांना म्हणाली - "बाबा, या रकमेतील अर्धी रक्कम खर्चून तुम्ही एक घर खरेदी करा. तुम्ही असं केलं नाहीत, तर माझं लग्न झाल्यावर तुम्ही राहणार तरी कोठे? शेताची मिळकत तर संपलीच. आता दर महिन्याला भाडं देणं ही तुम्हाला कठिण होईल. माझ्या लग्नासाठी आपली सारी संपत्ति तुम्ही खर्च करावी हे योग्य होणार नाही."

मुलीच्या सल्ल्यानुसार रावतने एक छोटं घर खरेदी केलं. हे घर होतं आनंदचं. लहानपणीच तो पितृ-छत्राला पारखा झाला, आईने मोठ्या कष्टाने त्याचे पालन-पोषण करून त्याला लहानाचा मोठा केला. मोठा झाल्यावर सुद्धा आनंदने आपल्या जबाबदाऱ्या स्वीकारल्या नाहीत. आईच्या मृत्यूनंतर पैसे मिळवायला किती कष्ट करावे लागतात, किती मेहनत करावी लागते हे त्याच्या लक्षात आले. त्याला कोठे नोकरी पण मिळाली नाही. आता त्याच्या पुढे एकच मार्ग होता. घर विकून टाकायचं आणि शहरात जाऊन काही व्यापार करायचा. अशा परिस्थितीत त्याने आपले घर सुनंदाच्या वडिलांना पंचवीस हजार रुपयांना विकले.

आता रावत आपल्या नव्या घरी रहायला आला. वडील व मुलगी यांनी नव्या घरात सर्व सामान नीट लावले. काम संपता संपता संध्याकाळ झाली.

थकून गेल्यामुळे आता स्वयंपाक करायची ताकत सुनंदात राहिली नाही. ती विचार करू लागली - एकाद्या बाईने येऊन आपला स्वयंपाक करून दिला तर काय बहार येईल नाही!

"आजच का, रोज मी येऊन तुझा

अविनाश बापट



स्वयंपाक करीत जाईन. हे काम तू आता माझ्यावरच सोपव.'' हातात चिमटा घेऊन आत आलेली पिशाचीण म्हणाली.

पिशाचिणीला पाहून सुनंदा घाबरून गेली. पिशाचिणीने आपल्या हातातील चिमटा हवेत असा फिरवला की जणू तिने सुनंदाला आश्वासन दिले. ती म्हणाली - ''अग, अशी घाबरू नकोस. मी काही कोणी परकी का आहे? हे घर ज्या आनंदने तुम्हाला विकले त्याची मी आई. तुझ्या वडिलांनी दिलेले पंचवीस हजार रुपये घेऊन काही व्यापार करण्याच्या विचारात तो आहे. फार बुद्धिमान आहे हं तो. त्याच्यासारखा हुशार मुलगा इथं आसपास कुठे असेल असं मला नाही वाटत. आता राहिली माझी गोष्ट! जेव्हा जिवंत होते, तेव्हा मी दोन-तीन घरचा स्वयंपाक करून आपली उपजीविका करीत असे. आत्ता निदान-एकाद्या तरी घरात स्वयंपाक करण्याचे काम केल्याशिवाय मला चैन नाही पडणार. आपल्याच घरात स्वयंपाक करायची संधि मिळाली तर त्याहून अधिक चांगलं ते काय?''

सुनंदा भीतीने थरथरू लागली. तिने बाहेर येऊन वडिलांना ही बातमी दिली. रावत ही घाबरला आणि म्हणाला - ''आपण सुद्धा किती दुर्दैवी नाही? शेवटी आपण खरेदी केलं ते भुताचं घर!'' आणि तो आपल्या भाग्याला दोष देत राहिला.

वडिलांना समजाऊन सांगत सुनंदा म्हणाली - ''बाबा, आपण फार वाईट वाटून घेऊ नका. स्वयंपाकीण पिशाचीण मला तरी स्वभावाने फार चांगली दिसतेय. तिची बोलण्याची पद्धत मला आवडली. आपण तिला भ्यायचं काही कारण नाही.''

रावत काही बोलणार एवढ्यात स्वयंपाक-घरातून पिशाचिणीचा आवाज आला - ''भोजन तयार आहे. दोघे ही जेवायला या लवकर.'' रावत आणि सुनंदा अमळ भीत भीत स्वयंपाक-घरात आले. सगळे पदार्थ फार चविष्ट होते. तसे पिशाचिणीला सांगावे की नाही याबाबत दोघे ही विचार करीत होते, इतक्यात पिशाचीणच म्हणाली - ''उद्या सकाळी लवकरच येईन आणि स्वयंपाक करून जाईन!'' एवढं बोलून ती अदृश्य झाली.

अशा रीतीने सुनंदाची स्वयंपाकाच्या कामातून तर सुटका झाली. पण एक आठवड्याभरात पिशाचिणीच्या पदार्थांचा सुनंदाला कंटाळा आला. पिशाचीण रोज एकाच चवीचे पदार्थ बनवायची. तेलावर तिचा फार हात असे. पहाटे बनवलेले खाद्य-पदार्थ जेवणाच्या वेळेपर्यंत थंड होऊन जात. नंतर अंधार पडल्यावर ती यायची नि स्वयंपाक करायची. जेवण संपेपर्यंत अर्धी रात्र व्हायची. रावतला लवकर झोपायची सवय होती. म्हणून दोघे ही पिशाचिणीच्या या स्वयंपाकाला कंटाळून गेले.

एक दिवशी सकाळी सकाळी पिशाचीण आली तेव्हा सुनंदा तिला म्हणाली - ''आता मी स्वतः आपला स्वयंपाक करीत जाईन. तुझ्या मुलाच्या घरी स्वयंपाक करायला कोणी नाही, त्याला फार त्रास होत असेल नाही? तू मुलाकडे जाऊन स्वयंपाक केलास तर बरं नाही का होणार?''

''हे तर शक्यच नाही. मी पिशाचीण बनलेय हे जर समजलं, तर फार वाईट वाटेल त्याला. आता तर तो खूप कमवू लागलाय म्हणे! जरूर वाटली तर एकादा आचारी सुद्धा ठेवील तो आपल्या पदरी.'' पिशाचीण म्हणाली.

सुनंदाने मनातल्या मनात विचार केला - ही ब्याद इतक्या सहज जाईलसे वाटत नाही. अमळ संकोचाच्या स्वरात ती म्हणाली - ''तुझा स्वयंपाक आम्हाला आवडत नाही बघ!''

हे ऐकताच पिशाचीण म्हणाली - ''हे काय बोलत आहेस तू? माझा स्वयंपाक आणि आवडत नाही! हे कसे शक्य आहे? ऐक, मी मोठी लहरी आहे. मी बनवलेले पदार्थ तुम्ही



दोघांनी खाल्लेच पाहिजेत. नाहीतर परिणाम चांगला होणार नाही हे लक्षात ठेव.''

त्या दिवसापासून पिशाचीण रागाने पदार्थात खूप मिर्च्या घालू लागली, भाज्या तेलात बुडवून काढू लागली. यामुळे महिन्याच्या बेगमीचे सामान पंधरा दिवसातच संपू लागले. बिचाऱ्या रावतला महिन्याच्या मध्येच बरेच पदार्थ खरेदी करावे लागले.

एक दिवशी रात्री वडील व मुलगी भोजन करीत बसले होते. अकस्मात् सुनंदाची एक बाल-सखी तिला भेटायला आली. शहरात राहणारी ही मैत्रीण आपल्या एका नातेवाईकाच्या मुलाच्या लग्नासाठी आली होती.

रात्री इतक्या उशीरा जेवण करताना पाहून तिने सुनंदाला विचारले - ''ही काय जेवायची का वेळ? इतका उशीर का?''



''भगवत्कथा ऐकायला देवळात गेलो होतो. आताच परत आलो. तुझ्याकडे सगळे खुशाल आहेत ना?'' सुनंदाने विचारले.

थोडा वेळ दोघी मैत्रिणी पलंगावर बसून इकडच्या-तिकडच्या गप्पा मारीत बसल्या. नंतर सुनंदाने घर खरेदी करण्यापासून पिशाचिणीच्या स्वयंपाकापर्यंत सर्व कथा आपल्या मैत्रिणीला सांगितली. आणि म्हणाली - ''या पिशाचीण स्वयंपाकिणीचा मुलगा शहरात व्यापार करतो. खूप पैसे मिळवतो तो. तिनेच आम्हाला हे सर्व सांगितले. आपल्या मुलाकडे जाऊन राहिली, तर तिच्या तडाख्यातून सुटका होईल आमची!'' सुनंदाने मैत्रिणीला आपली व्यथा सांगितली.

हे ऐकून मैत्रीण राधाला मोठं आश्चर्य वाटलं. ती म्हणाली - ''अग, तू काय सांगत आहेस हे? तुझी पिशाचीण स्वयंपाकीण आनंदची आई होय? आनंद माझ्या भावाचा जिवलग मित्र आहे. तो नेहमी आमच्याकडे येतो बघ. व्यापारात मोठा दक्ष आहे तो. जसं आईचं या घरावर प्रेम आहे, तसंच मुलाचं पण आहे. तो माझ्या भावाला नेहमी घराबद्दल सांगतो आणि म्हणतो - व्यापारासाठी भांडवल जमवण्यासाठी आपल्याला घर विकावं लागलं. आपल्या आजोबा-पणजोबांनी बांधलेले घर विकण्याची पाळी आपल्यावर यावी याचे फार दुःख आहे त्याला.

सुनंदा रडव्या सुरात म्हणाली - ''त्या बिचाऱ्या मोठ्या व्यापाऱ्याला हे माहीतच नाही की हे घर खरेदी करून आम्ही इकडे कसे संकटात पडलो आहोत ते!''

राधा थोडा वेळ शांतपणे बसली आणि एकदम पलंगावरून खाली येत म्हणाली - ''वाऽ, मला एक छान उपाय सुचलाय बघ सुनंदा. तू तसं केलंस तर आनंद व तू दोघे ही सुखी व्हाल.'' सुनंदाच्या कानात काही सांगून ती म्हणाली - ''तुझी काही हरकत नसेल आणि तुला सर्वस्वी योग्य वाटत असेल, तर माझी योजना तडीस जाईल. त्या पिशाचिणीला मात्र यातील काही सांगू नकोस हं. हे शुभ कार्य झालं तर शहरातच होईल.''

सुनंदा लाजत म्हणाली - ''ठीक आहे. तू म्हणशील तसं.'' दुसऱ्या दिवशी पिशाचीण स्वयंपाकीण येण्यापूर्वीच राधा शहरात निघून गेली. पिशाचीण आल्याबरोबर सुनंदा तिला म्हणाली - ''मला नि वडिलांना काही महत्त्वाच्या कामासाठी शहरात जायचंय. आम्ही दुपारी जाणार आहोत. निदान पंधरा दिवस तरी आम्हाला तिकडे रहावं लागेल.''

चिडून पिशाचीण म्हणाली - ''मग हे सांगायला एवढं मोठं भाषण कशाला? तर काय, तुम्हाला पंधरा दिवसांची रजा पाहिजे ना? मंजूर. पण रजा संपल्यावर परत आला नाहीत तर मात्र तुमचा सर्वनाश करून टाकीन हं. समजलं?''

त्याच दिवशी दुपारी सुनंदा आणि तिचे वडील शहराकडे गेले. राधा आणि तिचा भाऊ यांच्या देखरेखीखाली आनंद आणि सुनंदा यांचा विवाह निर्विघ्नपणे पार पडला.

नंतर एक आठवड्याने सुनंदा आपल्या नवऱ्याबरोबर सकाळी-सकाळी घरी आली. पिशाचीण नारळाची चटणी वाटत आहे असं तिनं पाहिलं. सुनंदा तिच्याजवळ जाऊन म्हणाली - ''सासूबाई, शहरात गेल्यापासून तुमच्या मुलाला चटण्या आवडेनाशा झाल्या आहेत. त्यांच्यासाठी थोड्या भेंड्या तळा.'' आश्चर्याने पिशाचीण म्हणाली - ''म्हणजे माझा मुलगा आनंद याच्याशी लग्न करण्यासाठी तू शहरात गेली होतीस तर?''

''होय सासूबाई, तुमचा मुलगा काही दिवस याच घरात राहणार आहे. रोज त्याच्यासाठी स्वादिष्ट पक्वान्न बनवा. आज खीर पण करा. तुम्ही उत्तम स्वयंपाक करता हे दाखवून द्या. मी आता फार दमलेय. जरा वेळ आराम करते हं.'' जांभई देत सुनंदा म्हणाली.

डोळे लाल करीत पिशाचीण म्हणाली - ''थांब जरा, तू किती चलाख आहेस हे समजलं मला आता. आपल्या सासूकडून काम करून घेणार आणि स्वतः ताणून देणार हं? दुसरी कोणी असती तर मी मुळिच सोडलं नसतं. ठीक आहे, आज तुझं म्हणणं मानते मी. माझ्या मुलाने मला स्वयंपाक करताना पाहिलं तर फार वाईट वाटेल त्याला. त्याला दुःख व्हावं अशी माझी इच्छा नाही. आतां आपला स्वयंपाक तूच संभाळ. माझ्या मुलाची चांगली काळजी घे.'' आणि पिशाचिणी अदृश्य झाली.

सासूबद्दल आदर होता म्हणून सुनंदाने यातील काही ही आनंदला सांगितले नाही. आपल्या घरी परत आल्यावर आनंदला फार आनंद झाला. त्याला फार समाधान वाटलं की आपल्याला मोठी गुणवती बायको मिळाली आहे.






# माकडाची मदत

एका शहरात एक गरीब स्त्री रहात असे. तिचा नवरा वारला, पण लोक त्याला विसरले नाहीत, त्याच्या गुणांचे गोडवे गात. आपल्या आयुष्यात त्याने फक्त नाव कमवले, धन नाही. आपली बायको आणि मुलगा यांना गरीबीत खितपत ठेवून तो मरून गेला. त्याच्या मुलाचं नाव होतं - गोपाळ.

वडील वारले तेव्हा तो पंधरा वर्षांचा होता. तो जिथे बसायचा, तिथे बसून राही. उठण्याची ताकत त्याच्यात नव्हती. अजगराने एकादा प्राणी वा मनुष्य गिळल्यावर तो जसा पडून राहतो, तसा गोपाळ आळसून पडून राही.

गोपाळची आई म्हणे - "परमेश्वराने आपल्यावर अवकृपा केली. आपण तरी काय करणार?" ती मुलावर कधी रागावीत नसे. त्याला काही काम करायला सांगत नसे. ती स्वतः मात्र चार घरी काम करून थोडं-फार कमवी. त्या पैशातून मुलाचं नि आपलं पोट भरी. आई जेव्हा जागवील तेव्हा गोपाळ मोठ्या कष्टाने उठे आणि जेवून-खाऊन पुन्हा झोपून जाई.

गोपाळच्या घराजवळच एक व्यापारी होता. त्याचं नाव होतं अशर्फी गुप्ता. व्यापारासाठी तो चीनला जाणार आहे असं तिला समजलं. त्याच वेळी तिच्या हातात पगाराचे पैसे आलेले होते. त्याच्यातून चांदीचे पाच रुपये गोपाळच्या हाती देऊन ती म्हणाली - "बेटा, ही रक्कम अशर्फी गुप्ताला दे आणि त्यांनी चीनहून येताना आपल्यासाठी एकादी वस्तु आणावी असे सांग. ती विकून तू काही व्यापार कर आणि थोडे पैसे मिळव."

मोठ्या कष्टाने बडबडत गोपाळ बिछान्यावरून उठला. त्याने एक जांभई दिली. आणि अर्धवट जागृतावस्थेत झोपेच्या खुमारीत चालत चालत तो अशर्फी गुप्ताकडे गेला आणि आईने दिलेले पाच रुपये त्याच्या हातावर ठेवून, आईचा निरोप सांगितला.

गुप्ताला गोपाळची दया आली. त्याने विचार केला - एवढ्या थोड्या पैशात हा काय व्यापार करणार? इतक्या थोड्या रकमेतून मी वस्तु तरी काय खरेदी करू? आपल्या दयाळु स्वभावामुळे तो गोपाळला म्हणाला - "ठीक आहे, मी आणीन तुझ्यासाठी काही तरी." गोपाळ घरी आला अन् झोपून गेला. अशर्फी गुप्ताने अन्य व्यापाऱ्यांच्या सल्ल्याने मुहूर्त निश्चित केला आणि तो चीनला रवाना झाला. सुदैवाने समुद्रातील प्रवास निर्विघ्नपणे पार पडला. हवा पण अनुकूल होती. वाटेत ते ज्या ज्या बंदरात थांबले, तेथे मालाची खरेदी-विक्री छान झाली. शेवटी जहाज चीनला पोचले. तेथे व्यापाऱ्यांनी आणलेला सर्व माल विकून टाकला आणि रेशमी वस्त्रे, हस्तिदंत, रत्ने वगैरे माल खरेदी केला. आता जहाज परत मायदेशी यायला निघाले.

दहा दिवसांनी अशर्फी गुप्ताला एकदम गोपाळच्या पाच रुपयांची आठवण झाली. गोपाळच्या आईने चीन मधून काही तरी वस्तु आणायला सांगितली होती. व्यापाराच्या गडबडीत तो हे सर्व विसरूनच गेला होता. त्याने विचार केला की आपण खरीदलेल्या मालातील एकादी वस्तु देऊन टाकावी. पण इतक्या कमी किंमतीची देण्यासारखी वस्तु त्याच्याकडे नव्हती.

अशर्फी बाकीच्या व्यापाऱ्यांना म्हणाला - "आपण जहाज पुन्हा चीनला घेऊन




जाऊ या. मी एक खरेदी करायला विसरलो." पण कोणी ही हे मान्य केले नाही.

काही दिवसांनी जहाज पूर्वेकडील एका बेटावर थांबले. बंदरावर बरेच भिकारी जमले. त्यांच्या पैकी एका जवळ तीन माकडे होती. त्यांच्यापैकी दोन मोठी चंपळ होती. मालक जे करायचा हुकुम देई ते ती बिनचूक करून दाखवीत. तिसरं माकड मात्र म्हातारं होतं. त्याला कुठल्याच खेळात भाग घेता येत नसे. बाकीची दोन्ही माकडे जेव्हा आपली कला दाखवीत, तेव्हा हे म्हातारे माकड दिनवाणेपणाने समुद्राकडे पहात बसे.

त्या माकडांकडे पाहून अशर्फी गुप्ताला एक कल्पना सुचली. गोपाळच्या पैशातून एकादं माकड त्याला खरीदून दिलं की आपली जबाबदारी संपली. काही आणलं

पंचवीस वर्षांपूर्वी 'चांदोबा'त प्रकाशित झालेली गोष्ट



नाही असं नको व्हायला.

"अरे ऐक, यातील एक माकड मला विकत देशील? मी तुला पाच रुपये देईन." अशर्फी माकडाच्या मालकाला म्हणाला.

मालक म्हणाला - "हे म्हातारं माकड घेऊन जा पाहिजे तर!"

"ते नको. दुसऱ्या दोन पैकी एक दे न?" गुप्ताने विचारले.

"शंभर रुपयांहून कमी किंमतीला नाही देता येणार ते. यांच्या कलेवर तर मी जगतो आहे. या म्हाताऱ्याला मी पाच रुपये देऊन खरेदी केलं. फुकटच खायला घालतोय मी त्याला. याला काहीच खेळ करता येत नाही. शिकवलं तर शिकत नाही! तेव्हा हे घेऊन जा पाच रुपयात."

शेवटी अशर्फीने ते म्हातारं माकड पाच रुपये देऊन खरेदी केलं नि त्याला जहाजावर घेऊन आला. ते ही गोपाळ सारखंच सुस्त होतं. खाण्या-पिण्याची वेळ सोडली तर बाकीच्या वेळात ते पडून रहायचं. मस्त झोपून रहायचं. त्याला बांधून ठेवायची पण जरूर नव्हती.

आणखी काही दिवसांनी जहाज मोत्यांच्या बेटावर पोचलं. या बेटाच्या चारी बाजूंच्या समुद्रात मोत्यांचे शिंपले मिळतात. या बेटावरील नावाडी स्वस्तात मोत्यांचे शिंपले व्यापाऱ्यांना विकतात. कधी कधी भाग्यवान व्यापाऱ्यांना मोठ-मोठे शिंपले मिळतात. त्यातील टपोरे मोती भारी किंमतीला विकले जातात. ज्या दुर्दैवी व्यापाऱ्यांच्या नशीबात छोटे शिंपले येतात, त्यांना या व्यापारात खोट बसते. दिलेले पैसे ही वसूल होत नाहीत.

हे जहाज मोत्यांचा सौदा करण्यासाठीच या बंदरावर आलेलं होतं. जहाज पाहताच तरुण नावाड्यांनी समुद्रात उड्या मारल्या. आतापर्यंत मुकाट्याने बसलेलं माकड नावाड्यांचा आवाज ऐकून जागं झालं. आणि त्याने एकदम समुद्रात उडी मारली.

हे म्हातारं माकड ही गोपाळच्या नशिबात नाही की काय अशी अशर्फी गुप्ताला काळजी वाटू लागली. पण थोड्याच वेळात माकड दोन शिंपले छातीशी कवटाळून पोहत जहाजापर्यंत आलं. आणलेले शिंपले जहाजावर एका ठिकाणी ठेवून त्याने पुन्हा समुद्रात उडी मारली. अशा रीतीने बरेच मोत्यांचे शिंपले माकडाने जमा केले.

बाकीच्या व्यापाऱ्यांनी आपापल्या कुवतीनुसार शिंपले खरेदी केले. टपोरे मोती फारसे कोणाला मिळालेच नाहीत. बरेचसे मोती छोटेच होते. माकडाने आणलेल्या शिंपल्यात मात्र छान मोती होते. त्याच्या मागे त्याची तपस्या होती.

हे माकड पूर्वी या मोत्यांच्या बेटावरच रहात असे. त्याचा मालक एक नावाडी होता. मोत्यांचे शिंपले आणायचं काम त्याने त्याला शिकवले होते. पुढे तो नावाडी मेला. त्याला काही कोळ्यांनी आपल्या पाशी ठेवले. पण हे नेहमी झोपत असे म्हणून त्याला एका माकडवाल्याला विकून टाकलं. मोत्याचे शिंपले आणायची कला याला अवगत आहे हे त्यांच्या लक्षातच आले नाही. कोणे एके काळी नाचणारं बागडणारं माकड सुस्त का झालं हे ही त्यांना समजलं नाही. हे निरुपयोगी आहे असे समजून त्यांनी बिचाऱ्याला विकून टाकलं.

माकडवाल्याने बरेच दिवस त्याला आपल्याजवळ ठेवले, पण त्याची किंमत व उपयोग तो समजू शकला नाही.

माकडाने जमवलेले मोती ही आता गोपाळची संपत्ति होती. त्याने आपल्या भावी मालकासाठी हा संग्रह जमवला होता.

अशर्फी गुप्ताने सर्व मोती सुरक्षित ठेवले आणि आपल्या शहरात पोचल्यावर ते गोपाळच्या हवाली केले.

आता गोपाळ पैसेवाला बनला. त्याने एक छोटेखानी घर बांधलं. मोत्यांचं बेट पाहून जसा माकडात उत्साह संचारला, तसाच पैसे मिळाल्यावर गोपाळचा आळस पळून गेला. वर्षातून एकदा तो माकडासह मोत्यांच्या बेटावर जाई आणि तेथून शिंपले घेऊन येई. पाहता पाहता तो चांगला श्रीमंत झाला. लग्न करून आरामात जीवन जगू लागला. आईने आपल्यासाठी किती कष्ट केले हे आता त्याला समजले. सर्वजण त्याला आळशी व निकम्मा म्हणत, पण आईने तिकडे लक्ष न देता त्याला लहानाचा मोठा केला. तो व त्याची बायको मोठ्या प्रेमाने आईची सेवा करू लागले.



विश्व समाचार

# नवे पंतप्रधान

एप्रिल आणि मे महिन्यात आपल्या लोकसभेच्या ५४३ जागांसाठी निवडणुका घेण्यात आल्या. आसाम, हरियाणा, केरळ, तमिळनाडु, पश्चिम बंगाल त्याचप्रमाणे केंद्रशासित पॉंडिचेरी येथील विधानसभेच्या निवडणुका झाल्या. विधान सभेत एकूण २१४ जागा आहेत. थोड्या फार अनपेक्षित घटनांव्यतिरिक्त निवडणुका शांतपणे पार पडल्या. त्या चार राज्यांमध्ये आणि पॉंडिचेरीमध्ये शासित पक्ष हारला आहे. पश्चिम बंगाल मध्ये शासित-पक्ष लेफ्ट फ्रंट पक्ष पुन्हा विजयी झाला आहे.



केंद्र सरकारमध्ये सुद्धाफेरबदल झालेला आहे. शासित-पक्ष कॉंग्रेस, फक्त १४० जागांसाठी विजय मिळवू शकला. भारतीय जनता पार्टीला कॉंग्रेसपेक्षा २१ जागा अधिक मिळालेल्या आहेत. तरीसुद्धा केंद्रसरकार तयार करण्यासाठी ह्या पक्षाला बहुमत मिळवता आले नाही. कुठल्याही एकाच पक्षाला सरकार बनवण्यात यश मिळाले नाही, त्यामुळे संयुक्त पक्षांची लोकसभा बनवण्यात आली.

लोकसभेच्या ह्या निवडणुकांमध्ये जनतादलाला ४६, दोन्ही कम्युनिस्ट पक्षांना ४४ जागा प्राप्त झाल्या. ९७ विभागीय पक्षांना आणि स्वतंत्र उमेदवारांना एकूण १५६ जागा मिळाल्या.

काही विभागीय पक्षांनी भारतीय जनता पक्षाचे समर्थन केले. सगळ्यात जास्त संख्येने निवडून आलेल्या जनता पक्षाचे नेता श्री अटलबिहारी वाजपेयी यांना राष्ट्रपतींनी सरकार बनवण्याचे आव्हान दिले. १५ मे ला भारतीय जनता पक्षाने सरकार बनवले. राष्ट्रपतींनी दिलेल्या अवधित भारतीय जनता पक्ष आपले बहुमत सिद्ध न करु शकल्यामुळे त्या पक्षाला राजीनामा द्यावा लागला. भारतीय जनता पक्षाचे हे सरकार फक्त तेरा दिवस टिकले.

आता जनता पक्ष, लेफ्ट फ्रंट पक्ष आणि मुख्य विभागीय पक्ष ह्यांनी मिळून 'युनायटेड फ्रंट' बनवला. ह्या संयुक्त पक्षाने कॉंग्रेस पक्षाच्या पाठिंब्याने घेऊन सरकार बनवले. कर्नाटक राज्याचे जनता पक्षाचे मुख्य मंत्री श्री.हेच.ड्ही. देवेगौडा त्यांना, या युनायटेड फ्रंट ने आपला नेता म्हणून जाहिर केले. ते आपल्या देशाचे बारावे पंतप्रधान झाले. एक जूनला त्यांनी कामगिरी आपल्या हातात घेतली. अकरा पक्षाच्या या संयुक्त केंद्रसरकारचे ते नेतृत्व करीत आहेत.

श्री. देवेगौडा ह्यांचा जन्म १९३३ मध्ये कर्नाटकामधील एका खेडेगावात शेतकरी परिवारात झाला. शेतकरी कुटुंबातील श्री. देवेगौडांनी शालेय शिक्षणानंतर सिव्हिल इंजिनियर ची पदवी घेतली. त्यानंतर काही काळ ते सिव्हिल कॉंट्रॅक्टर म्हणून काम करीत होते.

त्यानंतर त्यांनी राजकारणात प्रवेश केला. कॉंग्रेस पक्षात गेल्यानंतर ते लोकसभेचे सभासद म्हणून १९६२ मध्ये निवडून आले. १९८३ मध्ये ते कॉंग्रेस विरोधी पक्षाचे कर्नाटकचे मुख्यमंत्री म्हणून नियुक्त करण्यात आले. १९९१ मध्ये समाजवादी पक्षाचा उमेदवार होऊन ते हासन येथून यशस्वीरित्या निवडून आले. १९९४ मध्ये ज्या निवडणुका झाल्या त्यात त्यांनी जनतापक्षाचे नेतृत्व केले आणि ते कर्नाटकाचे मुख्यमंत्री झाले. त्या पदावर ते १७ महिने पर्यंत होते त्यानंतर जनतापक्षाने त्यांना भावी पंतप्रधान होण्यासाठी दिल्लीला पाठवले.



# विश्वंभरचा न्याय

**न**वनीत नावाच्या एका गावामध्ये नरेश नावाचा एक भाग्यवान रहात असे. त्याचा स्वत:चा रहाण्यासाठी एक अलिशान महाल होता. बेसुमार जमिन-जुमला होता. तो जो काही उद्योग करी त्यात त्याला लाभच होत असे. त्यामुळे सगळेजण त्याला भाग्यवान म्हणत असत.

गोपाल नावाची एक व्यक्ति त्या गावात रहावयास आली. जरी त्याच्यावर लक्ष्मी प्रसन्न नव्हती तरी सरस्वती देवीचा आशीर्वाद त्याच्या पाठीशी होता. तो खूप बुद्धिवान होता. म्हणतात की तुम्ही भले तर जग भले! आणि हेच घडले. त्या गावात रहावयास येऊन एक महिनासुद्धा झाला नाही; पण त्या अवधित गोपालला चांगलेच नाव आले. सगळ्या लोकांबरोबर तो गोडीगुलाबीने वागायचा. पण ह्या दरम्यातच्या काळात त्याची नरेशबरोबर गाठभेट काही होऊ शकली नाही.

पण गोपालबद्दल गावातल्या इतर लोकांकडून नरेशला सगळं समजत होते. गोपाल आपल्याला भेटायला येत नाही, हे त्याच्या मनात खटकत होते. शेवटी आपला माणूस पाठवून त्याने गोपालला बोलवून घेतले. तेव्हा गोपाल म्हणाला, ''मी तुम्हाला भेटायला येणारच होतो, तेवढ्यात तुमचे बोलावणे आले. असो. मला बोलावण्याचे काय कारण?''

''मी असे ऐकले कि तुम्हाला पैशाची थोडी अडचण आहे. स्वाभिमानी लोक हे स्वत:हून कबूल करणार नाही, हे मला माहित आहे. पण तुम्हाला आपलं मानून मी मदत करू इच्छितो. माझ्याकडून पैसे घेतले तर माझे भाग्य तुमच्या समृद्धिसाठी उपयोगी पडेल'' नरेश म्हणाला.

गोपाल हात जोडत म्हणाला, ''तुम्ही जे म्हणता आहात त्यावरून तुमचे माझ्यावरील प्रेम आणि आपुलकी स्पष्टच आहे. त्यामुळे मला खूप आनंद झाला आहे. मी त्या लोकांपैकी एक आहे जे स्वत:च्याच भाग्याच्या बळावर समृद्धिच्या मार्गाने जाऊ इच्छितात. म्हणून मी तुमच्याकडून पैसे घेणार नाही. इथून पुढे सुद्धा आपल्या व्यवहारामध्ये पैशाचा उल्लेख होऊ नये. आपण प्रेमाने एकमेकांना भेटत राहू या. आपल्या दोघांमधील आपुलकीची भावना अशीच कायम ठेवू या.

गोपाल आपल्या परिवारासह भाड्याच्या घरी राहू लागला. दोन वर्षानंतर त्याने एक घर विकत घेतले. नंतर परत दोन वर्षांनी त्याने पाच एकर जमिन विकत घेतली. हळु-हळु तो धन-दौलत जमा करित होता. दहा वर्षांच्या आत तो नरेशच्या बरोबरीने श्रीमंत झाला.

गोपाल नेहमीच बाहेरच्या प्रदेशांमध्ये जाऊन विद्वानांच्या सभांमध्ये, चर्चांमध्ये भाग घेत असे. तो पैसे कमवतच होता. पण तो विद्वान असल्यामुळे त्याची कमाई दिवसेंदिवस वाढतच राहिली. अशातच नवनीत गावात एक राजदूत आला आणि त्याने घोषणा केली, ''एका आठवड्यातच सोन्याची पालखी गोपालला राजधानीला घेऊन जाण्यासाठी येईल. तेथे गोपालचा राजाच्या हस्ते सन्मान होणार आहे. महाराजांच्या मते गोपाल हा एक महान पंडित आहे.''

संपूर्ण गावात ही बातमी वाऱ्यासारखी पसरली. जो तो ह्याचबाबत चर्चा करू लागला. बघता बघता गोपालबाबत गावातील लोकांचा आदर-भाव पण वाढला.



गोपालने स्वत: जाऊन नरेशला ही गोष्ट सांगितली. हे ऐकून नरेशचा चेहरा उतरला. माझे डोके दुखत आहे, असं म्हणत तो आत निघून गेला. त्याच्या अशा वागण्याने गोपालला क्षण भर आश्चर्य वाटले. पण त्याला हे नविन नव्हतं. नरेशचा स्वभावच असा आहे असा विचार करून तो शांत बसला. ज्या दिवशी राजाची पालखी आली त्यादिवशी गावातील सगळेजण, सरहद्दीपर्यंत गोपालला निरोप देण्यासाठी गेले. परंतु तब्येत बरी नसल्याचा कांगावा करून नरेश घरीच राहिला.

राजधानीमध्ये गोपालचा सन्मान खूप मोठ्या प्रमाणावर झाला. राजा म्हणाला, ''महाशय, नवनीत गावासाठी अजूनपर्यंत कोणी ग्रामाधिकारी नियुक्त केलेला नाही.

रा. सुधा



गोपाल येण्याच्या आधीच ही बातमी गावभर पसरली. लोकांनी गोपालच्या निस्वार्थीपणाची खूप प्रशंसा केली. पण काही लोक स्वतःचे मत व्यक्त करताना म्हणू लागले, ''नरेश चांगला आहे. पण फार फटकळ आहे. त्यापेक्षा गोपालच अधिकारी झाला असला तर बरे झाले असते.''

राजधानीहून परतल्यावर गोपालने नरेशला राजाचे पत्र दिले आणि म्हणाला, ''माझा मित्र ग्रामाधिकारी झाल्यामुळे मला खूप आनंद झाला आहे. मला खूप कौतुक वाटत आहे.'' नरेशने पहिल्यांदा गोपालकडे आपली कृतज्ञता व्यक्त केली.

इकडे दिवसेंदिवस गोपाल च्या विद्वतेकडे राजा आकर्षित होऊ लागला. तो नेहमीच गोपालला राजधानीला बोलावू लागला. जेव्हा तो राजधानीला जात असे तेव्हा गावातील लोकांच्या समस्येवर आपले मत व्यक्त करीत असे. तेव्हा राजा लगेच त्या समस्यांवर उपाय सांगत असे. परत आल्यानंतर राजाने सुचवलेला उपाय गोपाल जेव्हा नरेशला सांगत असे तेव्हा रागाने नरेश म्हणत असे, ''गावाच्या समस्याबाबत राजाशी तू कशाला बोलायला गेलास? ग्रामाधिकारी मी आहे कि तू? ठीक आहे ते झाले ते झाले. इथून पुढे तू असे केले तर मी ह्या पदाचा राजीनामा देईन.''

''मी जरी राजाला बोललो तर तुला काय फरक पडतो? तुला तर आनंद वाटायला पाहिजे की ह्यात गावाचेचं भलं होतय. माझ्या मदतीने तू तुझे काम करून घे. आणि गावाचे पण भलं कर.'' गोपालने नरेशला

शेजारच्या गावाचा अधिकारीच दोन्ही गावांचा कारभार सांभाळतो. आतापासून तुम्हीच ह्या गावाचे ग्रामाधिकारी असाल.''

गोपालने नकारात्मक अर्थाने मान हलवित म्हटले, ''प्रभु, विद्वता आपल्या जागी आणि शासन-कारभार आपल्या जागी. दोन्ही गोष्टी वेगवेगळ्या आहेत. नवनीत गावात माझा प्रिय मित्र नरेश आहे. तो केवळ समृद्धच नाही तर भाग्यवानसुद्धा आहे. माझा विश्वास आहे कि त्याच्या अधिकार-काळात प्रजा सुखी राहिल. तो भाग्यवान आहे. गावसुद्धा त्याच्या भाग्याचा भागीदार होऊ शकेल.''

राजाने त्याचा सल्ला मान्य केला. त्याने तावडतोब नरेशच्या नावाने एक पत्र लिहून घेतले आणि ते पत्र नरेशला देण्याची जबाबदारी गोपालवरच सोपवली.

समजवण्याचा प्रयत्न केला.

पण हट्टाने नरेश म्हटला, ''मी ग्रामाधिकारी आहे. गावातील लोकांचे चांगले वाईट मी बघून घेईन. तू आपल्या पांडित्याशिवाय राजाशी काही बोलू नकोस.'' नरेश ने जोर देत म्हटले. ही माझी आज्ञा आहे असे पण तो म्हणाला.

त्या बोलण्यावरुन हे स्पष्ट झाले कि नरेशला आपल्या पदाचा गर्व आहे आणि त्याला कुणाचाही हस्तक्षेप नको होता. गोपालला वाटले की त्याचे म्हणणेमुद्धा खरे आहे, रास्त आहे.

थोडया दिवसांतच नरेशच्या मनात गोपालबद्दल असहनशीलता वाढू लागली. शेताचा कर वेळेवर नाही दिला, घराचा एक भाग निश्चित केलेल्या हद्दीच्याबाहेर आहे वगैरे अनेक कारणं दाखवून त्याला त्रास दिला जाऊ लागला.

थोडे दिवस गोपाल चुपचाप सहन करीत होता. पण जेव्हा सहन झाले नाही तेव्हा त्याने राजाकडे तक्रार केली. राजाने नरेशला तंबी दिली. नरेश राजाला काही समजवू शकत नव्हता कारण चुक त्याचीच होती. त्यामुळे गोपालबद्दल त्याचा राग वाढतच गेला.

त्याच सुमारास विश्वंभर नावाचा एक साधु त्या गावात आला. हिमालयात तपश्चर्या, केल्यामुळे काही असाध्य शक्ति त्याला प्राप्त झाल्या होत्या. आठवडयातून एक दिवस लोकांच्या इच्छा तो पूर्ण करीत असे. नरेशने त्याला आपल्या घरी आश्रय दिला.

त्या संधिचा फायदा घेऊन त्याने विश्वंभरला आपल्या मनातील इच्छा सांगितली कि राजाच्या मनात नरेशबद्दल जास्तीत जास्त प्रेम उत्पन्न व्हावे आणि जे नरेशला पाहिजे तेच राजाने करावे. आणि तसेच झाले. आता नरेश राजाला जास्त भेटू





लागला. त्याने सुरुवातीला राजाकडे गोपाल-विरुद्ध तक्रार करून पाहिली पण त्याची डाळ शिजली नाही. कारण सहजपणे दुसऱ्यांचे ऐकणाऱ्यांपैकी राजाचा स्वभाव नव्हता. म्हणून नरेश राजाला म्हणाला, "विद्वान लोकांच्या गरजा सामान्य लोकांच्या गरजांपेक्षा कमी असतात. माझी प्रार्थना आहे कि तुम्ही थोडाकाळ विद्वानांच्या गरजेकडे लक्ष न देता सामान्य जनतेच्या कल्याणावर आपले लक्ष केंद्रित करावे." त्याच्या परिणामस्वरूप इतर विद्वानांबरोबर गोपालला सुद्धा राजाच्या भेटवस्तु मिळणे बंद झाले.

गोपाल खूप दानशूर होता. तो स्वतः सुखी समृद्ध जीवन जगत होता आणि दुसऱ्यांनापण उदारपणे मदत करीत होता. राजाकडून मिळणारा नजराणा बंद झाल्यामुळे त्याची संपत्ति हळूहळू कमी होऊ लागली. त्याच्या परिस्थितीवर दया येऊन काही लोकांनी त्याला म्हटले, "तुम्ही विश्वंभरच्या आश्रयाला जा. त्यामुळे तुम्हाला राजाचा आदर परत प्राप्त होईल." विश्वंभरच्या शक्तीविषयी गोपाल ने बरेच ऐकले होते पण त्याचा अशा अद्भुत शक्तींवर विश्वास नव्हता. आपल्या परिस्थितीचे निवेदन करण्यासाठी तो राजधानीला गेला. पण तोपर्यंत नरेशच्या सल्ल्याचा राजावर चांगलाच प्रभाव पडलेला होता. गोपालला सांगण्यात आले की नवनीत गावाचा कोणीही गावकरी केवळ नरेश द्वाराच आपली समस्या राजाच्या कानावर घालू शकतो, किंवा राजाला भेटू शकतो.

गोपालला आता कळेनासे झाले कि अशा परिस्थितीत काय करावे? तो एका मंत्रीला भेटला आणि त्याला संपूर्ण हकीकत सांगितली.

गोपालच्या विद्वेतेवर मंत्री खूप प्रसन्न होता तो म्हणाला, "बोला मी तुमच्या साठी काय करु? मी काहीही करायला तयार आहे."

गोपाल ने त्याला एक संदेश लिहून दिला आणि म्हणाला, "तुम्ही राजाला असे सांगू नका कि हे मी लिहिले आहे. मी असे लिहिले आहे कि सर्वसामान्यांना विद्वान पंडितामुळे खूप फायदा होतो. ह्यावरोबर मी असे पण लिहिले आहे कि विद्वानांच्या गरजा पूर्ण केल्याने राज्याचा पण खूप फायदा होतो. तुम्ही हे राजाला अशाप्रकारे ऐकवा जसं काही तुम्ही स्वतःच राजाला समजावीत आहात.



मंत्र्याने ऐकवल्यावर राजाने तो संदेश लक्षपूर्वक ऐकला. त्याला आपली चूक उमगली आणि त्याने निर्णय केला कि प्रत्येक गावामध्ये एक विद्वान पंडित् नेमला जाईल. ह्यासाठी विद्वान स्वतःची माहिती देऊ शकतात पण जो आपल्या ग्रामाधिकाऱ्या मार्फत देईल त्याला प्राधान्य देण्यात येईल.

नवनीत गावाला पण ही सूचना देण्यात आली. नरेशला आवडणाऱ्या पंडितांविषयी माहिती पाठवण्यात झाली. मग गोपालने स्वतः विषयी माहिती परस्पर राजाकडे पाठविली. "राजा तुमच्यावर खूप प्रेम करतात. पण पंडितांच्या नेमणुकीच्या बाबतीत ही तुमचा सल्ला घेतला नाही. आणि तुमच्या नेमणुकीबद्दलही काही लक्ष घातले नाही. एखादी दुष्ट शक्ती तुमच्या विरुद्ध हे सगळं घडवत आहे. त्यामुळे तुम्ही एकदा तरी विश्वंभरला जाऊन भेटा. त्यातच तुमचं भलं आहे," काही हितचिंतकांनी सल्ला दिला.

का कुणास ठाऊक पण ह्यावेळी त्यांचा सल्ला गोपालला बरोबर वाटला आणि गोपालने विश्वंभरला भेटून आपली समस्या सांगितली.

विश्वंभर काही बोलणार इतक्यात तिथेच उपस्थित असलेला नरेश म्हणाला, "स्वामी, ह्याचा तुमच्यावर विश्वास नाही. आजपर्यंत एकदासुद्धा तो तुमच्या दर्शनासाठी आला नाही. आज तो इथे आला तो त्याचा काही स्वार्थ साध्य करायच्या हेतुनेच!"

"माझ्याकडे जो कोणी येतो तो त्याच्या स्वार्थापोटीच येतो. माझा त्या व्यक्तिशी किंवा



त्याच्या समस्यांशी काही संबंध नाही. त्यांची नाय्य इच्छा पूर्ण करणे हाच माझा धर्म आहे. विश्वंभर गंभीरपणे म्हणाला. मग गोपालला विचारले "पुत्र, तु मला परवा भेटायला ये."

हे ऐकुन नरेश घाबरुन गेला. त्याने विचार केला, गोपाल आत्ताच माझी परवा करीत नाही आणि जर तो राजपंडित झाला तर माझी काहीच किंमत राहणार नाही. विश्वंभराचा आशिर्वाद काही वाया जाणार नाही. म्हणून हे थांबवायला काहीतरी उपाय करायला पाहिजे.

शेवटी विश्वंभरने गोपालला आशिर्वाद देण्याचा दिवस उजाडला. विश्वंभर गोपालला म्हणाला, "जे हवे आहे ते तू मनातल्या मनात म्हणून घे. तुला ते अवश्य प्राप्त होईल."

गोपालनी मनातल्या मनात इच्छा केली

कि मी राजपंडित व्हावे. त्यानंतर नरेश तेथे आला. विश्वंभरने नरेशला पण तेच सांगितले जे गोपालला सांगितले होते. लगेच नरेशने मनात म्हटले कि गोपाल राजपंडित होऊ नये.

पण त्याच्या मनात शंका आली आणि त्याने विश्वंभरला विचारले, ''स्वामीजी, जर दोघेही एकाच वेळी तुमच्याकडे आले आणि त्यांच्या इच्छा परस्परविरोधी आहेत तर तुम्ही कोणाची इच्छा पूर्ण कराल?''

''मी दोघांपैकी एकाचीच इच्छा पूर्ण करु शकतो. ज्याची इच्छा मी पूर्ण करु शकणार नाही, त्याचे त्या दिवसापासुन अधःपतन होऊ लागेल.'' विश्वंभर म्हणाला.

त्याच्या उत्तराने नरेश आनंदित झाला. त्याला वाटले आता गोपालचे अधःपतन निश्चित होणार. परंतु एक आठवडयातच त्याला बातमी कळली आणि तो निराश झाला. गोपालला राजपंडित पद मिळाले.

नरेश धावत-पळत विश्वंभरकडे गेला आणि म्हणाला, ''स्वामी, असे म्हणतात माझे भाग्य अचूक आणि अतूट आहे. मी विचार केला तुम्ही इथे राहिल्यामुळे ते दुप्पट होईल पण आता मला भीती वाटु लागली आहे कि माझे अध-पतन सुरु होणार आहे. हे सगळे कसे झाले?'' नरेशने रडकुंडीस येत विचारले.

विश्वंभर हसत म्हणाला ''तुझी जीवन रेखा निःसंशय भाग्यशाली आहे. जोपर्यंत तू स्वतःविषयीच विचार करतोस स्वतःचे सुख इच्छितो तोपर्यंत तुझे भाग्य तुला साथ देईल. पण दुसऱ्यांना त्रास देऊन त्यांचा सर्वनाश चिंतायला लागलास तर तुझे भाग्य तुला साथ देणार नाही. आणि तुझ्या दुर्भाग्याला सुरुवात होईल. गोपालची इच्छा त्याच्यापुरती सीमित होती पण तुझी इच्छा गोपालचे नुकसान करणारी होती. म्हणून तुझी इच्छा पूर्ण झाली नाही. तुझे अध-पतन थांबवण्याची शक्ती तुझ्यातच आहे. एखाद्या उपकारकर्त्याचे नुकसान करण्याची तुझी विचारपद्धति तू बदलून टाक. तुझ्या बुद्धिचा उपयोग योग्य दिशेने कर.''

आता नरेशला आपली चूक उमगली. त्याने गोपालबरोबर पुन्हा मैत्रीचे - प्रेमाचे नाते जोडले आणि शांतपणे उरलेले आयुष्य कंठू लागला.






१३

(रूपधर जीवंत आहे कि नाही याचा निर्णय होत नव्हता. त्यामुळे ते राजकुमार त्याच्या घरी तळ ठोकून बसले आणि त्याच्या बायकोशी विवाह करण्याचे स्वप्न रंगवू लागले. एवढेच नाही तर ते तिच्यावर बळजबरी करु लागले कि तिने त्यांच्यापैकी एकाशी विवाह करावा. मग मात्र तिला आणि तिच्या मुलाला सहन झाले नाही. रूपधराचा मुलगा धीरमति आपल्या वडिलांच्या शोधार्थ नावेत बसुन निघाला.) - यानंतर

दरम्यानच्या काळात इथाकामध्ये रूपधरच्या घरी असलेले राजकुमार निश्चिंतपणे खाऊन-पिऊन दिवस घालवत होते. त्यांना अडवणूक करण्यासाठी कोणीही नव्हते. त्यामुळे त्यांना कसलीही भीती वाटत नव्हती. धीरमतिला ते भित्रा मुलगा समजत होते. त्यांची खात्री होती की पद्मावतीला झक मारत त्यांच्यापैकी एकाशीच विवाह करावा लागणार. धीरमति पैयासला गेला आहे हे त्यांना माहित नव्हते. घराच्या बाहेर द्यूत खेळण्यात मग्न असलेल्या त्या दुष्ट राजकुमारांकडे एकदा एका तरुणाने येऊन विचारले, ''तुम्हाला माहित आहे का? धीरमति माझी नाव घेऊन गेला आहे. मला नावेची निकडीची गरज आहे. मला पैलतीरावर जाऊन एका जंगली घोडयाला घेऊन यायचे आहे.'' ह्यावर सगळेजण एकमेकांच्या तोंडाकडे बघायला लागले. त्यांना खूप आश्चर्य वाटले. दुर्बुद्धि ने त्या तरुणाला विचारले, ''धीरमति पैयास ला



गेला आहे? तुला माहित नसताना चोरून तुझी नाव घेऊन गेला की तुला सांगून घेऊन गेला? ती नाव कोण चालवत होते? धीरमतिचे नोकर होते की गावातील लोकांपैकी कोणी आहे? तुला माहित आहे तो पैयासला का गेला आहे?'' अशा प्रकारे त्याने प्रश्नांचा वर्षाव केला.

''माझ्या संमतिनेच तो नाव घेऊन गेला. एवढ्या मोठ्या घरचा मुलगा माझ्या कडे नाव मागणार आणि मी देणार नाही हे कसं शक्य आहे? त्याने मागितल्यावर आनंदाने नाव त्याच्या स्वाधीन केली. नाव चालवण्यासाठी गावातील निपुण नावाडी त्याच्या बरोबर गेले. सहन त्यांचा नेता होता.'' त्या तरुणाने दुर्बुद्धिला सांगितले.

दुर्बुद्धिला राग आला. आपल्या सह-काऱ्यांकडे वळून तो म्हणाला, ''हा अन्याय आहे. ज्या दिवशी सर्व नागरिकांना जमवून त्याने आमच्याविरुद्ध तक्रार केली त्या दिवसा-पासून माझ्या मनात शंका येत आहे की हा आम्हाला घरातून हाकलून देण्यासाठी योजना आखत आहे. आता आपल्या सर्वांच्या डोळ्यात धूळ फेकून हा मुलगा सोबत काही नावाड्यांनासुद्धा घेऊन गेला आहे. ह्याची ही हिम्मत? ताबडतोब वायु-वेगाने जाणाऱ्या नौकेचा बंदोबस्त करा. आता धीरमतीच्या मृत्यू शिवाय मला चैन मिळणार नाही.'' मग सर्व राजकुमारांनी आपापसात चर्चा केली. धीरमती जेव्हा परत येईल तेव्हा रस्त्यातच त्याला मारून टाकायचे ठरले. हे काम दुर्बुद्धिवर सोपवले.

त्यांच्या ह्या षडयंत्राची बातमी नोकरांतर्फे पद्ममुखीला समजली. धीरमती पैयास ला गेला हेच मुळात तिला माहित नव्हते.

''घरी इतके नोकर असून एकानेही मला सांगितले नाही की माझा मुलगा प्रवासाला जात आहे. जर मला कल्पना असती तर मी त्याला मुळीच जाऊ दिले नसते. ''असे म्हणून पद्ममुखी रडू लागली. मग आजीने सांगितले की तुम्हा सर्वांना त्याच्या प्रवासाबद्दल त्यांना नव्हतेसांगायचे. जोपर्यंत तुम्ही त्याच्याबद्दल विचारत नाही तोपर्यंत मौन पाळायचे असे त्यानेच सांगितले.

''विवाहाची घाई असल्यामुळेच नवरी रडत आहे असे वाटते. बिचारीला माहित पण नाही की तिच्या मुलाचा मृत्यू जवळ आला आहे'' एका दुष्टाने कुत्सितपणे म्हटले. ''तुमच्यापैकी कोणीही काहीही बोलायचे नाही. धीरमतीच्या हत्येविषयी आमच्याशिवाय कोणालाही समजता कामा नये'' दुर्बुद्धि म्हणाला. आणि ताबडतोब वीस एक नावाड्यांना सोबत घेऊन समुद्र किनाऱ्यावर पोहोचला.

एका नावेत त्यांनी तलवारी, चाकू वगैरे अवजारे लपवून ठेवली आणि समुद्रकिनाऱ्या-पासुन थोड्या अंतरावर जाऊन धीरमती येण्याची वाट पाहू लागले.

पद्ममुखीला त्यादिवशी जेवण गेलं नाही. रात्रीसुद्धा तिला झोप येत नव्हती. मुलाला आता मी परत जीवंत रुपात पाहू शकेन का? असा विचार करून ती स्फुंदून स्फुंदून रडत होती. त्याचवेळी अंधारात आपली बहिण धुंधलाचा तिला भास झाला. ती म्हणाली, ''ताई तु कशाला रडतेस? तुझ्या मुलावर कोणतेही संकट-विपत्ति येणार नाही. आता तू शांत हो,'' मग अचानक ती अदृश्य झाली.

त्याच रात्री त्या दुष्टाने आपली नौका एका बेटाजवळ नेली नांगर टाकून धीरमती येण्याची वाट पाहू लागले. धीरमतीने प्रतापचा निरोप घेतला आणि त्यांच्या अमूल्य भेटी बरोबर घेऊन प्रवासाला निघाला. तो समुद्रकिनाऱ्यावर पोहोचला आणि नावाड्यांना भेटला. नौका सरळ आपल्या गावाकडे जाऊ लागली. एका ठिकाणी तो नौकेतून उतरला आणि नावाड्यांना म्हणाला, ''तुम्ही सगळे गावाते जाऊ शकता. मी माझ्या डुकरांना



सांभाळणाऱ्याला भेटून मग परत जाईन.''

धीरमति राखणदाराच्या झोपडीपाशी गेला. तेव्हा राखणदार आणि रूपधर स्वयंपाक करीत होते. झोपडीच्या बाहेर कुत्र्यांनी धीरमतीला ओळखले आणि शेपूट हलवीत ते त्याच्या अंगाशी खेळू लागले.

''कोणीतरी आले आहे. बहुतेक तुमच्या ओळखीचेच असावे कुत्रे न भुंकता त्याच्याशी खेळत आहेत,'' रूपधर म्हणाला.

रूपधरचे बोलणे संपायच्या आधीच धीरमती झोपडीच्या दारात येऊन उभा राहिला.

त्याला बघून राखणदाराला आश्चर्याचा धक्काच बसला आणि तो पळतच आपल्या आतिथ्याकडे गेला. त्याला त्याने अशी



मिठी मारली जसं काही त्याचा स्वतःचा मुलगाच दूर देशाहून परत आला आहे. दोघांच्याही डोळ्यातून आनंदाश्रु वाहू लागले. त्या दोघांचे हे मिलन बघून रूपधर आवाक् झाला. राखणदाराने प्रेमाने धीर-मतीला म्हटले, ''आलास बेटा तू! मला वाटलंच नव्हतं की परत मी तुला भेटू शकेल. तुला तर या गरीबाच्या झोपडीत यायला जमत नाही. मी असं ऐकलंय की पैयास ला गेला होतास? कधी परत आलास?''

''तिथूनच येतो आहे, काका. आमच्या घरची काय हालचाल आहे? माझी आई ठीक तर आहे ना? कुणा दुष्टानी तिच्याशी विवाह तर नाही ना केला?'' धीरमतीने विचारले ''देवाच्या कृपेने अजून तरी तसं काही झालं नाहीए. तुझी आई रात्रंदिवस चिंतेत असते. त्या दुष्टांपासुन कधी तिची सुटका होईल कोणास ठाऊक?'' राखणदाराने धीरमतीच्या हातातील गाठोडं आपल्या हातात घेत सांगितले.

धीरमतीला आत येताना बघून रूपधर उठून उभा राहू लागला तेव्हा धीरमती त्याला म्हणाला, ''उठू नका, बसायला दुसरी पुष्कळ जागा आहे.''

रूपधर परत बसला. राखण्दाराने धीरमतीसाठी एक चामड्याचे आसन अंथरले. मग तिघांनी मिळून जेवून घेतले.

जेवणं झाल्यावर धीरमतीने राखणदाराला म्हटले, ''काका हे नवीन गृहस्थ कोण आहेत?'' ''मुला, ह्यांचं म्हणणं आहे कि ते क्रीट देशाचे आहेत. असं वाटतं की ह्याच्या नशिबात जगभराचा प्रवास करण्याचे लिहिले आहे. एका दुर्घटनेतून वाचून ते माझ्या झोपडीत आश्रय शोधत आले. ह्यांना मी तुझ्या सुपुर्त करतो. मग तुझी इच्छा ''राखणदार म्हणाला.

''काका, ह्या गृहस्थांची जबाबदारी माझ्यावर सोपवून तुम्ही माझी परीक्षा घेताय. ह्या पाहुण्यांना मी माझ्या घरी कसा घेऊन जाऊ? घरभर ते दुष्ट लोक आहेत. ते सतत आईवर दबाव आणत आहेत की आमच्यापैकी एकाशी विवाह कर. आणि ती असहायपणे तळमळत आहे. तिचा विश्वास आहे की तिचा पती लवकरच घरी परत येईल. ती काहीच निर्णय घेऊ शकत नाही. म्हणून ह्या





पाहुण्यांना मी जास्तीत जास्त म्हणजे घालायला चांगले कपडे देऊ शकतो, चपला देऊ शकतो, तलवार देऊ शकतो. मग त्यांना जिथे जायचे असेल तिथे त्यांनी जावे. पण खरं सांगायचं तर त्यांना इथे ठेवलेलेच बरं. त्यांना जे काही जेवण पाहिजे ते मी पाठवत जाईल. ह्यांनी त्या दुष्टाबरोबर राहिलेले मला नाही आवडणार. ते ह्यांना खूप सतवतील, आणि दुःखी करतील. ह्यांचा अपमान करतील'' धीरमतीने आपले विचार व्यक्त केले.

मग तो राखणदाराला म्हणाला, ''काका, तुम्ही लगेचच माझ्या घरी जा आणि माझ्या आईला सांगा की मी पैयासहून परत आलो आहे आणि तुमच्या झोपडीत सुखरूप आहे.''

''बेटा, मला तर असं कळलंय की तू गेल्यापासुन तुझ्या आजोबांनी कणभर सुद्धा अन्न घेतलेले नाही. त्यांना तुझ्या येण्याची बातमी देऊ. त्यांच पण आता वय झालंय,'' राखणदाराने विचारले.

''तुम्ही दुसरीकडे कुठेही जाऊ नका. आईला सांगा की संधी साधून तिनेच खुशाली कळवावी. तुम्ही ताबडतोब इथे परत या,'' धीरमती म्हणाला.

राखणदार निघून गेला. आता झोपडीत वडिल आणि मुलगा दोघंच उरले.

तेवढयात अचानक झोपडीबाहेर बुद्धिमति देवी प्रगट झाली आणि खुणेनेच तिने रूपधरला बाहेर बोलावून घेतले. मग देवी त्याला म्हणाली, ''तुझ्या मुलाला सांग कि तू कोण आहेस? त्याच्या मदतीने शत्रुंचा नाश करायला आरंभ करा. त्या दुष्टांचा अंतसमय निकट आला आहे. मी तुमच्या पाठीशी आहे काळजी करायची





गरज नाही," असे म्हणून तिने आपल्याकडिल काठीने रूपधरला स्पर्श केला.

त्या स्पर्शाबरोबर रूपधरच्या चेहऱ्यावरच्या सुरकुत्या नाहिशा झाल्या.

त्याला स्वतःचे पूर्वीचे रूप प्राप्त झाले. त्याचा पोशाख पण बदलला. त्या परिवर्तन झालेल्या व्यक्तिला बघून धीरमति आश्चर्य चकित झाला. त्याने विचारले, "महाशय आपण कोण? सामान्य माणसाकडे स्वेच्छेनुसार रूप बदलण्याची शक्ती नसते. निदान सर्व साधारण व्यक्तिच्या चेहऱ्यावर असे अद्‌भुत तेज नसते."

रूपधरने स्वतःचा परिचय करून दिला "बेटा, मी तुझा पिता आहे. परतीच्या प्रवासात मला खूप त्रास झाला. अनेक संकटांना तोंड देत मी कसातरी स्वदेशी पोहोचलो." मग त्याने धीरमतीला संपूर्ण हकिकत सांगितली आणि म्हणाला, "आतातू मला सांग की आपल्या घरी किती दुष्ट लोक-आहेत? आपण त्या सगळ्यांचा नाश करु या."

"सगळेमिळून ते एकशे आठजण आहेत. त्याशिवाय त्यांचे सहा नोकर आहेत. एवढ्या सगळ्यां पुढे फक्त आपल्या दोघांची ताकद कशी पुरी पडणार? धीरमतीने आपली शंका व्यक्त केली.

"वेड्या तुला वाटतं की आपण दोघच आहोत? अरे, आपल्या पाठीशी बुद्धिमती देवी सुद्धा आहे. सकाळपर्यंत तू घरी जा मी एका भिकाऱ्याच्या वेषात राखणदाराबरोबर येईन. या दुष्टांनी माझा कितीही अपमान केला तरी तो तू सहन करायचा. मी खूण केल्याबरोबर भिंतीवर टांगलेल्या तलवारी, भाले आणि चाकू ही अवजारे सगळे घ्यायचे आणि वरच्या खोलीत एका कोपऱ्यात लपवून ठेव. जर त्यांनी विचारले तर त्यांना सांग की गंजू नये म्हणून सर्व अवजारे सुरक्षित जागी काढून ठेवली. त्यांच्याशी नम्रपणे वाग. चुकुनसुद्धा त्यांच्याशी भांडण किंवा वाद होता कामा नये. आपल्याला पाहिजे असलेले दोन भाले, दोन तलवारी आणि चामड्याच्या दोन ढाली दुसऱ्या ठिकाणी पण जवळपास सुरक्षित असाव्यात. मी इथे परत आलोय ही बातमी गुप्त असू दे. अगदी तुझ्या आईलासुद्धा सांगू नकोस. ही गुप्तता पाळणे खूप आवश्यक आहे." अशाप्रकारे रूपधरने आपली योजना धीरमतीला समजावून सांगितली. तोपर्यंत पैयासला गेलेली नौका गावापर्यंत परत आली. त्यातील नावाड्यापैकी एक नावाडी रूपधरच्या घरी आला. त्याचवेळी डुकरांचा राखणदारपण तिथे पोहोचला. घरात ठाण मांडून बसलेल्या दुष्टांना जेव्हा कळले की धीरमती परत आला तेव्हा त्या सगळ्यामध्ये एकच खळबळ माजली. रस्त्यातच धीरमतीला मारून टाकण्यासाठी गेलेले दुर्बुद्धि आणि त्याचे सहकारीसुद्धा निराश होऊन परत आले.

सगळ्यांनी मिळून ह्या रहस्यावर चर्चा केली. तेव्हा दुर्बुद्धि म्हणाला, "यावेळी तो वाचला. परंतु जर आपण लवकरात लवकर ह्याचा नाश नाही केला तर आपण सगळे संकटात सापडू शकतो. येथील प्रजासुद्धा आपल्या विरुद्ध आहे. तो आपल्या षड्यंत्राची कल्पना प्रजेला देईल. मग मात्र प्रजा आपला सर्वांना ह्या देशातून हाकलून देईल. म्हणून धीरमती गावात प्रवेश करतानाच त्याला मारून टाकणे आवश्यक आहे. त्याची संपत्ति आपण आपापसात वाटून घेऊ. आपल्यापैकी ज्याच्याशी पद्ममुखीचा विवाह होईल, हे घर त्याच्या वाटणीला येईल. धीरमतीला मारले नाही तर रूपधरच्या घरी रहाणे अशक्य आहे. मग आपापल्या घरी राहूनच आपल्याला पद्ममुखीशी लग्न करण्यासाठी प्रयत्न करावे लागतील. तुमचे सगळ्यांचे ह्याबाबतीत काय मत आहे? तुमचा निर्णय मला सांगा."

धीरमतीला मारून टाकण्याच्या योजनेला काहीजणांनी विरोध केला. एक जण म्हणाला, "धीरमतीचा मृत्युसमय जवळ आला आहे की नाही हे समजल्या शिवाय आपण ह्याबाबतीत काहीच करु नये. जर देवतेने सांगितले की त्याचा अंतसमय जवळ आला आहे तर मी स्वतःच त्याला मारून टाकेन. तोपर्यंत कसलीही घाई करु नये.

सगळ्यांनी हा सल्ला मान्य केला आणि आपापल्या घरी निघून गेले. रात्री डुकरांचा राखणदार परत यायच्या आत धीरमती आपल्या पित्याबरोबर राखणदाराच्या झोपडीत झोपून गेला होता.

- क्रमशः



# बाल-विश्व

### जीभेच्या टोकावर दुनिया

अफ्रिका खंडा मध्ये किती देश आहेत? तुर्कमेनिस्तान ची राजधानी कोणती? उज्बेकिस्तान मेनन चलन काय आहे? नुकत्याच झालेल्या मुंबईच्या प्रेस-क्लब मध्ये मोनिका मेनोन ला विचारल्या गेलेल्या प्रश्नांपैकी हे प्रश्न आहेत. जवळजवळ एक तास चालू असलेल्या प्रश्नोत्तराच्या कार्यक्रमात विचारलेल्या प्रत्येक प्रश्नाचे अचूक उत्तर क्षणात तिने दिले. एकाही प्रश्नाचे उत्तर चुकीचे नव्हते. जगातील जवळजवळ १८५ देशांच्या राजधान्या आणि त्या त्या देशांचे चलन तिला तोंडपाठ आहे. तुम्हांला माहित आहे, तिचे वय काय आहे? वय वर्षे पाच! ती पहिल्या इयत्तेत आहे. प्रश्नोत्तरानंतर तिची आई वनजा मेनोन ने सांगितले की मागच्या डिसेंबर मध्ये तिला जगाचा नकाशा असलेला विश्वगोल मेनन विकत आणून दिला त्याचे ती निरीक्षण करते. त्यामुळे जगातील देश आणि त्यांच्या राजधान्या ह्याबाबतीत तिला संपूर्ण माहिती आहे. तिच्या वडिलांनी सांगितले की ह्याव्यतिरिक्त ती 'विश्वकोश' सुद्धा वाचते. मुलांची प्रतिभाशक्ती ओळखून त्यांना प्रोत्साहन दिले तर त्यांचा सर्वांगीण विकास होतो ह्याचे मोनिका हे साक्षात उदाहरण आहे.

### बुद्धिवानांची संस्था

'मेन्सा' ही अत्यंत बुधिवान सदस्यांची एक आंतरराष्ट्रीय संस्था आहे. ह्या संस्थेत इंग्लंडचे ४०,००० सदस्य आहेत. ह्यांच्यामध्ये सगळ्यात वयाने लहान, पश्चिम इंग्लंडमधील रियन्नान पेयिन ही तीन वर्षाची आहे. त्या संस्थेत प्रवेश मिळण्यासाठी जी परीक्षा झाली त्यात तिला सगळयात जास्त गुण मिळाले. तिच्यापेक्षा दुप्पट वयाची मुलं जे वाचू शकतात ते ती या वयात सहज वाचू शकते. ह्या मुलीला आता बालवाडीत भरती करण्यात आले आहे.

### चीनी भाषेतील छोटया बालिकेची प्रतिभा

डांग डांग ही दक्षिण चीन मधील तीन वर्षाची लहान मुलगी आहे. चीनी भाषेतील ३,००० अक्षरं ती वाचू शकते. ह्यात कमीत कमी सहा हजार आधार अक्षरं आहेत. त्यांना जोडून किंवा आकारात बदल करून दुसऱ्या अक्षरांना जोडून वेगवेगळे शब्द तयार होतात. वीस महिने वय असतानाच तिला २०० कविता आणि बडबड गीतं तोंडपाठ होती. तेव्हाच ती ९०,००० पेक्षा अधिक शब्द लिहू शकत होती. इतक्या बुद्धिमान बालिकेने. 'शांघाय गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डस्' मध्ये स्थान प्राप्त केले तर आश्चर्य काय?

### निसर्गप्रेमी

हर्षभात्रा दिल्लीमध्ये आठव्या इयत्तेतील विद्यार्थी आहे. ह्याने पर्यावरणाच्या संरक्षणासाठी ''पंचवटी'' नावाची एक योजना आखली आहे. पर्यावरणाच्या संरक्षण संबंधी मुलांमध्ये रुचि निर्माण करण्यासाठी नुकतीच संयुक्त राष्ट्र संघटनेने एक बाल-सभा आयोजित केली होती. ८० देशांच्या मुला-मुलींनी ह्यात भाग घेतला. आपल्या देशाचा एकमात्र प्रतिनिधि होता बारा वर्षाचा हर्षभात्रा! त्याने त्या सभेत भाषण देताना आपल्या 'पंचवटी' योजनेवर प्रकाश टाकला. सर्वसाधारणपणे ह्या वयात खेळण्याची आवड टी.व्ही. च्या कार्यक्रमांची इच्छा आणि कॉम्प्युटर गेम्स् बद्दल ओढ असते. पण ह्या वयात पर्यावरणाच्या संरक्षणाची योजना आखणाऱ्या हर्षभात्राच्या स्वभावाचे कौतुक करावे तितके थोडेच आहे.



# वेताळ कथा

## अदृश्य शक्ति

दृढ निश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाकडे गेला. शव उतरवून पुढे निघाल्यावर त्यातील वेताळ म्हणाला, ''राजा मला वाटतय कि तू दैवी आणि अदृश्य शक्ती प्राप्त करण्याच्या प्रयत्नात आहेस. म्हणूनच या भयंकर अंधकारमय स्मशानात तू नाना संकटांना तोंड देत आहेस. आता मात्र मला तुझ्या निश्चयाबद्दल शंका नाही. त्यासाठीच तू एवढे परिश्रम घेत आहेस. काही अपूर्व व्यक्तिंना, काही अद्भुत घटनांना किंवा काही अपूर्व उदाहरण पाहून वाटेल की ह्या अदृश्य शक्ती सहजच साध्य होतील. ह्या अदृश्य शक्ती साध्य करुन त्यांचा उपयोग करण्याच्या मोहात ते लोक आपोआप पडतात. तू त्यांच्याप्रमाणे ह्या मोहात पडून आपला अमूल्य वेळ वाया घालवू नकोस असे मला वाटते. तुझे हे प्रयत्न वाया जाऊ नये म्हणून मी तुझा हिमकर नावाच्या



राजकुमाराची गोष्ट सांगतो. गोष्ट ऐकताना तुझी थोडी करमणूकही होईल अन् चालण्याचे कष्ट विसरायला होतील. गोष्ट नीट लक्षपूर्वक ऐक.'' आणि वेताळ हिमकरची गोष्ट सांगू लागला.

गोदावरी नदीच्या काठावर सोमपुर नावाचे छोटेसे राज्य होते. हिमकर हा तेथील राजकुमार होता. हिमकर, सेनापतीचा मुलगा भद्रवर्मा आणि मुख्यमंत्र्याची मुलगी मधुमती हे तिघेजण बालपणापासुन मित्र होते. हिमकर आणि भद्रवमनि दहा वर्षे गुरुकुलात शिक्षण घेतले. सर्वविद्या शिकून झाल्यानंतर जेव्हा ते आपल्या राज्यात परत यायला निघाले तेव्हा गुरुकुलातील मुख्य गुरुवर्यांनी भद्रवर्माच्या नकळत हिमकरला परकाया प्रवेश करण्याची विद्या शिकवली. गुरुवर्यांचे आशिर्वाद घेऊन दोघेजण राजधानीस परत आले.

राजभवनाच्या मुख्य प्रवेशद्वारासमोर एक पटांगण होते. दररोज संध्याकाळी राज्यातील तरुणांच्या निरनिराळ्या स्पर्धा तिथे आयोजित केल्या जात. एका पळण्याच्या स्पर्धेत हिमकर हारला. स्पर्धा जिंकणारा तेथील दंडाधिकाऱ्याचा मुलगा होता. राजकुमाराला हारवल्यामुळे त्याला घमेंड आली. आणि तो राजकुमाराची चेष्टा करु लागला. हिमकरने त्याच्याकडे दुर्लक्ष केले. त्याच दिवशी रात्री एक विषारी किडा चावल्यामुळे महिनाभर तो बिछान्यातच होता.

आणखी एके दिवशी, जेव्हा हिमकर आणि मधुमती बगीच्यात फेरफटका मारत होते तेव्हा वैद्यराज आस्थानचा मुलगा तेथे आला आणि विनाकारण राजकुमार हिमकर बरोबर तो वाद घालू लागला मग रागाच्या भरात त्याने हिमकरला दगड फेकून मारला. हिमकरला फारशी काही इजा झाली नाही पण त्याच दिवशी आपल्या घरी औषधी वनस्पतींना पाणी घालत असताना त्या वैद्याच्या मुलाला साप चावला. आपल्या वडिलांच्या उपचारांनी तो वाचला. ही बातमी हिमकरला समजली.

मधुमतीचे सौंदर्य असामान्य होते. हिमकर आणि भद्रवर्मा दोघही तिच्यावर प्रेम करीत होते. दोघांनाही विश्वास होता की मधुमती त्यालाच प्रेम करते.

एके दिवशी सकाळी तिघे ही जण राजाच्या फळांच्या बागेत फिरायला गेले.



खरंतर तो आंब्याचा मोसम नव्हता. तरीही आश्चर्य म्हणजे एका फांदीवर एक पिकलेला आंबा होता. तो बघून मधुमतीच्या तोंडाला पाणी सुटले. तिने दोघांनाही विनंति केली कि मला तो आंबा तोडून द्या.

भद्रवर्मा ताबडतोब भरभर झाडावर चढू लागला. हिमकरला सुद्धा वाटले की मधुमतीला पहिले मीच आंबा तोडून द्यावा. तोसुद्धा झाडावर चढू लागला. अचानक त्याचे लक्ष जवळच मरुन पडलेल्या पोपटाकडे गेली. गुरुकडून शिकलेली परकाया-प्रवेश विद्या उपयोगात आणून त्याने पोपटाच्या शरीरात प्रवेश केला. पटकन तो झाडावर उडत गेला आंबा तोडला आणि खाली आला. परत आपल्या शरीरात प्रवेश करून हिमकर ने तो आंबा मधुमतीला दिला. हे सगळं काही क्षणात झाले.

भद्रवमनि हे बघितले. त्याला हिमकरचा फार राग आला. तो म्हणाला, ''राजकुमार, हा अन्याय आहे. झाड चढण्यात तू आपली कुशलता दाखवू शकला नाही म्हणून तू मांत्रिक विद्येचे सहाय्य घेतले. तुला आपल्या कृत्यावर शरम नाही वाटत? मत्र-तंत्र, जादुटोणा यांचा उपयोग वीरांना शोभत नाही. हे भीत्रे पणाचे आणि असमर्थतेचे लक्षण आहे.'' असे ओरडून भद्रवमनि खाली उडी मारली तर त्याचा पाय तुटला.

भद्रवर्माच्या पायाचे हाड तुटले. तीन महिने तो हिंडु-फिरु शकला नाही. ह्या घटनेनंतर हिमकरच्या अशांत मनाला स्थैर्य प्राप्त झाले. इतके दिवस तो विचार करत होता. घडलेल्या घटनांसंबंधी अंदाज बांधत



होता पण नक्की काय ते त्याला कळत नव्हते. आज त्याची खात्री झाली की कुठली तरी अदृश्य शक्ती त्याची मदत करत होती. आता त्याला समजले की ती अदृश्य शक्ती, जो-जो त्याचा अपमान करीत होता त्याला शिक्षा देत होती. हे निश्चित करण्यासाठी त्याला अनेक दृष्टांत मिळाले होते. ते असत्य मानून त्याकडे दुर्लक्ष करणे त्याला पटत नव्हते. हा त्या अदृश्य शक्तीचा अपमान झाला असता. हिमकरला आता खात्री पटली की जो त्याचे वाईट चिंतेल तो कष्टमय जीवन जगेल.

राजकुमार हिमकर मुख्यमंत्र्याची मुलगी मधुमती हिच्याबरोबर फिरत असताना नेहमीच दिसत असे. वृद्ध राजाने जेव्हा बघितले तेव्हा राजाला वाटले हिमकरचे मधुमतीवर प्रेम आहे. एक दिवस त्याने



आपल्या मुलाला बोलवून सांगितले, ''माझी अशी इच्छा आहे की आता तुला राज्याभिषेक करावा. त्याचबरोबर तुझा विवाह पण करु या. मुख्यमंत्र्यांशी ह्याबाबत बोलू का?''

उत्तरादाखल हिमकर गालातल्या गालात हसला. तो खूप आनंदित झाला होता कारण त्याच्या मनातील इच्छा राजाने ओळखली आणि दुसऱ्या कुठल्या राजकन्येशी विवाह करण्याचा प्रस्ताव त्याच्यासमोर ठेवला नाही.

ही आनंदाची बातमी ऐकवायला हिमकरने मधुमतीला निरोप पाठवला की, संध्याकाळी जलविहार करायला ये. परंतु संध्याकाळी मधुमतीबरोबर भद्रवर्मासुद्धा नदिकिनारी आला. तिघेही एका छोट्या नौकेत बसून जवळच असलेल्या छोट्याशा बेटावर गेले. परत येताना हिमकरने आपल्या पित्याचा निर्णय त्या दोघांना सांगितला. त्याला वाटले आपला मित्र भद्रवर्मा ह्याला हे ऐकून खूप आनंद होईल. त्याला माहित नव्हतं की भद्रवर्माचिदेखील मधुमतीवर प्रेम आहे. जर त्याला माहित असते तर त्याने विवाहाची गोष्टच केली नसती.

भद्रवर्माचा स्वभाव खूप रागीट होता. तसाच तो खूप निडर होता. त्याने खूप आवेशात येऊन सांगून टाकले ''हिमकर तर राजकुमार आहे, होणारा राजा आहे, त्याचा अधिकार खूप मोठा आहे, त्या अधिकाराच्या जोरावर तो काहीही करु शकतो. मी मधुमतीवर प्रेम करतो हे माहित असूनसुद्धा तो तिच्याशी विवाह करायला तयार झाला. तू आपल्या मित्राचा विश्वासघात केला आहे.'' नंतर त्याने हिमकरला म्हटले, ''तुझे पिता राजा आहेत. मधुमतीचे वडिल त्याचे मंत्री असल्यामुळे तू तुझी इच्छा पूर्ण करु शकतोस. तुझी जिद्द यशस्वी करु शकतोस. मला कल्पना नव्हती तू इतका नीच आहेस. जर तुझ्यात अजूनही क्षत्रियधर्म बाकी असेल तर तू माझ्याशी द्वंद्व कर आणि मधुमतीला जिंकून घे. ''अशाप्रकारे त्याने हिमकरला आव्हान दिले. मधुमती सगळं बघत - ऐकत होती पण ती काहीच बोलली नाही, जसा काही तिचा याच्याशी काही संबंधच नव्हता.

हिमकरने आपला राग-जोश आटोक्यात ठेवून - भद्रवर्माला शांत करण्याचा प्रयत्न केला. भद्रवर्मा रागाने थरथर कापू लागला त्याने म्यानेतून तलवार काढली हिमकरला त्याचं रक्षण करणाऱ्या अदृश्य शक्तीची आठवण आली. त्याने भद्रवर्माच्या उजव्या हाताचे मनगट घट्ट पकडून ठेवले आणि त्याला थांबवू लागला. तरीसुद्धा भद्रवर्मा आवेशात येऊन त्याच्यावर वार करणार इतक्यात नाव उलटली.

मधुमती मागे वळून न पहाता पोहत पोहत नदीकिनारी येऊन पोहोचली. हिमकर आणि भद्रवर्मा अजून पाण्यातच होते. हिमकरला वाटले भद्रवर्मा नदीकिनाऱ्यावर येऊ शकणार नाही. त्याला वाटले भद्रवर्माने तलवार काढल्यामुळेच ही दुर्घटना झाली. तेवढयात उलटलेल्या नावेच्या पुढच्या भागावर त्याचे डोके आदळले आणि तो बेशुद्ध झाला.

हिमकरने जेव्हा डोळे उघडले तेव्हा त्याला दिसले की भद्रवर्मा त्याचे पोट दाबून तोंडातून पाणी बाहेर काढत आहे. मधुमती बेचैनपणे बाजुलाच उभी आहे. हिमकर उठून बसल्यावर भद्रवर्माने एकदाच त्याच्याकडे जळजळीत नजरेने बघितले मग तिथून उठून काहीही न बोलता निघून गेला.

तेव्हा मधुमती हिमकरला म्हणाली, ''तू तर कुशल पोहणारा आहेस पण डोक्याला मार लागल्यामुळे तू बेशुद्ध झालास तुला माहित आहे असे का झाले? ह्याच्याआधीच भद्रवर्माने मला एक रहस्य सांगितले होते. त्याने सांगितले की एक अदृश्य शक्ति सतत त्याच्याबरोबर असते. वेळ पडल्यास ती शत्रुला अशा दुर्घटनेचे शिकार व्हायला लावते कधी कधी शत्रुला मारतेसुद्धा,'' हिमकर मधुमतीला काही सांगणार होता इतक्यात ती काही न बोलता लवकर लवकर निघून गेली. थोड्या वेळाने हिमकर राजभवनात



पोहोचला आणि त्याने आपल्या पित्याला सांगितले, ''मला एवढ्या लवकर विवाह करायचा नाही. मी काही काळ देशभ्रमण करू इच्छितो.'' पित्याची अनुमति मिळताक्षणी तो निघाला.

एवढी गोष्ट ऐकवल्यानंतर वेताळाने विक्रमला विचारले, ''राजन्, हिमकरच्या या विचित्र वर्तणुकीचा उद्देश काय असेल? मधुमतीशी विवाह करण्याला होकार देऊनपण तो देश भ्रमण करण्यास त्याच क्षणी का निघाला? कि त्याला भद्रवर्माचे भय वाटु लागले? ज्या मधुमतीशी भद्रवर्मा विवाह करु इच्छित होता, त्या मधुमतीशी विवाह केल्यावर, भद्रवर्माच्या सतत बरोबर असणाऱ्या अदृश्य शक्तीच्या घावाबद्दल त्याला भीती वाटु लागली? नाही तर, कृतज्ञतेने त्याने विवाह टाळला-कारण भद्रवर्माने त्याला वाचवले? त्याने आपल्या प्रेमाचा त्याग कृतज्ञतेने प्रेरित झाल्यामुळे केला? माझी ही शंका दूर केली नाहीस तर तुझे मस्तक धडावेगळं होईल.''

विक्रम उत्तरादाखल म्हणाला, ''हिमकरने मधुमतीशी विवाह केला नाही याचे कारण हे अजिबात नाही. त्याला आधी अदृश्य शक्तीवर विश्वास बसला. त्याला वाटले त्याच्या अदृश्य शक्तीमुळे भद्रवर्मा पाण्यात बुडेल. पण त्याऐवजी जेव्हा तो स्वतःच बुडु लागला तेव्हा त्याचा अदृश्य शक्तीवरुन विश्वास उडाला. स्वतःच्या अदृश्य शक्तिवरुन विश्वास उडल्यावर, एखादा दुसऱ्याच्या अदृश्य शक्तिवर विश्वास का ठेवेल? म्हणून तो भद्रवर्माला जराही घाबरत नव्हता. हिमकरला वाटले मधुमती त्याला प्रेम करते. पण नाव उलटल्यावर त्याच्याकडे वळूनसुद्धा न बघता ती पोहत किनाऱ्यावर पोहोचली आणि तिने स्वतःचे प्राण वाचवले. त्यामुळे त्याला समजले की तिचे हिमकरवर प्रेमच नाही. अशा परिस्थितीत हे म्हणणं बरोबर नाही की पाण्यात बुडताना वाचवल्यामुळे कृतज्ञतेने प्रेरित होऊन त्याने आपल्या प्रेमाचा भद्रवर्मासाठी त्याग केला.''

राजाचं मौन भंग करण्यात सफल झालेला वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा झाडावर जाऊन बसला.

**(आधार : शारदा रमेश पंतची कथा)**





# हट्ट परंतु सत्य

**सी**तापुरच्या सीतारामचा विश्वास होता कि वादविवादात तो कोणालाही हरवू शकतो. पण गावातल्या लोकांचे मत आहे की त्याच गावात रहाणारा राजाराम हट्टी आहे आणि कोणालाही हरवण्याची योग्यता त्याच्यात आहे.

एके दिवशी सीताराम आणि राजाराम शेतात भेटले. कोणत्याही प्रकारे वादविवाद करण्यास उतावीळ असणाऱ्या सीताराम ने म्हटले, ''दररोज तुझ्या बकऱ्या माझ्या शेतात घुसतात आणि चरत असतात. त्यासाठी तुला, मला नुकसान भरपाई द्यावी लागेल. जर तू नाही दिलीस तर मी ग्रामाधिकारीकडे तुझी तक्रार करेन.''

''जनावर गवत खातात किंवा झाडपाला खातात. तुझ्या शेतात तर हे दोन्ही नाही. म्हणून तुझ्या तक्रारीला तर आधारच नाही.'' राजाराम म्हणाला.

सीताराम ने म्हटले, ''तिकडे बघ, जनावरं गवत चरत आहेत.''

राजाराम ने वळुन बघितले तर काही गाई गवत खात होत्या.

''जनावर म्हणजे मला बकऱ्या म्हणायचं होतं. आपण दोघे तर बकऱ्यांविषयीच बोलत होतो ना? तिथे तर गाई चरत आहेत.'' राजाराम म्हणाला.

हट्टाने सीताराम म्हणाला, ''माझ्या बरोबर चल, तुला मी बकऱ्या पण दाखवतो.'' दोघेही थोड्या अंतरावर गेले. गायींच्या मागे त्यांना एक बकरी दिसली. सीताराम लगेच म्हणाला, ''बघ, ही बकरी, ती पण चरायलाच आली आहे.''

''काय माहिती ती कशाला इथे आली आहे? जोपर्यंत मी माझ्या डोळ्याने काही बघत नाही तोपर्यंत कुठल्याही गोष्टीवर विश्वास ठेवत नाही'' राजाराम ने सांगितले.

''ठिक आहे. आता तू स्वतःच बघशील'' असे म्हणत त्याने त्या. बकरीला जवळच

असणाऱ्या काकडी आणि वांग्याच्या रोपटांकडे हाकलले. बकरीने लगेच डोके खाली घालून त्या रोपट्यांची पाने खायला सुरुवात केली. सीताराम ने मोठ्या गर्वाने विचारले, ''बोल, आता काय म्हणतोस तू?'' ''मी तर माझ्या बकऱ्यासंबंधी बोललो होतो, ही माझी बकरी नाही.''

तेवढयात राजारामचा नोकर बकऱ्या घेऊन तेथून चालला होता. सीतारामने लगेच म्हटले, ''आता सांग, ज्या बकऱ्या तो घेऊन जात आहे त्या तुझ्या आहेत कि नाही?''

राजाराम गंभीर स्वरात उत्तरला, ''हो, माझ्याच आहेत.'' सीताराम ने नोकराला बोलावून विचारले, ''अरे, तू मला सांग की ह्या बकऱ्या वांगी, काकडी, तुरी ह्या झाडांची पाने खातील की नाही?'' नोकर म्हणाला, ''का नाही खाणार? बाबा, तुम्हाला माहित नाही? बकऱ्या कापसाच्या झाडाच्या पानाशिवाय सगळी पाने खातात.

''मग एकदा त्यांना चाखून तरी बघ; तुझे मालक स्वतःच बघतील.'' सीताराम नोकरास म्हणाला स्वतःचे नुकसान् होईल याची पण त्याला काळजी नव्हती. त्याला गावातल्यांना दाखवून द्यायचे होते कि मी राजारामला हरवले.

नोकराने भाज्यांच्या झाडांकडे बकऱ्यांना हाकलले. त्या मोठ्या आनंदाने शेपूट हलवत चरु लागल्या. तेव्हा सीतारामला वाटले त्याने राजारामला हारवले. मोठ्या उत्साहाने टाळ्या वाजवत तो म्हणू लागला, ''बघ राजाराम, तुझ्या स्वतःच्याच डोळ्याने बघ. ह्याच्यापेक्षा मोठा पुरावा तुला काय पाहिजे? तुझ्या बकऱ्या माझ्या शेतात चरत आहेत. आता तुझे काय म्हणणं आहे?''

''मी त्या बाजूला बघणारच नाही.'' राजाराम म्हणाला. ''मग तू मान्य केलेस की माझा आरोप चुकीचा नव्हता?'' सीताराम ने विचारले.

''कसे मान्य करु? मी तर पहिलेच सांगितले की जोपर्यंत मी माझ्या डोळ्याने बघत नाही तोपर्यंत तुझे म्हणणे खरं मानण्याचा प्रश्नच येत नाही.'' राजाराम ने म्हटले. त्याच्या उत्तरामुळे सीतारामला समजून चुकले की राजारम हट्टी नाही. त्याची अक्कल खरी आहे.तो खरोखरीच चतुर आणि बुद्धिवान आहे. हे सत्य जाणल्यावर सीतारामने हार मानली.



# समुद्र किनाऱ्यावर सहल - ९

आलेख : मीरा नायर ♦ चित्र : गौतम सेन




मल्पे किंवा उद्यावर नदी जिथे अरब समुद्राला मिळते तेथे घनदाट नारळाच्या बागा असलेले मल्पे बंदर आहे. मल्पे हे बंदर दक्षिण कर्नाटकाचा भाग आहे आणि मोठे मच्छिमारी केंद्र आहे.

येथील निसर्गसौंदर्य बघण्यासारखे आहे. बंदराच्या पश्चिमेला तीन भाग आहेत. त्यातील एकाचे नाव 'कोकोनट द्वीप' आहे. आणि त्यावर ज्वालामुखीचा उद्रेक होऊन निर्माण झालेला नैसर्गिक स्तंभ आहे. हा भाग राष्ट्रीय वैज्ञानिक स्मारक म्हणून घोषित केलेला आहे. हे स्तंभाकार शिखर जवळजवळ ६ करोड वर्षांपूर्वी ज्वालामुखीच्या उद्रेकामुळे निर्माण झाले.

मल्पेहून चार कि.मि. दक्षिणेकडे प्रसिद्ध तीर्थस्थान 'उडुपि' आहे. ज्याचे पूर्वीचे नाव 'रजताद्रिपुर' होत असे सांगितले जाते. ७०० वर्षांपूर्वी पहिले महान वैष्णव संत आणि श्रीमध्वाचार्यांनी येथे आठ मठांची स्थापना केली होती. त्यांना 'पर्यायमठ' म्हणतात. येथे श्रीकृष्णाचे देऊळ आहे आणि देवाची मूर्ति मुख्यप्रवेशद्वाराच्या दिशेला नाही तर एका झरोक्याच्या दिशेला तोंड करुन उभी आहे. त्यासंबंधी एक आख्यायिका आहे.

सोळाव्या शतकातील कानडी संत-कवि कनकदास येथे देवदर्शनासाठी आले होते. ते सेनापती होतेपण जातीने धनगर होते. पुजाऱ्यांनी त्यांना आत जाण्यास मनाई केली. तेवढेच नाही तर देवळाच्या मुख्य प्रवेशदाराजवळ उभे राहून दर्शन घेऊ देण्यास सुद्धा परवानगी दिली नाही. म्हणून देवाच्या मूर्तीने आपले तोंड



श्री मध्वाचार्यांची मूर्ती

कोकोनट आयलंड वर ज्वालामुखीचा शिलास्तंभ



**उडुपिचे श्रीकृष्ण मंदिर**

एका झरोक्या कडे फिरवले, ज्यामुळे कनकदास देव-दर्शन करु शकले. त्याच झरोक्याला आज 'कनकन किंडी' (कनकाचा झरोका) असे म्हणतात.

तशी वर्षभर उडुपि मध्ये भक्तांची गर्दी असते पण दोन वर्षांतून एकदा होणाऱ्या पर्यायोत्सवासाठी श्रद्धाळु लोकांची जी गर्दी उसळते ती बघण्यासारखी असते. तेव्हा मंदिराची व्यवस्था एका मठाकडून दुसऱ्या मठाकडे सोपवली जाते.

उडुपि हे एक शिक्षण केंद्र आणि बँकिंग केंद्र म्हणून सुद्धा प्रसिद्ध आहे.

उडुपिच्या आग्नेय किनाऱ्यापासून थोड्या अंतरावर जैन लोकांची दोन थोडी धार्मिक स्थळं आहेत - कार्कल आणि मूडबिद्री. कार्कलमध्ये १२.८ मीटर उंचीची गोमतेश्वर म्हणजे बाहुबली ची मूर्ती आहे जिची स्थापना इ.स. १४३२ मध्ये झाली होती. प्रसिद्ध शिल्पकार स्व. रंजाल गोपाल शेणॉय
इथलेच रहिवासी होते. श्री.शेणॉय ह्यांनी दगडात कोरून केलेल्या

**मूडबिद्रीचे हजार स्तंभाचे जैन मंदिर**



विशाल मूर्ती देशाच्या निरनिराळ्या भागात आढळतात. एक तर जपानमध्ये सुद्धा आहे.

(मूडबिद्रीचे हजार स्तंभाचे जैन मंदिर)

(उडुपिपासून नैर्ऋत्येकडे चार कि.मी. अंतरावर श्री माध्वाचार्यांचे जन्मस्थळ आहे - उद्यावर. येथे त्यांची मूर्ती आहे.)

मूडबिद्रीला जैन धर्मियांची काशी असे म्हटले जाते. येथे एकूण १८ बसदी (जैन मंदिर) आहेत. त्यापैकी सगळ्यात प्रसिद्ध आहे 'त्रिभुवनतिलक चूडामणि बसदी, जिला हजार स्तंभवाली बसदी म्हटले जाते. अखंड दगडात बनलेले स्तंभ आणि रत्नजडित तीर्थकरांच्या मूर्ती हेच ह्या देवळाचे मुख्य आकर्षण आहे.

सोळाव्या शतकातल्या जैन कानडी कवी रत्नाकर वर्णी ह्यांनी आपले महाकाव्य, 'भरतेश-वैभव' - ची रचना मूडबिद्री मध्येच केली, असे म्हटले जाते. मूडबिद्रीच्या नैर्ऋत्येला आहे मंगलूर. दहाव्या शतकातल्या मंगलादेवी नावाच्या राणीमुळे ह्या शहराचे नाव 'मंगलूर' पडले असे मानले जाते. तस बघितले तर दुसऱ्या शतकापासूनच हे बंदर व्यापक आणि समृद्ध होते. टिपू सुलतानाने येथे रेशीम-उद्योग चालू केला आणि तेव्हापासून मंगलूर रेशिमासाठी



**गोमटेश्वराची मूर्ती कार्कल**

**मंगलूर हे शहर आणि ह्या नद्यांच्या संगमावर बसलेले आहे.**



प्रसिद्ध झाले.

मंगलूर हे कर्नाटकधील उच्च शिक्षणाचे महत्त्वपूर्ण केंद्र आहे. व्यापार आणि उद्योग ह्याचे महत्त्वाचे केंद्र आहेच शिवाय कर्नाटकाचे एकमेव मोठे बंदर आहे.

७६० कि.मी. लांब कोकण रेल्वे जी समुद्रकिनाऱ्याला लागून सुरु केली जाणार आहे, त्यामुळे मंगलूर आणि मुंबई जोडले जातील. तो रेल्वेमार्ग सुरु झाल्यावर मुंबईहून फक्त १८ तासात मंगलूरला पोहोचता येईल. सध्या ४९ तास लागतात.

मंगलूरहून ८ कि.मी. दक्षिणेला उल्लाल आहे. येथे कर्नाटकची समुद्रकिनाऱ्याची हद्द संपते. हे छोटे से शहर रुपेरी वाळू साठी प्रसिद्ध आहे. १७ या शतकाच्या उत्तरार्धात अब्बक्का नावाची शूर राणी राज्यकार भार करीत होती. राजगादीवर आल्याबरोबर तिने पोर्तुगीजांना कर देण्याचे बंद केले.

त्या काळात पोर्तुगीजांचा अरबी समुद्रात दबदबा होता. ते कर वसूली केल्याशिवाय दुसऱ्या जहाजांना येजा करुन देत नसत. पण अब्बक्का राणीने त्यांच्या धाकाला न जुमानता आपली जहाजे व्यापार करण्यासाठी अरब देशी रवाना केली. पोर्तुगीजांनी उल्लालवर हमला केला, पण राणी आणि तिच्या वीर सैनिकांनी पोर्तुगीजांना हाकलून लावले.

वीर राणी अब्बकाने पोर्तुगीजांना पाणी पाजले.







# अन्नदानाची महिमा

सूरदास खूप दानशूर होता. गंगानदीच्या काठची जमिन खूप सुपिक होती. दूर दूरच्या भागातून लोक येथील शेतात काम करण्यासाठी येत असत. याच भागातील शेतीत काम करण्यासाठी येण्याचे मुख्य कारणहोते - सूरदास करीत असलले अन्नदान. मोलमजूरी करून थकलेल्या-भागलेल्या ह्या गरीब शेतमजुरांना सूरदास मोफत जेवण देत असे.

तो मजुरांना म्हणत असे, ''लाजू नका. आरामात आणि पोटभर जेवा. शेवटी तुम्ही पण मजुरी करता ती वीतभर पोटासाठीच ना? तुम्हाला खायला घातल्याने माझे काही नुकसान होणार नाही.

कोणीही वाटसरु असो किंवा यात्रेकरु असो मध्यरात्री जरी दार ठोठावले तरी प्रेमाने सूरदास त्याचे स्वागत करी आणि त्याला जेवायला देत असे.

एके दिवशी नीलकंठ नावाचा एक श्रीमंत सूर्यास्तानंतरच्या सुमारास त्या गावात आला. त्याला ज्या गावाला जायचे होते ते गाव अजून चार मैल लांब होते. म्हणून रात्री इथेच मुक्काम करायचा असे त्याने ठरवले.

त्या श्रीमंताने आपल्या गाडीवानाला सांगितले की तू जरा जाऊन बघून ये की इथे जेवण कुठे मिळेल? तेव्हा गाडीवान म्हणाला, ''मालक, जिथे सूरदाससारखा दानी रहातो तेथे जेवणाची काय कमतरता? दुसरीकडे कुठे जेवण मिळण्याची शक्यता कमीच आहे. आपल्याला सूरदासच्या घरीच जावे लागेल.''

नाइलाजाने नीलकंठला सूरदासच्या घरी जावे लागले. दार बंद असल्यामुळे बाहेर पडवीत असलेल्या खुर्चीत तो बसून राहिला.

थोड्या वेळाने दार उघडून सूरदास जेव्हा बाहेर आला तेव्हा नीलकंठ त्याला म्हणाला,

नाग शिरीष



''मी आणि माझा गाडीवान, आम्हांला दोघांना जेवण पाहिजे. पैशाची काळजी करु नका. रुचकर जेवण तयार करा. दोन-तीन प्रकारच्या भाज्या करा. माझे नाव नीलकंठ आहे, मी विष्णुपुर गावाचा आहे, तेथील जमिनदाराशी जवळचे नाते आहे माझे. जेवण माझ्या दर्जाला शोभेल असे पाहिजे.''

या श्रीमंताच्या बोलण्याने चिडलेला होता तरी हसत हसत सूरदास म्हणाला, ''माझ्या दृष्टीने घरी आलेला अतिथि साक्षात श्री नारायणाप्रमाणे आहे.

श्रीमंत असो किंवा गरीब, एकत्र बसून जेव्हा पूर्णब्रह्मरुप अन्न ग्रहण करतात तेव्हा मला अपार आनंद होतो. माझे जीवन सार्थकी लागते. माझ्या आजोबा पणजोबांनी माझ्या साठी भरपूर संपत्ति साठवून ठेवली आहे. जे सगळ्यांना जेवायला देतो ते तुम्हाला सुद्धा देईन. तुमची आणि गाडीवानाची भूक एकसारखी आहे. जेव्हा भुकेचा स्वतःचा असा दर्जा नाही, तेव्हा तुम्ही मनुष्य असून अशा दर्जाची कल्पना मनात बाळगता हे ऐकून मला आश्चर्य वाटते. माझ्या घरी अन्न विकले जात नाही. श्रीमंत गरीब, उच्च-नीच हे दर्जे विसरुन सगळ्यांना एकाच पंक्तित बसवून मी अन्नदान करतो. तुम्हीपण पाय धुवून घ्या आणि जेवायला चला.''

सूरदासाची दानशूरता बघून नीलकंठाला आपल्या अहंकारी वृत्तीची लाज वाटली. तो म्हणाला, ''तुमच्यासारख्या दानी व्यक्ति पुढे मी काहीच नाही. मला क्षमा करावी.'' मग तो पोटभर जेवला आणि बाजूलाच बसलेल्या गाडीवानाला म्हणाला, ''थोडावेळ विसरुन जा कि मी तुझा मालक आहे.'' असे म्हणत गाडीवानाचे जेवण पूर्ण होइपर्यंत तो त्याच्या बाजूला बसून राहिला. दुसऱ्या दिवशी सकाळी त्याने सूरदासचे आभार मानले आणि निघाला.

गाडी गावाबाहेर आली. आता ती नदीच्या पुला वरुन जात होती. तेवढ्यात गाडीवानाला दुर्बुद्धि सुचली. त्याने गाडी थांबवली आणि नीलकंठला गाडीतून उतरावयास सांगितले. नीलकंठ विचारात पडला की हा कशाला मला उतरायला सांगतोय. उतरल्याबरोबर गाडीवानाने दरडावून सांगितले, ''मलाआता कोणाचाही नोकर बनून रहायचे नाही. मला कळले की सहज सोप्या रितीने श्रीमंत कसे व्हायचे. तुझ्याजवळ जेवढा काही पैसा-अडका आहे ताबडतोब काढून मला दे.''



घाबरत घाबरत नीलकंठ म्हणाला ''लुटलेले धन चंचल असते. तुला जर वाटत असेल की ह्या पैशामुळे मी श्रीमंत होईन तर हा तुझा गैरसमज आहे. घरी गेल्यावर, चांगल्या मार्गाने, नीतिने पैसे कमवण्यासाठी जेवढे पैसे पाहिजे तेवढे मी तुला देईन.'' परंतु लालचेपायी त्याने नीलकंठचे ऐकले नाही. त्याच्याकडून जबरदस्ती त्याचे धन काढून घेऊन त्याला वाहत्या नदीत ढकलून दिले आणि तेथून पळून गेला.

काही दिवसानंतर तो रामनगरच्या जमिनदाराच्या शहरात पोहोचला. तेथे त्याने नीलकंठला लुटलेल्या पैशातून एक छोटासा व्यापार सुरु केला. थोड्याच काळात तो श्रीमंत झाला आणि शहरातील प्रमुख लोकांमध्ये त्याचे नाव घेतले जाऊ लागले.

परंतु हळूहळू त्याच्या मनात केलेल्या पापाची भीती डोकावू लागली. म्हणून तो रोज दोन गरीबांना मोफत जेवण देऊ लागला. तो स्वतःशीच मनात म्हणत असे, ही पुण्याई माझे रक्षण करेल.

नदीत पडलेला नीलकंठ मरुन गेला पण त्याच्या आत्म्याला गाडीवानाशी बदला घ्यायचा होता. म्हणून तो पिशाच्च बनला. पिशाच्च रामनगरला पोहोचले. त्याने बघितले गाडीवान तर खूप वैभवसंपन्न जीवन जगत आहे. त्याला भयंकर राग आला. गाडीवान भारी कपडे घालून जमिनदाराच्या गादीवर एका उंच आसनावर बसला होता. त्यावेळी त्यांच्यात भूत-पिशाच्च यावरच चर्चा चालू होती. लोक-भूत पिशाच्चच्या अस्तित्वावर आपापले मत व्यक्त करीत होते.



पिशाच्च बनलेल्या नीलकंठला वाटले हीच संधि आहे. बघता-बघता तो गाडीवानात सामावून गेला. बस, यानंतर गाडीवानात जमिन-आसमानचा फरक दिसायला लागला. तो उठून उभा राहिला आणि म्हणू लागला, ''बघा-बघा पिशाच्च आलंय. तुमच्याच्याने होत असेल तर माझे ह्याच्यापासुन रक्षण करा,'' तो आरडाओरडा करु लागला.

सुरुवातीला लोकांना गंमत वाटली. पण थोड्या वेळाने भीती वाटायला लागली. जेव्हा त्यांची खात्री झाली की ह्याच्यात पिशाच्च संचारले आहे तेव्हा जमिनदारा सकट सगळे थरथर कापायला लागले. तेथील भूत वैद्याला निरोप पाठवण्यात आला. त्याने आपल्या

मंत्र-तंत्र विद्येने नीलकंठ पिशाच्चाशी संवाद साधला. मग त्यांना समजले की गाडीवानने नीलकंठवर किती अत्याचार केले.

मांत्रिकाने पिशाच्चला म्हटले, ''ए पिशाच्चा, जे झालं ते झालं, ह्या गाडीवानाला आम्ही कडक शिक्षा देऊ. तू ह्याला सोडून जा.'' ह्यावर पिशाच्च मोठ्यांदा हसत हसत म्हणाला, ''ह्या दुष्टाचे शरीर मला नकोच. ह्या पिशाच्चाच्या रूपातून मुक्ति मिळण्यासाठी एकच मार्ग आहे. सूरदासने इथे यावे आणि ह्या नीच माणसाला केलेल्या अन्नदानाचे फळ मला द्यावे.''

''सूरदासाला तेथे बोलावण्यात आले. त्याला बघताच गाडीवानाच्या शरीरातील पिशाच्चाने त्याला नमस्कार केला. आणि म्हणाला, ''महाशय, आपल्याला हे सिद्ध करून दाखवावे लागेल की अयोग्य व्यक्तिला अन्न दिले तरी ते उत्तम दान मानले जाईल ह्या गाडीवानाला अन्नदान करून जे पुण्य तुम्हाला मिळाले ते तुम्ही मला द्यावे आणि मला ह्या पिशाच्चरूपातून मुक्त करावे.''

सूरदास म्हणाला, ''मला अन्नदानाच्या महिमेबद्दल मला काही माहित नाही. श्रीमंत वा गरीब, चोर किंवा भिकारी त्याची भूक भागवावी हाच माझा उद्देश आहे. फळाच्या अपेक्षेने मी अन्नदान कधी केले नाही. परंतु खरच अन्नदानात महिमा असेल तर तुला ह्या पिशाच्च रूपातून मुक्ति मिळेल.'' पिशाच्च म्हणाला, ''धर्मात्मा, भूक खूप वाईट असते. ती सद्सद् विवेकबुद्धी नष्ट करते आपण आपले अन्नदानाचे पुण्य माझ्या पदरी घालून माझे रक्षण केले. अन्नदानाची महिमा जगाला कळावी म्हणून मी ह्या मनुष्य पिशाच्चाच्या शरीरात प्रवेश केला. माझे काम झाले. आता मी जातो.''

पिशाच्च गेल्यानंतर गाडीवान बेशुद्ध पडला. थोड्यावेळाने शुद्धीत आल्यावर त्याला सर्व हकीगत कळली. त्याला खूप पश्चाताप झाला. त्याने आपली सारी संपत्ति जमिनदाराच्या सुपूर्द केली आणि तो सूरदासाबरोबर त्याच्या गावी गेला. तेथे अन्नदानात सूरदासाला मदत करु लागला.

जेजे येत त्याला तो अन्नदानाची महिमा सांगायचा आणि म्हणायचा, ''भुकेल्या लोकांना अन्न द्या. कष्ट करा, अन्नदान करून आपल्या कमाईचा सदुपयोग करा.''



चांदोबा



# सोनेरी क्षण

## दहा कवट्या



कोशल राज्यात दुष्काळ पडल्यामुळे आदित्य महाराज कपाल मुनींचे सहाय्य मागण्यास गेले.












# सोनेरी क्षण



# प्रश्नावलि

1 भगवान बुद्ध जेव्हा कोसल राज्यातल्या अरण्यातून जात होते तेव्हा अंगुलीमाल नावाच्या एका भयंकर लुटेऱ्याने त्यांना थांबवले. अंगुलीमालने निश्चय केला कि माझ्या पद्धतीनुसार बुद्धाला मारून टाकून त्याचा अंगठा मी माझ्या गळ्यातील माळेत घालेन. परंतु भगवान बुद्धांनी त्याला प्रभावित केले आणि त्याला त्याची चूक उमगली. बुद्धांनी त्याला सद्भावनेने जाण्यास प्रोत्साहित केले. तो एक संन्यासी झाला.
अंगुलीमाल ह्या नावाने ओळखल्या जाण्या आधी ह्या लुटेऱ्याचे नाव काय होते?



2 सर्वात पहिल्यांदा ऑस्ट्रेलियामध्ये जाऊन वसति करणारे युरोपियन लोक आपल्याबरोबर एका जनावराला घेऊन गेले. ते जनावर आता देशातील पिकांचे नुकसान करीत आहेत. त्यातल्या त्यात, मुख्यत्वेकरून तिथले शेतकरी आपल्या गाई आणि बकऱ्यांना जो चारा खाऊ घालतात त्या चाऱ्याचे ते नुकसान करीत आहेत. ह्या जनावरापासून आपल्या गवताचे रक्षण करण्यासाठी तेथील शेतकऱ्यांनी आपल्या शेताभोवती मोठे कुंपण बांधले आहे. त्या जनावराचे नाव काय?

3 लंडनच्या व्हिक्टोरिया अँड अल्बर्ट म्युझियममध्ये खऱ्याखुऱ्या वाघाच्या आकाराएवढाच एक लाकडात बनवलेला वाघ आहे. हा वाघ एका ब्रिटीश सैनिकाच्या अंगावर मारायला धावून जात आहे असे दाखवले गेले आहे. जवळच असलेल्या खुंटींना फिरवल्यास वाघ डरकाळी मारतो आणि दुःखाने कण्हत असलेला सैनिक हात वर उचलतो. हा वाघाचा लाकडी पुतळा कोणाचा आहे?



4 एका खणात ६ पांढरे, ६ काळे एकूण बारा मोजे आहेत. दिवे गेल्यामुळे खोलीत अंधार झाला. काळे किंवा पांढरे एक जोडी मोजे घेण्यासाठी तुम्हाला किती मोजे घ्यावे लागतील?





5 सोमणची नौका किनाऱ्यावर पोहचली. त्याने जवळच उभ्या असलेल्या हत्तीला बघितले. त्या हत्तीच्या मालकाला तो ओळखत होता. त्याला सोमणने विचारले हत्तीचे वजन किती आहे? त्याने म्हटले 'मला माहित नाही कि त्याचे किती वजन आहे? पण तू मला सांगू शकला तर मी तुला हत्तीवर बसून चक्कर मारायला परवानगी देईन. सोमणकडे, फक्त ५० किलो वजन करू शकण्याइतकीच 'वेईंग मशिन' होती. मग त्याने हत्तीचे वजन कसे मोजले?



6 एका लोहाराने तोफेचे ८ गोळे तयार केले. वरवर पहाता सर्व एकसारखे दिसत होते. त्यातील सात एकसारख्या वजनाचे होते. एक मात्र इतर गोळ्यांपेक्षा हलका होता. जर तुम्हाला सांगितले कि तराजूच्या दोन पारड्यांमध्ये ठेवून कुठला गोळा हलका आहे हे सिद्ध करा तर तुम्ही काय कराल? कसे सिद्ध कराल?



7 प्राचीन इजिप्तमध्ये मृतदेहाला पुरताना त्यांच्या हातात चांदी आणि तांब्याचे नाणी ठेवीत असत. तुम्हाला माहित आहे असे का करीत होते?

## स्नॅपी भेटकार्ड पाठवा



१२ से.मी. x ८ सें.मी. मापाचा एक पुठ्ठा घ्या. मध्यभागी तीन मि.मी. रुंद खाच आकृतित दाखवल्याप्रमाणे कापा.



६ से.मी. ८ सें.मी. मापाचा अजून एक पुठ्ठा कापा. आणि मध्यभागी चिटकवा.



नंतर चिटकवलेला पुठ्ठा खाचेच्या विरुद्ध दुमडून रबर बँड लावा. ते खूप घट्ट किंवा सैल असू नये.




रबरबँडचा आणि खाचेचा भाग सोडून त्यावर दोन कागद चिकटवा. त्या कागदावर शुभकामना लिहा.




'स्नॅपर' पेक्षा मोठे भेट कार्ड तयार करा आणि आतमध्ये हे 'स्नॅपर' चिकटवा



आता स्नॅपर उलटा दुमडून कार्डमध्ये ठेवा. भेट कार्ड बंद करून लिफाफ्या-मध्ये घाला. आणि मित्रांना पाठवून त्यांना आश्चर्यचकित करा.






## व्हॅन चे चित्र ... तीन सोप्या पायऱ्यांमध्ये








दुःशासनच्या प्रेरणेने दुर्योधन आपले पिता धृतराष्ट्र यांच्याकडे जाऊन म्हणाला, ''पिताश्री, द्यूतामध्ये आम्ही जेकाही जिंकलो ते सर्व तुम्ही घालवलं. युद्धामध्ये पांडव नक्कीच आमचा सर्वनाश करतील. त्यांचे सामर्थ्य अफाट आहे. त्यांना पुन्हा द्यूत खेळण्यासाठी बोलवावे. यावेळी त्यांना द्यूतामध्ये हारवून बारा वर्षाच्या वनवासासाठी पाठवू या. त्यांचा वनवास संपायच्या अवधीत आपण इतर देशातील राजांना वश करुन घेऊ या मग युद्ध झाले तर पांडवांना सळो की पळो करुन सोडता येईल.''

धृतराष्ट्राने या म्हणण्याला मान्यता दिली. भीष्म, द्रोण, विदुर ह्यांनी मात्र सक्त विरोध दर्शविला. गांधारीने सक्त मनाई केली. तिने स्पष्टपणे सांगितले कि ह्यामुळे कौरवांचा सर्वनाश होईल. धृतराष्ट्र आपल्या पत्नीला म्हणाला, ''कुळाचा नाश झाला तरी चालेल पण हे द्यूत थांबवणे आता माझ्याच्याने होणार नाही.'' त्याने द्यूताचे आमंत्रण देण्यासाठी प्रतिकामीला पाठवले.

धर्मराजाला माहित होते की परत द्यूत खेळणे धोक्याचे आहे, तरीसुद्धा आपल्या भावांना आणि परिवाराला घेऊन तो हस्तिनापुरला पोहोचला.

द्युतास सुरुवात व्हायच्या आधीच शकुनी धर्मराजाला म्हणाला, ''यावेळी खेळल्या जाणाऱ्या द्यूताच्या अटी अशा आहेत - जो हरेल त्याला वल्कलं नेसून बारा वर्षासाठी वनवास भोगावा लागेल. वनवास संपल्यानंतर एक वर्ष अज्ञातवासात रहावे लागेल. अज्ञातवासाच्या दरम्यानच्या काळात जर ते कोणाला दिसले किंवा प्रगट झाले तर परत बारा वर्षाचा वनवास आणि एक वर्षाचा अज्ञानवास भोगावा लागेल. तेरा वर्षानंतर आपापला राज्यकारभार सांभाळायचा



अधिकार त्यांना प्राप्त होईल.''

शकुनीने सांगितलेल्या अटी ऐकून सभेतील सर्व उपस्थितांमध्ये भीती दाटून आली. काही सभासद क्रोधित झाले. रागाने ओरडून म्हणाले, ''धृतराष्ट्र बुद्धिहीन झाला आहे. तो आपल्या पुत्राच्या हातातील कठपुतळी झाला आहे. तो जसा नाचवतोय तसा धृतराष्ट्र नाचतोय.''

धर्मराजाने सगळं ऐकून घेतले आणि शकुनीला म्हणाला, ''राजधर्माचे पालन करण्याची मी शपथ घेतली आहे. ती शपथ पाळण्यासाठी मी कुठल्याही परिस्थितीत मी वचनबद्ध आहे. मग त्यामागे दुष्टयोजना असल्यातरीही मला द्यूत खेळावेच लागेल कारण तीच राजनीती आणि क्षत्रिय धर्म आहे.''

शकुनीने द्यूतास सुरवात करण्यासाठी कवडया टाकल्या धर्मराज हरला.

अटी प्रमाणे धर्मराज, त्याचे भाऊ आणि पत्नी द्रौपदी वल्कलं नेसून वनवासासाठी निघाले. त्यांना बघून दुःशासन म्हणाला, ''बऱ्याच वर्षानंतर पांडवांच्या दुःखद काळाचा प्रारंभ बघायला मिळाला. हे दृश्य बघून माझा जन्म सार्थकी लागला. आता दुर्योधनचा मार्ग मोकळा आहे. त्याला बाधा आणणारे कोणी नाही. आपल्या ऐश्वर्याची घमेंड दाखवून पांडवांनी आमचा अपमान केला. त्यांच्या दृष्टिने आमचे अस्तित्वच नव्हते. आता त्यांचा उचित पराभव झाला आहे. आता ते वनातील प्राण्यांप्रमाणे जगतील. आमच्यासारखे संपन्न, सुखी आणि समर्थ आता इतर कोणीही उरले नाही,'' मग त्याने द्रौपदीला म्हटले, ''पांचाली, ह्या दरिद्री पांडवांबरोबर जाऊन वनातील कष्टमय जीवन जगण्यापेक्षा तू आमाच्यापैकीच कोणाशी विवाह कर आणि सुखाने राजवैभव भोगत आयुष्य घालव.''

ह्यागोष्टी ऐकल्यावर भीम रागाने उसळून सिंहासारखा गरजला, ''अरे नीच, पापी, दुष्ट, शकुनीच्या मायावी बळावर जिंकून जे तोंडाला येईल ते बडबडतोस? जेव्हा युद्धात मी तुझ्या शरीराचे एक एक अवयव तोडून दाखवेल तेव्हा तुला समजेल की आता तू जी बडबड करतो आहेस त्याला माझे उत्तर कसे असेल. केवळ तुझाच नाही, तर तुझ्या आश्रयाला आलेल्या सर्व दुष्ट लोकांचा मी सर्वनाश करेन. त्यांना यमसदनी पाठवेन, ही माझी प्रतिज्ञा आहे.''



दुर्योधनाकडे वळून भीम म्हणाला, ''अरे मूर्खा, अजून काहीही झालेले नाही. ह्यापुढे बघ, काय घडेल ते. ज्या दिवशी युद्धात मी तुझा संहार करेन तेव्हा ह्या सर्व गोष्टींचं उत्तर तुला मिळेल.''

द्यूत कक्षातून बाहेर निघताना मागे वळून त्या सभामंडपात बघत भीम म्हणाला, ''लक्षात असू द्या. ह्या पापी दुर्योधनाला मी युद्धात भयंकर प्रकारे मारणार आहे. ह्याचा मित्र असलेला दुराभिमानी कर्णाला अर्जुन मारेल आणि ह्या कपटी शकुनीला सहदेव ! ह्या दुष्टांच्या समूहाचा संहार आमच्याच हाताने होणार आहे. हे विधिलिखित आहे. ते कोणी टाळू शकणार नाही किंवा ह्यांना कोणी वाचवू शकणार नाही.'' अर्जुनाने भीमाला मध्येच अडवीत म्हटले, ''ह्या व्यर्थ बोलण्याने काय मिळणार आहे? चौदा वर्षानंतर जे करणार आहे, ते आत्ताच बोलायची काय आवश्यकता आहे? ते पण जर ह्या दुष्टांनी आपल्याला आपलं राज्य दिले नाही तरच शक्य आहे. मग जर ह्यांनी राज्य दिले नाही तर मात्र तू जे म्हणतो आहेत ते अवश्य होईल. पण आता तू शांत हो, आणि चल.''

सहदेवाने शकुनीला म्हटले, ''अरे नीच, कवडयांनी धोका देऊन तू तुझे रूप आम्हाला दाखवलेस. हिम्मत असेल तर युद्धभूमि वर तुझा पराक्रम दाखव. भीमाने म्हटल्याप्रमाणे मी तुझा सर्वनाश करेन. तोपर्यंत तुला जे करायचे आहे ते करुन मृत्यूची वाट बघत बस.''

नकुल क्रोधित होऊन म्हणाला, ''ज्यांनी



ज्यांनी या सभेत द्रौपदीचा अपमान केला आहे त्यांना कीटकांप्रमाणे चिरडून टाकून मृत्यूदंड देऊ. आम्ही उगीच ह्या गोष्टी बोलत नाही तर खरंच हे करणार आहोत.''

अशा प्रकारे पांडवांनी प्रतिज्ञा केल्या. धृतराष्ट्र, भीष्म, कृपाचार्य, द्रोण, अश्वत्थामा, विदुर, संजय ह्या सर्वांचा निरोप घेताना ते म्हणाले, ''आपण परत भेटू.''

दुष्ट कौरवांच्या भीतीने बाकी कुणीच काही म्हटले नाही पण विदुराने धर्मराजाला निक्षून सांगितले, ''छळ-आणि कपटामुळे हरणाऱ्या व्यक्तिला आपल्या हरण्यावर दुःखी होण्याचे काही कारण नाही. अनमोल हिऱ्याप्रमाणे तुझा एकेक भाऊ आहे. सद्गुणांचा पुतळा असणारी द्रौपदी तुझ्या बरोबर आहे. तुला काहीही कमतरता

भासणार नाही. बंधुप्रेमामुळे तुम्हा भावांमध्ये कधी कोणी फूट पाडू शकणार नाही. तुमच्याविरुद्ध कोणीही जिंकू शकणार नाही. तुमच्या मातेचे आता वय झाले आहे. ती आता तुमच्यासह वनवास भोगू शकणार नाही म्हणून मी तिला माझ्याकडे ठेवून घेतो आणि तिचा सांभाळ करतो. माझं म्हणणं ऐका. तुम्ही निश्चिंतपणे जा. तुमचे कल्याण होवो. परत भेटू या.'' अशाप्रकारे त्याने शुभचिंतन आणि सदिच्छा व्यक्त केल्या.

धर्मराज विदुराला म्हणाला, ''आपण आम्हाला पितासमान आणि गुरुसमान आहात. आमचे हितचिंतक आहात. आपण जे म्हणाल तेच आम्ही करु.''

द्रौपदीने अंत:पुरातील कुंती, गांधारी आणि इतर पुण्य-स्त्रियांना नमस्कार केला. कुंती तिला म्हणाली, ''तुला तर माहितच आहे कि पतीबरोबर रहाणे हाच स्त्रीधर्म आहे. म्हणून तू उगीच दुःख करु नकोस. जर तू खरोखरीच क्रोधित नजरेने कौरवांकडे बघितले असते तर ते भस्म झाले असते. मला तुझ्याकडून आश्वासन पाहिजे की सहदेवाची विशेष काळजी घेशील. बाकी चारही भावंडं सशक्त आहेत पण सहदेवाची गोष्ट वेगळी आहे. बालपणापासुन तो नाजूक आहे. वनवासातील कष्ट त्याला झेपणार नाहीत. प्रत्येक बाबतीत त्याची काळजी घे. धर्माचा-सत्याचा विजय होईल आणि तुमचेच कल्याण होईल.''

रडत-रडत द्रौपदी अंत:पुरातून निघाली. तिचे केस मोकळे सोडलेले होते. कुंती तिच्याबरोबर आपल्या पुत्रांकडे आली. त्यांनी सर्वांनी वनवासाला जाण्यासाठी मुनिवेष परिधान केला होता. त्यांना पाहून दुःखाने विकल झालेली कुंती म्हणाली, ''तुम्ही धर्मपरायण आहात. कुठल्याही परिस्थितीत तुम्ही धर्माचा मार्ग सोडला नाही. तरीपण तुम्हाला वनवासाला जावं लागत आहे. मला माहित नाही, देवांचा आशिर्वाद तुम्हाला न मिळाल्यामुळे की माझ्या उदरी जन्म घेतल्यामुळे तुम्हाला हा दंड भोगावा लागत आहे. तुमची ही दुर्दशा बघण्याच्या भीतीनेच कदाचित तुमचे पिता आणि त्याच्याबरोबर माद्री दिवंगत झाली. ते खरंच भाग्यवान आहेत. मी महाभयंकर पाप केले असावे म्हणूनच हे दिवस बघायला जिवंत राहिले. ह्याच्याआधी पण मी तुमच्या दुःखात कष्टदायी जीवनात सहभागी होते. आता मला एकटीला सोडून तुम्ही जाऊ नका. मला सुद्धा तुमच्याबरोबर घेऊन चला. या परिस्थितीत अनाथांचा रक्षणकर्ता कृष्ण सुद्धा काही करु शकत नाही.''

नंतर कुंती सहदेवला म्हणाली, ''तू तरी जाऊ नकोस, तू जरी माझ्याबरोबर राहिलास तर मला वाटेल माझे सर्व पुत्र माझ्याबरोबर इथे आहेत,'' असे म्हणत कुंती व रडू लागली.

विदुराने कुंतीची समजूत काढून तिला आपल्या घरी नेले. पांडवांनी आपल्या मातेला नमस्कार केला आणि ते वनवासाला निघाले. केशसंभार मोकळाच असलेली द्रौपदी पण पांडवांबरोबर निघाली. धर्मराजाने आपला चेहरा कपडयाने झाकून घेतला. आपल्या शक्तिशाली बाहूंकडे बघत भीम जाऊ लागला. अर्जुन जाता जाता रस्त्यावर वाळू भिरकावीत जात होता. नकुलाने आपल्या सर्वांगाला राख फासून घेतली होती. आणि सहदेवाने आपल्या शरीरावर धूळ लावून घेतली.

भीम सगळ्यांच्या पुढे चालत होता. सोबत धौम्य सामगान गात जात होता.

धृतराष्ट्राने विदुराला विचारले, ''पांडव वनवासास कसे गेले?'' त्यावर विदुरानेकोण-कोण कसे-कसे गेले ते सांगितले.

धृतराष्ट्रने विचारले, ''ते असे का गेले?''







''तुमच्या पुत्राने पांडवांवर घोर अन्याय केला आहे. त्यामुळे धर्मराजाच्या चर्येवर क्रोध दाटला होता. त्याला भीती वाटली की त्याच्या ह्या तीव्र क्रोधित दृष्टिने माणसे जळून भस्म होऊन जातील म्हणून त्याने आपला चेहरा कपड्याने झाकून घेतला होता. भीम जाताना आपल्या हाताकडे बघत गेला कारण त्याच्या मनात तुमच्या पुत्रांचा पराभव करण्याची भावना दृढ झाली होती. अर्जुन सगळीकडे वाळू भिरकावीत जात होता कारण त्याला सांगायचे होते कि जशी वाळू भिरकावीत आहे तसाचा मी बाणांचा वर्षाव करेन. लोकांनी आतापर्यंत नकुलाचे सौंदर्य बघितले होते. म्हणून त्याला वाटले लोक त्याच्याविषयी काळजी करतील की हा येणाऱ्या कष्टांना कसा तोंड देईल? सहदेवाने आपले दुःख लपविण्यासाठी अंगाला माती लावली होती. द्रौपदीने ओले वस्त्र घातले होते आणि केस मोकळे सोडले कारण त्याद्वारे तिने सांगितले की चौदा वर्षांनंतर कौरवांच्या सुनांवर हीच दुःस्थिती येईल आणि त्यापण अशाच विलाप करतील. धौम्यच्या हातात कुशाग्र होते. हा भविष्यकाळात होणाऱ्या युद्धात मृत्यू होणाऱ्या मानवांच्या अंतक्रियेचा संकेत आहे. हे स्पष्ट करण्यासाठी तो सामवेदातील यमाला प्रसन्न करण्याचे श्लोक म्हणत होता. राजन् तुझ्या दुर्बुद्धिमुळेच भवितव्यात कौरवांचा विनाश होणार आहे.''

पांडव गेल्यानंतर दुर्योधन, दुःशासन, कर्ण, शकुनी हे चौघेजण द्रोणाचार्यांकडे गेले आणि त्यांना म्हणाले, ''गुरुवर पांडवांकडून प्राप्त झालेल्या राज्यावर तुम्हीच राज्य करावे. त्यासाठी तुम्हीच योग्य आहात. तुमच्या शिवाय दुसरा कोणीही ह्या राज्यपदासाठी योग्य वाटत नाही.''

द्रोणाचार्य म्हणाले, ''पांडवांना हरवणे हे फारच असाध्य कार्य आहे. परंतु मी दुर्योधनालासुद्धा सोडू शकत नाही. कारण त्याची माझ्यावर अपार भक्ति आहे. पांडव नियमांप्रमाणे नक्कीच युद्ध करायला येतील. द्रुपदाचा मी पराभव केला होता पण त्याच्याकडे आता माझा पराभव करणारा यज्ञपुत्र आहे. त्याचप्रमाणे त्याला अर्जुनाला योग्य अशी यज्ञ-कन्या सुद्धा प्राप्त झाली. धृष्टद्युम्न, द्रौपदीच्या विवाहामुळे पांडवांकडून आहे. त्याशिवाय श्रीकृष्णसुद्धा पांडवांच्या बाजूनेच आहे. आणि अर्जुनासारखा रथी-महारथी निःसंशय ह्या भूतलावर नाही. माझा

मृत्यू धृष्टद्युम्नच्या हस्ते होईल हे तर सगळ्यांनाच माहित आहे. ह्या सगळ्याला जबाबदार तुम्ही आहात. मला नको तुमचे राज्य आणि राजवैभव ! तुम्हाला जर करता येत असेल तर करा परोपकार आणि धर्माने, नीतीने वागून दाखवा. तुम्हाला जर क्षणभंगूर सुख हवे असेल तर हे चौदा वर्षे भरपूर उपभोग घ्या. सुख सागरात मनसोक्त डुंबा. त्यानंतर कौरवांचा विनाश निश्चित आहे.''

धृतराष्ट्राने जेव्हा हे ऐकले तेव्हा तो मनातून भयभीत झाला आणि विदुराला म्हणाला, ''विदुर, द्रोणाचार्य म्हणतात त्यात तथ्य आहे. तू आत्ताच अरण्याकडे जा आणि पांडवांना परत घेऊन ये. जर त्यांनी परत येण्यास नकार दिला तर त्यांना सांग सन्मान झाल्यावर परत या.'' त्याचे मन तडफडत होते आणि तो दीर्घ सुस्कारे टाकत होता.

तेव्हा संजय धृतराष्ट्रला म्हणाला, ''राजन्, हे संपूर्ण राज्य जिंकून पांडू ने तुम्हाला दिले. त्याविषयी तुमच्या मनात कृतज्ञता नाही. कपटाने तुम्ही षड्यंत्रे वापरून त्यांच्या पुत्रांना वनात पाठवले. आपले सर्वस्व घालवून सुद्धा ते न बोलता वनवासाला गेले. आता कशाची चिंता करायचे काय कारण आहे?''

''चिंता करु नको तर काय करु? पांडव अतिरथी आहेत. युद्ध-विद्येत निपुण आहेत. अजिंक्य आहेत. अशा महायोद्धयांबरोबर मी शत्रुत्व पत्करले. आता चिंता करु नको तर काय करु?

''हे शत्रुत्व तर आपण स्वःहून पत्करले. पितामह भीष्म, गुरु द्रोण, मंत्री महोदय विदुर हे सर्वजण तुम्हांला सावध करीत होते परंतु आपण दुर्लक्ष केले. आपल्या पुत्रांना तर बुद्धि आणि लाज दोन्हीही नाही. प्रतिकामीला पाठवून भरसभेत द्रौपदीला हजर व्हायला लावले, तिचे वस्त्रहरण करुन तिचा घोर अपमान केला. आता हा तुमच्या कुळाला शाप आहे. विनाशकाले विपरीत बुद्धि! देव-देवता सुद्धा तुमच्या विरुद्ध झाले आहेत. तुमचा अंतकाळ जवळ आला आहे म्हणूनच तुम्हाला अन्यायसुद्धा न्याय वाटला होता.''

''हो, पुत्र-मोहात अडकल्यामुळेच मी कोणाचेही म्हणणे मानले नाही. जे माझ्या पुत्राला हवे होते तेच मी केले. आता काय करावे? आता देवच आम्हांला यातून वाचवू शकतो,'' धृतराष्ट्र म्हणाला. -क्रमशः





# कारंज

मुंबई जवळच एक बेट आहे 'कारंजिया.' इथे बहुतेक सर्वत्र आढळणाऱ्या वृक्षाला ह्या बेटाच्या नावावरुनच नाव देण्यात आले आहे. 'कारंज' हिन्दी, गुजराथी मध्ये सुद्धा ह्या झाडाला कारंज असेच म्हणतात. बंगालीमध्ये 'कांजी' म्हणतात. तमिळमध्ये ह्या वृक्षाला 'पांगं' किंवा 'पुंकु' तर तेलगु आणि मल्याळम् भाषेत ह्याला 'पुंगु' म्हटले जाते. जीवशास्त्रात ह्या वृक्षाला 'पोंगामया पिन्नाटा म्हटले जाते. मल्याळम् मध्ये अगदी वेगळे असे आणखी एक नाव आहे 'उन्नं'.

हे वृक्ष जास्तीत जास्त प्रमाणात समुद्रकिनारी आढळून येतात. वाळूमय नदीकाठी किंवा ओढ्याच्या काठी ही झाडे जास्त चांगली वाढतात. फांद्या पसरल्यावर मुकुटासारख्या दिसतात. झाडाचे खोड फार खडबडीत असते. हे झाड वर्षाचे बारा महिने हिरवेगार असते. फिक्कट हिरव्या रंगाच्या प्रत्येक फांदीमध्ये ५, ७, ९ या संख्येने पाने असतात. पाने रुंद अंडाकृती आणि टोकदार असतात. लाकडी कपाटांना वाळवी लागू नये म्हणून ह्या झाडाच्या सुकलेल्या पानांचा उपयोग होतो. ह्या झाडाच्या फुलांचा रंग पांढरा असतो पण त्यावर फिक्कट लाल आणि वांगी रंगाच्या रेषा असतात. एप्रिल-जूनच्या सुमारास ह्या झाडाला फुले येतात. सकाळी ह्या झाडांच्या फुलांचा सडा पडला म्हणजे असे वाटते, सुंदर गालिचा अंथरला आहे. फळ सुकल्यानंतर लाकडासारखे दिसते. दोन्ही बाजूला टोकांकडे निमुळते असते. फळ गुच्छाच्या रुपात न येता एकेकच येते. हे झाड बहुतेक रस्त्याच्या कडेला सावलीसाठी म्हणून लावले जाते.



# अकृतव्रण

महर्षि परशुरामाचे अनेक शिष्य होते. त्यापैकी एक अकृतव्रण जो नेहमीच गुरुबरोबर असे. आणि सतत गुरुची सेवा करित असे.

एकदा जेव्हा परशुराम जंगलामधून जात होते तेव्हा एका गुहेतून त्यांना केविलवाणा आवाज ऐकू आला. त्यांनी आत जाऊन बघितले. एक ऋषिकुमार त्या गुहेच्या भींतिला घट्ट धरुन केविलवाण्या स्वरात रडत होता आणि अगदी थोड्याच अंतरावर त्याच्यावर तुटुन पडायला वाघ अगदी तयारीत उभा होता. एका क्षणाचाही विलंब न करता परशुरामांनी बाणाने वाघाला मारले.

दुसऱ्याच क्षणी त्या मृत वाघाच्या शरीरातून एक गंधर्व प्रगट झाला आणि परशुरामाला प्रणाम करून म्हणाला, "तुमच्या कृपेमुळे मी आज शापमुक्त झालो आहे. मी तुमचा सदैव आभारी राहिन." असे म्हणून तो अदृश्य झाला. मग ऋषिकुमारने परशुरामांना साष्टांग नमस्कार केला आणि म्हणाला "मुनिवर आज तुमच्या दयेमुळे मी अकृतव्रण उभा आहे." मग परशुरामांनी त्याला आर्शिवाद देऊन आपला शिष्य बनवले. परशुरामांनी त्याला वेद-वेदांत तर शिकवलेच पण या व्यतिरिक्त निरनिराळ्या शस्त्र आणि शस्त्रांचे शिक्षण दिले.

कुरुवीर भीष्मांनी सुद्धा परशुरामांकडे विद्याभ्यास केला. एकदा भीष्म काशीच्या राजाने घोषित केलेल्या स्वयंवरास उपस्थित होण्यास गेले. तेथील राजकुमारांना हरवून भीष्मानी आपल्या भावासाठी, म्हणजेच विचित्रवीर्यसाठी काशी राजाच्या तीनही कन्या, अंबा, अंबिका आणि अंबालिका, ह्यांना आपल्या राज्यात आणले. परंतु जेव्हा अंबा ने सांगितले की ती साल्वराजावर प्रेम करते तेव्हा भीष्मांनी तिला जाऊ दिले. पण नंतर साल्वराजाने तिच्याशी विवाह करण्यास नकार दिला तेव्हा ती परत आली आणि विचित्रवीर्यबरोबर विवाह करण्याची इच्छा व्यक्त केली. विचित्रवीर्यला हा प्रस्ताव मंजूर नव्हता. तिच्यामते तिच्यावर ही परिस्थिती आणण्यास भीष्मच कारणीभूत आहे. म्हणून अंबा भीष्माकडे गेली आणि तिच्याबरोबर विवाह करण्यास विनविले. पण भीष्मांनी आजन्म ब्रह्मचर्यत्वाचे व्रत घेतले असल्यामुळे त्यांनी आपली अशक्यता व्यक्त केली.

भीष्मचा बदला घेण्यासाठी अंबाने बऱ्याच राजकुमारांकडून सहाय्य मागितले. पण भीष्माविरुद्ध लढण्यास कोणीही तयार नव्हते. शेवटी अंबा परशुराकडे गेली आणि आपली जीवनकहाणी ऐकवली. परशुराम अंबाला घेऊन भीष्माकडे गेले आणि भीष्माला तिच्याशी विवाह करण्यास सांगितले.



## तुम्हाला माहित आहे का?

१. "डेड सी" किती खोल आहे?
२. ऑलिंपिकच्या झेंड्यात निरनिराळ्या रंगाची सात वर्तुळं आहेत. ते सात रंग कोणते?
३. झाडांचा विकास मोजण्याच्या एका साधनाचा शोध एका भारतीयाने लावला. त्या भारतीयाचे नाव काय?
४. १९०६ मध्ये नोबेल पुरस्कार प्राप्त झालेल्या वैज्ञानिकाला आठ शिष्य आहेत. नंतर या आठही शिष्यांना हाच पुरस्कार मिळाला. या विशिष्ट वैज्ञानिकाचे नाव काय?
५. राजा आंधळा आहे, म्हणून राणीने सुद्धा आपल्या डोळ्यांवर पट्टी बांधली. ह्या राजा आणि राणीचे नाव काय?
६. 'देशबंधु' 'दीनबंधु' या नावाने संबोधले जाणारे व्यक्ति कोण?
७. रोमन लोक घुबडाला विनाशाचे चिन्ह मानायचे. मग माशीविषयी त्यांचे काय मत होते?
८. भारताच्या राष्ट्रीय झेंड्याची रूप-कल्पना मॅडम भिकाजी कामा ने केली. अमेरिकेच्या झेंड्याची रूप-कल्पना कोणाची?
९. वाघ राष्ट्रीय प्राणी म्हणून केव्हा निवडला गेला?
१०. 'उडती तबकडी' पहिल्यांदा केव्हा दिसली?
११. इटलीच्या प्रथम महिला डॉक्टरने आणखी एका क्षेत्रात विशेष काम केले आहे. त्या महिला डॉ.चे नाव काय?
१२. कोणत्या (कुठल्या) जेलमध्ये असताना पं. जवाहरलाल नेहरुंनी 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' हा ग्रंथ लिहिला?
१३. 'पिपल्स रिपब्लिक ऑफ चायना ची घोषणा माओ-से-टुंग ने केव्हा केली?
१४. 'टेंपल ऑफ हेवन' कुठे आहे?
१५. सम्राट अकबरचा महसूल मंत्री कोण होता?

### उत्तर

१. ३९५.९ मीटर
२. निळा, पिवळा, हिरवा, लाल, काळा. सर्व देशाच्या झेंड्यात ह्यापैकी एक रंग तरी असतोच.
३. जगदीश चंद्र बोस.
४. जे.जे. थॉमसन्.
५. धृतराष्ट्र आणि गांधारी - महाभारतामध्ये.
६. देशबंधु - सी.आर.दास दीनबंधु - सी.एफ. ॲंड्रूस
७. भाग्याचे चिन्ह
८. फिलाडेल्फिया ची 'बेट्टी रॉस'. ती बायकांचे कपडे शिवत असे.
९. १९७२ मध्ये.
१०. २४ जून १९४७.
११. मारिया मॉंटेसरी - प्रसिद्ध शिक्षणशास्त्र. त्यांचेच नाव काही शिक्षण क्रमाला देण्यात आले आहे.
१२. अहमदनगरचा भुईकोट किल्ला.
१३. १९४१ सप्टेंबर, २१.
१४. बीजिंग - चीनची राजधानी.
१५. तोडरमल.

# सोनेरी क्षण प्रश्नावलि - २ चे उत्तर.



१ अंकोर- राजा विजयवर्मा आणि त्याच्या वारसदारांनी अंकोर हे नगर निर्माण केले. ३०० वर्षांपर्यंत हे वैभवशाली होते. पण शासक आणि जनता ह्यांनी हे नगर सोडल्यामुळे तेथे झाडंझुडपं वाढून जंगल तयार झाले. जवळजवळ ५०० वर्षानंतर हेन्री मौहार नी या नगराचा शोध लावला. खाली दाखवलेली मूर्ति गरुडाची आहे.

२ कुठेही नाही. दोदो पक्ष्याचा नाश जवळजवळ २०० वर्षांपूर्वी झाला.

१७

३ ह्या क्रमात दाखवले गेलेले सगळेच अंक एकनी सुरुवात होणाऱ्या विषम संख्यांच्या उलट्या प्रतिमा आहेत.

४ 'तमाशा' - महाराष्ट्रातील प्रसिद्ध गाणे आणि नृत्य.

५ मासा - अंदमानचे लोक माशांची शिकार धनुष्य बाणाने करतात.

६ एका तासानंतरसुद्धा मूर्ति पाण्याच्या वरच राहिल. पाण्याची पातळी वाढल्यावर नौकासुद्धा वर होईल.






# पिशाच्चांचा स्वयंपाकी

शिव श्रीमंतांच्या घरी नेहमी किंवा शुभकार्याच्या वेळी स्वयंपाकाचे काम करुन आपले पोट भरीत असे. सीता ही त्याची एकुलती एक मुलगी होती. ती पाच वर्षांची असतानाच तिची आई मरण पावली. एखाद्याच्या घरी जेव्हा तो कामाला जात असे तेव्हा तो आपल्या मुलीलासुद्धा बरोबर नेत असे. वडिल स्वयंपाक करायचे आणि मुलगी ते नीट लक्षपूर्वक बघायची. दोघेही एकवेळचे जेवण तेथेच जेवायचे आणि दुसऱ्या वेळच्या स्वयंपाकासाठी शिधा बांधून घरी आणयचे. ज्या दिवशी कुठे काम नसे त्या दिवशी शिव स्वत: स्वयंपाक करुन आपल्या मुलीला प्रेमाने स्वत: भरवीत असे. काही वर्ष हाच दिनक्रम चालू राहिला. पण सीता स्वयंपाक करण्याच्या बाबतीत उत्साही नव्हती.

रामू हा शिवच्या मित्राचा एकुलता एक मुलगा होता. तो मित्र पण गरीब होता. जेव्हा रामूचे आईवडिल एका दुर्घटनेत मृत्यू पावले तेव्हा शिवने रामूला आपल्या घरी आणून ठेवले. तो त्यांच्या घरी राहू लागला. थोड्याच दिवसांत रामूने स्वयंपाकाचे सर्व काम शिकून घेतले. शिवला बसायला सांगून त्याचे काम तो स्वत:च त्याच्या देखरेखीखाली करीत असे.

रामू, शिवला खूपच आवडू लागला. एक दिवस शिव म्हणाला, "अरे रामू, सीता जन्मल्याबरोबर आम्ही मित्रांनी ठरवले होते की सीते चा आणि तुझा विवाह करायचा. तुमचा दोघांचा विवाह झाला कि मी निश्चिंत होईन."

सीता दिसायला सुंदर असल्यामुळे रामूच्या मनात भरली होती. तो तिला प्रेम करु लागला होता. त्यामुळे त्याने आनंदाने शिवचा प्रस्ताव स्वीकारला. तो शिव ला



म्हणाला, ''जशी तुमची इच्छा.''

त्यानंतर दोन महिन्यांनी रामू-सीताचा विवाह झाला. पण त्यानंतर वर्षभरातच शिव स्वर्गवासी झाला. आता स्वयंपाकाचे काम आणि पितृहीन सीतेची काळजी ही जबाबदारी रामूला एकट्याला पार पाडावी लागत होती. रुचकर जेवण जेवायची चटक लागलेली सीता जेव्हा जेवायला बसायची तेव्हा म्हणायची, ''वांग्याच्या भाजीला तिखट कमी आहे, नारळाची चटणी चांगली आहे, पण त्यात चिंचेऐवजी लिंबू पिळले असते तर जास्त चांगली चव आली असती. असं न करता तसं केले असते तर चांगलं झालं असतं'' अशा अनेक चुका काढायची किंवा नावं ठेवत रहायची.

आरामात बसून आयतं खाणाऱ्या सीतेच्या ह्या फालतू बोलण्यामुळे रामू नाराज होत असे.

एकदा रामूला वाटले, आज आपला वाढदिवस आहे तर आज आपल्या आवडीचे पदार्थ खावे. आजचा स्वयंपाक सीतेने स्वतः करावा अशी त्याची इच्छा होती. पण डोकेदुखीचे निमित्त करुन तिने त्याची इच्छा टाळली. मग रामूने विचार केला, मी रोज स्वयंपाक तर करतोच आहे, आज पण करुया. पण आज मी माझ्या आवडीचेच पदार्थ करुन खाणार !

त्याच्या इच्छे प्रमाणे त्याने स्वयंपाक केला. सीता जेवायला आली. एकेका पदार्थाची चव घेत म्हणाली, ''हे काही तेवढे रुचकर झाले नाही, याच्यात मीठ जस्त आहे. ते आंबट आहे, मला वाटते ह्याच्यात साखर जरा जास्तच झाली आहे.''

स्वतः आवडीचे पदार्थ करुन मोठ्या उत्साहाने खायला बसलेल्या रामूने जेव्हा आपल्या पत्नीचे बोलणे ऐकले तेव्हा तो नाराज झाला. तिचे बोलणे त्याला काट्याप्रमाणे बोचू लागले आणि तिचा रागही आला. ताबडतोब पुढ्यातील ताट सरकवून जोरात ओरडून तो म्हणाला, ''अग महामाये, आजपर्यंत तुझ्यावर दया येऊन मी चुपचाप सगळे सहन केले. इथून पुढे माझ्याच्याने हे सहन होणार नाही. स्वयंपाक करुन तुला खाऊ घालण्यापेक्षा जंगलात जाऊन भूत-पिशाच्चांना खाऊ घालणे बरे. त्यात जास्त आनंद मिळेल. आत्ताच मी निघून जातो. इथून पुढे तू खा नाहीतर उपाशी रहा मला त्याच्याशी काही



घेणंदेणं नाही'' असे म्हणून त्याने हात धुतले आणि कुडता घालून बाहेर निघून गेला.

पतीला एवढं रागावलेले सीताने कधी बघितले नव्हते. ती खूप घाबरुन गेली. उठून बाहेर जाऊन बघितले तर गल्लीच्या कोपऱ्यावरुन वळून तो दिसेनासा झाला होता. आता काय करायचे? तिने हात धुतले आणि बिछान्यावर बसून रडू लागली.

क्रोधित रामू रागाच्या भरात चालत जंगलात येऊन पोहोचला. थोडे अंतर असेच चालत गेल्यावर त्याला किचकिच किचकिच असा आवाज ऐकू आला. त्याला वाटले माकडांची टोळी असावी. मागे वळून बघताच दोन पिशाच्च त्याच्यासमोर प्रगट झाली. किचकिच करत हसत ती म्हणाली, ''मोठ्या प्रेमाने इथे आलेल्या स्वयंपाक्याचे पिशाच्चलोक स्वागत करीत आहेत.''

रामू डरपोक नव्हता म्हणून पिशाच्यांना बघून तो किंचितसुद्धा घाबरला नाही. तो म्हणाला, ''मी तुमच्यासाठी थोडाच आलो आहे? तुम्हाला कसे माहित कि मी स्वयंपाक करतो?''

रामूच्या ह्या प्रश्नावर हसत हसत पिशाच्च म्हणाले, ''हेच तर आमचे विशेष आहे. आज मध्यरात्री आमच्या यजमानाच्या मुलीचा विवाह मोठ्या प्रमाणावर संपन्न होणार आहे. नेहमीच्या स्वयंपाकाच्या कार्यक्रमात बदल व्हावा ही आमची इच्छा आहे. पिशाच्च स्वयंपाक्याऐवजी मानवी स्वयंपाकी आम्हाला हवा आहे. आता तू आमच्या मागे मागे ये. आम्ही तुला



आमच्या यजमानाकडे घेऊन जाऊ.''

त्यानंतर ते पिशाच्च अंधारात त्याला दाट झाडीच्या मागे घेऊन गेले आणि आपल्या यजमानासमोर उभे केले. पिशाच्चांनी सांगितल्यानंतर यजमानाला कळले कि रामू कोण आहे. मग त्यांचा यजमान त्या स्वयंपाक्याला म्हणाला, ''ए स्वयंपाक्या, ह्या लग्नकार्यात स्वयंपाकाची पूर्ण जबाबदारी तुझ्यावर आहे. स्वयंपाक मुलाकडच्यांना आवडला तर तुला पुष्कळ भेटवस्तु मिळतील.''

रामू मोठ्या गर्वाने म्हणाला, ''भेटवस्तुंचे राहू द्या पण स्वयंपाकाला आवश्यक असलेल्या वस्तुंची व्यवस्था होईल कि नाही?''

त्याच्या गर्वाचा त्या यजमानाच्या



पत्नीला खूप राग आला. ती म्हणाली, ''काहीही कमतरता नाही. ह्या कार्यासाठी सर्वोत्तम मिठाई आणि इतर पदार्थ बनवावे लागतील. तुला आम्हा पिशाच्चांच्या पक्वानांविषयी काही माहिती आहे का? मी सांगते, ऐक. आम्ही तूर डाळ आणि उडीद डाळ एकत्र करुन पुरण तयार करतो आणि त्याच्या पुऱ्या बनवतो. मुगाच्या डाळीत मेथी घालून वडे तयार करतो. अशा प्रकारे स्वयंपाक करुन स्वादिष्ट भोजन दिलेस तर काही होणार नाही तुझी सगळे स्तुति करतील आणि भेटवस्तु देतील. जर तू असे करण्यात यशस्वी झाला नाहीस तर तुझे तुकडे-तुकडे करुन तिखट-मीठ लावून आमच्याशेजारच्या मांसाहारी पिशाच्चांना जेवायला देऊ. तेव्हा सावधान ! त्यांचे हे बोलणे ऐकून रामू भयंकर भयभीत झाला. त्याला आता मात्र पिशाच्चांची खूप भीती वाटू लागली. पण ह्या परिस्थितीत तो काय करु शकणार होता? पिशाच्चिणीने सांगितल्याप्रमाणे त्याने तूरडाळ आणि उडीद डाळ भिजवून वाटले. पुरणाच्या पुऱ्या केल्या. मग वडे बनवले. आणि थकून भागून तो दूर जाऊन बसला. त्याचा थोडा डोळा लागला. इकडे पिशाच्चांचे लग्न सुरु झाले. तिसरा प्रहर संपत आला तेव्हा कुठूनतरी अजून पुष्कळ पिशाच्च आली त्यांच्या कर्कश आवाजाने रामूला जाग आली.

नवरा मुलगा रामूने केलेला स्वयंपाक खात म्हणाला, ''पुरणाच्या पुऱ्या आणि वडे खूपच रुचकर आहेत. कोणी बनवले?'' यजमान पिशाच्च मोठया ऐटीत म्हणाले, ''स्वयंपाक करण्यासाठी एका मानवाला बोलावले, त्यानेच हे सर्व बनवले.

नवरामुलगा म्हणाला, ''त्या मानवाला तुम्ही तुमच्या मुलीबरोबर आंदण म्हणून द्यावे अशी माझी इच्छा आहे.''

यजमान पिशाच्चाने आनंदाने म्हटले, ''त्यात काय विशेष? जरूर पाठवेन.'' त्याने बाजूच्या दोन जणांना रामूला बोलावून आणण्यास सांगितले.

हे सगळे ऐकून रामू थरथर कापू लागला. आणि मनाशीच बडबड करु लागला, ''अरे देवा आता मी काय करु?'' देवाचे नाव काढल्याबरोबर त्याला हनुमानाची आठवण आली. तो रोज हनुमानच्या मंदिरात जात असे आणि तिथे हनुमान चालीसा ऐकत असे. पण त्याला त्याची पहिली, ओळ तेवढीच



आठवत होती. ती पण 'श्री आंजनेय' त्याच्याकडे पळत येणाऱ्या पिशाच्चांकडे त्याने मोठ्या नाराजीनेच बघितले. डोळे बंद केले आणि हात जोडून 'श्री आंजनेय' म्हणत जोर जोराने ओरडू लागला. तीच ओळ परत परत म्हणू लागला.

पाच मिनिट सतत तीच ओळ म्हटल्यावर त्याला जाणवले कि तिथे कोणी नाही. सगळं सुनसान आहे. त्याने डोळे उघडून बघितले. कुठेही पिशाच्चांचे नामोनिशाणसुद्धा नव्हते. सुर्योदयपण होत आला होता.

खूप आनंदित होत त्याने ओरडून म्हटले 'श्री आंजनेय' आणि घराकडे जाऊ लागला. जेव्हा तो जंगल पार करुन गावाच्या सरहद्दीपर्यंत आला तेव्हा खाली मान घालून चालत येत असलेली सीता त्याला दिसली. ''कुठे चालली आहेस?'' त्याने आश्चर्याने विचारले.

पतीचा आवाज ऐकू येताचं तिने वर मान करुन बघितले. आश्चर्य आणि आनंदाने रडत ती रामू जवळ आली. पत्नीला शांत स्वरात रामू म्हणाला, ''रडू नकोस सांग तर खरं की तू जंगलाच्या दिशेने का चालली होतीस?''

''तुमच्यासाठीच येत होते. तुम्हीच म्हणालात कि जंगलातील पिशाच्चांना स्वयंपाक करुन खाऊ घालणे चांगले. म्हणून मला वाटले तुम्ही नक्कीच जंगलात असाल.'' पदराने डोळे पुसत पुसत सीता म्हणाली.

तिचे बोलणे ऐकत दीर्घ श्वास घेऊन रामू म्हणाला, ''ती इच्छा पण पूर्ण करुन घेतली. त्या मूर्ख पिशाच्चांना स्वयंपाक करुन देण्यापेक्षा तुला जेवण वाढणे परवडले.''

सीताने लगेच आपल्या पतीचा हात पकडून म्हटले, ''इथून पुढे मी केलेला स्वयंपाकच खायचा. तुम्ही बाहेर स्वयंपाकाच्या कामाला जाल तेव्हापण मी तुमच्याबरोबर येऊन तुम्हाला मदत करेन.''

पत्नीच्या बोलण्यावर खुश होत घरी जाताना रामूने स्वतःच्या अनुभवाबद्दल सांगितले. शेवटी दोघे घरी पोहोचले. मग सीता म्हणाली, ''बरं झालं, आंजनेय स्वामींच्या कृपेने तुम्ही वाचला. नाहीतर माझे काय झाले असते?'' असे म्हणत तिने मंगळसूत्र डोळ्यांना लावले.

नंतर दोघेही सुखाने संसार करु लागले.



# सोमनाथाची मूर्खता

सोमनाथ भुवनगिरीहून रामगिरीला जात होता. रस्ता जंगलामधून असल्यामुळे चोरांची भीती होती, म्हणून त्याने बरोबर एक मोठी काठी घेतली होती. जेव्हा तो जंगलाच्या मध्यभागी पोहोचला तेव्हा झाडामागे लपलेले चार धट्टकट्टे चोर त्याला सामोरे आले आणि त्याला अडवलं. सोमनाथने मोठ्या धैर्याने त्यांचा सामना केला. झालेल्या मारामारीत चोर आणि सोमनाथ पण जखमी झाले पण कसंतरी करुन अखेरीस चोरांनी सोमनाथाला पकडून झाडाला बांधले. त्यांनी त्याची पूर्ण तपासणी केली त्यांना फक्त तांब्याची दहा नाणी मिळाली.

मग मात्र चोरांचा सरदार निराश होऊन म्हणाला, ''इतकी मोठी काठी घेऊन येताना तुला पाहुन आम्हाला वाटलं कि तुझ्याकडे पुष्कळ जडजवाहिर असेल. आधीच माहित असतं कि तुझ्याकडे फक्त तांब्याची दहा नाणी आहेत तर आम्ही तुझ्याकडे आलोच नसतो; आणि तुझ्याकडून जखमी पण झालो नसतो'' दुखण्यामुळे कण्हत तो म्हणाला.

चारी चोरांकडून मार खाऊन सोमनाथ पण बराच जखमी झाला होता. तो कण्हत म्हणाला, ''मी ऐकून होतो की चोर खूप हुशार आणि चतुर असतात. लुटलेल्या माणसाची अगदी कसून तपासणी करतात. तुम्ही तर नुसतेच तगडे पहिलवान आहात पण तुम्हाला थोडी सुद्धा अक्कल नाही. तुम्ही तर माझ्या डोक्याच्या पगडीला विसरुन गेला. मला सुद्धा आधीच असतं की तुम्ही माझ्या पगडीला शिवणारसुद्धा नाही तर मी पण तुमच्याकडून जखमी झालो नसतो.''

चोरांनी लगेच त्याची पगडी काढली. त्यातील लपवून ठेवलेली चांदीची नाणी घेतली आणि निघून गेले.

- रामकृष्ण





# चांगुलपणाचे फळ

आनंदपुरा कांतिवर्मा नावाचे एक गृहस्थ रहात होते. सगळी सुखं होती पण त्यांना मूलबाळ नव्हते त्यामुळे ते खूप दुःखी होते.

एकदा त्या गावात एक साधु आला. तो सतत भ्रमण करीत असायचा. कुठल्याही गावात तो तीन दिवसांपेक्षा जास्त मुक्काम करायचा नाही. त्याच्याकडून प्रसाद घेण्यासाठी खूप गर्दी असायची. त्याच्या प्रसादाच्या महिम्यावर लोकांचा अपार विश्वास होता.

कांतिवर्मा त्या साधुला भेटला. त्याला आपल्या मुलं नसल्याचे दुःख सांगितले. त्यावेळी त्याच्या हातात दुधाने भरलेला ग्लास होता. त्यातील थोडे दूध एका द्रोणात ओतून कांतिवर्माला देत साधु म्हणाला, ''हे दूध जर तुझ्या पत्नीने एकाच घोटात संपवले तर तुझ्या मनातील इच्छा पूर्ण होईल.

घरी आल्यावर कांतिवर्माने तो द्रोण आपल्या पत्नीला दिला आणि म्हणाला, ''हे एकाच घोटात संपव.'' कांतिवर्माच्या पत्नीने ते देवघरात नले. त्याचा देवाला नैवेद्य दाखवला मग तो द्रोण डोळ्याला लावला आणि दूध दोन घोटात संपवलं.

मग ती गर्भवती झाली. तिला दोन मुली झाल्या. दोन्ही मुली खूप सुंदर होत्या. पण जेव्हा त्या जमिनीवर रांगायला लागल्या तेव्हा कळले की त्यांचा एक-एक पाय थोडा अधु आहे. नंतर अपंग असल्यामुळे त्या दोघी व्यवस्थित चालू शकत नव्हत्या.

कांतिवर्माने ह्यावर उपाय करण्यासाठी पाण्यासारखा पैसा खर्च केला परंतु काहीही उपयोग झाला नाही. दोघी मुली नक्षत्रासारख्या सुंदर होत्या पण स्वतःचे अपंगत्व त्यांच्या मनात सलत होते. 'कोणी बघेल का', ही भीती सतत त्यांच्या मनात असायची. मुलगा अपंग असता तर चाललं

२५ वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट



असतं पण ह्या मुली होत्या. पण तरीसुद्धा कांतिवर्मा आपल्या मुलींचा सांभाळ उत्तमरित्या करीत होता.

बारा वर्षानंतर तो साधु परत त्या गावी आला. कांतिवर्मा त्या साधूच्या दर्शनास गेला आणि म्हणाला, "स्वामी तुमच्या आशीर्वादाने मला दोन मुली झाल्या. पण त्या अपंग आहेत. मला त्यांच्या भवितव्याच्या कल्पनेनेसुद्धा भीती वाटते. माझ्यावर कृपा करा आणि त्यांचे हे अपंगत्व दूर करा." विनम्रपणे कांतिवर्म्याने साधुला विनंति केली. डोळे बंद करुन थोडा वेळ साधुने विचार केला. मग म्हणाला, "मी जे करायला सांगितले होते ते तुझ्या पत्नीने केले नाही म्हणूनच ही समस्या उद्‌भवली आहे. माझ्याकडे ह्या केळ्याशिवाय दुसरे काही नाही." असे म्हणत त्याने केळीचे साल काढले थोडासा भाग स्वतः खाल्ला आणि उरलेले केळे कांतिवर्माकडे देत म्हणाला, "हे जिला द्यायाची तुझी इच्छा आहे तिला दे" नंतर त्यावर त्याला काहीही बोलू न देता त्याला परत पाठवले.

खूप विचार करुनसुद्धा कांतिवर्मा निर्णय घेऊ शकत नव्हता कि दोही मुलींपैकी कुणाला हे केळे द्यावे. विचार करीत तो घराकडे जाऊ लागला. त्याला वाटत होते की, साधुला माहित होते की दोन्ही मुली अपंग आहेत मग त्याने फक्त एकीसाठीच प्रसाद का दिला असावा? ह्या प्रसादाने एक मुलगी बरी झाली तर दुसरीच मन किती दुःखी होईल? आणि जरी असे झाले तर तो स्वतःसुद्धा किती दुःखी होईल.

अशा प्रकारे विचार करीत जात असतानाच कांतिवर्माला कुणाच्या तरी रडण्याचा आवाज ऐकू आला. त्याने आजुबाजुला बघितले तरी जवळच एका विहिरीजवळ एक तरुण मुलगी रडत बसली होती. एक तरुण तिला काहीतरी समजावून सांगायचा प्रयत्न करीत होता. कांतिवर्मा जवळ येताना पहाताच त्या तरुणाने त्याला म्हटले, "श्रीमान, आपण जरा हिला समजवा. ही विहिरीत पडून जीव देणार आहे." "काय झालं तरी काय? खरं काय कारण आहे?" कांतिवर्माने विचारल्यावर तरुण उत्तरला, "लहानपणीच ही अर्धांगवायूची शिकार झाली आणि तिची शरीराची उजवी बाजू निकामी झाली आहे. हिच्याशी कोण लग्न करेल? पण मला हिची दया आली आणि मी हिच्याशी लग्न केले. मी काही खूप श्रीमंत नाही, मेहनत करुनच मला पोट भरावे लागते. मला शक्य होईल तेवढी माझ्या पत्नीची सेवा-शुश्रूषा करुनच घराच्या बाहेर पडतो.

गेल्या काही दिवसांपासून हिला असे वाटत आहे की हिच्यामुळे मला खूप कष्ट करावे लागतात. आणि हे तिला सहन होत नाही. मी सगळी कामं करावी आणि तिने आरामात बसावे हे तिला आता आवडेनासे झाले आहे. तिने निश्चय केला आहे कि आत्महत्या केली तर माझा पती दुसऱ्या स्त्री बरोबर लग्न करुन सुखपूर्वक आयुष्य जगू शकेल. मला माहित आहे कि ही अपंग आहे. वस्तुस्थिती जाणूनच मी हिच्याशी लग्न केले. जर हिने आत्महत्या केली तर मी पण जिवंत रहाणार नाही. हे सत्य तिला समजावून सांगा आणि आत्महत्या करण्यापासून परावृत्त करा."

साधुने दिलेला प्रसाद कांतिवर्माने त्या मुलीला दिला. त्याला त्या जोडप्याचे दुःख दूर करण्याची तीव्र इच्छा झाली. तो त्या मुलीला म्हणाला, "हे केळं तू खा मगच मी तुला उचित सल्ला देईन."

तिने ते केळे खाल्ले आणि तिच्यात खूपच मोठे परिवर्तन दिसू लागले. ती उठून उभी राहिली आणि तिने हात जोडून कांतिवर्म्याला नमस्कार केला. तिच्या पतीच्या आश्चर्याला आणि आनंदाला तर सीमाच उरली नाही.

"आता तुमचे दुःख संपले आहे; तुम्ही सुखाने संसार करा" असे म्हणून कांतिवर्म्याने त्यांचा निरोप घेतला आणि आपल्या घराकडे निघाला. स्वतःच दुःख संपले नव्हते पण त्याला आनंद अशा गोष्टीचा होता कि एक कुटुंब उध्वस्त होण्याऐवजी त्याच्यामुळे वाचले. घरी जाऊन दोघींपैकी एका मुलीलाच प्रसाद द्यावचा, एकच मुलगी बरी व्हायची, मग दुसरी बरी झाली नाही म्हणून दुःख करीत बसायचे, ह्यातून वाचलो ह्या खुशीतच तो घरी पोहोचला. तेवढ्यात त्याच्या दोन्ही मुली धावत त्याच्याकडे आल्या. त्यांना बघून त्याला अपार आनंद आणि आश्चर्य वाटले.



विश्व समाचार

# आपला शेजारी पंतप्रधान

आपला शेजारी आहे, 'बांगला देश.' ह्या देशाची पहिली महिला पंतप्रधान होती 'बेगम खलिदा जिया.' १९९१ ते १९९६ पर्यंत ह्यांनी शासनाचा भार सांभाळला. फेब्रुवारीमध्ये घेण्यात आलेल्या निवडणुकांमध्ये जिंकून त्या परत पंतप्रधान झाल्या. पण अपक्षाने ह्या निवडणुकांचा बहिष्कार केला. त्यांनी पंतप्रधान पदाचा राजीनामा द्यावा म्हणून देशभर चळवळ करण्यात आली. शेवटी बेगम खलिदा जियांनी राजीनामा दिला. १२ जूनला परत निवडणुका झाल्या. शेख हसीना च्या नेतृत्वाखाली संयुक्त सरकार बनवण्यात आले. शेख हसीना वाजेद ह्या बांगला देशाच्या द्वितिय महिला पंतप्रधान झाल्या.



बांगला देशाचे 'राष्ट्रपिता' म्हणून प्रसिद्ध असलेल्या प्रख्यात शेख मुजिबुर रहमान यांची ही सर्वात मोठी मुलगी आहे. मुजिबुर रहमान अवामीलीग पक्षाचे नेतृत्व करीत होते. त्यांनी पूर्ण पाकिस्तानला स्वातंत्र्य मिळावे म्हणून युद्ध केले. पाकिस्तान विरुद्ध चळवळींनी तीव्र स्वरूप धारण केले, तेव्हा हजारो लोक शरणार्थी होऊन आपल्या देशात येऊ लागले. त्यांना त्यांच्या देशात पाठवण्यासाठी भारताला पाकिस्तानच्या राज्यकारभारात लक्ष घालावे लागले. त्यामुळे १९७१ मध्ये भारत आणि पाकिस्तान ह्यांमध्ये युद्ध झाले. त्यानंतर पूर्व पाकिस्तान स्वतंत्र देश झाला - ज्याचे नाव आहे, बांगला देश.

१९७२ मध्ये मुजिबुर रहमान बांगला देशाचे अध्यक्ष झाले. १५ ऑगस्ट, १९७५ ला बांगला देशाची राजधानी ढाका येथे मुजिबुर रहमान यांची परिवारासहित हत्या करण्यात आली. त्यावेळी त्यांची मोठी मुलगी शेख हसीना जर्मनीला असल्यामुळे वाचली.

१९७७ मध्ये जनरल झिया रहमान अध्यक्ष झाले. १९८१ मध्ये त्यांचीपण हत्या करण्यात आली. त्यानंतर लेफ्टनंट जनरल हुसेन मुहम्मद इर्शाद अध्यक्ष झाले आणि त्यांनी सैनिकी राजवट घोषित केली. १९८६ मध्ये ही सैनिकी राजवट हटवून निवडणुका घेण्यात आल्या. इर्शादच्या 'जातीय पक्षाला' विजय मिळाला. परंतु ह्या विजयावर मतभेद झाले. तरीसुद्धा ते १९९१ पर्यंत सत्तेवर होते. १९९१ मध्ये परत निवडणुका घेण्यात आल्या त्यात जिया उर रहमानच्या विधवा पत्नी बेगम खलिदा झिया यांच्या नेतृत्वाखाली 'बांगला देश नॅशनॅलिस्ट पार्टी' ह्या पक्षाने अधिकार हातात घेतले लाचलुचपतीच्या आरोपावरुन जनरल इर्शाद ह्यांना कैद करण्यात आले.

मुजिबर रहमान ह्यांची मोठी मुलगी शेख हसीना १९८१ मध्ये स्वदेशी परतली. त्यांनी नंतर 'आवामी लीग' ह्या पक्षाचे नेतृत्व केले. बांगला देशातल्या संसदेत त्यावेळी 'आवामीलीग' ही विरोधी पक्ष होता.

१२ जून मध्ये ज्या निवडणुका झाल्या त्यात 'आवामी लीग' ह्या पक्षाला सगळ्यात जास्त म्हणजे १४६ जागा मिळाल्या. 'बांगला देश नॅशनॅलिस्ट' पक्षाला ११६ जागा मिळाल्या. 'जातीय पार्टी' ह्या पक्षाला ३० जागा मिळाल्या. संसदेत एकूण ३०० जागा आहेत. 'आवामी लीग' पक्षाला सरकार बनवण्यासाठी बहुमत न मिळाल्यामुळे इतर पक्षाच्या पाठिंब्याने संयुक्त सरकार बनवण्यात आले. जनरल इर्शाद ह्यांनी कैदतून नविन सरकारला पाठिंबा घोषित केला. शेख हसीना ह्यांनी २५ सभासदांना स्वतःच्या मंत्रिमंडळात सामील केले आहे. द्वितीय महिला पंतप्रधानपदाची जबाबदारी हातात घेत त्या म्हणाल्या, "जरी हे संयुक्त सरकार असले तरी देशाच्या मुख्य समस्यांवर उपाय शोधण्याचा प्रयत्न केला जाईल आणि त्यासाठी सगळ्यांच्या सूचनांचे स्वागत करण्यात येईल."



# शहरी पती आणि गावंढळ पत्नी

कमलाकरचे आई-वडिल त्याच्या लहानपणीच वारले. त्यानंतर त्याचा सांभाळ त्याच्या आजीने केला. मग त्याने उच्च शिक्षण घेतले आणि शहरात राहून नोकरी करू लागला. पण त्याच्याबरोबर त्याची आजी शहरात आली नाही. सगळे आयुष्य गावातच गेल्यामुळे तिला ते गाव सोडावेसे वाटत नव्हते. त्याच गावात त्याची मोठी बहिण पण रहात असे अधून-मधून येऊन ती आजीची चौकशी करायची.

एके दिवशी कमलाकरला समजले कि त्याच्या आजीची तब्येत एकदम बिघडली आणि ती खूप थोड्या दिवसांची पाहुणी आहे. कमलाकर ताबडतोब गावी गेला. तो आला आहे असं समताच आजीने डोळे उघडले आणि म्हणाली, ''तुझे लग्न बघितल्याशिवाय मला मरायचे नाही. गेल्या दोन वर्षांपासुन मी तुझ्या मागे लागले आहे कि तू लग्न कर. पण प्रत्येक वेळेस तू टाळतोस. तू माझी इच्छा पूर्ण नाही केली.'' रडत रडत आजी म्हणाली.

खरंतर कमलाकरला गावातल्या मुलीशी लग्न करायचे नव्हते. त्याला सुंदर नाजुक पण हुशार मुलगी हवी होती. आणि त्याचा विश्वास होता कि अशी मुलगी फक्त शहरातच असेल.

''आजी, तुझी तब्येत तरी बरी होऊ दे. मी ह्या श्रावण महिन्यातच लग्न करुन टाकेन.'' कमलाकर आजीचे पाय दाबत म्हणाला, ''आता माझी तब्येत कसली बरी होतेय? देवाचे बोलावणे आले आहे. तुझे लग्न बघितले म्हणजे समाधानाने डोळे मिटेन. उद्याचा मुहूर्त चांगला आहे. तु कस्तुरीशी लग्न कर. ती चांगली मुलगी आहे.''

कस्तुरी शेजारच्यांची एकुलती एक मुलगी आहे. आजी घरात एकटीच असल्यामुळे बऱ्याचवेळी ती आजीला हवं नको ते बघायची.

कमलाकरला आजीचा हा प्रस्ताव अजिबात आवडला नाही. तो काही बोलणार इतक्यात आक्काने त्याचा हात पकडला आणि म्हणाली, '''कस्तुरी सगळ्या दृष्टिने तुला योग्य आहे. वैद्यांनी सांगितलंय कि आजी आता चार-पाच दिवसांपेक्षा जास्त नाही जगणार. आजीने आपल्यासाठी काय कमी खस्ता खाल्ल्यात? तिची एक इच्छा पूर्ण करणे काय तुझे कर्तव्य नाही? ह्या अंतिम क्षणी तिचे मन दुखवणे तुला चांगले वाटेल का? तिच्या इच्छेसाठी लग्न कर. हा तुझा धर्म आहे.''



कमलाकर अगदी इच्छेविरुद्ध नाइलाजाने लग्नास तयार झाला. आजीच्या म्हणण्यानुसार अगदी दुसऱ्याच दिवशी लग्न झाले.

आणि हे लग्न बघितल्यानंतर आजीच्या तब्येतीत आश्चर्यकारक सुधारणा झाल्या. तिला बघून कोणालाही वाटले नसते काल ही जीवन-मृत्यूच्या सीमेवर उभी होती.

एक आठवड्यानंतर कस्तुरीला घेऊन कमलाकर शहराकडे निघाला. निघताना आजी त्याला म्हणाली, ''याच महिन्यात मर्यादा पुरुषोत्तम श्रीरामाचे दर्शन करुन या. मी श्रीरामचंद्राकडे नवस बोलले होते. विसरु नकोस. माझा हा नवस अवश्य फेडून टाक.''

बसमध्ये बसून ते जेव्हा शहराकडे निघाले तेव्हा कमलाकर कस्तुरीला समजावून सांगत म्हणाला, ''तू तर खेडवळ मुलगी आहेस. शहरातील दुकानं, मोठमोठे रस्ते इमारती आल्या कि डोळे फाडून फाडून बघू नकोस. तिकडे जोरजोरात बोलू नकोस. हसताना उगीच सगळे दात दाखवून हसत जाऊ नकोस. तिकडे वागताना तुझ्या खेडवळपणाच्या सवयी विसरुन जा.'' कस्तुरीला शहरातील राहणीमान आवडू लागले. पण नवऱ्याचे सतत असे म्हणणे कि तू खेडवळ आहेस तुला शहरातील जीवन काय माहित हे मनात खटकू लागले. मनातल्या मनात ती दुःखी होत असे. ''हे काय एवढी घट्ट वेणी कशाला बांधलीस? अंबाबाई सारखं एवढं मोठं कुंकु काय लावलंस? एखाद्या आजीबाईसारखी अशी साडी का घातलीस? नवी नवरी आहेस. राग रंग उमजून वागत जा.'' कमलाकर कधी कधी नाराजी व्यक्त करीत असे. वीस एक दिवसांमध्येच कस्तुरी शहरी स्त्रीयांप्रमाणे राहण्या सवरण्यामध्ये तरबेज झाली. त्यांना शहरात रहायला येऊन एक महिना पुर्ण होत

सुधा



आला आणि तेव्हाच कस्तुरीने आजीने बोललेल्या नवसाची कमलाकरला आठवण करुन दिली. कमलाकर म्हणाला आत्ताच तर आजीची तब्येत बरी नसल्यामुळे आणि लग्नासाठी म्हणून दहा दिवस रजा घेतली. माझ्या साहेबांचे नाव आहे उग्रनरसिंह. आणि नावाप्रमाणेच त्यांचा स्वभावसुद्धा उग्र आहे. त्यांनी स्पष्ट सांगितले आहे कि आता एक दिवसाची पण रजा मिळणार नाही.''

कस्तुरी क्षण भर विचार करुन म्हणाली, ''तुमच्या साहेबांचे नाव उग्रनरसिंह आहे म्हणजे त्यांचे कुलदेवता नक्कीच नरसिंह स्वामी असतील. त्यांना खोटेच सांगून बघा की तुमचा नवस त्याच स्वामीकडे आहे.'' कस्तुरीच्या ह्या सल्ल्याने आश्चर्य घडले. कमलाकरला लगेचरजा मिळाली.

दुसऱ्या दिवशी सकाळीच पती-पत्नी गाडीत बसून रामापूरला जायला निघाले. रस्त्यात कमलाकरने दोन सोन्याच्या बांगड्या काढून कस्तुरीच्या हातात दिल्या आणि म्हणाला ''ह्या बांगड्या माझ्या आक्काच्या आहेत. तिने सांगितले आहे कि, रामापुरला सोन्याच्या दुकानात अगदी नवीन नवीन घडणीच्या बांगड्या मिळतात. ह्या जुन्या बांगड्या देऊन मला नविन बांगड्या घेऊन ये. आता तू ह्या बांगड्या पेटीत ठेव.'' रामापुरला पोहचेपर्यंत दुपार झाली होती. गावात गेल्याबरोबर धर्मशाळा होती. पती-पत्नी गाडीतून उतरले. धर्मशाळेत गेल्याबरोबर तेथील अधिकाऱ्याने सांगितले कि एकही खोली रिकामी नाही. कमलाकर निराश झाला. पण कस्तुरीने मोठ्या आत्मविश्वासाने त्या अधिकाऱ्याला सांगितले, ''रामशास्त्री जेव्हा जेव्हा आमच्या घरी येतात तेव्हा सांगायचे कि रामापुरला आल्यावर आमच्याच धर्मशाळेत रहा.''

रामशास्त्रीचे नाव ऐकताच अधिकारी घाबरून गेला आणि म्हणाला, ''अरे, मी विसरूनच गेलो. मघाशीच एक खोली रिकामी झाली आहे.'' असे म्हणत त्याने ताबडतोब एक खोली त्यांना रहाण्यास दिली.

कमलाकरने कस्तुरीला विचारले, ''हे रामशास्त्री कोण आहेत?'' ''ही धर्मशाळा मागच्या वर्षीच त्यांनी आपल्या वडिलांच्या स्मरणार्थ बांधली'' कस्तुरी म्हणाली.

''तू त्यांना कशी ओळखतेस?'' कमलाकरला आश्चर्य वाटले. ''आत येण्याच्या आधी बाहेर लावलेली पाटी



वाचली. कस्तुरी हसत हसत म्हणाली.

कमलाकर तिच्या हुशारीवर थक्क झाला. लवकर लवकर आंघोळ वगैरे उरकून ते मंदिरात पोहोचले. तेव्हाच पुजारी मंदिराचे दरवाजे बंद करीत होता. त्यांना बघत तो म्हणाला, ''देवाचे दर्शन आता संध्याकाळीच होऊ शकेल.''

कमलाकर निराश झाला तो पत्नीला म्हणाला, ''मला तर एकच दिवसाची सुट्टी मिळाली आहे. आता काय करायचे?''

''आता आपण काय करु शकतो? देवाचे दर्शन तर आपल्या नशिबी नाही. आजीने दिलेले दान आतल्या ताटात ठेवण्या ऐवजी बाहेरच्या हुंडीतच टाकून देऊ.'' कस्तुरी मुद्दाम थोड्या मोठ्या आवाजात म्हणाली, म्हणजे पुजारीलासुद्धा ऐकू आले. कस्तुरीला माहित होते कि हुंडीत टाकलेले दान मंदिराचे असते आणि गाभाऱ्यातील ताटात टाकलेले दान पुजाऱ्याचे असते.

दान-दक्षिणा हे शब्द कानावर पडताच पुजाऱ्याने ताबडतोब मंदिराचे दरवाजे उघडले आणि त्यांना म्हणाला, ''मला वाटते तुम्ही खूप लांबून आला आहात. लगेच दर्शन करुन घ्या.'' त्या दोघांनी देवाचे दर्शन केले आणि कस्तुरीने आजीने दिलेली छोटी पिशवी पुजाऱ्याच्या ताटात ठेवली. मग दोघे बाहेर पडले.

''तुझ्यामुळे देवाचे मनापासुन दर्शन घडले. आजीचा नवस पण फेडला. अरे हो, पण त्या आजीने दिलेल्या छोट्या पिशवीत काय होते?'' कमलाकर ने विचारले. ''दिव्याच्या वाती, पण काहीही असले तरी वेळेवर आपल्या कामी



आल्या.'' कस्तुरी हसत म्हणाली.

दोघे मोठ्या गल्लीत आले. सराफाची दोन मोठी दुकाने दाखवत कमलाकर म्हणाला, ''तू आत्ताच धर्मशाळेत जा आणि सोन्याच्या बांगड्या घेऊन ये. तोपर्यत मी दुकानात जाऊन बघतो कि कोणत्या नविन प्रकारच्या बांगड्या आहेत?''

कस्तुरी धर्मशाळेत परत आली आणि जेव्हा पेटीमधून बांगड्या बाहेर काढत होती तेव्हा तिथे एक तरुण मुलगा आला आणि म्हणाला, ''मी सराफाच्या दुकानातच काम करतो. साहेबांनी तुमच्याकडून लवकर बांगड्या घेऊन येण्यास सांगितले आहे.'' कस्तुरीला लगेच संशय आला. मनातील संशय चेहऱ्यावर अजिबात दिसुन देता तिने त्याला विचारले, ''बांगड्यांबरोबर चंद्रहार पण

आणायला सांगितला का? मला वाटते चंद्रहार पण त्यांना बदलून हवाय, जरा त्यांना विचारुन येता का?'' थोड्याच वेळात तो तरुण मुलगा परत आला आणि म्हणाला, ''हो साहेबांनी चंद्रहार सुद्धा आणायला सांगितला.'' कस्तुरी एकदम ओरडली, ''अरे चोरट्या, थांब पोलिसांना बोलावलय. आत्ता येऊन तुला हातकड्या घालतील म्हणजे समजेल.'' चोर लगेच आल्या पावली परत पळून गेला. कस्तुरीला माहित होते की त्याने आपल्या पतीचे बोलणे ऐकले असावे. कमलाकरला जेव्हा कस्तुरीने ही हकिगत ऐकवली तेव्हा कमलाकरने कस्तुरीची खूप स्तुति केली.

अशाप्रकारे सगळी कामे सफलतेने उरकल्यावर जेव्हा ते घरी पोहोचले तेव्हा मध्यरात्र झाली होती. घरी येऊन बघतात तर घराला कुलुप नाही बघुन त्यांना आश्चर्य वाटले. आत कुणाचा तरी चालण्या-फिरण्याचा आवाज येत होता.

कमलाकर चोर-चोर म्हणून जोरजोरात ओरडणार इतक्यात कस्तुरीने खुणेने असं करु नको म्हणून सांगितले आणि दरवाजा ठोठावत म्हणाली, ''मालक आम्ही वाटसरु आहोत. खूप रात्र झाली आहे. आम्हाला रामापूरला जायचे आहे. अंगावर किमती दागिने आहेत आणि पिशवीत पण खूप जडजवाहिर आहे. त्यामुळे अंधारात जाणे धोक्याचे आहे. तुमच्या घरी राहू द्याल तर खूप कृपा होईल. सकाळीच निघून जाऊ.''

लगेच अस्ताव्यस्त विखुरलेले केस असलेल्या, टोकदार मिशीवाल्या एका इसमाने खिडकीतून वाकून बघितले. मग दार उघडले. कस्तुरीने आपली पेटी त्याच्या हातात दिली आणि म्हणाली, ''ह्यात नवरीचे कपडे आणि दागिने आहेत. जपून कपाटात ठेवा. सकाळी जाताना घेऊन जाऊ. मान हलवत तो इसम दुसऱ्या बाजूच्या खोलीत गेला. कस्तुरीने तावडतोब दार बंद करुन बाहेरून कडी लावली आणि पतीला म्हणाली, ''तावडतोब पोलिसांना बोलवा.'' पत्नीच्या बुद्धिमत्तेवर खूप होत कमलाकर म्हणाला, ''इतके दिवस तुला मूर्ख, गावंढळ समजूत तुझी चेष्टा मी केली. खरं तर तुझ्या हुशारी पुढे शहरी मुलीसुद्धा फिक्या पडतील. मला माफ कर.'' आणि तो पोलीस स्टेशनकडे गेला.





# प्रिय स्थळ

गोकर्ण हे मोठ्या यात्रास्थळांपैकी एक आहे. इथे शंकराचे खूप मोठे देऊळ आहे. एक सुंदर बगिचा आहे. एक मोठे नाट्यमंदिर आहे, ह्या गावात एक मोठे ग्रंथालयसुद्धा आहे. तेथील ग्रंथ अपूर्व आहेत.

अशा ह्या प्रसिद्ध यात्रास्थळाला भेट द्यायला यादव आला. त्याचे मोठे काका, तात्या ह्या गावात रहात होते. त्या त्यांना चार मुलं होते. चंद्रु, सोमू, गोपी आणि विश्वंभर. मोठा मुलगा चंद्रु हा यादवच्याच वयाचा होता. चारही भाऊ यादव आल्यामुळे खूप आनंदित झाले. यादवला ते सगळीकडे फिरायला घेऊन गेले.

''तुमचे गाव खूपच छान आहे. चार दिवस रहाण्यासाठी आलो पण आता चाळीस दिवस रहावे असे वाटते.'' गावाची भरपूर तारीफ करीत यादव म्हणाला.

आपल्या गावाची प्रशंसा ऐकून चारही भाऊ खूश झाले. पण त्यांनी परत परत यादवला विचारले कि सगळ्यात जास्त त्याला काय आवडले? मग यादव त्यांना म्हणाला, ''जे स्थळ मला आवडते तिथे मला जास्त वेळ रहायला आवडतं. पण कधीकधी मीच संभ्रमात पडतो आणि मलाच कळत नाही की कुठले स्थळ जास्त चांगले आहे? आता असं करु या, आधी तुम्ही चौघेजण एकेका स्थळी जाऊन रहा. जिथे तुम्हाला जास्तवेळ रहावेसे वाटेल ते तुमचं प्रिय स्थळ समजू या. आणि तुम्हाला सगळ्यात जास्त कुठले स्थळ आवडते हे समजल्यावरच मी माझी आवड सांगेन.''

यादवचा हा प्रस्ताव चारही भावांना पटला. चौघेही चार-चार दिवस चारही स्थळांना भेट देऊन, राहून आले. मग एक गोष्ट त्यांच्या लक्षात आलीत. दुसऱ्या

स्थळात पण आकर्षण आहे. त्यांना वाटत होते कि जे स्थळ आपल्याला आवडत नाही तिथे आपल्याला रहावं लागेल. पण त्यांना जी स्थळं आवडत नव्हती तिथेसुद्धा रहायला त्यांना आवडले.

जेव्हा चौघेही भाऊ परत आले तेव्हा यादव त्यांना म्हणाला, "बघा, तुम्ही उगीचच स्वतःचा गैसमज करुन घेतला होता. प्रत्येक जागेची स्वतःची अशी एक खूबी असते. मला सुद्धा मनापासून प्रत्येक स्थळ आवडले."

यादवचे म्हणणे चार भावांपैकी एकालाही पटले नाही. त्यांनी स्पष्टपणे सांगितले "असं काहीतरी सांगून तुमची सुटका होणार नाही. तुम्ही सुद्धा आमच्यासारखं चारही स्थळी जाऊन चार-चार दिवस राहून या. जिथे तुम्ही जास्त दिवस रहाल ते तुमचे आवडते स्थळ!"

"बापरे, अजुनही तुमच्या लक्षात येत नाही? ह्या गावात आपल्या सगळ्याच्या आवडीचे एकच स्थळ आहे. अजूनही माझी परीक्षा घेणार का?" यादव ने विचारले.

चार भावांपैकी, चंदु ने मंदिरात, सोमूने उद्यानवन ह्या बगिच्यात, गोपीने नृत्य-मंदिरात तर विश्वंभरने ग्रंथालयात आपल्या जास्तीत जास्त वेळ घालवला होता. त्यामुळे त्यांना यादवचे म्हणणे समजेना. ते एकदमच म्हणाले, "तुमचं म्हणणं आमच्या नाही लक्षात येत."

यादव हसत-हसत म्हणाला, "तुम्हाला काय वाटतं, ही विशेषता फक्त गोकर्ण मध्येच आहे? इंद्रप्रस्थ, उज्जयिनी, तक्षशिला, विजयनगर, श्रीरंगपट्टण ह्यासारख्या पुष्कळ ठिकाणी आहेत. प्रत्येक ठिकाणी ह्याच्यापेक्षा जास्त विशेषता आहेत. तरीसुद्धा मी ह्या गावात का आलो? कारण मला तुमच्या सगळ्यांबरोबर प्रेमाने काही दिवस घालवायचे होते. इथले सगळ्यात आवडीचे माझे प्रिय स्थळ म्हणजे तुमचे घर! कुठेही गेलो तरी आपल्याला परत घरीच यावे लागते. तुम्ही पण ह्या गावात कुठेही गेलात तरी घरीच रहाणार. म्हणून तुमचं, माझं प्रिय स्थल एकत्र आहे खरं की नाही?" आता मात्र चारही भावांना पटलं आणि त्यांनी होकारार्थी मान हलवली. त्यांना खूप आनंद झाला होता.






१४

(रूपधरचा मुलगा धीरमती वडिलांच्या शोधार्थ पैयासला गेला. त्याला मारण्यासाठी षड्यंत्र आयोजित केले होते. ते समुद्रात त्याची वाट बघत होते पण त्यांच्यापासुन आपला बचाव करुन तो डुकरांच्या राखण दाराकडे गेला. तिथे वडिलांची आणि मुलाची भेट झाली. मग दोघांनी मिळून शत्रुचा नाश करण्यासाठी योजना आखली.) -त्यानंतर

धीरमती सकाळीच नगरात जाण्यास निघाला. जाता जाता त्याने राखणदाराला म्हटले, "काका मला लवकर घरी जायचे आहे. जोपर्यंत मला बघत नाही तोपर्यंत आईला चैन पडणार नाही. हा जो तुमचा म्हातारा अतिथि आहे तो एका जागी शांत बसणारा नाही. इथे त्याच्याच्याने बसून रहाणे होणार नाही. त्यामुळे त्याला नगरात सोडून या. चालून-फिरुन भूक लागली तर तिथेच कसेतरी पोट भरुन घेईल."

"हो तुम्ही जबरदस्ती केली तरी मी इथे रहाणार नाही. माझ्यासारख्या भिक्षुकाला सगळी घरे आपलीच असतात. तू जा. उन्हं वर आल्यावर मी ह्याच्यासोबत नगरात पोहचेन नाहीतरी माझ्या ह्या फाटक्या कपड्यामुळे आता ही थंडी मला सहन होणार नाही. उन्हे वर आल्यावरच मी निघेन." रूपधर धीरमतीला म्हणाला.



धीरमती भराभर चालत आपल्या घरी जाऊ लागला. रस्त्यात तो हाच विचार करीत होता कि मी आणि माझे वडिल त्या शत्रुंचा सामना कसा करु शकतो? हे शक्य आहे का? माझ्यात त्यांना हरवण्याइतकी शक्ती नाही. पण वडिलांचे सहाय्य असल्यावर मी का घाबरावे? त्यांच्या शुरतेपुढे हे दुरात्मा थोडीच टिकणार आहेत. असा विचार करत तो मनातील शंका दुर करण्याचा प्रयत्न करीत होता. घरी पोहोचल्याबरोबर त्याने आपला लहान भाला एका खांबाशी ठेवला आणि आत गेला. घरातील दासन्दासी त्याला बघून खूश झाले.

तेवढयात पद्ममुखी खाली उतरून आली आणि आपल्या मुलाला तिने मोठ्या प्रेमाने आलिंगन दिले. तिने म्हटले, ''आलास बेटा तू मला वाटले परत तुला भेटु शकेन कि नाही? आपल्या वडिलांच्या शोधार्थ मला न सांगता तू पैयासला गेलास त्यांचा काही ठावठिकाणा लागला? काय बातमी आणलीस?'' ''आई मी कसा वाचलो ते माझे मलाच माहित. पण आता आपल्याला हातावर हात ठेवून बसायचे नाही. तु लवकर आंघोळ उरकून घे आणि देवाकडे प्रार्थना कर, आम्ही बदला घेण्यात सफल होवो. तोपर्यंत नगरात मी एकदा जाऊन येतो. हो आणखी एक गोष्ट सांगायला मी विसरुनच गेलो. पैयासहून माझ्याबरोबर एक अतिथी आला आहे त्याला पण घेऊन येईन.'' तो अतिथी एक विद्वान होता. धीरमती जेव्हा बंदरातून निघाला तेव्हा त्याने स्वत:ला बरोबर घेऊन चलण्याची धीरमतीला विनवणी केली. धीरमती मध्येच उतरला आणि राखणदाराकडे गेला. विद्वान इतर नाविकाबरोबर दुसऱ्या रस्त्याने नगरात गेला.

पुत्राच्या म्हणण्यानुसार पद्ममुखीने आंघोळ केली, चांगले वस्त्र घातले आणि भक्तिभावाने देवाकडे प्रार्थना केली कि शत्रुंचा नाश निर्विघ्नपणे व्हावा.

धीरमती बाहेर आला आपला लहान भाला घेतला आणि आपल्या दोन पाळीव कुत्र्यांना घेऊन नगरात जाण्यास निघाला. त्यावेळी त्याच्या घरी आरामात रहाणाऱ्या शत्रुंनी त्याचे कुशल मंगल विचारले जसे काही त्याच्या परत येण्याने ते खूप खुश होते. पण त्यांच्या मनात त्यावेळी द्वेष आणि मत्सराची भावना दाटून येत होती.

धीरमतीने आपला शत्रु भाव किंचितसुद्धा प्रगट होऊ दिला नाही. त्यांच्याशी बोलून झाल्यावर तो वडिलांच्या मित्रांच्या बैठकीत गेला. त्यांच्या प्रश्नांना उत्तरे देऊ लागला. उत्तरे देताना तो खूप सावध होता. आपल्या वडिलांबद्दल काही माहिती आहे ह्याचा त्याने अजिबात पत्ता लागू दिला नाही.

थोड्याच वेळात त्या विद्वान अतिथीला घेऊन नाविक तेथे आला. त्याने धीरमतीला म्हटले, ''तुला प्रतापनी दिलेल्या भेटवस्तू माझ्याजवळच आहेत. तू तुझ्या दासींना पाठवून घेऊन जा.''

''माहित नाही माझ्या घरात बसलेले ते दुष्ट माझा कधी अंत करतील. अशा परिस्थितीत ह्या भेटवस्तू माझ्या घरी ठेवणे योग्य नाही. ह्या भेटवस्तू त्या दुष्टांच्या हाती लागण्यापेक्षा इथेच राहू देत. जेव्हा त्या दुष्टांची पिडा टळेल तेव्हा तुम्हीच माझ्या घरी आणून द्या.''

मग तो अतिथीला घेऊन घरी गेला. घरात गालिचे अंथरले होते. दासींनी अतिथींचे स्वागत करुन स्नान वगैरेची व्यवस्था केली. मग तो आणि धीरमती जेवायला बसले. जोपर्यंत ते जेवत होते तोपर्यंत त्यांच्याचसमोरच्या आसनावर बसून पद्ममुखी टकळीने तलम सूत काढू लागली.



जेवण झाल्यानंतर तिने मुलाला विचारले, ''बेटा, ते दुष्ट लोक परतायच्या आत तु मला सांग तुझ्या वडिलांची तू काय खबर आणली आहेस?''

''सगळे सांगतो आई, पैयासला जाऊन मी नवद्योतला भेटलो. त्यांनी आणि त्यांच्या मुलांनी मला चांगल्या पद्धतीने वागवले. पण त्यांना बाबांबद्दल काही माहित नाही. म्हणून त्यांच्या एका मुलाला घेऊन मी प्रतापला भेटायला गेलो. माझी सर्व हकीगत ऐकून त्यांनी सांगितले कि तुझे वडिल अवश्य परत येतील आणि शत्रुंचा नाश करतील. ते ह्या दुष्टांवर खूप नाराज दिसत होते. प्रतापनी सांगितले कि समुद्रात सतत फिरत असणाऱ्या एका वृद्धाने त्यांना म्हटले कि त्याने माझ्या बाबांना एका बेटावर बघितले आहे. मग मी घरी परतलो. ह्याशिवाय बाकी काही

माहिती मिळाली नाही.''

हा समाचार ऐकताना त्या वृद्धाने पद्ममुखीला म्हटले, ''देवी, सत्य काय आहे ते ऐक! तुझे पती ह्या शहरात आलेले आहेत. तुझ्या घरात चालू असलेल्या अत्याचाराविषयी त्याला पूर्ण कल्पना आहे. माझा अंतरात्मा म्हणतोय कि ह्या दुष्टांचा सर्वनाश लवकरच त्याच्या हातून होणार आहे.'' अशी भविष्यवाणी त्याने वर्तवली.

''महोदय, आपले म्हणणे खरे व्हावे. जर असेच झाले तर तुम्ही मागाल तो पुरस्कार तुम्हाला मिळेल.'' पद्ममुखी म्हणाली.

तिघेही जण घराच्या आत गप्पा मारण्यात मग्न होते तर बाहेर व्यायाम करण्यात ते दुष्ट व्यस्त होते. काहीजण जड वस्तू लांब फेकत होते, काही भाल्यांनी निशाणा लावत होते. तेवढ्यात त्यांचा एक नोकर आला आणि म्हणाला, ''दुपार झाली. खेळ बंद करा आणि आत जेवायला चला.'' सगळेजण आत आले. आपापल्या आसनावर बसले. त्याच दिवशी कापलेल्या बकरीच्या जेवणावर ताव मारु लागले. इकडे राखणदाराने रूपधरला म्हटले, ''माझ्या यजमानांनी तुला नगरात घेऊन जाण्यास सांगितले आहे. चला निघू या. उशिर पण झालाय.''

निघायच्या आधी रूपधरने आपल्या हातात एक मोठी काठी घेतली आणि आपली झोळी खांद्यावर अडकवली. पुढे राखणदार होता आणि त्याच्यामागे रूपधर एखाद्या गरिब, म्हाताऱ्या दुबळ्या भिकाऱ्यासारखा लटपटत जाऊ लागला.

ते दोघे प्रताप जवळ पोहोचले. तेव्हा तिथे शेळ्या-मेंढ्यांना हाकलत काली नावाचा एक माणूस आला. रूपधरला



बघून त्याने विचारले, ''हा भिकारी कोण आहे? अरे ए डुकरांच्या राखणदारा तुला हा जिवंत मुडदा कुठे मिळाला? हे भिकारी तर काही कामाचे नसतात. सतत भीक मागून लोकांना त्रास देत असतात. ह्या दरिद्रिला रूपधरच्या घरी घेऊन गेलास तर तेथील मोठे लोकं ह्याचा निकालच लावतील. चल सरक निकम्मा.'' असे म्हणत त्याने रूपधरला लाथ मारली.



रूपधरला भयंकर राग आला. त्याला वाटले हातातल्या काठीने ह्याचे डोके फोडावे किंवा बेदम मारावे. पण अजुन वेळ आली नाही हा विचार करून तो गप्प बसला.

डुकरांच्या राखणदाराने कडवट स्वरात त्या माणसाला म्हटले, ''तुझी ही हिंमत. मालकाला येऊ दे मग तुला बघतो.''

''मूर्खच आहेस. तुझा मालक आता थोडाच परत येणार आहे. देवता जर धीरमतीला पण बोलावून घेतील तर बरेच होईल. ताहीतर त्या लोकांकडून त्याचा मृत्यू निश्चित आहे.'' असे म्हणत शेळ्या-मेंढ्यांना घराकडे हाकलत तो निघून गेला. ह्या शेळ्या-मेंढ्या रूपधरच्या घरी ठाण मांडून बसणाऱ्या दुष्ट लोकांसाठीच होत्या.

रूपधर आणि राखणदार घराजवळ पोहोचले. आपले घर बघून रूपधर म्हणाला, ''हे घर रूपधरचेच असावे. एवढे मोठे घर त्याच्याशिवाय आणखी कोणाचे असू शकेल? असे वाटते आत जेवणं चालू आहेत. वासावरुनच कळतंय.''

''हो वास तर येतोय! पण आधी हे सांग कि आधी तू आत जातो कि मी जाऊ? तू बाहेरच उभा राहून इकडे तिकडे बघत राहिलास तर तुला कोणी न कोणी इथून हाकलून देतील.'' राखणदार म्हणाला.

जेव्हा ते दोघे आपापसात बोलत होते तेव्हा बाजूच्या कचऱ्याच्या ढिगाऱ्यावर बसलेल्या एका म्हाताऱ्या कुत्र्याने डोके वर काढले आणि रूपधरकडे लक्षपूर्वक बघू लागला. खरं तर तो एक कांति नावाचा शिकारी कुत्रा होता. लहानपणापासुन रूपधरने त्या कुत्र्याला पाळून मोठे केले होते. पण जेव्हा तो मोठा झाला तेव्हा रूपधर युद्ध करण्यास निघून गेला. आता कांतिला सांभाळणारे कोणी ही नव्हते. तो आता म्हातारा झाला होता आणि

कचऱ्याच्या ढिगाऱ्यावर बसून मृत्यूची वाट बघत होता. त्याने आपल्या मालकाला ओळखले आणि शेपूट हलवू लागला. त्याच्या दुबळ्या अवस्थेकडे बघून रूपधरच्या डोळ्यात पाणी आले. त्याने राखणदाराकडे वळून म्हटले, ''दिसायला तर हा कुत्रा चांगल्या जातीचा दिसतो ह्याचे हे हाल कसे झाले? मला वाटते हा कुत्रा ह्यांना उपयोगी आहे असे वाटते नाही.''

''असे नको म्हणू, जेव्हा यजमान जिवंत होते तेव्हा ह्याचा थाट बघायचा. शिकारीवर जाताना ह्याला पण घेऊन जायचे. तेव्हा इतरांपेक्षा आधी पुढे जाऊन हा हरिणाचा शोध लावायचा. ह्याचा यजमान कुठे तरी अकाली मेला आता हा इथे अकाली मरणार.'' असे म्हणत राखणदार घराच्या आत निघून गेला.

कांतिने आपल्या मालकाला बघून डोळे बंद केले आणि त्याच्या शेवट झाला. जसे काही तो ह्याच क्षणाची वाट बघत होता.

घरात पाय ठेवताच धीरमतीने खुणेनेच त्यांना बोलावून घेतले. तो धीरमतीच्या समोर जाऊन बसला. तेवढ्यात काठीच्या आधाराने रखडत, म्हाताऱ्यासारखा आवेश आणून रूपधर आत आला आणि उंबरठ्यावर टेकून बसला.

त्याचे हे रूप बघून शत्रूच काय पण स्वतः पद्ममुखीसुद्धा ओळखू शकणार नाही कि हाच तो तेजस्वी रूपधर आहे जो ट्रायच्या युद्धात अजिंक्य ठरला होता.

धीरमतीने एक मोठी पोळी आणि मांसाहार त्या राखणदाराला देत म्हटले, ''हे त्याला दे आणि सांग घरातल्या इतर लोकांकडून पण थोडे थोडे मागून घे.''

राखणदाराकडून ते घेताना रूपधर म्हणाला, ''मालकावर सदैव देवाची कृपा राहो. त्यांच्या साऱ्या इच्छा पूर्ण होवो.'' असे म्हणून आशिर्वाद दिला. आपल्या वडिलांची ही परिस्थिती बघून धीरमतीचे डोळे भरून आले. रूपधर तेथून उठून दुष्ट लोक जेथे जेवत होते तेथे गेला. एखाद्या खऱ्याखुऱ्या भिकाऱ्याप्रमाणे तो प्रत्येका जवळ जात होता आणि भीक मागत होता.

**क्रमशः**



# ‘चांदोबाच्या’ बातम्या

## महागडे एव्हरेस्ट

तरुण-तरुणींना पर्वतारोहण करायला खूप आवडते. एन.सी.सी. च्या विद्यार्थ्यांना पर्वतारोहणाचे शिक्षण दिले जाते. पर्वतारोहण हा शब्द ऐकल्याबरोबर आपल्याला एव्हरेस्ट शिखराची आठवण येते, जे जगातील सर्वात उच शिखर आहे. ह्याची उंची ८,८४७ मीटर आहे. एव्हरेस्ट शिखरावर चढण्यासाठी उत्साह शक्ति आणि पैसे पण लागतात. किती पैसे लागतात, माहित आहे? १०,००० डॉलर्स म्हणजेच ३,५०,००० रुपये हे पैसे नेपाळच्या सरकारला द्यावे लागतात. जगातील आठही उंच शिखरे ह्याच देशात आहेत. यावर्षी एव्हरेस्टवर चढण्यासाठी ८० गट गेले. ९७ गट शिखराच्या टोकापर्यंत पोहचु शकले. ह्यामध्ये ‘एव्हरेस्ट हिरो’ तेनसिंगचा ३९ वर्षाचा नातू ‘ज़ांलिंग’ पण सामिल होता. त्याच्या बरोबर फिन्ले ब्रिषर्स, एडमंड कार्ल, वीस्टर्डस हे चित्रपट निर्माते पण आहेत. तिसऱ्यांदा त्यांनी शिखर चढण्यात यश मिळविले. १९९२ मध्ये ५८ लोकांनी एव्हरेस्ट शिखरारोहण केले. १९९३ मध्ये एकाच दिवसात ३५ जण चढू शकले. नेपाळ सरकारने ह्या वर्षी ६,४०,००० डॉलर्स पर्वतरोहकांकडून वसूल केले. सरकारचे म्हणणे आहे कि ‘एव्हरेस्ट मार्गात’ गर्दी झाली होती. त्यामुळे नियोजित मार्गानेच जावे असा आदेश, प्रत्येक गटाला देण्यात आला. पर्वतारोहक जो कचरा किंवा टाकाऊ वस्तू तिथे टाकतात ते साफ करायला शेर्पांची नियुक्ति केली जाते. नुकताच २,००० कि.ग्रॅं. कचरा काढण्यात आला. तरी शेर्पांच्या प्रमुखाचे म्हणणे आहे कि एवढा कचरा काढून सुद्धा१५,००० कि.ग्रॅं. केरकचरा तिथे अजून असण्याची शक्यता आहे.

### बाटलीतील संदेश

दक्षिण इंग्लंडमधील बॉगनर रेजिस ह्यांच्या, आठ वर्षाच्या मुलीने, विकी थॉमस ने एक संदेश लिहिला बाटलीत घालून मोहरबंद केला आणि ती बाटली समुद्रात फेकली. नुकतीच पश्चिम ऑस्ट्रेलियातील जेराल्टन ह्या प्रदेशातील अँडु फिच ह्या युवकाला ती बाटली मिळाली. ह्या बाटलीने जवळजवळ १६००० कि.मी. लांबचा प्रवास केला आहे. हेच एक मोठे आश्चर्य आहे. दुर्भाग्याची गोष्ट म्हणजे अशा आश्चर्यांना मान्यता देण्याची सोय गिनिज बुकमध्ये नाही.

### उंट परतला

१९९१ मध्ये गल्फ मध्ये युद्ध झाले. ह्यामुळे तिथल्या परिस्थितीत खूपच अंदाधुंदी झाली. कुवेतमधील एका भागातील उंट घाबरून इतस्ततः विखुरले गेले. त्यातील एक उंट पाच वर्षांपर्यंत भटकत होता आणि मार्च महिन्यातील एका सकाळी आपल्या मालकाचे घर शोधत बरोबर परत येऊन पोहोचला. सुखरूप परत आलेल्या आपल्या उंटाला पाहून मालकाला खूप आनंद झाला. ह्या उंटाचा मालक मुहम्मद अल-अबाईशीर ह्यांनी आपल्या उंटाचे कौतुक करण्यासाठी त्याच्या स्तुतिपर एक कविता रचली.



# गंधर्व गीत

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाकडे गेला. शव उतरवून पुढे निघाल्यावर त्यातील वेताळ म्हणाला, “तुझ्या कठोर परिश्रमाचे कारण माझ्या लक्षात नाही येत. ह्या परिश्रमानंतर तुला काय साध्य इच्छित आहे हे मला समजत नाही. ह्यासाठी तुला किती कठिण प्रसंगांना तोंड द्यावे लागते ते मला माहित आहे. तू तर उत्तम पुरुष आहेस. धैर्य, निर्भयता, कष्ट करायची चिकाटी हे सर्व गुण तुझ्यात आहेत. तुझ्या ह्या विलक्षण आणि असामान्य व्यक्तिमत्वाकडे बघून माझा तुझ्या बद्दलचा आदर दिवसें दिवस वाढतच चालला आहे. आता तरी तू मला सांग कि ह्या कठोर परिश्रमांनी तुला काय साध्य करायचे आहे? काय मिळाले म्हणजे तू तृप्त होशील? तू तर स्वतः एवढा बलवान आहेस. तुझ्यापेक्षा

वेताळ कथा



आणखी कोणी जास्त बलवान आहे का? ज्याच्यापासुन स्वत:चे रक्षण करण्यासाठी तू ह्या दैवी शक्ती गोळा करीत आहेस? कि तुला इतर सगळ्या राजांना हरवून चक्रवर्ती व्हायची आकांक्षा आहे? ते काहीही असो, एक गोष्ट लक्षात ठेव. ज्याला असे ऐहिक सुख आणि प्रसिद्धी पाहिजे त्याला सूक्ष्म ज्ञान असणे आवश्यक आहे. त्याला जीवनातील वास्तविकता समजण्याची शक्ती आणि मनाचे संतुलन असणे आवश्यक आहे. काय योग्य आहे आणि अयोग्य काय आहे ह्याचा निर्णय त्याला घेता आला पाहिजे. जर हे गुण त्याच्यात नसतील आणि त्याला आध्यात्मिक चिंतन किंवा तात्विक विषयात आसक्ती असेल तर मोठ्या परिश्रमांनी प्राप्त झालेल्या शक्ती त्याच्या हातून बघता बघता निघून जातील. उदाहरणार्थ देशवर्मा नावाच्या युवकाची गोष्ट तुला सांगतो. गोष्ट ऐकताना तुझी थोडी करमणूकही होईल अन् चालण्याचे कष्ट विसरायला होतील. गोष्ट लक्षपूर्वक ऐक.'' आणि वेताळ सांगू लागला.

देशवर्मा नावाचा एक तरुण विशाल देशातील एकाछोट्या गावात रहात असे. त्याचा परिवार संगीतशास्त्रात पारंगत होता. जन्मत:च तो संगीतात रुची दाखवू लागला. त्यामुळे देशवर्माने संगीतात सहजरित्या विद्वता आत्मसात केली. लहानपणीच त्याचे आई वडिल स्वर्गवासी झाले. आपल्या घरी सुरक्षित ठेवलेल्या ताल-पत्रांना वाचून त्याने संगीतशास्त्राचा अभ्यास केला. आणि साधनेने संगीतक्षेत्रात अपार ज्ञान प्राप्त केले. विशाल देशातील दरबारातील संगीत विद्वान एकाएकी मृत्यू पावल्याने राजाने निर्णय घेतला कि संगीत स्पर्धा आयोजित केल्या जाव्या आणि ह्या स्पर्धेत जो असा राग गाऊन दाखवेल कि जो आतापर्यंत आपण ऐकलाच नसेल आणि जो गायक सर्वांच्या प्रशंसेस पात्र ठरेल त्याला दरबारातील संगीतज्ञ म्हणून नियुक्त केले जाईल.

ही घोषणा ऐकून देशवर्माला वाटले कि आपली कला सगळ्यांपुढे मांडण्याची वेळ आली आहे. संगीतज्ञ होण्याची महत्वाकांक्षा सुद्धा पूर्ण होण्याची हीच संधि आहे. आणि तो राजधानीकडे निघाला. दुसऱ्या दिवशी दुपारपर्यंत तो एका गावात पोहोचला.





एका गृहस्थाने त्याला आश्रय दिला तो ऐंशी वर्षे वयाचा, 'कश्यप' होता. तो पण संगीत विद्वान होता. त्याच्याबरोबर विवाहायोग्य वय असणारी त्याची नात रहात होती. कश्यपने त्याची तो कुठुन आला कुठे आणि का जाणार ही. विचारपूस केली देशवर्माने आपण कोण कुठे जात आहोत हे सांगि-तल्यावर कश्यप खूष झाला. मग कश्यपने त्याला गाणे म्हणण्यास सांगितले त्याचे गाणे ऐकून कश्यप खूष झाला. त्याला आलिंगन देऊन. तो म्हणाला, ''तुझ्या आजोबाबत मी ऐकले आहे. तझे गाणे पण अद्भुत आहे पण ते अपूर्व नाही. मला एक अपूर्व राग माहित आहे.'' असे म्हणून ह्या रागाची पूर्वगाथा त्याने देशवर्माला ऐकवली. जेव्हा कश्यप गुरुकुलात शिक्षण घेत होता त्यावेळी एक दिवस पूजा सामग्री गोळा कारण साठी तो जंगलात फिरत होता, तेव्हा त्याला खूप मधुर स्वर ऐकू आला. आधी त्याला वाटले हा नवीनच पक्ष्याचा आवाज आहे, नंतर वाटले हजारो भ्रमरांचा झणकार आहे. आवाजाच्या रोखाने तो चालू लागला. शेवटी एका मुनीच्या आश्रमात पोहोचला. तिथे एक मुनिकन्या फुलांचा हार ओवत मोठ्या तन्मयतेने गात होती. कश्यपची चाहूल लागताच तिने गाणे बंद केले. जेव्हा मुनीवर आले तेव्हा कश्यपने त्यांना प्रणाम करुन हा राग आपणाला शिकवावा अशी प्रार्थना केली.

मुनिवर ह्या गंधर्वगीताबद्दल बोलताना म्हणाले, ''पुत्रा हा लोकातीत अपूर्व राग आहे. पाच पिढ्यांपूर्वी माझे पूर्वज गंधमादन पर्वतावर तपस्या करण्यास गेले होते. एके दिवशी पद्मासन घालून तपस्या करायच्या आधी त्यांना मधुर स्वर ऐकू आला. हा अद्भुत राग प्रक्षापाल नावाचा एक गंधर्व गात होता. जवळच्याच सरोवर तो उतरला. मोठ्या तन्मयतेने तपस्वीने तो राग ऐकला. मग गंधर्वाजवळ जाऊन म्हणाला, ''महोदय आपण जो राग आता गात होतात तो बहुतेक देवांच्या दरबारात म्हटला जात असावा. कारण मी पहिले इतका मधुर राग कधीही ऐकला नव्हता. मी पण तो ऐकला आणि आत्मसात केला आहे. मी धन्य झालो.'' पण गंधर्व क्रोधित झाला, ''तुझा अंदाज बरोबर आहे. हा देव-दरबारातील राग आहे.



म्हणूनच जर तू हा राग दुसऱ्या कुणाला पूर्णपणे शिकवलास तर दुसऱ्याच क्षणी तू हा राग विसरून जासील.'' असा शाप देऊन तो गंधर्व अदृश्य झाला.

एवढे सांगून कश्यप म्हणाला, ''हा राग मला महित आहे. जो कोणी हा राग गाऊन दाखवेल, त्याला राजा अवश्य दरबारात नियुक्त करेल.'' असे म्हणून कश्यपने गंधर्व रागाचा थोडा अंश म्हटला आणि थांबला. देशवर्मा तल्लीन होऊन ऐकत होता. इतके सुमधुर संगीत त्याने आधी कधीही ऐकले नव्हते, देशवर्मा हात जोडून म्हणाला. ''महोदय आपण मध्येच का थांबलात? ह्यातील सर्व पदं मला शिकवा.''

''इतका आतूर होऊ नकोस. तुला शिकवल्याबरोबर दुसऱ्याच क्षणी मी हा राग विसरुन जाईन. माझी संपूर्ण संपत्ति म्हणजे संगीत आहे. माझी नातीला आई वडिल कुणी नाही. तिचा विवाह करणे ही माजी पहिली जवाबदारी आहे. त्यानंतरच मला शांतता मिळेल.'' जवळच बसलेल्या नातीकडे अंगुलीनिर्देश करीत कश्यप म्हणाला. थोडा विचार करुन देशवर्मा म्हणाला, ''मला राजधानी ला जाण्यासाठी फक्त तीनच दिवस उरले आहेत.'' पण कश्यप ने आधी त्याचे जप-तप पूर्ण केले. मग देशवर्माला आपल्या समोर बसवले. मागे त्याची नात तंबोऱ्यावर साथ देणार होती. मग कश्यपने गंधर्व रागाचे आलाप सुरु केले. रागाच्या प्रत्येक स्वरावर प्रकाश टाकला. देशवर्मा आणि कश्यपची नात दोघेही प्रभावित झाले. देशवर्माच्या आनंदाचा उद्वेग पाहून त्याची नात म्हणाली, ''माझ्या आजोबांनी मघाशी जे सांगितले त्याव रून वाटते की तुम्ही माझ्याशी विवाह केला तरच ही संगीत संपदा तुम्हाला मिळेल. पण तुम्ही गेल्यावर मी त्यांच्याशी ह्याबाबत बोलले. त्यांना सांगितले माझा विवाह आणि संगीत शिक्षणाची सांगड घालू नये. त्यांनी ते मान्य केले आहे. आता तुमच्या मनावर काही दडपण आणू नका.''

''तुमच्याशी विवाह करण्यास मला अजिबात संकोच नाही. पण एक गोष्ट सांगू इच्छितो कि मी आता राजधानीत जाऊन संगीत-स्पर्धेत भाग घेण्याचा विचार सोडून दिला आहे.'' देशवर्मा म्हणाला.

वेताळने एवढी गोष्ट झाल्यावर विचारले, ''राजन् देशवर्मा, इतके दिवसराजधानीला जाऊन संगीत विद्वान होण्याचे स्वप्न बघत होता. ऐहिक सुख आणि प्रसिद्धी त्याला हवी होती. म्हणूनच त्याने कश्यपला अपूर्व राग शिकवण्याची विनंति केली. कश्यपच्या नातीने नंतर हे पण स्पष्ट केले कि त्यामागे त्यांचा काही स्वार्थ नाही. तरीसुद्धा देशवर्माने राजधानीस न जाण्याचा निर्णय का घेतला? शेवटच्या क्षणी त्याच्यात विरक्ति उत्पन्न झाली असावी का? कि त्याच्याकडे मानसिक बळ नसल्याने जे प्राप्त झाले ते गमावले? हे त्याचे अज्ञानच नाही का? माहित असून उत्तर दिले नाहीस तर तुझे मस्तक धडावेगळं होईल.''

विक्रम उत्तरादाखल म्हणाला, ''कुठला ही कलाकार आपल्या ऐहिक सुखासाठी किंवा धन-दौलत मिळवण्या साठी आपली कला विकत नाही. देशवर्माचा परिवारतर संगीत विद्वानांचाच होता. देशवर्माच्या परिवारातील सदस्य पण कधी राजाच्या शरणार्थ गेले नव्हते. जे आहे त्यात समाधान मानून होते. तरी त्यांचा आदर होत होता. पण देशवर्माला दरबारी संगीत विद्वान होण्याची आकांक्षा होती. ह्यामुळे त्याला मानसिक बळ नसल्याचे स्पष्ट होते. पण जेव्हा त्याने कश्यप कडून अपूर्व राग ऐकला तेव्हा त्याला वाटले हा राग स्पर्धेत म्हणणे उचित नाही. सगळ्यांनाच ऐकवला तर ह्या रागाचे काहीच मोल रहाणार नाही. जो कलेची आराधना करतो त्याच्या आत्म्याला आनंद दिला पाहिजे. खऱ्या कलाकाराला आपल्या स्वार्थासाठी कला उपयोगात आणायला आवडत नाही. त्यामुळे असे समजणे चुकीचे आहे कि देशवर्माकडे मानसिक बळ नसल्यामुळे साध्य केलेले त्याने गमावले. आणि तो अज्ञानी आहे हे म्हणणे पण अगदी चुकीचे आहे.'' राजाचे मौन भंग करण्यात सफल झालेला वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा झाडावर जाऊन बसला.

**आधार : किरण चतुर्भुजची कथा**





# चांगला धडा शिकवला

चंद्रपुर येथील कल्याणरामचा परिवार अतिथीच्या आदर सत्काराबद्दल प्रसिद्ध होता. एक दिवस विकास नावाचा त्यांचा नातेवाईक त्यांच्या घरी आला. लहान मुलांना रडवण्याची त्याला फार हौस होती.

कल्याणरामचा नातू श्रीराम दहा वर्षांचा होता. त्याला चित्रकलेची आवड होती. दिवसभर तो कशाचेतरी चित्र काढीत बसायचा. त्याने घोडयाचे चित्र काढले आणि ते विकासला दाखवले. त्याला वाटले विकास आपल्या चित्राची तारीफ करेल. पण विकासने त्या चित्राकडे बघितले आणि गाढव छान काढलेस असे म्हणून जोर जोरात हसू लागला. मग जमलेल्या शेजारच्या मुलांनी पण विकासच्या शेऱ्यामुळे हसायला सुरुवात केली.

श्रीरामला वाटले मुद्दाम त्याचा अपमान केला जात आहे. विकास श्रीरामला म्हणाला, "तू चित्र छान काढतोस. हे गाढवाचे चित्र फार छान जमलेय. आता एक गोष्ट लक्षात घे. तुला घोडयाचे चित्र काढायचे असेल तर गाढवाचे चित्र बघून बघून काढ. मग तो घोडा वाटेल." परत विकास म्हणाला, "असे इथून पुढे तुझे प्रत्येक चित्र मला दाखव. मी सांगेन कि ते कशाचे चित्र आहे. माझ्या सल्ल्यामुळे तू चांगला चित्रकार बनशील. तुझी ही कला सुधारण्यासाठी मी तुला मदत करेन."

त्याच्या ह्या बोलण्यामुळे शेजारची मुले अजून जोरजोरात हसायला लागली. आता मात्र श्रीरामला सहन झाले नाही. त्याने घोडयाचे चित्र घेतले आणि शेजारच्या चंद्रपालकडे गेला.

चंद्रपाल हा उत्तम चित्रकार होता. त्यानेच श्रीरामला चित्रकलेसाठी प्रोत्साहन दिले होते. श्रीरामने सांगितलेली हकिगत ऐकून आणि घोडयाच्या चित्रांकडे बघुन तो म्हणाला, "तू पहिल्यापेक्षा चांगले चित्र काढायला लागला आहेस. पण तू घाई खूप करतोस. कुठलीही कला शिकण्यासाठी श्रद्धाभाव आवश्यक आहे. जर तू श्रद्धेने शिकण्याचे वचन दिलेस तर चित्रकलेतील बारकावे मी तुला शिकवेन. थोडे दिवस अभ्यास करुन जसे बघतोस तसेच चित्र हुबेहुब काढता येईल."

श्रीरामने निश्चय केला कि मी मन लावून चित्रकलेचा अभ्यास करेन. दररोज तो चंद्रपालकडे जाऊन चित्रकला शिकू लागला. दिवसें दिवस त्याच्या कलेत प्रगति होत होती. त्याच्या चित्रांमध्ये भाव तरळू लागले. पण विकास त्याच्या प्रत्येक चित्रात काहीतरी चुका काढून नावं ठेवायचा.



दोन महिन्यानंतर श्रीराम चंद्रपालला म्हणाला, "विकासला मी काढलेलेचित्र आवडत नाही ह्याचे मला फार वाईट वाटते." त्याच्या बोलण्यात निरुत्साह आणि नाराजी होती.

चंद्रपालने स्वतः एक चित्र काढले आणि म्हटले, "हे चित्र विकासला दाखव आणि सांग तूच काढले आहेस. मग उद्या येशील तेव्हा सांग तो काय म्हटला." श्रीरामने ते चित्र बघितले. ते गदाधारी भीमाचे चित्र होते. चित्र खूपच छान होते. अगदी सजीव वाटत होते. ते चित्र जेव्हा त्याने विकासला दाखवले तेव्हा तो म्हणाला, "तुला भीमाचे चित्र काढायचे होते पण जांबुवताचे झाले." श्रीराम म्हणाला "नाही हे भीमाचेच चित्र आहे." नेहमीप्रमाणे कुत्सितपणे हसत विकास म्हणाला, "तुला कुठल्यातरी एका युगाचे चित्र काढायचे असते आणि मध्येच दुसरे युग येऊन जाते." श्रीराम चंद्रपालकडे गेला आणि झालेली घटना सांगितली. आणि म्हणाला, "तुम्हाला चित्रकला येत नाही म्हणूनच मलासुद्धा येत नाहीए! तुम्ही मला काय शिकवणार?" मग चंद्रपालने विचारले, "मला तर संशय येतोय की विकास कोत्या मनाचा आहे. तू मला सांग कसा आहे हा विकास?" "दोन महिन्यांपासून आमच्या घरी ठाण मांडून बसला आहे. रोज त्याला जे पाहिजे ते पक्वान्न करायला सांगून जेवतो. सगळ्यां कडून स्वतःची सेवा करवून घेतो. जायचे

अशोक पवार

नावच घेत नाही. सगळ्यांना त्याची चीड आलेली आहे.'' श्रीरामने सांगितले.

''ठीक आहे मी एक चित्र काढतो. जेव्हा विकास सगळ्याबरोबर बसलेला असेल तेव्हा ते चित्र विकासला सोडून सगळ्यांना दाखव. सगळ्यांना सांग की हे चित्र तू स्वतः काढलेस. त्याला धडा शिकवलाच पाहिजे.''

श्रीरामने चंद्रपालने सांगितल्याप्रमाणेच केले. ते चित्र पाहून त्याच्या आजोबांनी म्हटले, 'डुकर'. आजीने म्हटले 'रेडा'. वडिलांनी म्हटले 'गाढव', आई म्हणाली 'बैल'. लहानांमध्ये एकाने 'कुत्रा' तर दुसऱ्याने 'लांडगा' म्हटले.

हे सगळे ऐकत असताना विकासला मजा वाटली. तो उत्साहाने म्हणाला, ''जरा मलासुद्धा एकदा दाखव. मी पण सांगेन ते चित्र मला कशाचे वाटते.'' असे म्हणत त्याने ते चित्र आपल्या हातात घेतले. बस बघितल्याबरोबर त्याचा चेहरा पडला. ते विकासचेच चित्र होते. त्याला समजले कि घरातले सगळेजण आपल्यावर नाराज आहेत. आपला किती तिटकारा करतात. आपण श्रीरामच्या चांगल्या चित्रालासुद्धा नावं ठेवत होतो आणि उगीचच चुका काढीत होतो. आता आपलीच वर्तणुक त्यांनी सगळ्यांनी अंमलात आणली आहे. विकास लगेचच आपल्या गावी परत गेला.

कल्याणराम खूश होत श्रीरामला म्हणाला तुझ्या चित्रांना सतत नावं ठेवणाऱ्या विकासला तू धडा शिकवला आणि आमचा पण फायदा झाला. तेवढ्यात चंद्रपाल तिथे आला आणि कल्याणरामला म्हणाला, ''श्रीरामला चित्रकलेची आवड आहे. त्याला प्रोत्साहन दिले तर तो एक उत्तम चित्रकार होऊ शकेल. त्याच्या चित्रांची मस्करी करु नका. लहान मुलांच्या बौद्धिक शक्तीला वाव मिळावा, त्यांनी एखाद्या क्षेत्रात कौशल्य दाखवावे ह्यासाठी मोठ्यांचे प्रोत्साहन आणि त्यांच्याशी चांगल्या गोड गोष्टी आवश्यक आहेत. ही मोठ्यांची जबाबदारी पण आहे.

कल्याणरामाने आपल्या नातवाला प्रेमाने जवळ घेतले आणि त्याची पाठ थोपटली. आता श्रीराम खूपच आनंदित झाला.





# केरळच्या भूमित

शब्द : मीरा नायर
चित्र : गोपकुमार




अरब सागराच्या बरोबर कर्नाटकपासुन पुढे गेलो कि आपण केरळला पोहोचतो केरळची हिरवीगार अरुंद किनारपट्टी ५५० कि.मी. लांब आहे. 'केर' म्हणजे नारळ म्हणून 'केरळ' 'नारळाच्या झाडांचा देश' केरळ. मुळातील ह्याचे नाव 'चेरलम्' होते. म्हणजे समुद्र बाजुला झाल्याने निर्माण झालेली जमिन, परशुरामने आपला परशु समुद्रात फेकल्याने ही भूमि निर्माण झाली अशी मान्यता आहे. भूवैज्ञानिकांच्या म्हणण्यानुसार भारतीय भूखंड तयार झाल्यानंतर केरळची जमिन ज्वालामुखीमुळे निर्माण झाली.

इसवीसना पूर्वीपासुन इथे रोम, अरबस्तान, इजिप्त, ग्रीक, असीरिया येथून मलबार येथे व्यापारी येत असत. मुख्यतः येथे मिळणाऱ्या काळे मिऱ्यासाठी. कण्णूर, तलशेरी, कोषिकोड, पदल्यानी, बेइपोर आणि कोइलांडी ही उत्तर मलबार चे समृद्ध बंदरे आहेत.

उत्तर केरळच्या कण्णूर जिल्ह्यात एषिमला ही खडकाळ टेकडी २९६ मीटर उंचीची आहे. ती २५० मीटर खोलवर समुद्राच्या आत आहे. एषिमला येथे नेव्ही अकॅडमी सुरु होणार आहे.

भारतीय सर्कसची सुरुवात केरळमध्ये झाली. ही गोष्ट लक्षात ठेवण्याजोगी आहे.



एषिमला आणि खडकाळ समुद्रकिनारा

कि आजही भारतातील जवळजवळ सर्वच सर्कशींचे संचालन कण्णूर - तलशेरी येथील मल्याळी लोकांच्या हातात आहे. देशातील पहले सर्कस प्रशिक्षण केंद्र १७०१ मध्ये कुंजिरामनने तलशेरी येथे स्थापन केले. ते केरळच्या सामाजिक खेळासाठी 'कलरिपयट्टु' साठी प्रसिद्ध होते.



तलशेरीच्या दक्षिणेला एक छोटे से सुंदर शहर आहे, माहे. हा केंद्र शासितप्रदेश पॉडिचेरीचाच एक भाग आहे. आधी ह्याचे नाव 'मय्यषि' असे होते. मग फ्रेंच लोकांनी कॅप्टन बेर्ना फ्रान्स्वा माहे द लाबूर्दने च्या नावावर ह्या शहराचे नाव माहे केले. ह्या कॅप्टनने हे शहर फ्रेंच लोकांसाठी आपल्या ताब्यात ठेवले होते. जेव्हा फ्रेंच लोक भारत सोडून जाऊ लागले तेव्हा त्यांनी ह्या शहरात रहाणाऱ्या सर्वांनाच फ्रेंच नागरिकता देण्याची सवलत जाहिर केली होती ह्या केंद्रशासित प्रदेशातील बरेचसे लोक फ्रेंच नागरिक आहेत. फ्रेंच संसदेत विदेशात रहाणाऱ्या फ्रेंच नागरिकांसाठी त्यांचा एक प्रतिनिधी असतो.

माहेच्या दक्षिणेला आहे वडकेरा किंवा वडगरा, जे मोठे व्यापार केंद्र आहे. इथे मुख्यत्वे काळे मिरे आणि नारळाचा व्यापार होतो. उत्तर मलबारच्या लोक कथांमधील महानवीर तच्चोलि ओतेनन् चे जन्मस्थान वडगराच होते. याचे बहादुरीचे गुणगान 'वडक्कन् पाट्टुकल्' मध्ये गायलेले आहे, जे उत्तर मलबारचे पोवाडया सारखे गीत आहे. वडगराच्या जवळ एका मंदिरात ओतेनन् च्या सन्मानार्थ दरवर्षी उत्सव साजरा करतात.

पुढे दक्षिणेकडे गेले तर आपण पंदलयानी येथे पोहोचतो. ज्याचे फार ऐतिहासिक महत्त्व आहे. इथे सहाव्या शतकात बनवलेली एक मशिद आहे जी मक्का शरीफ च्या मशिदीसारखीच आहे. ही मशिद मलिक इब्न दीनार ने बांधली. ह्याच्या घुमटावर तांब्याची चादर मढवलेली होती. ह्या बाजूने जाणारी अरबी जहाजे ह्या मशिद चे दर्शन घेण्यास हमखास इथे थांबत होती मशिदीजवळ



कोषिकोड, जेथे कोंबडा आरवतो

## कोषिकोड आणि मुर्गेच्या बांड

समुद्रकिनाऱ्यावर एक पदचिन्ह बनवलेले होते. इथे रहाणारे लोक असे मानतात कि हजरत आदम श्रीलंकेला जाताना वाटेत भारताच्या भूमिवर उतरले, त्यांचे हे चरणचिन्ह आहे.



दक्षिणेकडे आणखी पुढे गेल्यास कोषिकोड येते, ज्याला पहिले इंग्रजी शैलीत कैलिकट म्हणत असत. ईसवी सन च्या नवव्या शतकात मलबारचा अंतिम शासक चेरमान पेरुमाल् आपले राज्य आपल्या सरदारांमध्ये वाटून मक्क्यास जाऊ लागला. तेव्हा जामोरिन नावाच्या सरदाराला तो म्हणाला की तालिच्या मंदिरातून जर कोंबडा आरवला तर त्या कोंबड्याचे आरवणे जिथपर्यंत ऐकू जाईल ती सर्व जमिन तुझी होईल. तेव्हापासून हा प्रदेश कोषिकोड म्हणजेच कोंबडा आरवणारी भूमि म्हणून ओळखला जाऊ लागला. खरं म्हणजे 'जामोरिन' ही एक पदवी आहे. 'समुद्रिन' (समुद्राचा स्वामी) ह्या शब्दाचे ते बदलेले रुप आहे.

जामोरिनांनी कुंजलि मरक्कार ह्या नावाने प्रसिद्ध असलेल्या आपल्या जलसेनापतिंच्या मदतिने कोषिकोडला खूप शक्तीशाली राज्य बनवले.

१५ व्या शतकाच्या सुरवातीला चीनचे सामुद्रिक व्यापारी कोषिकोड बरोबर व्यापार करुन सोनो चांदी तांबे आणि रेशीम देऊन काळे मिरे, दालचिनी, आले आणि सुती कपडा इथून घेऊन जात. वास्को-द-गामा ने कोषिकोड जवळच



जामोरीनच्या सेवेत वास्को-द-गामा

२० मे १४९८ ला भारताच्या भूमिवर पाय ठेवला. हीच ऐतिहासिक घटना ठरली वास्को-द-गामाने भारत आणि आशियातील इतर देशांमध्ये पोहचण्याचा सामुद्रिक मार्ग युरोपियन लोकांसाठी शोधला त्यामुळे बऱ्याच देशांचे भाग्य बिघडले आणि बदलले.

वास्को-द-गामा ने जामोरिन ची भेट घेतली. जामोरिन ने त्यांचे स्वागत केले पण त्यांनी जो नजराणा आणला (टोप्या, कपडे, पोवळ्यांच्या माळा वगैरे) त्याचा काही फारसा प्रभाव पडला नाही. खूप टाळाटाळ केल्यानंतरच त्याने वास्को द गामा ला कोषिकड येथे व्यापाराची आणि किल्ला बांधण्याची परवानगी दिली.

इंग्रज ई.स. १६९५ मध्ये पहिले कोषिकड येथे आले. पण त्यांची ईस्ट इंडिया कंपनी ई.स. (१७९२ मध्ये टीपू सुलतान बरोबर झालेल्या तहानंतरच ह्या शहरावर कब्जा करु शकली.

कोषिकोड आता इमारती लाकडासाठी प्रसिद्ध आहे. कल्लाई येथील इमारती लाकडाचा साठा जगातील मोठ्या साठ्यांपैकी एक मानला जातो.

कोषिकोड पासून, ९ कि.मी. दक्षिणेला बेपोर आहे. टिपू सुलतानने ह्याला 'टिपू पट्टणम' नाव देऊन मलबारची राजधानी बनवले. इथे नाव तयार करण्याचा कारखाना आहे आणि नारळाचा व्यापार होतो.

**लाकुड नेणारा हत्ती, बायबल मध्ये वर्णन केलेल्या राजा सालोमान चे मंदिर केरळच्या सागवानी लाकडानेच बनवले.**







# पुरातन मंदिर

**खूप** पूर्वीच्या काळी दंडकारण्यात रक्तपिपासु नावाचा एक राक्षस होता. आपली भूक भागवण्यासाठी तो जंगली पशुंना मारुन खात असे. त्याला मानवी मांसाहार जास्त आवडत असे. पण त्या भागात मनुष्य क्वचितच नजरेस पडत असे. जर कधी चुकुनसुद्धा एखादा मनुष्य दृष्टिस पडला तर राक्षस त्याचा पाठलाग करुन त्याला पकडून खात असे. मग दोन दिवस आपल्या गुहेमध्ये आराम करीत असे.

ह्या जंगलात एक पुरातन मंदिर होते. ह्यात किरणाक्षिणी नावाच्या देवीची मूर्ति होती. ह्या देवीची शक्ती अद्भुत होती. कोणे एके काळी इथे एक संपन्न राज्य होते. जो कोणी ह्या देवीला शरण जात असे त्याला देवी वरदान देत असे आणि त्याची इच्छापूर्ति करीत असे. एकदा त्या राज्यात महाभयंकर भूकंप झाला आणि अर्धे राज्य जमिनीखाली गाडले गेले. उरलेसुरले लोक दुसऱ्या आजुबाजुच्या राज्यांमध्ये निघून गेले. पण किरणाक्षिणीच्या देवळाला मात्र भूकंपाचा जरासुद्धा धक्का बसला नाही. थोड्याच कालावधीत राज्याचा उर्वरित भागसुद्धा अरण्यामध्ये रुपांतरित झाला.

हे अरण्य रक्तपिपासु राक्षसाचे राहण्याचे ठिकाण बनले. एके दिवशी रात्री त्याला खूप भूक लागली आणि तो एखाद्या पशुच्या शोधार्थ गुहेतुन बाहेर पडला. चांदणी रात्र होती. किरणाक्षिणी देवी मूर्तितून प्रगट होऊन बाहेर चांदण्यात फिरत होती. रक्तपिपासुने तिला लांबूनच बघितले आणि त्याच्या तोंडाला पाणी सुटले. आनंदाने तो जोरात ओरडला. त्याच्या ओरडण्याचा आवाज

**अविनाश बापट**



जंगल भर दुमदुमला. तो किरणाक्षिणीच्या रोखाने चालू लागला. तो जवळ आल्यावर देवीने उग्र नजरेने त्याला बघत म्हटले, ''अरे अधम राक्षसा, तुला माहित नाही मी कोण आहे आणि तू सरळ मला खायला येत आहेस? मी किरणाक्षिणी देवी आहे.''

विकट हास्य करीत राक्षस म्हणाला, ''तू कोणीही असली तरी मला त्याची परवा नाही. माझ्या दृष्टिने माझी भूक मिटवणारा रुचकर पदार्थ तू आहेस.''

''तुझ्या ह्या घमेंडीसाठी शिक्षा मिळायलाच हवी.'' असे म्हणत किरणाक्षिणी ने आपला शूळ हातात घेतला आणि राक्षसाकडे फेकला. त्या शूळातून लाल रंगाची किरणे निघाली आणि ती राक्षसाच्या डोळ्यांवर पडली. तो आंधळा झाला. आता त्याला देवीच्या शक्तीची कल्पना आली. तो देवीच्या पाया पडला आणि विनवणी करु लागला, ''हे माते, अजाणतेपणाने माझ्याकडून अपराध झाला, मला क्षमा कर.''

देवी शांत झाली आणि म्हणाली, ''तुझा अपराध अक्षम्य आहे. तुझ्यासारख्या घमेंडी राक्षसाला थोडी तरी शिक्षा मिळायलाच हवी. तुला फक्त एका डोळ्याने बघण्याची शक्ती देईन.''

ह्यावर राक्षस खूष झाला. तो देवीला म्हणाला, ''माते, इथून पुढे मी तुझा दास झालो. असा वर दे कि ज्यामुळे रोज मी तुझे दर्शन घेऊ शकेल.''

देवीने पुरातन मंदिर दाखवले आणि म्हटले, 'तेच माझे निवासस्थान आहे. इथून पुढे नर मांस भक्षण करु नकोस. राक्षसजन्मापासुन मुक्ति मिळवण्याचा प्रयत्न कर. मी माझ्या सदाचारी भक्तांची इच्छा नेहमी पूर्ण करते.'' रक्तपिपासूने श्रद्धापूर्वक देवीला नमस्कार केला. आणि देवी अदृश्य झाली. राक्षस गुहेकडे निघून गेला.

ही घटना जेथे घडली तेथे एक वडाचे झाड होते. ह्या झाडाच्या फांद्यामध्ये विश्वनाथ लपला होता. त्याने ही घटना बघितली. तो वैशाली राज्याचा गुप्तचर होता. आता त्याला समजले किरणाक्षिणी देवी किती शक्तीशाली आहे. झाडावरुन उतरुन तो देवळात गेला. आणि देवीच्या समोर उभा राहून म्हणाला, ''माते जे घडले ते मी बघितले. माझा मुलगा मुका आहे. मी खूप प्रकारचे इलाज केले पण काही उपयोग झाला नाही. आशीर्वाद दे, ज्यामुळे तो बोलू शकेल.'' प्रार्थना करुन तो निघून गेला.

एक आणखी विचित्र घटना घडली. थोड्या वेळाने झाडांच्या मागून वीरबाहु नावाचा एक तीर्थयात्री बाहेर आला. तो उदयपुरचा नागरिक होता. त्याने पण घडलेली घटना बघितली होती. राक्षसाची त्याला अजुनही भीती वाटत होती. घाबरतच तो देवळात आला आणि म्हणाला, ''हे माते, मी निपुत्रिक आहे. मला वरदान दे, मला पुत्र होऊ दे.''

थोड्या दिवसांनी विश्वनाथ आणि वीरबाहु आपापल्या राज्यामध्ये परत गेले. विश्वनाथचा मुलगा आता बोलु लागला. त्याला किरणाक्षिणी देवीची महानता प्रत्ययास आली म्हणून त्याने वैशालीच्या राजाला झालेली हकिगत सांगितली आणि म्हणाला, ''महाराज, आपण किरणाक्षिणीच्या देवळाचा पुनरुद्धार करावा आणि आशिर्वाद मिळवावा. आपल्या राज्यातील प्रजेला त्या देवीच्या दर्शनाचे भाग्य मिळाले तर तुमचे नाव चारही दिशांना प्रसिद्ध होईल.''

उदयपुर राज्यात पोहोचल्यावर वीरबाहुला समजले कि त्याची पत्नी गर्भवती आहे तेव्हा तो खूप खुश झाला. त्याने आपला राजा सूर्यकेतु ह्याला किरणाक्षिणी देवीच्या शक्तीविषयी स्वतःची खात्री पटल्याचे राजाला सांगितले आणि पुरातन देवळाचा पुनरुद्धार करण्याचा आग्रह केला. त्याने बघितलेली घटना सुद्धा राजाला सांगितली. दोन्ही राजा आपापले



सैन्य घेऊन त्या देवळापाशी आले राजा चंद्रकांतने आधी देवीच्या मूर्तिची पुजा केली तेवढ्यात तिथे उदयपुरचा राजापण आला. दोघे जेव्हा समोरासमोर आले तेव्हा त्यांना हकिगत कळली.

चंद्रकांत म्हणाला, ''महाराज सुर्यकेतु, हे अरण्य आमच्या राज्याच्या सीमेच्या आत आहे. मी किरणाक्षिणी देवीसाठी एक मोठे मंदिर बनवणार आहे.

ह्यावर सुर्यकेतु म्हणाला, ''महाराज आपण चुकीचे सांगत आहात. हे अरण्य आमच्या राज्याच्या सरहद्दीत आहे, माझा संकल्प आहे कि देवीसाठी मी अपूर्व मंदिर बांधेन.''

अशाप्रकारे दोन्ही राजांमध्ये वादविवाद झाला. आवेशात येऊन दोघांनी म्यानातून तलवारी बाहेर काढल्या आणि आपापल्या सैन्याला युद्धास तयार रहाण्याचा आदेश दिला.

त्याचवेळी रक्तपिपासु तेथे आला. आता काय होणार हे त्याला समजले. रागाने तो लालबुंद झाला. त्याने म्हटले ''अरे मुर्खानो युद्ध म्हणजे रक्तपात. तुम्हा दोघांना फक्त आपले राज्य आणि आपली प्रजा ह्यांची काळजी आहे. संपूर्ण जनतेच्या कल्याणाबाबत तुम्ही विचार करायला तयार नाही. देवीला शांतता हवी आहे. भांडणं नकोत. तुम्ही दोघेही मिळून ह्या पुरातन मंदिराचा उद्धार करा. दोन्ही देशाची प्रजा दर्शन करु शकेल अशी व्यवस्था करा. माझे ऐकणार नसाल तर तुम्हा दोघांना मी आताच खाऊन टाकेन.''

त्याचक्षणी किरणाक्षिणी प्रगट झाली आणि म्हणाली, ''रक्तपिपासु, राक्षस असूनही तु हे दाखवून दिलेस की ह्या दोन अधम मनुष्यांपेक्षा तुला सदसद विवेकबुद्धी आहे. आता मी तुझ्या दुसऱ्या डोळ्यालासुद्धा दृष्टि प्रदान करते.'' एवढे बोलून ती अदृश्य झाली.

चंद्रकांत आणि सूर्यकेतु दोघेही लज्जित झाले. देवीने त्यांना अधम आणि राक्षसाला सद्विवेकी म्हटले. दोघांना आपली चूक समजली. दोघांनी मिळून पुरातन मंदिराचा पुनरुद्धार केला आणि दोन्ही राज्यातील प्रजा दर्शन घेऊ शकेल अशी सोय केली.





चांदोबा

# सोनेरी क्षण

## साहसी अंतरिक्ष - यात्रा

देवा अंतरिक्षातील योद्धा आहे. तो दुष्टो निवास-स्थळांचा विध्वंस करण्यासाठी तो आपल्या क्सोरा या अंतराळया-नातून अंमारक ग्रहावर पोहोचला.

तेव्हाच

स्ट्राइडसनी आम्हाला जखमी केले.



# मुखवटा तयार करा.

**खालील पद्धतिने तुम्ही तुमच्या चेहऱ्याच्या मापाचा मुखवटा तयार करु शकता**

१. तुमच्या चेहऱ्याचा आकाराचा पट्टी आणि डिंक एकत्र करुन साचा तयार करा आणि वाळू द्या.



३. जेव्हा पेपरचा थर पूर्ण वाळेल तेव्हा आतील पट्टी आणि डिंकाचा थर काढून टाका. डोळे नाक आणि तोंड याचे आकार कापा. आजूबाजूने व्यवस्थित गोलाकार कापा. नंतर योग्य रंग द्या. भुवया आणि मिशीसाठी लोकर वापरा.



२. जुना पेपर फाडून लहान लहान तुकडे कापा. आणि साच्यावर चिटकवा. डिंक वाळल्यावर अजून एक थर द्या. अशा प्रकारे चार थर देऊन आठवडाभर वाळू द्या.







## तीन सोप्या क्रमात मांजरीचे चित्र





# महाभारत

**पां**डव द्यूत हरले. वनवासासाठी ते द्रौपदीसहित हस्तिनापुरहुन अरण्याकडे निघाले. इंद्रसेन इत्यादि चौदा सेवक रथ घेऊन त्यांच्याबरोबर गेले.

रस्त्यात वर्धमानपुर नावाच्या गावावरुन जाताना हस्तिनापुर मधुन काही लोक आले. ते म्हणाले, ''धर्मराज आम्ही पण तुमच्याबरोबर येतो. जेथे आपण आहात तेथे सुख शांति आहे. आम्हाला माहित आहे कि आपल्या गैरहाजरीत तेथे अधर्म होईल, अन्याय होईल सदाचारी व्यक्तिंचा अनादर होईल. आम्हाला तुमच्याबरोबरच रहाण्याची अनुमती द्यावी.''

धर्मराजाने त्यांना समजावीत म्हटले, ''मी तुमच्या बंधुप्रमाणे आहे. माझ्या विनंतिकडे लक्ष द्या. भविष्यात आम्हाला ज्या ज्या कष्टांना तोंड द्यावे लागेल त्याची कल्पना करुनच आमचे पितामह भीष्म, पिता समान धृतराष्ट्र आणि मातोश्री कुंती त्यांच्यापेक्षा अधिक चिंतित आहे. ते सर्वजण खूपच दु:खी आहेत. तुम्ही जाऊन त्यांची सांत्वना केलीत तर आमचे कल्याण होईल. त्यांची जबाबदारी तुमच्यावर सोपवत आहे. आपण सर्वजण खूप लांब आला आहात. आता कृपया परत जावे.''

धर्मराजाची विनंति ते टाळू शकले नाहीत. पांडवांच्या सहनशीलतेचे आणि विनम्रतेचे गुणगान करीत ते हस्तिनापुरास परतले.

मग पांडव रथांमध्ये बसून गंगा नदीच्या किनाऱ्यावरुन अरण्याकडे निघाले. सूर्यास्तापर्यंत ते ऐका मोठया वृक्षापर्यंत पोहोचले रात्री तेथेच मुक्काम केला. आजुबाजुच्या गावांमधुन पुष्कळ ब्राह्मण आले आणि त्यांना अनेक पुण्यकथा ऐकवल्या. अशाप्रकारे ती रात्र त्यांनी



चालवली. प्रातःकाली त्यांनी गंगेत स्नान उरकले आणि परत अरण्याकडे निघाले. काही ब्राह्मणांनी त्यांच्याबरोबर जाण्याचा आग्रह धरला.

धर्मराज त्यांना म्हणाला, "आम्ही सर्वस्व घालवले आहे. वचनबद्ध असल्यामुळे नियमाप्रमाणे आम्ही वनवासाला निघालो आहोत. तुम्ही सगळे वनवासात कसे राहू शकाल? आमच्यामुळे तुम्हाला कष्ट झाले तर आम्हाला सहन होणार नाही, म्हणून कृपया तुम्ही आपापल्या घरी परत जा."

ब्राह्मण हट्ट करीत म्हणाले, "आम्हांला तुमच्याबरोबर यायचे आहे पण तुम्हीच नकार देत आहात. हे तुम्हाला शोभत नाही."

"माझा नाईलाज आहे. माझे भाऊ पण असहाय्य आहेत. तुमच्या सगळ्यांसाठी फळं कंदमुळं आणायला मी माझ्या भावांना त्रास देऊ शकत नाही. धर्मराज म्हणाला, "आम्ही आमच्या गरजा स्वतःच भागवून घेऊ आम्ही आत्मनिर्भर राहू. आमच्यामुळे तुम्हाला कष्ट पडणार नाही. आम्हाला फक्त तुमचा सत्संग हवा आहे." ब्राह्मण म्हणाले.

धर्मराजने पुरोहित धौम्य ऋषींना म्हटले, "मुनीवर हे ब्राह्मण माझ्याबरोबर सर्व प्रकारचे कष्ट झेलायला तयार आहेत. माझे ऐकत नाही. आपणास माहित आहे कि ह्या स्थितीत मी त्यांचे पोषण करु शकत नाही. वनामध्ये ह्यांचे भोजन वगैरे कसे होईल? काही उपाय आहे का?"

"धर्मराज अन्न आदित्यमय आहे. तू सूर्याची आराधना कर आणि त्याच्या महिमेने ह्या ब्राह्मणांचे पोषण कर." असे म्हणून धौम्य ऋषींनी धर्मराजास सूर्य स्तोत्राचा उपदेश दिला.

धर्मराजाने थोडे दिवस निष्ठेने सूर्यदेवाची पूजा केली. सूर्य प्रगट झाला आणि एक तांब्याची थाळी देत म्हणाला, "धर्मराज हे अक्षय पात्र आहे. द्रौपदीने कच्चे फळं आणि कंदमुळं ह्यात ठेवले तर तुम्हाला आणि तुमच्या अतिथ्यांना पुरेल एवढा आहार तुम्हाला लाभेल" असे म्हणून सूर्यदेव अदृश्य झाले.

धर्मराजाने ते अक्षय-पात्र द्रौपदीला दिले. तेव्हापासुन कंदमुळं त्यात ठेवले तर अनेक प्रकारचे रुचकर जेवण प्राप्त होत असे.

पांडवांनी गंगेचा किनारा सोडला आणि



पश्चिम दिशेला वनातून पुढे जाऊ लागले. यमुना, दृषद्वती नद्या पार करुन ते काम्यक वनात पोहोचले. तिथे फारच सुंदर प्रदेश होता. पुष्कळ ऋषि-मुनि रहात होते.

जेव्हा पांडव काम्यकवनात होते तेव्हा धृतराष्ट्राने विदुरास बोलावले आणि म्हटले, ''विदुर, पांडव वनवासाला गेल्यापासुन लोक आमच्या पासुन दूर-दूर राहू लागलेत. ते आम्हाला अपाय तर करणार नाहीत ना? त्यांना आपलेसे करण्यासाठी काही उपाय असेल तर सांग.'' धृतराष्ट्रला मनातल्या मनात भीती वाटत होती की प्रजा आपल्या विरुद्ध विद्रोह करेल. पांडवांना परत बोलावून घेण्यासाठी आपल्यावर दबाव टाकेल.

''राजन, सगळ्याचा उपाय आहे धर्म! तू धर्माचे पालन कर. असे करुन तू पांडवांचे आणि आपल्या पुत्रांचे रक्षण कर. शकुनिने पांडवांना धोका देऊन त्यांचे राज्य हडपले. पांडवांमध्ये तुझ्या पुत्रांचे निर्मूलन करण्याची शक्ती आहे. धर्मराजाचे राज्य परत दे. दुर्योधन, शकुनि, कर्ण इत्यांदींनी धर्मराजाचे प्रभुत्व स्वीकारावे आणि द्रौपदी व भीमाची क्षमा मागावी. धर्मराज अवश्य त्यांना क्षमा करेल. माझा सल्ला विचारला म्हणून मला जे योग्य वाटते तेच मी सांगितले.''

धृतराष्ट्र क्रोधित होऊन म्हणाला, ''आपल्या सख्ख्या मुलांचा परक्या मुलांसाठी कसे त्याग करु. तुझे बोलणे उचित आहे? मी तुझा किती आदर करतो पण काय फायदा? तुझी बुद्धीच वक्र आहे. तू माझ्या मुलांवर जळतोस, त्यांचे कल्याण व्हावे असे तुला वाटत नाही. जेव्हा बघावे तेव्हा पांडवच उत्तम, महान हाच जप चालू असतो. पाहिजे असल्यास त्यांच्या बरोबरच जाऊन रहा. आणि तिथे पण जायचे नसेल तर जिथे पाहिजे तिथे जा.''

विदुरने तावडतोब रथ मागवला आणि काम्यकवनाकडे निघाला, जिथे पांडव रहात होते.

विदुर जेव्हा तिथे पोहोचला तेव्हा धर्मराज ब्राह्मणाच्यामध्ये बसला होता. त्याने विदुराला येताना बघुन भीमला म्हटले, ''द्यूतात आपण आपले शस्त्रास्त्र हारलो नव्हतो. असे वाटते, शकुनि आणि दुर्योधनने परत द्यूत खेळण्याचे आमंत्रण देण्यास विदुरला पाठवले आहे. नाहीतर आपणहून विदुरश्री इथे का येतील? त्यांना





वाटत असेल विदुरश्रीने बोलावले तर आपण गेल्याशिवाय रहाणार नाही. काहीही असो, इथून पुढे मी द्यूत खेळणार नाही. अर्जुनाचे गांडीव आणि भीमाची गदा जर ते द्यूतात जिंकले तर आपण युद्ध कधीच जिंकू शकणार नाही.'' तेवढयात विदुर आलाच.

धर्मराज इत्यादिंनी त्याला उठून प्रणाम केला आणि आसनावर बसवले. यायचे कारण विचारले. विदुरने, धृतराष्ट्रने त्याला सल्ला मागणे, आपले उत्तर आणि त्यावर क्रोधित होऊन धृतराष्ट्रचे निघून जा म्हणणे, हे सगळे सविस्तर सांगितले. धर्मराजाने विदुरास म्हटले तुम्ही इथेच आमच्याबरोबर राहून पदोपदी आम्हाला न्यायोचित मार्गदर्शन करीत रहा. विदुराला माहित होते कि धर्मराज असेच म्हणेल. त्याला धृतराष्ट्र आवडत नव्हता कारण तो स्वार्थ आणि पुत्र-मोहाच्या बळी पडला होता.

धृतराष्ट्रला जेव्हा समजले कि विदुर पांडवांबरोबर काम्यकवनात रहात आहे तेव्हा बेशुद्धच झाला. त्याला भीती वाटु लागली कि विदुराच्या सल्ल्याने पांडवांचे केवळ कल्याणच होईल. थोड्या वेळाने स्वतःला सांभाळून घेत तो संजयला म्हणाला, ''संजय, विदुर माझा भाऊ आहे. तो बुद्धिवान आहे. मी थोडा कठोर वागलो तर रुसुन पांडवाकडे जाऊन राहु लागला. त्याच्या गैरहजेरीत माझी बुद्धी काम करेनाशी झाली आहे. तू लवकर जाऊन विदुराला घेऊन ये.''

संजय काम्यकवनात आला आणि येण्याचे कारण धर्मराजास सांगितले, मग विदुरास म्हणाला, ''विदुरश्री, तुमच्या निघुन येण्यानंतर धृतराष्ट्राचा जीव तळमळत आहे. तुम्हाला घेऊन येण्यास मला सांगितले आहे. तुम्ही चला आणि त्यांना जीवनदान द्या.''

धर्मराजाची अनुमति घेऊन विदुर संजयबरोबर हस्तिनापुरास आला. धृतराष्ट्राने विदुरास आलिंगन दिले आणि म्हटले, ''तू उत्तमपुरुष आहेस. माझे ऐकले आणि परत आलास. माझी बुद्धि भ्रष्ट झाली होती. मला क्षमा कर.''

विदुर म्हणाला, ''तुझ्या आज्ञेचे पालन केले. मी जे काही म्हटले ते तुझ्या चांगल्यासाठीच म्हटले. दोघेही मला आपलेच आहेत आणि एकसमान आहेत. त्यांची परिस्थिती दीन आहे म्हणून



त्यांच्याविषयी मला सहानुभूति आहे. आणि हे न्यायोचितच आहे.''

विदुर परत आल्यानंतर दुर्योधनाने, कर्ण, दुःशासन, शकुनिला बोलावले आणि म्हटले, ''विदुर परत आला आहे. माहित नाही तो पांडव पक्ष-पाती पिताश्रींना काय काय सल्ला देईल? पांडव परत आले तर मी आत्महत्या करेन.''

शकुनि दुर्योधनास म्हणाला, मूर्खासारखी बडबड करु नकोस. तुझ्या पित्याने बोलावले तरी ते परत येणार नाहीत. जरी ते आले तरी त्यांना द्यूत खेळण्यास भाग पाडू आणि त्यांना भिकारी करुन परत पाठवू.''

कर्णाने ओळखले कि दुर्योधनाला शकुनिचे बोलणे पटले नाही. मग लगेच तो म्हणाला, ''आम्ही सर्व तयारी निशि युद्धास सिद्ध होऊन निघू या आणि पांडवांचा पराभव करुनच परतु या. ते जोपर्यंत जिवंत आहेत तोपर्यंत आमचे शत्रुच आहेत. आता त्यांना मारु शकलो नाही तर कधीच शक्य नाही.''

सगळ्यांना कर्णाचे म्हणणे पटले. सैन्यासमवेत पांडवांवर आक्रमण करण्याचा त्यांनी निश्चय केला.

अगदी त्याचवेळी व्यासमुनी धृतराष्ट्राकडे आले आणि म्हणाले, ''तुझ्या पुत्रांनी मायावी द्यूतात पांडवांना हरवले आणि त्यांना त्यांच्या राज्यापासुन वंचित केले. माझ्या दृष्टिने हा त्यांच्यावर अन्याय आहे. त्यांना अरण्यात पाठवणे पाप आहे. त्या पांडवांवर आक्रमण करण्यासाठी तुझे पुत्र निघाले आहेत. जर गेले तर अपमानित होऊन येतील. तुझ्या पुत्राच्या ह्या कृत्यांना थांबव. तु, भीष्म, द्रोण, विदुर हा अधर्म बघत असुनही हातावर हात ठेवून का बसला आहात?''

धृतराष्ट्र उत्तर देत म्हणाला, ''महात्मा असे व्हावे हे आम्हाला वाटत नाही. पण माझ्या पुत्रमोहाच्या बळावर दुर्योधन मनमानी करीत आहे. तुम्हीच त्याला सन्मार्ग दाखवा.''

''मला जायचे आहे. इथे मैत्रेय नावाचे मुनि येतील तेच तुझ्या मुलाला समजावतील.'' असे म्हणून व्यास निघून गेले. त्यासांच्या म्हणण्याप्रमाणे काही दिवसांनंतर मैत्रेय महामुनि हस्तिनापुरात आले. धृतराष्ट्राला भेटले. धृतराष्ट्राने त्यांचे स्वागत करुन विचारले. ''मुनिवर आपण कुठुन आलात?''

''तीर्थयात्रा करुन मी काम्यकवनात गेलो. तिथे पांडवांबरोबर थोडे दिवस राहिलो. मग तुम्हालाबघायला इथे आलो. पांडव कंदमुळं खात आहेत. वल्कलं नेसत आहेत. त्यांना खूप कष्ट होत आहेत.'' मैत्रेयांनी आपले दुःख व्यक्त केले.

त्याक्षणी धृतराष्ट्राने विचारले, ''मुनीश्वर, पांडव सुखी आणि कुशल आहेत ना? नियमांचे उल्लंघन करुन परत तर येणार नाहीत ना?''

''सूर्य पश्चिमेला उगवेल पण पांडव नियमांचे उल्लंघन करणार नाहीत. अशा सत्पुरुषांवर तुझ्या पुत्रांनी अन्याय केला आहे. मी द्यूताविषयी सगळं ऐकले आहे.'' मग मैत्रेयांनी दुर्योधनास म्हटले, ''तुझ्यात थोडीशी जरी सद्बुद्धी बाकी असेल तर पांडवांचे प्रेम मिळव. ते खूप शूर आहेत. काम्यकवनात भीमाने किम्मीर नावाच्या राक्षसाला मारुन टाकले. तुला तर माहितच आहे कि त्याने बक, हिडिंबु, जरासंधला पण मारुन टाकले. द्रुपद-सारखा शक्तिशाली राजा, त्यांच्याबरोबर आहे. कृष्ण स्वतः त्यांच्याबाजूने आहे. अशा शूरवीरांशी कशाला तू शत्रुत्व पत्करतोस?''

दुर्योधनाने मुनिंच्या बोलण्याची चेष्टा करीत आपल्या मांड्या थोपटत हात उचलून पायाच्या अंगठ्याने जमिन उकरली. त्यामुळे मैत्रेयमुनिंना राग आला. आणि त्यांनी दुर्योधनाला शाप दिला कि तुझ्या ह्याच मांड्या भीम युद्धक्षेत्रात तोडुन टाकेल.

धृतराष्ट्र घाबरुन म्हणाला, ''आमच्यावर दया करा. असे होऊ देऊ नका.'' मैत्रेय ने म्हटले, ''ह्यावर एकच उपाय आहे. तुझ्या पुत्राने पांडवांशी वैर धरु नये. त्यांच्याशी प्रेमाने वागावे.''

धृतराष्ट्राला ऐकायचे होते कि भीमाने किर्मिर राक्षसाला कसे मारले.

''मी नाही सांगणार, विदुरास विचारले तर तो सांगेल. आता मी निघतो,'' असे म्हणत मैत्रेय तिथून निघाले.

''भीमाने किम्मीरला मारुन टाकले?'' आश्चर्यचकित होत स्वतःशीच बडबडत दुर्योधन सभामंडपातून बाहेर आला.



# उत्तम अभिनेता

अवंती राज्यात दसरा मोठ्या प्रमाणावर साजरा केला जात असे. त्या दहा दिवसांत उत्साही कलाकार आपल्या नाटकांचे प्रदर्शन करीत असत. नाटक झाल्यानंतर उत्तम अभिनेता निवडला जात असे, त्याला पुरस्कार मिळत असे आणि राजदरबारात चांगली नोकरी मिळत असे. न्याय देणारा असायचा दरबारातील महामंत्री !

एकदा प्रदर्शित केलेल्या नाटकांमध्ये तीन कलाकारांनी उत्तम अभिनय केला. योगायोगाने तिघांनीपण राजकुमाराचेच पात्र केले होते. पहिला राजाच्या साळ्याचा जवळचा नातेवाईक होता. त्याचे नाव होते रविवर्मा. त्याच्या अभिनयात काहीच चूक नव्हती. दुसरा सेनापतिचा मुलगा होता. त्याचे नाव होते शशिकांत. त्याने एक छोटीशी चूक केली त्यामुळे त्याला द्वितीय स्थान मिळाले. तिसरा जयदेव. एका शेतकऱ्याचा मुलगा होता. त्याने दोन चूका केल्या म्हणून त्याला तृतीय स्थान मिळाले.

सगळ्यांना वाटले रविवर्मालाच उत्तम अभिनेता म्हणून निवडले जाईल. पण महमंत्र्यांनी जयदेवला सर्वोत्तम अभिनेता घोषित केले.

पुरस्कार सभारंभ झाल्यावर राजा म्हणाला, ''मंत्रिवर ह्या निर्णयाने मला आश्चर्य वाटत आहे.''

तेव्हा महामंत्रि म्हणाला ''पहिल्या दोन्ही राजकुमारांनी हावभाव दर्शवण्यात काही विशेष प्रयत्न केले नव्हते. कारण रोजच्या जीवनमानाचेच दर्शन त्यांना करावयाचे होते. त्यांना ते सहज जमू शकले. पण शेतकऱ्याच्या मुलाला विशेष प्रयत्न करावा लागला. त्यामुळे छोट्या दोन चुका दुर्लक्षित केल्या तर त्याचा अभिनय जास्त अद्भुत वाटतो.

-रामभरोसे



'चांदोबा'
पुरवणी - ९४

आमच्या देशाची
वृक्षसंपदा

# ताडाचे झाड

कागदाचा शोध लागण्याआधी कातडे आणि ताडपत्र लिहिण्यासाठी उपयोगात आणले जात असे. आपल्या देशात, नेपाळ आणि तिबेट सारख्या देसांमध्ये सुद्धा प्राचीन पवित्र ग्रंथ ताड-पत्रांवरच लिहित असत. तीच पद्धत अजूनही नेपाळमध्ये चालते. आपल्या देशात ताड-पत्रांवर लिहिल्या गेलेल्या ग्रंथांना सुरक्षित ठेवण्यात आले आहे. मद्रास विश्व-विद्यालय येथील ओरियंटल मॅन्युस्क्रिप्ट ह्या पुस्तकालयात आणि तंजावर येथील सरस्वती महल पुस्तकालयात हे ताड-पत्र ग्रंथ आहेत. ह्यावर लिहिले अक्षर हजारों वर्षानंतर सुद्धा तशीच आहेत हे विशेष आहे. ह्या ताड-पत्रांवर चित्र पण काढतात.



ताडाच्या झाडाला तामिळ मध्ये ''पनै'' मल्याळम मध्ये 'पना', हिंदीत, 'ताल', गुजराथीत / आणि मराठीत 'ताड', बंगालीमध्ये 'तार', तेलगुमध्ये 'ताडिचेट्टु' म्हणतात. कलकत्त्याच्या प्रसिद्ध तारकेश्वरालय मध्ये ताडाच्या खोडामध्ये कोरुन केलेले शिवलिंग प्रतिष्ठापित केले आहे म्हणूनच ह्या देवळाला तारकेश्वरालय म्हटले जाते.

आपल्या देशात ताडाची झाडं रेताळ जमिनीत चांगली वाढतात. गंगेच्या किनाऱ्यापासुन दक्षिणेतील कन्याकुमारीपर्यंत ताडची झाडे वाढलेली दिसुन येतात. ह्या झाडाचा व्यास ६० ते ७५ सें.मी. असतो तर उंची ३० ते ४० मीटर असते. ह्याला फांद्या नसतात. डोक्यावर गोलाकार पंखा लावल्यासारखी पानांची मांडणी असते. ह्या पानांचा उपयोग घराच्या छतासाठी होतो. टोपल्या, चटया, पंखे, छत्र्या हे सुद्धा बनवता येतात. तसेच दोरखंड पण बनवला जातो. ह्या झाडा पासुन 'नीरा' हे पेय मिळते. ह्या झाडाची फळं पण स्वादिष्ट असतात. ती शरीरा तील उष्णता कमी करण्यास उपयोगी असतात.

आपल्या देशीतील ऋषि-मुनि

# उपमन्यु

उपमन्यु अयोध्येच्या धौम्य ऋषिचे शिष्य होते. विद्याभ्यास संपल्यानंतरसुद्धा गुरु ने शिष्याला घरी जाण्यास सांगितले नाही. उलट त्याच्यावर आश्रमातील गाई चारायचे काम सोपवले. आपल्या गुरुच्या उपदेशानुसार उपमन्यु गाईंना चरायला मोकळ्या रानात घेऊन गेले. चारुन झाल्याबर संध्याकाळी आश्रमात परतले तेंव्हा गुरुने त्यांना विचारले, ''संपुर्ण दिवस तू रानात होतास पण जेव्हा भूक लागली तेव्हा काय केले?'' ''जेव्हा गायी चरत होत्या तेव्हा बाजूच्या एका गावात जाऊन भिक्षा मागून आपली भूक मिटवली'' उपमन्यु म्हणाला, गुरु म्हणाले, ''गायींना अशाप्रकारे सोडून जाऊ नये'' थोड्या दिवसांनंतर गुरु ने विचारले, ''आता भूक लागल्यावर काय करतोस?''

''गायींना आश्रमात परत आणल्यानंतर गावात जातो आणि भिक्षा मागतो.'' उपमन्यु म्हणाला.

''संध्याकाळच्यावेळी गृहिणींना त्रास द्यायला नाही पाहिजे. शिवाय तुला जी काही भिक्षा मिळते त्यावर आश्रमाचा अधिकार आहे तुझा नाही,'' गुरु म्हणाले.

असेच काही दिवस गेले. गुरुने परत तोच प्रश्न विचारला. ''गायीचे दूध पिऊन भूक मिटवतो.'' शिष्य म्हणाला, ''मी तर तुला ह्याची अनुमती दिली नाही,'' गुरु म्हणाले.

एके दिवशी संध्याकाळी गायी आश्रमात पोहोचल्या. पण उपमन्यु त्यांच्याबरोबर आला नाही. गुरु सोबत इतर शिष्यांना घेऊन त्याला शोधायला निघाले. गुरुने बघितले उपमन्यु एका



खड्डयात पडून कण्हत आहे. त्याला उचलल्यावर त्यांनी विचारले कि खड्डयात कसा पडला. शिष्य म्हणाला, ''भूक सहन झाली नाही म्हणून झाडाचे एक फळ ख..ले. बहुतेक ते विषारी असावे कारण त्याने डोळ्यांनी दिसेनासे झाले.''

मग गुरुने सल्ला दिला कि दृष्टिप्राप्त करण्यासाठी अश्विनी देवतांची पूजा कर.

उपमन्युच्या प्रार्थनेनंतर अश्विनी देवता प्रगट झाली आणि त्याला आहार देऊ लागली पण उपमन्युने स्पर्श केला नाही आणि म्हटले, ''मला जी काही भिक्षा मिळेल ती प्रथम गुरुला द्यायला हवी.''

''तुझी गुरुभक्ती असामान्य आहे, म्हणून बाह्यदृष्टि बरोबरच तुला अत्यद्‌भुत अंतरदृष्टिसुद्धा प्राप्त होईल.'' असे म्हणून अश्विनी देवता अदृश्य झाली. पूर्वीच्या काळी गुरु, शिष्याच्या भलाईसाठी त्याची अनेक प्रकार परीक्षा घेत असे. उपमन्युच्या संदर्भातील हे उदाहरण त्याचा पुरावा आहे.

# तुम्हाला माहित आहे का?

१. सर रॉजर बॅनिस्टर कसे प्रसिद्ध झाले?
२. अंतराळयात्री अंतराळयानातून अवकाशात जातात तेंव्हा त्यांना आकाश निळे न दिसता दुसऱ्या रंगाचे दिसते. कोणता रंग?
३. 'लाल ग्रह' कोणत्या ग्रहाला म्हणतात?
४. कठपुतळ्यांची सुरुवात कुठे झाली?
५. आग्र्याची स्थापना कोणी आणि केव्हा केली?
६. 'रजतोत्सव' म्हणजे २५ वर्षांची समाप्ति तर 'पेपर ॲनिव्हर्सरी' म्हणजे काय?
७. 'जिप्सी' लोक कोणती भाषा बोलतात?
८. 'बाटिक' ची चित्रकला कोणत्या देशात सुरु झाली?
९. १९८१ च्या आधी टेबल टेनिस चे नाव दुसरे होते, कोणते?
१०. रक्ताचे चार गट कोणते?
११. सोने आणि इतर मूल्यवान खड्यांचे मूल्यमापनाचे परिमाण काय?
१२. पोस्टाची पेटी लाल असते. आधी दुसरा कोणता रंग होता?
१३. कुठल्या एका अंकाला (संख्येला) सोडून इतर सर्व रोमन लिपित लिहितात?
१४. झेब्राचे असामान्य गुणविशेष काय आहे?
१५. पांढरा हत्ती कुठे आहे?
१६. अटलांटिकपर्यंत एकटी विमानाने जाणारी धाडसी महिला वैमानिक कोण?

## उत्तरे

१. अगदि प्रथम चारच मिनिटात १ मैलाचे अंतर पळून पूर्ण केले.
२. जांभळा.
३. मार्स.
४. इजिप्त आणि भारत.
५. सिकंदर लोदी, १५०६ मध्ये.
६. पहिले.
७. रोमानी.
८. इंडोनेशिया.
९. 'पिंग-पाँग' हा खेळ एका ब्रिटीश कंपनीने शोधून काढला.
१०. ए, बि, ओ आणि ए, बि.
११. कॅरट.
१२. हिरवा.
१३. शून्य.
१४. कुठल्याही दोन झेब्रांना एकसारखे पट्टे नसतात.
१५. 'सायाम' (थायलंड)
१६. अमेलिया एरहार्ट, १९२८ मध्ये.